महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका वर्ष ४ थें (शके १८५३)

# लेखकानुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका, वर्ष ४ थें (शके १८५३)

# विषयानुक्रमणिका

## अभिप्राय



## ऐतिहासिक



## ग्रंथ



## निबंध



## परिषद्-वार्ता



## पुस्तक परीक्षण



## भाषिक

## शंका चर्चा इ०



## सामाजिक

# मुलींच्या ओंव्या

(सं.:—विश्वनाथ विष्णु सोहोनी, पुणें)

कोंकणांतील ब्राह्मणांच्या मुलींमध्यें करमणुकीखातर झोंपाळयावर बसून सुस्वर गळयावर ओंव्या म्हणण्याची चाल कांही वर्षांपूर्वी तरी होती. रत्नागिरी प्रांतांतील खालील ओंव्या माझ्या एका चुलतबहिणीच्या (कै. सौ. लक्ष्मीबाई फडके, पूर्वी कु. इंदिराबाई सोहोनी) साहाय्यानें जमविल्या गेल्या. अशा ओंव्या अनेक म्हणजे शेंकडों किंवा हजारों हजारही कदाचित् प्रचलित असतील.

पहिली माझी ओंवी । पहिला माझा नेम । तुळशीखाली राम । पोथी वाची ॥१॥
दुसरी माझी ओंवी । दुजा नाही भाव । चरणीं द्यावा ठाव । पांडुरंगा ॥२॥
तिसरी माझी ओंवी । तिन त्रिकूटाचे परी । महाविष्णूवरी । तुळशी पत्र ॥३॥
चवथी माझी ओंवी । चवथीच्या चांदा ॥ मोतीं तुझ्या भांगा । तुळसा देवी ॥४॥
पांचवी माझी ओंवी । पांच पांडवांना । पाठीच्या भावंडांना । विद्या येवो ॥५॥
सहावी माझी ओंवी । साउलीची छाया पडे । तुझ्या गर्भाला तेज चढे । काकूबाई ॥६॥
सातवी माझी ओंवी । सात सप्तऋषी । आठवी अरुंधती । नमियेली ॥७॥
सातवी माझी ओंवी । सात ज्योतिर्लिंगें । त्यांत माझीं दोघें । मायबापें ॥७॥
आठवी माझी ओंवी । आठ ओटे पट्टे । देवाजींचे ओटे । रंगवीले ॥८॥
नववी माझी ओंवी । नऊ नाग कुळें । पूजीत मी गेलें । पंचमीला ॥९॥
दहावी माझी ओंवी । दशरथाच्या वंशीं । कौसल्येच्या कुशीं । रामचंद्र ॥१०॥
दहावी माझी ओंवी । दशांगुळें मी गाईन । लक्ष्मुमी होईन । संवसारीं ॥१०॥
अकरावी माझी ओंवी । न करावा आळस । देवा त्रिंबकीं कळस । सोनियाचा ॥११॥
बारावी माझी ओंवी । बारा आदितवार । सूर्याला नमस्कार । घालूं दोघी ॥१२॥
तेरावी माझी ओंवी । तेरा आंऊली पाऊली । मला भेटली माऊली । तुळसा देवी ॥१३॥
चवदावी माझी ओंवी । चवदा चवकड्याची । पालखी मोतियांची । देवाजींची ॥१४॥
पंधरावी माझी ओंवी । पंधरा ह्या ग काड्या । अंबाबाईच्या साड्या । जरतारी ॥१५॥
पंधरावी माझी ओंवी । पंधरा ह्या खिडक्या । मैदानी पालख्या । देवाजींच्या ॥१५॥
सोळावी माझी ओंवी । सोळा सोमवार । वडापिंपळा बांधा पार । बापाजी हो ॥१६॥
सतरावी माझी ओंवी । सतरा शंखांची दाटणी । कृष्णाला रुक्मिणी । माळ घाली ॥१७॥
अठरावी माझी ओंवी । अठरा हे ग गडू । नैवेद्याला लाडू । मोरयाच्या ॥१८॥
एकुणिसावी माझी ओंवी । एकुणीस गोपरीया[1] (?) । आम्हि बहिणी सारिखीया ।
× × बाई ॥१९॥

---

[1] गोपर—रांगोळीची एक तऱ्हा अथवा गोपद—बांगडी. —सं. भ. सा. प.

विसावी माझी ओंवी । विसाण्या पाण्याची । निशाणें देवाचीं उभीं करा ॥२०॥
एकविसावी माझी ओंवी । एकवीस मोदक । तुम्हां मोरयाचें व्रत । + +जी हो ॥२१॥
एकविसावी माझी ओंवी । एकवीस दुर्वांचें आसन । तुम्हां मोरया प्रसन्न ।
× × जी हो ॥२१॥
बाविसावी माझी ओंवी । बाविस खंडी भात । मांगिरी[1] आलीं आंत । × ×जींची ॥२२॥
तेविसावी माझी ओंवी । तेविस खंडी वऱ्या । मांगिरी आली दर्या । × ×जींची ॥२३॥
चोविसावी माझी ओंवी । चोविस खंडी गहू । मांगिरी आली पाहूं । ++जींची ॥२४॥
पंचविसावी माझी ओंवी । पंचविसावी खुंटू नये । नांदते माझे सये । सासर माहेर ॥२५॥
सव्विसावी माझी ओंवी । सरसकट सहा देवा । आरत महादेवा । कापुराची ॥२६॥

---

××राय ग भोंवळा । सोनें जोखी तोळा तोळा । दुशीजोगा तुझा गळा । वहिनीबाई ॥१॥
माडीवरती माडी । माडीखाली तळघर । तिथें तुझा गौरीहर । ××बाई ॥२॥
माडीवरी माडी । माडीला चंदन शिडी । पुतळी केंस झाडी । ++बाई ॥३॥
माडीवरती माडी । माडीला ताटल्या ताटल्या । तबकीं तुझ्या पाटल्या । ×बाई ॥४॥
माडीवरती माडी । माडीला रवे रवे । तबकीं तुझे जवे (?)। × × बाई ॥५॥
माडीवरती माडी । माडीखाली चांफा । त्याचीं फुलें रोखा । एकादशिला ॥६॥
माडीवरती माडी । माडीखाली झरा । तोंड धुतो हिरा । + + बाळ ॥७॥
माडीवरती माडी । उपर माडी कंगोऱ्याची । लाल साडी पदराची । × ×बाई ॥८॥
माझ्या ग दारावरन । कोण गेला झपाट्याचा । कुसुंबी पागोट्याचा । ++राया ॥९॥
माझ्या ग दारावरन । कोण गेली सवाशीण । काजळ कुंकू बाळंतीण । ++बाई ॥१०॥
माझ्या दारावरन । हळदीकुंकवाचा नंदी गेला । खडा मारुनी उभा केला । ++रायानें ॥११॥
माझ्या ग दारावरन । कोण गेली परकराची । हातिं आंगठी हिरकणीची । ×बाइच्या ॥१२॥
माझ्या ग दारावरन । हरदासाचा मेळा गेला । त्यांत मी ओळखिला । ×रायाला ॥१३॥
माझ्या ग दारावरन । रंगीत गाडी गेली । कृष्णाने राधा नेली । गोकुळासी ॥१४॥
माझ्या ग दारावरन । गाडीमागे गाडी गेली । बहीण उतरली । भेटीसाठीं ॥१५॥
मुंबई शहरांत । गल्लोगल्लीं नळ । पाण्याचे केले खेळ । इंग्रजांनीं ॥१६॥
माझें घर मोठें । शिपाई वावरती । अडेसऱ्या मागूं येती । साखरेच्या ॥१७॥
मुंबईची मुंबादेवी । तिची सोन्याची पाटली । सर्व मुंबई बाटली इंग्रजाने ॥१८॥
मुंबईची मुंबादेवी । तिची सोन्याची कंबर । निऱ्या पडल्या शंभर । पैठणीच्या ॥१९॥

---

१ एक प्रकारचें गलबत अगर मचवा. रत्नागिरीकडील शब्द.

आम्ही दोघी बहिणी । × × डोंगराच्या आड । पत्र खुशालीचें धाड । × राया ॥२०॥
खाऊ मी पाठवीन । साखर पेढा रेवडीचा । माचा माझ्या आवडीचा । × बाळ ॥२१॥
कानींचे कुडुक । हालती वाऱ्याने । बोलते तोऱ्याने । × × बाई ॥२२॥
कानींचे कुडुक । हालती लुटुलुटु । बोलते पुटुपुटु । × × बाई ॥२३॥
नाकींची की नथ । आंखुड तिचा दांडा । शोभते गोऱ्या तोंडा । × × बाईला ॥२४॥
नाकींची की नथ । पडली रांझणींत । आधिं गुंतली सैपाकांत । × × बाई ॥२५॥
पुणें या शहरांत । गल्लोगल्लीं हिरे । मधूनी सखा फिरे । × × बाळ ॥२६॥
× × बाईला पाहूं आले । पुण्यांतले पुणेंकर । जरीचे परकर घालूं केले ॥२७॥
उंचशा ओसरीवरी । × × राय संध्या करी । वहिनीबाई तांब्ये भरी । उदकाचे ॥२८॥
उंचशा ओसरीवरी । रुप्याचे तांब्ये पेले । तुझे मित्र पाणी प्याले । × × राया ॥२९॥
आधिं घेतलें चंदनमंदन[1] । मग घेतला सातारा । रत्नागिरीचा पेटारा । जडावाचा ॥३०॥
हजाराचा घोडा । बाजारांत वसे । बहिणीचें घर पुसे । × × राय ॥३१॥
हजाराचा घोडा । बाजारांत उभा । तुमच्या स्वारीजोगा । × × जी हो ॥३२॥
हजाराचें ग नेसली । पन्नासाचें दांडीवरी । लेक सून मांडीवरी × × बाईच्या ॥३३॥
हजाराचा घोडा । त्याला पन्नासाची झूल । वर गुलाबाचें फूल । × × राया ॥३४॥
उंचशा ओसरीवरी । कागदाचें पेर । नवा झाला सुभेदार । × × बाळ ॥३५॥
× × राय घर बांधी । वहिनीबाई बेत सांगे । खोलीला दरवाजे । चंदनाचे ॥३६॥
× × राय चोळी शिवी । वहिनीबाई डोळे मोडी । घाल शिंप्या घडी । चोळियेची ॥३७॥
देवाच्या दर्शनाला । दत्तात्रय दिगंबर । चंदनाचें देवघर । सारविलें ॥३८॥
रामाच्या दर्शनाला । दत्तात्रय स्वामी आले । पादुका विसरले । पंचवटीं ॥ ३९ ॥
बापाजी काकाजी । तुम्हीं बसा एका ओळी । मला द्यावी साडीचोळी । दिवाळीची ॥४०॥
बापाजी काकाजी । तुम्हीं बसा एकीकडे । मला द्यावे वाकी तोडे । दिवाळीचे ॥४१॥
रुप्याच्या ताटांत । ठेविला दहींभात । जेविला रघुनाथ । द्वारकेचा ॥४२॥
रुप्याच्या ताटांत । ठेविला साखरसांजा । नैवेद्य महाराजा । गणपती ॥४३॥
रुप्याच्या ताटांत । मखमालीचीं फुलें । हारतुरे गजरे करूं । विठोबाला ॥४४॥
झोपाळ्यावर बैसूं । झोपाळ्याचा नाडा । चिरेबंदी वाडा । + + जींचा ॥४५॥
झोपाळ्यावर बैसूं । हिरव्या साड्या नेसूं । सारख्या बहिणी दिसूं । + + बाई ॥४६॥
सरती माझी ओंवी । सरत्या पुरत्या गंगा । काशीच्या ज्योतिर्लिंगा । नमस्कार ॥४७॥

---

१ चंदनमंदन, सातारा, रत्नागिरी –तिन्ही किल्ले.

# दिपवाळीचें गाणें



( विठ्ठल महादेव घुले )

[ आमच्याकडे ( नगर भागांत ) दिपवाळीच्या पांच दिवसांत गुराखी कांदळाच्या[1] सुंदर दिवट्या विणून संध्याकाळीं मोठया आनंदाने व हौसेने गुरांना ओवाळतात. गुराख्यांची रोषनाई म्हणजे गोड-तेलांत तेवणाऱ्या दिवट्या व गाई-बैलांच्या गोठ्यांत संथपणें जळणाऱ्या पणत्या ही होय. अगदीं तीन चार वर्षांच्या लहान बालकापासून थेट तरुण मंडळीपर्यंत गुराख्यांचे घोळके जमतात व गोठ्या-गोठ्यांतून गुरें ओवाळीत करगोटा-वाट्यांचा आपला हक्क प्रेमाने शाबीद करितात. अशा आनंददायक समयीं ते खडया सुरावर गाई-बैलांसंबंधीं वेगवेगळीं गाणीं म्हणतात. त्यांपैकीं कांही गाणीं मी गोळा केलीं आहेत. त्यांतील प्रस्तुत गाणें निवडक आहे. गाण्यांतील समर्पक उपमा पाहून असल्या गाण्यांत काव्य व सौंदर्य हीं असतात हें वाचकांच्या निदर्शनास येईल.]

माझी बोहळण गाय बरी । दुद[2] भरून देती चरी[3] ॥
चरचरीत भवरा करी । गाय रोखितो गाइंदहरी ॥
माझ्या बोहळण गाइच तोंड । जसं तीर्थाचं कुंड ॥
माझ्या बोहळण गाइच ओठ । जसं रखुमाईच गोट ॥
माझ्या बोहळण गाइच कान । जसं नागलीचं पान ॥
माझ्या बोहळण गाइची मान । जसी हीरयाची खाण ॥
माझ्या बोहळण गाइचे डोळ । जस लोणयाच गोळ ॥
माझ्या बोहळण गाइचा खांद । जसा पूनवचा चांद ॥
माझ्या बोहळण गाइची पाठ । जशी पंढरपुरची वाट ॥
माझ्या बोहळण गाइची शेप । जसी नागीण टाकिती झेप ॥
माझ्या बोहळण गाइच्या मांड्या । जशा पालखीच्या दांडया ॥
माझ्या बोहळण गाइच पोट । जशी कापसाची मोट ॥
माझ्या बोहळण गाईची कास । जशी तांदळाची रास ॥
माझ्या बोहळण गाइच सड । जस खारकाच घड ॥
माझ्या बोहळण गाइच्या धारा । जशा इनयाच्या[4] तारा ॥

---

१ कांदळः—हा गवताचा एक प्रकार आहे. याच्या काड्या उंच व जाडया असून विणल्या जाणाऱ्या असतात; रंग पिवळसर असतो.

२ दुदः—दूध. ३ चरीः—चरवी.

४ इनयाच्याः—इन्याच्या, वेण्याच्या.

माझ्या बोहळण गाइचं दुद । यानं देही[1] व्हईल सुद[2] ॥
माझ्या बोहळण गाइचं तूप । यानं जळ नंदादीप ॥

[ आमच्या प्रांतांत लहान मुलांना खेळविण्याकरितां बायका अगर वृद्ध माणसें खाली दिलेलीं गाणीं म्हणत असतात. ह्या गाण्यांवरून नवीन रचणाऱ्यांना अशाच प्रकारें मुलांची करमणूक होण्याकरितां रचना, विनोद, गीतांची लांबी व भाषा हीं कशीं असावीं हें समजण्याला सदरहू गीतें मार्गदर्शक होतील. तसेंच सध्या वेगवेगळ्या प्रांतांमधून ‘लोककथा’ गोळा करण्याचें कार्य सुरू झालें आहे. त्या कार्याला हातभार लावावा ह्या उद्देशाने ही रिकामपणीं केलेली कामगिरी आपल्यापुढें सादर करीत आहें.

ह्या गीतांमध्यें प्रांतिकत्व दिसून येऊन सदर गीतांमधून इतस्ततः विखुरलेले पण महत्त्वाचे शब्द संग्रहित होण्यास मदत होईल व वाङ्मयाच्या एका विशिष्ट प्रांतांत नवीन, अमुद्रित आचारविचारदर्शक साधनामध्यें भर पडेल.]

---

# बाल–गीतें

## (१) चांदा मांदा

चांदा मांदा । गिरगिर कांदा । अर्धी भाकरी । सगळा कांदा । टीक स्यो[3] ॥

## (२) पाऊस–गीत

पावसा पावसा ये ये । तुला देईन पैसा । पैसा झाला खोटा । पाऊस आला मोठा ॥

## (३) नको बाई नकोल्या

नकोबाई नकोल्या । चंदनाच्या टकोल्या[4] । एक टिकली नासली । गंगेला जाऊन बावली ॥
गंगेसनं आला लोंढा । भिजला माझा गोंडा । गोंडयांत काडी ।
काडींत होता रुपाया । भाऊ माझा शिपाया । शिपायाची घोडी । कडक फुगडी । ॥
चल ग बिब्बे न्हायाला । गोपा गेला ताकाला । विंचू चावला माकाला ।

## (४) साड्यामाड्या पापुड्या

साडयामाडया पापुडया पापुडया । गंगणीची[5] लेकरं माकुडया माकुडया । तिथं होती साळुंकी साळुंकी । साळुंकीच्या पायांत दोर ग दोर ग । गंगणीचा नवरा चोरग चोर ग ॥

## (५) अडगोळं मडगोळं

अडगोळं मडगोळं । सोन्याचं कडबोळं । रुप्याचा वाळा । तान्ह्या बाळा । टीक स्यो ॥

---

१ देही:—देह. २ सूद:—शुद्ध. ३ कोणी कोणी या ठिकाणीं ‘तीट लावूं’ असेंही म्हणतात.
४ टकोल्या:— ठिकल्या. शेवटची ओळ खेरीज करून बाकीच्या ओळींच्या शेवटल्या दोन शब्दांची द्विरुक्ति करावी. ५ आपल्या मुलीचें नाव घालावें.

## (६) लवलव साळूबाई

लवलव साळूबाई । मामा येतो । खोबऱ्याची वाटी देऊन जातो ।
मामी येती अन् काढून घेती ॥

## (७) आप्पड तिप्पड

आप्पड तिप्पड । तिम्बे लाडू । तिम्बे लाडूचं । तेल काढूं ॥
तिम्बे लाडूचं । एकच पान । घर ग बिम्बे । तिरपा काम ॥

## (८) इथं इथं बैस रे काऊ[1]

इथं इथं बैस रे काऊ । बाळ घालतय जेऊं ।
चारा खा पाणी पी । भुर्रर्कन् उडून जा. ॥

## (९) चाऊम्याऊ[2]

चाऊम्याऊ । पखालीचं पाणी पिवूं ॥

## (१०) अक्काबाई खुशाल

अक्काबाई खुशाल । पालखींत बसाल ।
पुढं लावा मशाल । चमकत दिसाल ॥

## (११) कढीची पाळ

एक घांस जेव रे बामणा[3] । दोन घांस जेव रे बामणा ।
तीन घांस जेव रे बामणा । चार घांस जेव रे बामणा ।
पांचव्या घांसाला कढीची पाळ फुटली फुटली ।
अर्से म्हणून अंगाला गुदगुल्या करावयाच्या.

## (१२) चांदोबा चांदोबा

चांदोबा चांदोबा भागलास[4] कां ? । लिंबुण्यांच्या[5] झाडावर हगलास कां ?
लिंबुण्याचं झाड वाटोळं । गौराई नेसती पाटोळं[6] ॥

## (१३) धुंडील राजा

धुंडील राजा । पाऊस पाणी । आभाळ दाणी । ऋण्याचं गाडगं । धंदाळं[7] ॥

## (१४) कुकुचि काई

कुकुचि काई । शेताला जाई । वाळकं[8] खाई । पाणी पीई । भुर्रर्कन् उडून जाई ॥

## (१५) अटुक मटुक

अटुक मटुक । चिमण्या चटूक । चिमण्या गेल्या भाल्या घाट्या ।
भाल्या घाटासनं आणल्या माळा । हातकर काळा ॥

---

१ कावळा २ चः-चमत्कार यांतील 'च' प्रमाणे उच्चार करावा.
३ ब्राह्मणा. ४ दमलास. ५ निंबुण्यांच्या. ६ रेशमी वस्त्र=पटल<पाटल<पाटोळं.
७ हेंदकाळणें. ८ काकडी.

## (१६) अडम् तडम्

अडम् तडम् । तड्तड् बाजा । हुक्का तिक्का ।
रेस मांस । काळी करवंद । जाळी फुल्ल्यो ॥

## सूचना

( १ ) चंद्राकडे बोट करून 'चांदामांदा' हें गीत म्हणून 'टीकल्यों'च्या वेळीं मुलाच्या कपाळाला बोटानें स्पर्श करतात.

( २ ) पावसाची झिमझिम सुरू झाली असतां मुलें पाऊस मोठा यावा म्हणून हें गीत म्हणत स्वतःभोंवतीं गिरक्या घालतात.

( ४ ) पुष्कळशीं मुलें ओळीनें बसून त्यांचे पाय लांब करून गीत म्हणत असतांना मुलांच्या पायावरून हात वरचेवर फिरविला जातो.

( ५ ) दिवा पुढें घेऊन व मुलांना जवळ बसवून 'तर्जनी' खेरीज हाताचीं सर्व बोटें मिटवून दिव्याच्या भोंवतालीं 'तर्जनी'चीं मंडलें काढीत हें गीत म्हणतात व शेवटीं 'टीकल्यो' म्हणून तर्जनीनें मुलाच्या कपाळास स्पर्श करीत असतात.

( ६ ) हात पालथा करून नागाच्या फडीसारखा करून सदरहू गाणें म्हणतात.

( ७ ) पुष्कळशीं मुलें आपल्यासमोर बसवून प्रत्येक मुलाच्या डोकीवर हात ठेवून 'आप्पड तिप्पड' हें गाणें म्हणावयाचें व शेवटीं 'घर ग बिब्बे तिरपा कान' हें म्हणून त्या मुलाला ( ज्याच्यावर शेवटला शब्द येईल ) शेजारच्या मुलाचा कान धरावयास सांगावयाचा.

( ८ ) मुलाला आपल्यापुढें बसवून मुलाचा हात उताणा करून आपल्यापुढें धरावयाचा व आपण तर्जनीनें 'इथं इथं बैस रे काऊ' हें गाणें म्हणत वारंवार तळहातावर स्पर्श करावा व शेवटीं आपला हात मुलाच्या टाळूवर ठेवावा.

( ९ ) सर्व मुलांनी मंडलाकार बसून एकमेकांचे कान धरून 'च्याऊ म्याऊ' हें गीत म्हणत म्हणत डुलत कांहीं वेळ बसावयाचें असतें.

( १० ) मुलाला मांडीवर बसवून पुष्कळ बाया वेगवेगळाले हातवारे करून हें गीत म्हणत असतात.

( ११ ) मुलाचा उजवा हात उताणा करून त्यावर अनेक पदार्थ वाढीत आहोंत अशी कल्पना करून चार पांच वेळां हाताची 'प्रोक्षण-स्थिति' करून स्पर्श करावा व 'एक घांस जेव रे बामणा' हें गाणें म्हणत मुलाच्या तोंडाजवळ हात न्यावा; ह्याप्रमाणे एकसारखे चार घांस होईपावेतों सदरहू कृति करावी व पांचव्या घासाला 'कढीची पाळ फुटली फुटली' असें म्हणून मुलाच्या अंगाला गुदगुल्या कराव्या.

( १२ ) चांदोबाकडे बोट करून हें पद म्हणावयाचें.

( १३ ) डोक्यावर मृत्तिकेचें लिंग असलेला पाट घेऊन 'धुंडील राजा' हें गीत गात अंगाभोंवतीं जोरानें प्रदक्षणा करावयाच्या व त्या फिरणाऱ्या मुलाच्या डोकीवरील लिंगावर दुसऱ्या कोणीतरी माणसानें पाणी ओतावें. सदरचें गीत अवर्षणकालीं पाऊस पडावा म्हणून कांहीं शेतकरीवर्गात म्हटलें जातें.

( १४ ) स्वतः उताणे निजून पाय मांडीपर्यंत वर करून व पावलापासून गुडघ्यापर्यंतचा भाग दुमडून त्या दुमडलेल्या भागावर लहान मुलास बसवून 'कुकुचिकाई' हें गीत म्हणत असतांना पाय वारंवार उचलावे.

( १५ ) पुष्कळशीं मुलें आपल्यापुढे बसवून त्या मुलांचे हात उताणे धरावेत व प्रत्येक मुलांच्या हातावर आपली तर्जनी वारंवार टेकवीत टेकवीत सदरहु गीत म्हणावें व शेवटीं त्या मुलाचा 'हात कर काळा' म्हणून हात पालथा करावयास लावावा याप्रमाणे सर्व मुलें संपेपर्यंत हा क्रम चालू ठेवावा.

( १६ ) अनेक मुलें पुढे बसवून त्या प्रत्येक मुलाच्या डोकीवरतीं हात ठेवून 'अडम् तडम्' हें गीत म्हणावें व 'फुलल्यो' हा शब्द ज्या मुलांवर म्हणावयाची पाळी येईल तो उतरला असें समजतात. शेवटीं एक मुलगा राहीपर्यंत हा क्रम अव्याहत ठेवावयाचा व शेवटल्या मुलावर डाव आला असें समजावयाचें. कोणत्याही खेळांत गडी उतरतांना ह्या रीतीने उतरण्याचा एक प्रघात आहे.

---

# भोंडल्याचीं गाणीं

( सं. कै. म. वि. डोंगरे )

## ( नमनाचें गाणें )

आयलमा पयलमा । गणेश देवा । माझा खेळ मांडून दे । करीन तुझी सेवा ।
माझा खेळ मांडिला । वेशीच्या द्वारी । पारवे घुमती । बुरुजावरी ।
पारवे फकीराचे । गुंजावाणी डोळे । गुंजावाणी डोळयाच्या । सारवल्या टीका ।
आमच्या गांवच्या । भुलोजी नाईका ॥

२

आवळीनं चढूं । कां चवळीनं चढूं । माझ्याने चवळी चढवेना । चढवेना ।
मामानी चवळी चढवली । चढवली । माझी ओटी भरवली । भरवली ।
माझ्या ओटींत तिळसें । तिळसें । दारी ऊभे दीरसे । दीरसे ।
दिराच्या हातांत । धनुकली । पाण्याला जाते चिमुकली ॥

३

एवढासा तांदुळजा । नखानी फोडीला । वेशीबाहेर टाकून दिला । गाय आली हुंगून गेली ।
म्हैस आली खाऊन गेली । गाईला झाला पाडा । म्हशीला झाला रेडा । तोच रेडा पाडा ।
आमच्या बाप्पाजींचा वाडा । बाप्पाजींनी दिली निळी घोडी । येतां जातां कमळें तोडी ।
कमळा मागें लागली राणी । अग अग राणी इथे कुठे पाणी । चल ग जाऊं जल्मन् राणी ।
जल्मन राणीची बारीक वाळू । तेथे खेळे चिल्हारी बाळू ।

---

# कोल्हापूर प्रांतांत स्त्रीपुरुषांच्या तोंडांत असलेल्या म्हणी

५१ घरांत मोतादी;[1] (अंगांत) पोषाख अहमदाबादी[2].
५२ ज्याचें काम त्याने करावें; इतरांनी गोते खावे[3].
५३ दिसायला ढबू; कामाला अधू.
५४ बाळूंत मुतलें; बळ ना बोळ.
५५ पैची म्हातारी; टक्याचीं कांकणें.
५६ तरुणाचे झाले कोळसे; म्हाताऱ्याला आलें बाळसें.
५७ साधल्या आळीचे; मधल्या फळीचे.
५८ ज्याचें त्याला; गाढव ओझ्याला.
५९ उन्हाळा जोगी; पावसाळा रोगी; हिंवाळा निरोगी.
६० भिडे भिडे, पोट वाढे.
६१ बारशाची तयारी बाराव्याला.
६२ दे रे प्राण्या; घे रे प्राण्या.
६३ घरांत नाहीं भाकरी; मानावारी[4] करतो नोकरी.
६४ ऐनाला नाही ठिकाण; व्याजांत घालतो दुकान.
६५ आपल्या गावांत बळी; परगांवीं गाढवें वळी.
६६ अकिती[5] आणि सणाची निचिती.[6]
६७ धन्याचें नांव गण्या; आणि चाकराचें नांव रुद्राजीअप्पा.
६८ दिवाळी आणि सण ओवाळी.
६९ बेंदूर[7] आणि आलें सणांचें लेंडूर.[8]
७० भावई[9] सण दावई.
७१ केलें तुका;[10] झालें माका.[11]
७२ प्रजेची होळी; आणि राजाची पोळी.
७३ देव तारी त्यास कोण मारी!
७४ जावयाचें पोर; आणि हरामखोर.
७५ शिंप्याला सुई; आणि कुटुंबाला बाई.
७६ गळ्यांत माळ; गरिबांचा काळ.

---

१ गरीबी. २ उंची. ३ जेनू काम तेनू थाय; बीजा करेसो गोते खाय या गुजराथी म्हणींचें रूपांतर दिसतें. ४ मानाकरितां ५ अक्षय तृतिया. ६ शेवट. ७ पोळा. ८ मालिका. ९ एका सणाचें नांव. १० तुला (सावंतवाडीकडचें रूप) ११ मला.

७७ गरिबांचा कैवारी; राजाचा वैरी.
७८ घराला पाया; राष्ट्राला बाया.
७९ देह देवळांत; चित्त पायपोसांत.
८० झाली चूक; धर मूक.[12]
८१ ग्रंथ लिहिणें; पश्चात्ताप करणें.
८२ गांवच्याला मसणवाट; आणि परगांवच्याला गोड.[13]
८३ खायाला मिळेना; काम सरेना.
८४ आई बघते पोटाकडे; आणि बायको बघते पाठीकडे.
८५ इच्छी परा; तें येई घरा.
८६ वाण्याचें गडबडतय, मिठारीचें दुणावतय, आणि तेलणीचें हरवतय.
८७ घरीं करतोय उसनवारी; बाहेर दाखवितोय जमादारी.
८८ घे घोडा; पी पाणी.
८९ लाव तूप; बघ रूप.
९० खाई शेरदाणा; चालतांना करितो ठणाणा.
९१ असतील मुली; तर पेटतील चुली.
९२ खुळ्या बाऱ्याला मिळाली बायको; अक्का म्हणूं कीं बाई म्हणूं ?
९३ गोड बोलणं; भोक पाडणं.
९४ जखमेला बिबा; मुलाला आबा.[14]
९५ उंदराला माऊ; बायकोला जाऊ.
९६ देवाला फूल; घराला मूल.
९७ न्हाव्याची परीक्षा नखांत; कारकुनाची परीक्षा टाकांत,
९८ गरीब गाय; गळ्यांत पाय.
९९ दाजी;[15] अन् पक्का वादी.

के. रा. कुलकर्णी.

१२ घुम्मता. १३ उतार. १४ बाप. १५ दीर.

# स्त्रियांच्या म्हणी

( २३८ ) रुखवत आलें, रुखवत आलें दणाणली आळी, अन् पहातात तों अर्धीच पोळी.
( २३९ ) कोणी मारतं धोंड्याने, अन् कोणी मारतं उंडयाने.
( २४० ) महार बसला सखलीं, आणि दोन्ही खळीं मुकलीं.
( २४१ ) खाणें बोकडाचें, अन् वाळणें लाकडाचें.
( २४२ ) हातपाय काडया, पोट वाड्या.
( २४३ ) राखण बसला दारांत, अन् चोर शिरला घरांत.
( २४४ ) प्रेमाची नाही दाटवण, तर कशाला होई मुलाची आठवण.
( २४५ ) काम कांही सरेना, फुरसत कांही मिळेना.
( २४६ ) सुधारणेचें सार, दिव्याखालीं अंधार.
( २४७ ) आधींच तसलं, अन् बैलावर बसलं.
( २४८ ) तोंडास मिठी, कपाळास आठी.
( २४९ ) हंडींत शीत असलें, म्हणजे लांडीला झोप कशाला येते !
( २५० ) आवाजी आवाजी आपले कुले आपणच नावाजी.
( २५१ ) खटनट विठ्ठल भट !
( २५२ ) आजीचें काम सरेना आणि कंबर उभी राहीना.
( २५३ ) ज्याचे जळे, त्यास कळे.
( २५४ ) मी मला वाणी अन् जग मला धार्णी.
( २५५ ) रेडयापाडयाची झुंज, अन् झाडास काळ.
( २५६ ) नको नको पायलीचें चाखो.
( २५७ ) घडवपेक्षां मढव भारी.

नीलकंठ शंकर मवाद्, सोलापूर.

# म्हणी

१ कष्टीं फळ तपीं राज्य.
२ व्याजाला सोकली मुदलाला मुकली.
३ गुरां गाताडी मुलां म्हातारी.

४ आजा मेला नातू झाला घरांत माणसें सारखींच.
५ डुंगणावर हाणा पण पाटलीण म्हणा.
६ ऐंशी तिथे पंचाऐंशी कर ग रांडे पुरणपोळ्या.
७ गुरविणीचीं शितें प्रसादावारीं जातात.
८ धडा गेला तरी हरकत नाही पासंगाला जपावें.
९ खोटेंच बोलायचं मग थोडं कां ? भुईवर निजायचे मग संकोच कां ?
१० महार मेला विटाळ फिटला.
११ आडक्याची भवानी टक्याचा गोंधळ.
१२ बाहेर धडीपगडी घरीं बायको उघडी.
१३ अती ऊ त्याला खाज नाहीं, अती ऋण त्याला लाज नाही.
१४ असा लेक दाणा तर घरोघरीं सुना.
१५ बाप तशी पुती खाण तशी माती.
१६ काम वगेने करावें का रगीने करावें.
१७ धड देवळांत मन जोडयांत.
१८ बिबी आली उंबरींत मिया गेला कबरींत.
१९ उधारीचें पोतें सव्वाहात रितें.
२० शिजीचें घेणें सवाई देणें.
२१ उंबरें पिकलीं अस्वलाचे डोळे आले.
२२ गुळाने मरतें त्याला विख कशाला ?
२३ शरिरांत पित्त व संसारांत वित्त.
२४ ऋण फिटतें पण हीण फिटत नाही.
२५ हागे तो तगे.
२६ दाणे टाकून कोंबडी झुंजवावयाची.
२७ पाण्यांत म्हैस बाहेर मोल.
२८ आडाण्याचा आला गाडा वाटेवरच्या वेशी पाडा.
२९ शिरीं विद्या तिरीं धन.
३० घोंगडयांत पासोडया सरदार.
३१ राजाची स्वारी निघाली म्हणे मशालजीचा घातवार.
३२ राजाच्या मागून जावें व सावकाराच्या पुढून जावें.
३३ नकटें व्हावें पण धाकटें होऊं नये.
३४ कुणबी गाठावा उपाशी बामण गाठावा पोटुशी (जेवलेला).
३५ कुणब्यासरिखा दाता नही, लाथेबिगर देता नही.

प्र. धों. कानिटकर,

# वाक्प्रचार आणि म्हणी

( १ ) इथे काडी तिथे काडि ; मामोजिच्या सोळा दाढि
( २ ) दिवस बुडाला ; नि गडि उडाला
( ३ ) सतीचे घरीं बत्ति ; नि शिंदळीचे घरीं हत्ती
( ४ ) काय गेलं तळतीचं ; काय गेलं वळतीचं; घर बुडालं भलतीचं
( ५ ) होशिल सुने कुणा सारखी ; तर सासुबाई तुम्हां सारखी
( ६ ) बाप तसा बेटा ; कुंभार तसा लोटा
( ७ ) आधि करि सुन सुन ; मग करि फुण फुण
( ८ ) आई तशी बाई मंगळ कोण गाई
( ९ ) कुणाची कोण नि बिळांतली घोण
( १० ) राजाला मिळालं बीड पण कबळीचं जाईना दीड
( ११ ) चट्टिपट्टीचा बोभाटा नि झिंपरि मारी झपाटा
( १२ ) उरीं डोंगर नि शिरीं कांटे
( १३ ) जडचिंब शेतचं नि थोटंपांग पोटचं
( १४ ) भात पटणीचं नि राज्य भटणीचं
( १५ ) तोंडावर हाजी गाजी नि मागे दगलबाजी
( १६ ) नवऱ्याने मारलं नि पावसाने भिजवलं सांगायचं कुणाला ?
( १७ ) आला वारा गेला वारा कोण कुणाचा सोयरा-धायरा
( १८ ) बाजारचा मेवा बापलेकांनी खावा.
( १९ ) सख्या सासूस लावला पाय, नि चुलत सासू रुसून जाय
( २० ) गांवाची झाली होळी नि वांझेची आली पाळी
( २१ ) उण्या माणसा दुणं काम
( २२ ) गाता गळा, शिंपता मळा, लिहिता हतोळा
( २३ ) देवि देवळांत नायटे गांवांत
( २४ ) आवडीने केली पर ती आली वर
( २५ ) आग आग म्हशी, मला कां नेशी.

रा. वा. सोमण, मोहपाडा

# "निघंटशिरोमणी" कोशांत दिलेले

# गवताचे प्रकार

| संस्कृत | मराठी |
|---|---|
| ( १) शरः | तिरकांडें. |
| ( २) स्थूलशरः | थोर तिरकांडें. |
| ( ३) मुंजः | मुंजतृण. |
| ( ४) काशः | थोर कसई. |
| ( ५) मिशी | लघु कसई. |
| ( ६) सितदर्भः | श्वेतदर्भ. |
| ( ७) हरिद्दर्भः | थोर दर्भ. |
| ( ८) बल्मजा | मोळ. |
| ( ९) कत्तृणम् | लघु रोहिस गवत. |
| (१०) दीर्घ रोहिषकम् | मोठें रोहिस गवत. |
| (११) नलः | देवनळ. |
| (१२) महानलः | थोर देवनळ. |
| (१३) नीलदूर्वा | निळी हरळी. |
| (१४) श्वेतदूर्वा | पांढरी हरळी. |
| (१५) वल्लीदूर्वा | वेल हरळी. |
| (१६) गंडदूर्वा | गांठे हरळी. |
| (१७) कुंदरुः | कुंदा गवत. |
| (१८) भूतृणम् | सुगंध रोहिस गवत. |
| (१९) सुगंध भूतृणम् | सुगंधी गवत. |
| (२०) ऊखलः | घोडेसर गवत. |
| (२१) इक्षुदर्भा | मुठें गवत. |
| (२२) गेणूभिका | थोर शिपी गवत. |
| (२३) शिलिका | लहान शिपी. |
| (२४) निःश्रेणिका | निशेणी गवत ( निरोषी ( कोंकणांत प्रसिद्ध ). |
| (२५) गर्मोटिका | गोडा लेणा गवत, जरडी. |
| (२६) मजरः | पवना गवत. |
| (२७) पत्राढ्यं | शेंडें गवत. |
| (२८) वंशपत्री | वंशपत्री गवत. |
| (२९) मंथानकः | मारवेल. |
| (३०) पालिवाहः | पोकळी गवत (तांबड्या पातीचें). |
| (३१) लवणतृणम् | लोणा गवत. |
| (३२) पर्ण्यंधः | पंधे गवत. |
| (३३) दीर्घ काण्डः | तिधारी लव्हा, लव्हाळें. |
| (३४) लघुगुंडः | लघु लव्हाळे. |
| (३५) वृत्तगुंडः | वाटोळे लव्हाळे. |
| (३६) गुलकंदः | कचरा. |
| (३७) चणिका | वर्णया गवत, चणई. |
| (३८) गुंडासिनी | पाणकणीस (जखमेंत भरतात). |
| (३९) शूली | सुळे गवत. |
| (४०) परिपेलम् | जलमुस्ता, केवटी मोथा. |
| (४१) हिज्जुलः | परळ. |
| (४२) शैवालम् | शेवाळ. |

---

कांही गवतांचे विशेष गुणः—

(१७) गाईबैलांना पुष्टिकारक.

(२२) गाईचें दूध वाढतें.

(२४) जनावरांना अशक्त बनवितें.

(२५) गुरांचें दूध वाढतें.

(२६) गाईचें दूध वाढतें.

(२७) पशूंना हितकारक.

(२८) नंबर २५ प्रमाणे गुण.

(२९) नंबर २६ प्रमाणे गुण.

(३०) नंबर २४ प्रमाणे गुण.

(३१) घोड्यांना उत्तम.

(३७) नंबर २७ प्रमाणे गुण.

(३९) म्हशींना चांगलें मानवतें

पंधे गवताचा विशेष गुणः—

तत्कालशस्त्रघातस्य व्रणविरोपणी परा ।

( शस्त्रानें जखम झाल्याबरोबर लागलीच पंधे गवत वाटून जखमेंत भरल्यास जखम भरून येते. गरजूंनी अनुभव पहावा.)

प्र. धों. कानिटकर

# शुद्धिभ्रमचर्चा ?

( लेखकः—गो. कृ. मोडक )

**दृष्टिभेद्**—भाषेसंबंधी व्याकरण पुस्तकांत अनेक गोष्टी सांगितलेल्या असतात. या गोष्टींपैकी कांही गोष्टी अशा कां, हें सकारण सांगितलेलें असतें व कांही गोष्टी कारण न देतांच केवळ गृहीत धराव्या म्हणून दिलेल्या असतात. या उत्तरोक्त गोष्टी सकारण नसतात असें नाही. पण त्यांपैकी कांहींचें कारण निश्चित सांगतां येत नाही, कांहींचें कारण विद्यार्थ्यांना अनाकलनीय असते, तर कांहींच्या कारणाबद्दल मतैक्य नसतें. एवं, कारणावाचून कार्य नाही, ही गोष्ट येथेही सिद्ध आहे. शिक्षकाचें किंवा लेखकाचें काम हीं अनुक्त कारणें शोधून काढण्याचें, तीं मनाला पटली किंवा नाही हें पाहण्याचें, व पटलेलीं कारणें विद्यार्थी व जनता यांचेपुढे मांडण्याचें असतें. एतदर्थ अशा जबाबदार माणसांनी केवळ ग्रंथवचनप्रामाण्यावर अवलंबून असतां कामा नये. त्यांनी नेहमी कारणाच्या बाबतींत असंतुष्ट असेच राहिले पाहिजे. अमक्या ग्रंथांत अमूक अर्थ दिला आहे. पण तसा तो कां दिला आहे, याचीही मीमांसा यावच्छक्य अशा विद्वानांनी मनाशी केली पाहिजे, अशी माझी दृष्टि आहे. पण रा. निजसुरे यांची दृष्टि याहून निराळी आहे. कोश जें सांगेल तें मुकाट्याने गिळण्यास ते खुषी आहेत. म्हणजे ते अल्पानें संतुष्ट आहेत तर मी प्रभूतानेहि असंतुष्ट आहे. उदाहरणार्थ, पुढील गोष्टींचा येथे विचार करूं.

कला शब्दाचा अर्थ अंश, हिस्सा असा आहे; तर तेवढ्यावरून **सकल** म्हणजे संपूर्ण हा अर्थ सहज सिद्ध होतो; असे रा. निजसुरे म्हणतात. पण **सभाग, सांश** इत्यादि सहबहुव्रीहि समास सकल-प्रमाणें सर्व या अर्थाचा बोध कां करीत नाहीत ? ही शंका त्यांचे हृदयांत शिरत नाही. चंद्राची कला म्हणजे त्याच्या बिंबाचा सोळावा अंश आहे व अशा सोळाव्या अंशांनी म्हणजे कलांनी युक्त असलेल्या म्हणजे **स-कल** चंद्रास आपण पूर्ण म्हणतो. अशा रीतीने सकल शब्दाच्या अर्थान्तराची सिद्धी होते. सकल म्हणजे सगळा, या कोशगत विधानाने तृषा होणें योग्य नाही. कोशगत अर्थाच्या पलीकडे कां जाऊं नये ? मशहूर या यवनी शब्दाचें रूपांतर मराठींत महशूर असे झाले आहे. यांतील वर्णविपर्यय स्पष्टतम आहे. पण, असा वर्णविपर्यय कां व्हावा, याचें कारण देणें अवश्य आहे. वर्णविपर्यय हा विकार सार्वत्रिक नाही; कांही मोजक्या शब्दांतच आढळतो; असें कां असावें ? 'कारणाशिवाय कार्य घडत नाही' हा नियम शब्दशास्त्रांतही प्रभावी आहे.

**एतत्सिध्यर्थ वर्णविपर्ययाचीं उदाहरणें** आपण घेऊं—

कोटि याचें रूपांतर रीति-रीत या धर्तीवर कोट असें झालें व हा शब्द मराठींत संख्येचा दर्शक आहे. कोटीचा संस्कृतामध्ये अर्थ अग्र असाही आहे. एतदर्थक शब्द मराठींत कोट हाच वापरल्यास संख्या कीं अग्र, असा त्याच्या अर्थासंबंधी घोटाळा होणार. हा टाळण्याकरितां भाषेने कोट या शब्दांत व्यंजनाविपर्यय करून टोक असें रूप साधिलें. येथील वर्णविपर्यय येथे दिलेल्या कारणाने समर्थित होत नाही काय ? कोणाच्या मतें हें समर्थन योग्य नसेल. कबूल. त्याने दुसरें सुचवावें. याहून सरस आढळ-ल्यास तें माझ्यच होईल. रा. निजसुरे महशूरप्रमाणेंच कोट या शब्दांतीलहि रूपांतर केवळ वर्णविपर्ययाने झालें, असेंच म्हणणार काय ? **भिन्न अर्थ** व्यक्त करण्यास **भिन्न शब्द** असावे, अशी कोणत्याहि

भाषेची स्वभावतःच खटपट असते. मनस शब्दाचे मराठी रूपांतर मन, यशस्-चें यश, तेजस्-चें तेज, या धर्तीवर मराठीला तळें एतद्-वाचक सरस शब्दाचें रूपांतर सर असें करतां आलें नसतें काय ? पण तसें तिनें कां केलें नाहीं ? त्याला 'वर' हा अवयव पुढें जोडून सरोवर असा समास एतदर्थ कां योजण्यांत आला बरें ? येथील कारण स्पष्ट आहे. (स लोपून होणाऱ्या) सर या रूपाचे अर्थ भाषेमध्यें अगोदरच पुष्कळ आहेत. हाराचा सर, पावसाची सर, प्रतिपक्षाशीं सर, एतदर्शक सर या शब्दांशी घोटाळा टाळण्याकरितां, भाषेनें वर हा शब्द सरस पाठीमागुढें जोडून 'सरोवर' असें रूप परकरिलें. कोणी म्हणेल नरवरप्रमाणे सरोवर हा शब्द श्रेष्ठत्व सूचित करितो, तर तसा प्रकार मराठींत नाहीं. पावसाळ्यांत होणाऱ्या कमलयुक्त लहानशा तळ्यापासून तों मानसापर्यंत सर्वांसच आपण सरोवर म्हणतो. श्रेष्ठत्व दर्शविणेंच तर मानस हें श्रेष्ठ सरोवर आहे असा निराळ्या श्रेष्ठ शब्दाचा प्रयोग आपण अधिक करितों. सारांश शब्दामध्यें अर्थाविषयीं होणारा घोटाळा यावच्छक्य टाळावा, अशीच किंवा अन्य एखादी प्रवृत्ति वर्णविपर्ययाचेहि मुळाशीं आढळते.

**लाघव**—संस्कृत गोक्षुर या शब्दावरून मराठींत गोखरू हा शब्द आला आहे. गोक्षुर या नांवानें बोधित द्रव्याचे ठिकाणीं गाईच्या खुराची आकृति मानण्यांत येऊन, त्यास सहृदय भिषग्वर्यांनी गोक्षुर असें म्हटलें. क्ष उच्चारास कठीण अतएव त्याचें रूपांतर ख असें झालें. यास साक्षीदार क्षीर-खीर क्षार-खार हा आहे. क्षुर यांतील स्वर स्थान विपर्यय पावून, गोखरू हा शब्द बनला येथील विपर्यय कसा झाला ? भिषग्वर्यांनी मानिलेलें साम्य मराठी बोलणाराच्या ध्यानांत न राहिल्यामुळें, हें द्रव्य व गाईचा खूर यांचा संबंध त्यांच्या मनांत आला नाहीं. तेव्हां खूर काय किंवा खरू काय दोन्ही रूपें त्यांना सारखींच अर्थशून्य वाटलीं. त्यांतल्या त्यांत खरू हें रूप त्यांना सोईचें वाटलें व त्यांनी गोखरू असा स्वर विपर्यय केला. यांत त्यांना कोणती सोय दिसली ? वर्णविपर्ययाच्या अभावीं होणारें गोखूर हें रूप नियमानें चतुर्मात्र होणार. तर वर्णविपर्यय-साध्य गोखरू हें रूप, त्यांतील अंत्य स्वर कांहींसा ऱ्हस्व उच्चारला गेल्यानें, चतुर्मात्र रूपाहून कांहींतरी लघुच होणार हेंच लाघव येथील विपर्ययाचे मुळाशीं आहे. 'रू'तील स्वर दीर्घ लिहिला जातो तरी उच्चारांत तो कांहींसा अखूड उच्चारला जातो.

यावर शंका—गोक्षुर यांतील उकार ऱ्हस्व आहे तर, तज्जन्य गोखूर या शब्दांतही तो ऱ्हस्वच असावा. (व तो असा ऱ्हस्व केल्यास त्यांतच लाघव साधणार) पण हें उच्चारशास्त्रास संमत नाहीं. शब्दाचा अंत्य अकार, त्याच्यापूर्वी जोडाक्षर नसल्यास म्हणजे एकच व्यंजन असल्यास, बहुधा अनुच्चारित म्हणजे निःसृत असतो. यास उदाहरणें-फूल-तीर, चोर इत्यादि. या प्रवृत्तीस अनुसरून गोखूर या शब्दांतील शेवटला अ नसल्यासारखाच आहे. अर्थात् तत्पूर्वग र-च्या उच्चाराचा भार मागील उकारावर पडणार; व तो भार वाहण्याकरितां त्याला दीर्घ व्हावें लागणार. याला साक्षीदार भूशिरस याचें मराठी रूपांतर भुशिर हें आहे. सारांश, संस्कृतावरून शब्द मराठींत येतांना वर्णविपर्ययादि कार्यांच्या मुळाशींहि कांहीं तरी कारण असतें व हें कारण शोधून काढणें भाषाशास्त्र्याचें कर्तव्य आहे, असें माझें मत; तर रा. निजसुरे म्हणणार नुसत्या वर्णविपर्ययाशींच थांबा. त्याच्या पलीकडे नजरही टाकूं नका. पडाव वारंवार उलटतो; तेव्हां तद्वाचक शब्दाची अक्षरेंहि कां उलटूं नयेत ? अशाच भावनेनें 'उडुप' याचें रूप वर्णविपर्ययानें 'पडाव' झालें असेल काय ?

शक्य तेवढ्या ठिकाणीं **कारण शोधून काढणें** हें शास्त्राभ्यासास अत्यंत आवश्यक आहे. रामः + चरति = रामश्चरति, या ठिकाणीं विसर्गाचा श् होतो व व्याकरणही तेवढेंच सांगतें. म्हणून शिक्षकानेंहि स्वतः तेवढ्यावरच संतुष्ट राहावें काय ? श् आणि च् हे दोन्ही एकाच स्थानचे आहेत, या

गोष्टीवरून च्-चा आपल्या गांवकऱ्यांविषयींचा प्रेमा येथें उघडउघड दिसून येत नाही काय? छढी घेऊन 'च्, छ् यांचेपूर्वी विसर्गाचा श् होतो' असें नुसतें विद्यार्थ्यांस घोकावयास सांगण्यापेक्षा, त्यांना श् आणि च् यांचें आपसांतील नातें समजावून देणें योग्य होणार नाही काय? अशाने दुहेरी लाभ आहे [१] आपल्या गांवकऱ्याविषयींचा ओढा वर्णांतही दिसून येतो, हें पाहून वाटणारें कौतुक; आणि [२] संबंध कळल्यानंतर 'च् पूर्वी श् होतो' वगैरे घोकण्याचे श्रमांची बचत. अशा प्रकारचीं उदाहरणें व्याकरणाच्या प्रत्येक शाखेंतून व उपशाखेंतून पदोपदीं देतां येतील. यथाशक्ति याचा विग्रह 'यथा शक्तिः तथा' असा न करितां 'शक्तिं अनतिक्रम्य' असा कां करावा, देहान्तरं याचा विग्रह 'देहस्य अन्तरम्' असा सरळ न करितां 'अन्यो देहः' असा कां करावा द्विकर्मक धातूंचे वर्ग त्यांच्या कर्मणि प्रयोगास अनुसरून हल्ली दोन पाडण्यांत येतात, ते कसे अनवश्यक आहेत, वगैरे गोष्टींच्या संबंधांत विचार-शक्तीस पुष्कळच व्यापारक्षेत्र आहे हें सहज दाखवितां येईल; पण तद्विषयक विचार या लेखांत देणें योग्य होणार नाही, म्हणून येथे दिला नाही. सारांश, कारणाचेंहि कारण शोधणें, त्याच्याही कारणाचा पत्ता लावूं पाहणें, अशी माझी दृष्टि असल्याकारणाने, माझीं अनेक विधानें रा. निजसुरे यांस रुचणार नाहीत तेव्हा आम्हां दोघांतील तंट्याचें मूळ या नैसर्गिक दृष्टिभेदांत असल्याने, पुढे दिलेल्या अनेकविध अनभिमत विधानांबद्दल रा. निजसुरे मला क्षमा करतील अशी आशा आहे.

---

# अभिप्राय

**बडोदा कॉलेज मॅगेझीन**— सं. मधुसूदन श्रीकृष्ण आपटे. आमच्या पाहण्यांत जीं कांही कॉलेजमासिकें आजपर्यंत आलीं त्यांत या बडोदा कॉलेज मॅगेझीनचा नंबर बराच वर लागेल असें आमच्या समोर मॅगेझीनचा सप्टेंबरचा अंक आहे, त्यावरून म्हणण्यास हरकत वाटत नाही. प्रो. दांडेकर यांची 'परोपकारी चोर' ही लहानशी गोष्ट उत्कृष्ट असून सूचक आहे. त्यानंतर जो दुसरा लेख आम्हांला आवडला तो व्यंकटराव पाटील यांचा तरुणांची जबाबदारी हा होय. The Determination of Sex हा लेख कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या मासिकांतून प्रसिद्ध होणें हें अगदी अयोग्य आहे. 'गरिबीचा पाहुणचार' ही कविता अनुकरण आहे कीं काय असा संशय येतो. कॉलेजमासिकांतून पुस्तकावर अभिप्राय देण्याची वहिवाट इष्ट आहे काय याचा विचार संपादकांनीं करावा अशी आमची त्यांस सूचना आहे.

**सद्विचार**—वर्ष १ अंक २. या अंकांत प्रो. चिं. वि. जोशी यांचा राजावलिपरिचय नामक लेख फार उपयुक्त आहे. राजावलि ग्रंथाची खरी किंमत अथवा योग्यता त्यांनी लोकांच्या निदर्शनास आणली ही त्यांची फार महत्त्वाची कामगिरी आहे. मूळ न पाहतां दुसऱ्यावर विसंबून त्याच्या आधाराने सिद्धांत बांधणें धोक्याचें असतें या तत्त्वाची हेळसांड संशोधकांनी कधीहि करतां कामा नये. याच अंकांतील श्री. गोविंदानुज यांचा सर टी. माधवराव यांच्यावरील लेख वाचण्यासारखा आहे. श्री. गोविंदानुजांनी माधवरावांचें मोठें चरित्र हातीं घ्यावें. अंकांतील नऊ लेखांपैकीं तीन कविता आहेत.

**नव्या स्मृतीची आवश्यकता**--(ले. का. न. केळकर— किं. ८ आणे) या संग्रहांत एक नवीन स्मृति बनविण्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. बदललेल्या आचारविचारांना शास्त्राची अनुज्ञा देणें हेंच या नवीन स्मृतिकाराचें कर्तव्य असणार हें उघड आहे. पण जुन्या काळांतल्या चाली बदलतात तद्वत् जुन्या काळांतलीं हत्यारें बदलावयास नको काय ? स्मृतीचा उपयोग कालांतराने होतो. आम्हांस तर शास्त्र आजच पाहिजे. शास्त्रांत बदल होतो हें सिद्ध करण्याच्या कामीं व्यवहाराचीं म्हणजे कायद्याचीं दिलेलीं उदाहरणें समर्पक वाटत नाहीत. तथापि धर्माविषयीं विचार करणारांना या पुस्तकांतील माहितीचा पुष्कळ उपयोग होईल यांत संशय नाही.

# आयुर्वेदसंहितांमधील शारीरसूत्रें



[ लेखकः—डॉ. म. वि. आपटे ]

चरक व सुश्रुत या दोन आयुर्वेदसंहिता होत. त्या लिहिल्या गेल्यास आज दोन हजाराहून अधिक वर्षे होऊन गेलीं. या दोन संहितांमध्यें 'शारीर' या नावाचा एक स्वतंत्र विभाग आहे. शारीर हा शब्द अलीकडे शरीररचनाशास्त्र या अर्थीं रूढ होत चालला आहे. तथापि या संहिताग्रंथांतील शारीर-स्थानाकडे पाहिल्यास त्यांत हल्लीं शारीरांत गणला जाणारा विषय तर आहेच पण हल्लीं इंद्रियविज्ञान या सदरांत मोडणारा विषयहि आहे असें आढळून येतें, किंबहुना या दोन शास्त्रांची विभक्त गणती होण्या-इतका प्रौढपणा त्यांत आलेला नव्हता असेंच म्हणावें लागतें. आयुर्वेदसंहितांतील शारीरावर एकवार नजर फिरविली असतां असें दिसून येतें कीं या दोन विषयांखेरीज आणखी वेदान्त, मानस, शल्योपयोगी शारीर, प्रसूतिविज्ञान, इत्यादि शाखांचाहि त्यांत समावेश आहे. तथापि प्रस्तुत लेखांत ते विषय वगळून शरीररचना आणि विशेषतः व्यापार याबद्दलच संहिताकारांचें म्हणणें काय आहे त्याचेंच विवेचन करावयाचें योजिलें आहे. आयुर्वेदसंहितामध्यें प्रथमतःच एक सूत्रस्थान दिलेलें आहे. त्यांत एकंदर शास्त्राच्या सर्व अंगोपांगांतील सूत्रें सांगितलेलीं आहेत. त्यामध्यें अर्थात् शारीराचीं सूत्रें आलेलीं आहेतच. त्यांचाच विचार येथे आरंभीं करणें जरूर आहे.

वात, पित्त, कफ, हे शरीरव्यापारांचे मूलाधार होत हें आयुर्वेदाचें मूळ सूत्र आहे ही गोष्ट सर्व-संमत आहे. या सूत्रामध्यें आर्यसंस्कृतीचा विशेष व्यक्त होत आहे. तो विशेष एका उदाहरणावरून स्पष्ट होईल. प्रत्यक्ष एकेका ज्ञानेंद्रियाला येणारा बाह्य जगाचा अनुभव आर्य आणि पाश्चात्य दोघांचा सारखाच असावयाचा. तथापि हरएक गोष्ट कृति मानून त्यामागे एकादा कर्ता मानण्याची सवय, हौस किंवा मनो-वृत्ति जी आर्यसंस्कृतीनें घटवून ठेविली तिला अनुसरून आपण म्हणतो 'ईश्वरानें सृष्टि निर्माण केली आहे' आणि अशी मनोवृत्ति ज्यांची घटलेली नाही ते 'जग हें असें आहे' एवढेंच म्हणण्यांत समाधान मानतात. आम्ही जगाचा कर्ता जरी ईश्वर मानतों तरी तो मूर्त किंवा जड नाहीं फक्त मनःचक्षूलाच दिसणारा आहे असें जोंवर दोघांनाहि माहीत आहे तोंवर दोघांनी एकमेकाशीं भांडण्यांत कांही अर्थ नाहीं. जेव्हां पहिला आपल्या योग्य सीमेच्या बाहेर जाऊन ईश्वराला मूर्त म्हणतो, किंवा दुसरा तो मन-श्चक्षूलाहि गोचर होत नाहीं असें म्हणतो तेव्हां खरा वादविषय उत्पन्न होतो आणि असा वाद कोणा एकाच्या तरी गळ्याशीं आल्याखेरीज रहात नाहीं. असो. प्रस्तुत प्रसंगीं या दोन भिन्न वर्णन–पद्धति आहेत, त्यांचा वर्ण्यविषय मात्र एकच आहे असें मान्य करून पहिल्या आर्यपद्धतीस 'परोक्ष' आणि पाश्चात्य पद्धतीस 'अपरोक्ष' अशीं नावें योजून कफ–वात–पित्तासंबंधीं उलगडा करून दाखवूं.

(समासीय टीप: पौर्वात्य सांप्रदायांतील विशेष)

| नवें अपरोक्ष वर्णन | जुनें परोक्ष वर्णन |
|---|---|
| १ वायूनें क्रिया ( हालचाली ) घडतात. | १ वायु क्रिया घडवितो. |
| २ अग्नीनें विक्रिया ( द्रव्यांतरें ) घडतात. | २ पित्त विक्रिया घडवितें. |
| ३ क्रिया किंवा विक्रिया 'वस्तू' च्या आश्रयानें घडतात. | ३ कफ हें क्रिया–विक्रियांचें अधिष्ठान आहे. |

हें कोष्टक आयुर्वेदीय वर्णनाशीं तंतोतंत जुळणारें आहे असें नाही हें उघडच आहे तथापि एक दोन मुद्यांच्या बाबतांत तें यथार्थ आहे असें दिसून येईल त्या बाबती अशा. बाह्य जगाचा अनुभव हा मनुष्याला प्रथमतः येणारा आहे. स्वतःच्या शरीराविषयीं जिज्ञासा जरी आरंभापासूनच असली तरी बाह्य जगतांतील व्यापारांचें निरीक्षण होऊन त्यांतून थोडीबहूत व्यवस्था निर्माण झाल्याखेरीज ती जिज्ञासा तृप्त करून घेण्याचा उपक्रम करतां येत नाही. शारीरव्यापार हे आपल्या नित्य परिचयाचे असतात आणि म्हणूनच त्यांची छाननी करण्याची आवश्यकता आपणास सहसा उत्पन्न होत नाही. ज्या गोष्टी आपल्या कमी परिचयाच्या असतात त्याविषयी कुतूहल उत्पन्न होतें आणि त्यांच्यांत व्यवस्था उत्पन्न करतांना प्रथमतः आपल्या नित्य परिचयाच्या गोष्टींच्या उपमेचें साह्याय्य आपण हरघडी घेत असतों. ज्योतिष-शास्त्राचा विषय स्वतःच्या व्यक्तिगत विचारापासून जास्तींत जास्त दूर आहे. परंतु सर्व भौतिक शास्त्रां-मध्यें त्याच्यावर मानवी मनाची उडी पहिल्याने पडलेली दिसते. त्यांत देखील पहिली शास्त्ररचना म्हणजे स्वतःच्या मनोभावनांच्या भाषेंत ज्योतिष अनुभवांचा वर्णनें अशींच होतीं. सूर्य, चंद्र, राहू, केतू, इत्या-दिकांना मानवी भावनांनी सजवून त्यांचे जे व्यापार चालतात ते त्या भावनांचीं फलें होत असें शास्त्र सांगू लागलें. पुढे आपल्या निकटच्या हालचालींचा अभ्यास बारकाईने होऊ लागून त्यांची संगति आपल्या अत्यंत परिचयाची झाली इतकी कीं, स्वतः आपल्या मनोभावनांची छाननी-सुद्धां तितक्या बारकाइने झाली नसल्यामुळे या बाह्य परंतु जवळच्या जगांतील निरीक्षणावरून आपण जें शास्त्र बनविलें त्याच्याच भाषेंत ज्योतिष बोलण्यास सुरुवात झाली. गतिनियमांचा जो गवसणी आपल्या निकटच्या हालचालींना बसली तीच ग्रहमालेच्या हालचालींना आपण बसवून पाहिली आणि ती यथास्थित जुळली देखील. ही ज्योतिषविज्ञानाची पहिली पाहिरी आधुनिकांनाच आक्रमलेली आहे असें नव्हे तर आपल्या भास्कराचार्यादिकांनाहि स्वीकारलेली आहे.

*उपमितीनें ज्ञानसंग्रह करण्याची रीत*

आतां या भौतिकशास्त्रांच्या पसाऱ्याशीं ताडून पाहतां असा देखावा दिसू लागला कीं देहाबाहे-रील व्यापारांचें व्याकरणात्मक ज्ञान (म्हणजे छाननी करून मिळविलेलें ज्ञान) आपण जें संपादन केलें आहे त्या मानानें स्वतःच्या शरीरांतील व्यापारांचें ज्ञान फारच कोतें पडतें. शरीरबाह्य पदार्थांशीं आपला जो परिचय आहे त्या मानानें शारीरिक पदार्थांचा परिचय कांहीच नव्हे. असें झाल्याबरोबर बाह्य सृष्टि-विषयक शास्त्राच्या भाषेंत शारीरिक सृष्टी सांगू लागण्याचा पायंडा पडत चालला. तात्पर्य हें कीं मानवी मनाची आकांक्षा जरी सर्व अंतर्बाह्य सृष्टी आवाक्यांत आणण्याची असली तरी मानवी मनाची उडी कांही सीमेपलीकडे जाऊ शकत नाही. म्हणून त्याला नेहमीं सृष्टीचा अंशतः अभ्यास करावा लागतो आणि निरनिराळ्या क्षेत्रांत प्रवास करून अधिकाधिक क्षेत्र आक्रमावें लागतें. वरील कोष्टकाकडे पाहिलें असतां असें दिसून येईल कीं डाव्या रकान्यांत लिहि-लेलें वर्णन बाह्य जगांतील घडामोडांचें आहे परंतु उजव्या रकान्यांतील वर्णन शरीरास अनुलक्षून केलेलें आहे. तथापि वरती मधल्यामध्यें माल जुने वर्णन नवें वर्णन असा भेद दर्शविला आहे. वाचक शंका घेतील कीं जुने लोक शरीरबाह्य सृष्टीचें वर्णन करीत नव्हतेच कीं काय ? उलट नवे लोक शारीरिक व्यापारांचें वर्णन करीत नाहीतच कां काय ? उत्तर असें आहे कां जुने लोक शरीरबाह्य सृष्टीचें वर्णन करीत असत परंतु तसें करतांना सुद्धां येथे दर्शविल्याप्रमाणे परोक्ष वर्णनाकडेच ते कल दाखवीत; उलट आधुनिक शास्त्रकार शरीरव्यापारांचें वर्णन करतात पण तें अपरोक्ष रीतीनेच करतात. दोन वर्णनांत त्यांनी भाषाभेदहि ठेवलेला नाही. दैहिक किंवा अदैहिक अशीं विशेषणें मागे लावण्यापेक्षा जास्त भेद ते ठेवीत नाहीत.

*शारीर व्यापारास बाह्य व्यापारांची उपमा*

कोष्टकासंबंधीं दुसरा मुद्दा असा कीं त्यांत दोन अनुभवांची तुलना केलेली आहे. कांहीं गोष्टी आपण बाहेर घडलेल्या पाहतों तसल्याच गोष्टी शरीरांतहि घडत असतात इतकेंच त्यांत सांगितलें आहे. शरीर व्यापारांची छाननी त्यांत नाहीं. शरीरांतील अवयवांचा उल्लेख त्यांत नाहीं किंवा असे वेगवेगळे अवयव एकमेकांवर किती किंवा कसे अवलंबून आहेत किंवा नाहींत? इत्यादि व्याकरणात्मक प्रश्नांचा उलगडा त्यांत नाहीं. किंबहुना असें व्याकरण करण्याच्या उद्योगाला लागण्यापूर्वी बाह्य आणि आंतर व्यापारांतील कांहीं सामान्य लक्षांत घेऊन वरील वर्णनें केलेलीं आहेत. चरकसंहिता सुश्रुताच्या पूर्वीची असली तरी तींतील वर्णनशैली कित्येक स्थळीं फार बहारीची आहे. अशाच कांहीं स्थळांपैकी सूत्रस्थानांतील बारावा अध्याय हें एक स्थळ आहे. अध्यायाचें नांव 'वातकलाकलीय' असें आहे. अनेक ऋषी जमलेले आहेत आणि त्यामध्यें वायूच्या गुणसंबंधीं (कला = गुण ) चर्चा सुरू झालेली आहे असा प्रसंग घेतला आहे. चर्चाविषयाचें वर्णन करतांनाच असें म्हटलें आहे कीं ' कानि चास्य शरीराशरीरचरस्य शरीरेषु चरतः कर्माणि बहिःशरीरेभ्यः वा इति० ॥ ३ ॥ ''

चरकसंहितेतील उपमितिमूलक वायुवर्णन

शरीरांत आणि शरीराबाहेरहि संचार करणाऱ्या वायूचीं कामें कोणतीं हा चर्चेचा विषय आहे. चौघा जणांनी आपलीं मतें सांगितल्यानंतर पांचवे वायोर्विद राजर्षी म्हणतातः–यानि खलु वायोः कर्माणि भवन्ति तेषां अवयवान् प्रत्यक्षानुमानोपमानैः साधयित्वा प्रवक्ष्यामः । वायुः प्रवर्तकः चेष्टानाम्, नियन्ता प्रणेता च मनसः, सर्वेन्द्रियाणां उद्योजकः-- स्थूलाणुस्रोतसां भेत्ता, कर्ता गर्भाकृतीनां, आयुषः अनुवृत्तिप्रत्ययभूतो भवति अकुपितः ॥ कुपितस्तु खलु मनो व्याहन्ति, सर्वेन्द्रियाणि उपहन्ति, विनिहन्ति गर्भान् । अस्य प्रकृतिभूतस्य लोकेषु चरतः कर्माणि धरणीधारणं, ज्वलनो ज्वालनम्, प्रवर्तनम् स्रोतसाम्, पुष्पफलानां च अभिनिर्वर्तनम्, इ० प्रकुपितस्य लोके चरतः उत्पीडनं सागराणां, उद्वर्तन सरसां, आकंपनं भूमेः । आधमनं अंबुदानाम् इ० ॥ ८ ॥

यासंबंधीं उतारा

वायूची महती वर्णन करतां करतांना हे महर्षी इतक्या थराला गेले कीं सर्व जीवित वायूच्याच आधीन आहे असा सिद्धान्त त्यांनी ठोकून दिला. परंतु सभेंत दुसरे ऋषी होते त्यांना ही अतिशयोक्ति पटली नाहीं. लगेच एकानें आक्षेप घेतला कीं सर्व जीवित पित्तावलंबी आहे. इतक्यांत तिसऱ्या एकानें दोघांनाहि हरकत करून सर्व आयुष्य कफाच्या आधीन आहे असें प्रतिपादन केलें. सरते शेवटीं आत्रेय पुनर्वसूंनी समारोप केला कीं एकान्तिकपणा सोडला तर सर्वांचेंच म्हणणें खरें आहे.

चरकसंहितेंतील हे उतारे वाचून पुष्कळ आधुनिक वाचक असें म्हणतील कीं येथील वायूच्या व्यापारांचें वर्णन ' नर्व्हस सिस्टिम् ' च्या व्यापारांचेंच वर्णन आहे. वक्त्याचा असा अभिप्राय असेल कीं वायूचीं म्हणून जीं कामें वर्णिलीं आहेत तींच आज नर्व्हस सिस्टिम्चीं म्हणून वर्णन करतात, तर तें म्हणणें पुष्कळ अंशीं बरोबर आहे. परंतु ' नर्व्हस सिस्टिम ' म्हणून आपण जो अवयवसंघ ओळखतो त्याचे अमुक व्यापार असें ओळखून तें वर्णन केलें आहे असा जर अभिप्राय असेल तर तो पतकरणें चुकीचें होईल. ' नर्व्हस सिस्टिम ' ज्यानें मुळीच पाहिलेली नाहीं त्यालाहि असेंच वर्णन करतां येईल. वायु कर्ता गणलेला आहे. आतां शरीरावयवांपैकी कशावर त्याचा शिक्का मारावयाचा हें नवीन अनुभव घेतल्याशिवाय समजावयाचें नाहीं. शरीरामध्यें अमुक इतके व्यापार घडतात हा एक (प्रत्यक्ष) अनुभव आणि शरीराबाहेर अमुक इतके व्यापार घडतात हा दुसरा ( प्रत्यक्ष ) अनुभव यांचा मेळ घालण्याच्या दोन रीति. ( १ ) जेथे जेथे हालचाली दिसतात तेथे त्या वायुकृत असतात असा कार्यकारणभाव गृहीत धरला तर त्यावरून शरीरांत वायु कर्ता आहे हो सरळ अनुमिति; ( २ ) किंवा बाह्य जगाच्या अनुभवावरून एकदम उपमिति ( उपमा ). प्रत्यक्ष, अनुमान आणि उपमिति यांच्या बळावर बोलतो असें

कांहीं आधुनिकांचा भ्रम आणि त्याचा निरास

मुळींच वाचोर्विद ऋषिनींच सांगून टाकलें आहे. त्यांच्या वचनांत शरीरावयवांचा मुळींच उल्लेख आलेला नाही परंतु कर्में जीं सांगितलीं त्यांचे मात्र अवयव (विभाग) पाडले असून त्यांची बाह्य जगतांतील कर्मांशीं तुलना केली आहे. अंतर्बाह्य कर्में प्रत्यक्ष होत. मनामध्यें त्यांचा मिलाफ किंवा एकसूत्रीपणा उपमेनें किंवा अनुमानानें केलेला आहे असा सरळ अर्थ निघतो. हीच विचारसरणी पित्त-कफानाहि लावतां येते. वातपित्तकफासंबंधीं सिद्धान्त सुश्रुतामध्यें सूत्र १५ आणि निदान १ मध्यें सांगितला आहे. तात्पर्यार्थानें तो चरकाचाच अनुवाद आहे.

वायु म्हणजे नर्व्हस् सिस्टिम् किंवा तत्रस्थ शक्ति असें म्हणण्याचा मोह ज्यांना आवरत नाही त्यांनी एका गोष्टीकडे अवश्य लक्ष द्यावें. ती गोष्ट ही कीं सुश्रुतांत वायूचें आलय किंवा स्थान पक्काशय आणि गुद असें सांगितलें आहे. वायूनें नर्व्हस् सिस्टिम अभिप्रेत असतो तर मस्तक आणि पृष्ठवंश यांचा उल्लेख आला असता. वास्तविक वायु ही कल्पना बाह्य जगांतील वायूवरून उपमेनें घेतली आहे. शरीरांतल्या कोणत्या अवयवावर ती बसवावयाची असेल ती विशिष्ट अनुभवावरून सिद्ध करावी लागेल. वायु=नर्व्हस् फोर्स असें गृहीत धरतां यावयाचें नाही.

स्थानांचा उल्लेख विसरूं नका

## संवर्धित सूत्र

चरकाप्रमाणें सुश्रुतांनीहि कफ वात पित्त हे जीविताधार मानले आहेत असें येथवर दाखविलें आहे. आता चरकोक्त सूत्रांत सुश्रुतांनी नवीन भर कोणती घातली हें दाखवावयाचें आहे. कफ, वात, पित्त यापैकीं कोणत्याहि एकानें देहधारणा होते असें म्हणणें हा एकांतिकपणा आहे असें चरकांत मोठ्या मार्मिकपणें दाखविलें आहे. त्यावर सुश्रुतसंहितेंत असें सुचविलें आहे कीं कफ–वात–पित्तांनी देहधारणा होते हें कबूल. परंतु तेवढ्या तिघांनीच ती होते असें म्हणणें हें देखील एकांतिकच कारण,

**नर्ते देहः कफादस्ति न पित्तान्न च मारुतात् ॥**
**शोणितादपि वा नित्यं देह एतैस्तु धार्यते ॥ ४ ॥ (सूत्र २१)**

वातादिकांच्या बरोबरीचा मान रक्तालाहि दिला पाहिजे.

वात, पित्त, कफ मूर्त नाहीत परंतु रक्त हें मूर्त आहे हा भेद लक्षांत घेतला असतां रक्त म्हणून जो चौथा जीविताचा आधार सांगितला त्याच्याशीच त्या अमूर्त गोष्टी मिलाफ पावलेल्या आहेत असें सांगितलें हें अगदीं साहजीक झालें यांत संशय नाही. मूर्तावरून अमूर्ताची कल्पना केली तरी त्याला पुनः कांहीं तरी आश्रय शोधावा लागतो अशी मनःप्रवृत्ति आहे ईश्वर अमूर्त आहे हें मूर्तांच्याच पसाऱ्यावरून ठरविलें तरी त्या अमूर्ताला मनामध्यें पुनः मूर्ति कल्पणें आणि त्या मूर्तीवर पुनः सर्व संस्कार कल्पणें हें एक प्राचीनांचें वळण आहे. तें इतकें हाडीमाशीं खिळलेलें आहे कीं त्याचा सहसा त्याग करवत नाही. वात, पित्त, कफांची गतीहि तद्वतच आहे. कांहीं ठिकाणीं दिसणाऱ्या मूर्त भावावरून सर्वत्र प्रकट होणारीं विशिष्ट कर्में वर्णन करण्याकरतां अमूर्त वात, पित्त, कफ मानले तथापि ते प्रत्यक्षांत अमूर्त असले तरी कल्पनेंत मूर्त झाले आणि पुनः मूर्तांच्या भाषेंत त्यांचें वर्णन करण्याची इच्छा उत्पन्न झाली. वाताचें स्थान पक्काशय आणि गुद असें सांगण्यामध्यें मूर्त वात तेथे अनुभवास येतो असा अर्थ आहे; परंतु बाह्य वातकर्मावरून शारीरवातकर्में अमूक म्हणून जी एकदा उपमिति केली तिला धरून पुनः वाताचें स्थलांतर न्यूनाधिक्य विकृताविकृत इत्यादि वर्णन करण्याची अपेक्षा राहिलीच म्हणून वाताचें स्थान अमुक म्हटलें तरी तो सर्वव्यापी आहे असें म्हणणें भाग पडलें. शिवाय त्याला वाहण्याला मार्ग पाहिजे, आणि कांहीं मूर्त वाहनही पाहिजे अशी अपेक्षा राहिली. या दोनही गोष्टी रक्तामध्यें सापडल्या. वात, पित्त,

अमूर्त वातादिकांचें वाहन मूर्त रक्त

कफ याबरोबर रक्त हाही एक चौथा जीविताधार आहे असें सूत्र बनविल्याने एकांतून दुसरी त्यांतून तिसरी अशा ज्या जिज्ञासा निघाल्या त्या सर्व तृप्त झाल्या. जी गोष्ट वाताची तीच पित्ताची आणि कफाची. अनुमितीच्या साच्यांत या गोष्टी अशा बसतातः—

गृहीत किंवा अध्याहृतः—शारीरकर्में वात, पित्त, कफ, यांच्या आधीन असतात.

अनुभवः—(१) शरीरामध्ये हरएक ठिकाणीं कर्में घडतात.

(२) प्रवाही रक्त सर्व शरीरभर वहात राहतें.

अनुमितिः—वात, पित्त आणि कफ हे रक्ताबरोबर सर्व शरीरभर संचार करतात. सू. (२१।३-४)

वर जी रक्ताची महति सुश्रुताने वर्णिलेली म्हणून सांगितली आहे ती शल्यविज्ञान लिहिणाराला सुचावी हे अगदीं साहजिक आहे. जेथे हरघडी व्रणाशीं व्यवहार तेथे रक्ताशीं वारंवार प्रसंग यावयाचा हें ठरलेलेंच आहे. व्रणचिकित्सेमध्ये रक्तमोक्ष थांबवावयाचा ही मोठी कामगिरी आहे. विशेषतः सद्योव्रण —आघात अपघातामध्ये उत्पन्न झालेले व्रण—ज्याला बरे करावयाचें आहेत त्याला तर रक्त आवरण्याचे उपाय उत्तम माहीत असणें अगत्य आहे. रक्तमोक्षाने शरीराची किती हानी होते हें शल्य व्यवहारांत रक्ताशीं प्रसंग त्याच्या डोळ्यापुढे सतत वागत असणार. आतुराचें जीवित जर वाचवाव-याचें असेल तर प्रथमतः रक्ताकडे लक्ष पुरविलें पाहिजे हा त्याचा आद्य मंत्रच होऊन बसतो. सीवन, रक्तस्तंभन संमोहन आणि जंतुनिवारण हे, शल्यविज्ञानाचा कर्मकौशल म्हणून जो भाग आहे, त्याच्या प्रगतीचे टप्पे आहेत. सुश्रुताने सीवनापैकी बाह्य त्वचा सिवण्याची कला संपादि-लेली होती. अंतर्गत सीवन करण्याचा उपाय त्याला चांगलासा साधला नव्हता. आतडें शिवण्याचा एक उल्लेख सुश्रुताच्या सद्योव्रण-चिकित्सेंत आहे. पण तें सीवन म्हणजे मुंगळे डसवून त्यांचें शरीर तोडून काढणें असे आहे. असो. अंतर्गत सीवनाची व्यवस्था नसल्यामुळे शस्त्रचिकित्सेचें क्षेत्र विशेष वाढणें अशक्य होतें. रक्तस्तंभनाकरतां यंत्र वापरण्याचा प्रघात त्यावेळीं होता असें दिसत नाही. तसें वर्णन सापडत नाही. अर्थात् रक्तवाहिनी बांधण्याची युक्ति नव्हती हें उघडच आहे. संमोहने त्यावेळीं नव्हतीं. तथापि जंतुनिवारणाची चालचलाऊ व्यवस्था—अगदी जंतूंचा नायनाट करण्याकरतां म्हणून नव्हे परंतु तत्सम फळ देणारी— त्या काळीं अमलांत होती. तात्पर्य हें कीं हल्ली यंत्रोपकरणें असून देखील रक्तमोक्षाचें भय शल्यविदाला अजूनही वाटतेंच तर त्यावेळीं साधनांच्या अभावीं तें विशेषच असलें पाहिजे यांत शंका नाही.

वरील कारणांनी शल्यविदांच्या मनावर रक्ताचें माहात्म्य ठळकपणें ठसून गेल्यावर दुसऱ्याहि एक दृष्टीने रक्ताची महती त्यांना दिसून आली. ती सूत्रस्थानाच्या चौदाव्या अध्यायांत वर्णिली आहे. आपलें शरीर कशाने वाढतें ? कालगत्या आणि विशेषतः काम करीत असतां शरीराची जी झीज होती ती कशाने भरून निघते ? हे प्रश्न साहजीक उद्भवणारे आहेत. त्यांना उत्तरहि साहजीकच रक्ताची उत्पत्ति रसापासून मिळणारे आहे कीं 'अन्नाने' अध्यायाच्या आरंभींच अन्नाचा 'रस' तयार होतो असें सांगून तो रस हृदयांतून धमनिद्वारा सर्व शरीरभर पसरतो असें विवरण केलें आहे. पुढे असें सांगितलें आहे की यांतूनच रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा, आणि शुक्र असें धातुसप्तक सिद्ध होतें.

आरंभालाच सः रसः कृत्स्नं शरीरं अहरहः तर्पयति वर्धयति धारयति यापयति चादृष्टहेतुकेन कर्मणा। असें वर्णन असून पुनः धात्वंतर सांगितल्यानंतर म्हटलें आहे कीं

रसजं पुरुषं विद्यात् रसं रक्षेत् प्रयत्नतः ॥
अन्नात् पानात् च मतिमान् आचाराच्चाप्यतंद्रितः ॥ १२ ॥

यावरून सर्व शरीरव्यापार रसावलंबी आहेत असा अभिप्राय स्पष्ट होत आहे. अन्नाची योग्य परिणती होऊन जे द्रव्यांतर प्राप्त होते त्याला रस म्हटलेलें आहे हें ध्यानांत घेतलें असतां सर्व देहव्यापार

त्यावरच अवलंबून असतात हें विधान किती यथार्थ आहे हें कळून येईल. ज्ञानकर्मेंद्रियांची संस्थिति म्ह० चांगल्या रीतीने आपआपलें काम करण्यास समर्थ असणें ही स्थिति किंबहुना त्यांचें आयुष्य किंवा जीवितच मुळी रस यथायोग्य मिळण्यावर अवलंबून आहे ही अनुभवाची गोष्ट आहे. येथील रस वेगळा काढून दाखविण्याजोगा नसतो तो उत्पन्न झाल्याबरोबर रक्तांत सामील होतो. तथापि तो आहारापासून उत्पन्न होतो आणि रक्तांत मिळतो एवढ्यावरूनच त्याचें स्वतंत्र अस्तित्व चर्मचक्षूला नाही तरी ज्ञानचक्षूला दिसतें-म्हणून त्याला 'तेजोभूत' ( सामर्थ्यवान् ) आणि 'परमसूक्ष्म' असें म्हटलें आहे.

सर्व शरीरव्यापार रसावलंबी

वरील अवतरणांतले 'अदृष्टहेतुकेन कर्मणा' हे शब्द मुद्दाम ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. रसाचीं कर्में म्हणून जीं सांगितलीं तीं प्रत्यक्ष अनुभवाचीं आहेत. तीं रसावर अवलंबून असतात हेंही अनुभव सिद्ध आहे. म्हणून ग्रंथकार या गोष्टीचें सरळ अपरोक्ष वर्णन करतात कीं हीं रसाचीं कर्में होत. रस हीं कर्में कां करतो म्हणून विचारलें तर त्याची कारणमीमांसा किंवा हेतु आपणांस माहीत नाही असें त्यांचें स्पष्ट उत्तर आहे. कर्म अनुभवल्यानंतर त्याच्या मागे एकादा हेतु कल्पावयाचा ही बुद्धीची कसरत आहे. ती पुष्कळ वेळा उपयोगी पडते. परंतु तिच्यावाचून अडावयाचें नाही असा शास्त्रकारांचा शिरस्ता आहे.

हेतु माहीत नाही

दोषधातुमलमूलं हि शरीरम् ॥ असें एक आयुर्वेदीय सूत्र आहे. तें सुश्रुतानें स्वीकारलें आहे. दोष म्हणजे कफ, वात, पित्त आणि धातु म्हणजे सप्त धातु वर सांगितलेच आहेत. आता राहिले मल. तेवढ्यांचा विचार झाला म्हणजे शरीराचा विचार झालाच असें वरील सूत्रांत सुचविलें आहे. दोषधातुमल यथास्थित असले म्हणजे शरीर यथास्थित असतें आणि ते बिघडले असले म्हणजे शरीर बिघडलेलें असतें म्हणून शरीराचा विचार या तीन सदरांत करणें जरूर आहे असा या सूत्राचा भावार्थ आहे. तथापि या सूत्राचा विचार करतांना देखील सुश्रुतांनी आपली पूर्वोक्त विचारसरणी कायम ठेवलेली आहे. आहारजन्य रस हाच धातूंचें पोषण करतो आणि त्यामुळे शरीर, कृश नाही स्थूल नाही असें, मध्यम आकाराचें राहून सर्व इंद्रियें आपापलें काम यथायोग्य रीतीने करण्यास समर्थ होतात असें त्यांचें सांगणें आहे.

इतर सूत्रांच्या निरूपणांत रसाचें वर्णन

......अन्नरसः शरीरमनुक्रामन् समान् धातून् उपचिनोति, समधातुत्वात् मध्यशरीरो भवति सर्वक्रियासु समर्थः ...... ॥ ३७ ॥ ( सु. सू. १५ )

मागे १४ व्या अध्यायांत देखील रसाचें वर्णन करतांना म्हटलें आहे कीं:-

तस्मिन् सर्वशरीरावयवदोषधातुमलाशयानुसारिणी रसे जिज्ञासा... ॥ ३ ॥

धन्वन्तरींचा व्यवहार शल्य काढून टाकण्याचा. उठल्या बसल्या तेथे रक्ताशीं गांठ येणार. हाताने करावयाच्या व्यवहारामध्यें दुष्ट रक्त काढून टाकण्याचा उद्योगच मुख्य आणि औषध्यादि व्यवहारांतहि रक्तांतर्गत किंवा रक्तपर्यवसायी रसावरच मुख्य लक्ष द्यावयाचें. आरोग्याचा विचार केला तरी तेंही रसाधीन. म्हणून शोणितवर्णनीय अध्यायाचा उपसंहार असा केला आहे.

रक्त हाच जीविताचा मूलाधार

देहस्य रुधिरं मूलं रुधिरेणैव धार्यते ॥
तस्मात् यत्नेन संरक्ष्यं रक्तं जीव इति स्थितिः ॥ ४४ ॥

शास्त्रमीमांसेच्या भाष्यांत हें विवेचन पुढीलप्रमाणे बसूं शकतें:-

अनुभव ( १ ) शरीराची झीज होऊन मल उत्पन्न होतात.
( २ ) शरीराची झीज अन्नसेवनाने भरून निघते.
( ३ ) शरीराची वाढ अन्नसेवनाने होते.
( ४ ) अन्न अन्नाशयांत जातें.
( ५ ) रक्त सर्व शरीरभर संचार करतें.

अनुमान ( १ ) अन्नरस रक्तामार्फत सर्व शरीरभर पसरतो.

( २ ) रक्तानेच सर्व देहाचें धारण होतें.

[ अर्थात् ( ३ ) देहांतील सर्व ज्ञानकर्मेंद्रियांचे व्यापार रक्तानेच घडतात. ]

## सूत्रनिरूपणावरून बोध.

शरीरबाह्य व्यापारांची तुलना शारीरिक व्यापारांशीं करून वात, पित्त, कफ यांची कल्पना बसविलेली आहे. मूळ कल्पना करतांना शरीरांतल्या अमूक अवयवाचा अमक्या क्रियेशीं असा संबंध आहे इत्यादि गोष्टी मनांत आणलेल्या नाहींत. किंबहुना शरीरावयवांची छाननी ज्याने केलेली नाहीं त्याला ती कल्पना सुचूं शकते किंवा अशाच दुसऱ्याला ती समजूं शकते. कोणतीहि एक गोष्ट पाहिल्यावर दुसरी पाहिली असतांना या दोन अनुभवांची तुलना करूं लागणें हा मनोधर्म आहे. या मनोधर्माला अनुसरून या कल्पनेची उभारणी शास्त्रकारांनी केलेली आहे. अशी एकदा कल्पना केल्यानंतर जर आपण शरीराची छाननी करावयास बसलों तर त्यांत जे जे अवयव सांपडतील त्यांपैकीं एकेक अवयव घेऊन याला वात म्हणतां येईल का याला पित्त म्हणतां येईल कां? असा विचार मनांत येऊन कांहीं अवयवांशीं आपण त्यांना निगडित करण्याचा प्रयत्न करावा हें साहजीक आहे. असा प्रयत्न होऊं लागल्याबरोबर शरीरांतल्या मूळ उपमानभूत* वात, पित्त किंवा कफ यांच्याच वर्गांतलीं द्रव्यें प्रसंगविशेषीं जेथे दिसतात तीं त्यांचीं स्थानें गणलीं आणि म्हणूनच वाताचें स्थान पक्वाशय आणि गुद असें सांगितलें. तथापि उपमिति करणाराचा उद्देश हीं मूर्त द्रव्यें वर्णन करण्याचा नव्हता तर आरंभी उपमेकरतां घेतलेल्या कर्मसादृश्याचें वर्णन करण्याचा होता. हीं कर्में तर सर्वत्र प्रकट होतात म्हणून कफ, वात, पित्त हे सर्वव्यापी आहेत असा उल्लेख करावा लागला.

मूळ कल्पना आणि तिचा प्रत्यक्षाशीं जम

एका गोष्टीची दुसऱ्याला उपमा देण्याचा प्रसंग येतो तेव्हा त्यामध्यें कांहीं बाबतींत साम्य असतेंच हें जसें निश्चित तसें इतर बाबतींत साम्य नसतें हें देखील निश्चित समजावें. वात, पित्त, कफ यांच्या बाबतींतहि तसेंच आहे. वारा, विस्तव आणि पाणी यावरून जरी वात, पित्त, कफ सुचले असले तरी त्यांचे मूर्तिसाम्य शास्त्रकारांनी केव्हांहीं मनांत आणलेलें नव्हतें हें निश्चित होय. सुश्रुतादिकांपाशीं मूर्त द्रव्यें पाहण्याचीं जितकीं साधने होतीं तितकीं सर्व आपणापाशीं आज आहेत तथापि जे वात, पित्त, कफ सर्वव्यापी म्हणून ग्रंथकारांनी वर्णिले ते मूर्तस्वरूपांत कोणालाहि दाखवितां आलेले नाहींत याचें इंगित हेंच आहे. दुसरी एक मौज आहे. संज्ञा ( म्ह० संवेदना ) आणि बुद्धिव्यापार यांचें अस्तित्व वारा, विस्तव, आणि पाणी यांमध्यें असल्याचा प्रत्यय येत नाहीं. अर्थात् आपल्याला जर दोहोंमध्यें साधर्म्य याही बाबतींत कल्पावयाचेंच असेल तर अमुक संज्ञा अमक्याला असा संकेत पाहिजे. सृष्टयुत्पत्ति वगैरे सांगण्याच्या शास्त्रामध्यें असा संकेत होऊन गेलेला होता त्याला अनुसरून चरकसुश्रुतांनी श्रवणस्पर्शन या संज्ञा वाताच्या म्हणून सांगितल्या परंतु दर्शनसंज्ञा मात्र पित्ताची म्हणून सांगितली. असें करतांना सुद्धां डोळ्यांतली चमक आणि अग्नीची चमक यांची तुलना साधण्याचा उद्देश उघड आहे. येथे हें लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं आलोचक पित्ताने जसें दर्शनज्ञान होतें म्हणून सांगितलें तसेंच साधक पित्ताने अभिप्रार्थित मनोरथ साधतात असें सांगून हा साधक अग्नि –वायु नव्हे– हृदयांत असतो असें सांगितलें आहे. ( सु० सू० २१।१० ).

उपमेतली उणीव संकेताने भरून काढावी लागते

[अपूर्ण

---

* शरीरांत कल्पिलेले वात, पित्त, कफ, हे उपमेय असून शरीरबाह्य वात, पित्त, कफ हे उपमान होत.

# पारिभाषिक शब्दकोश

## [ चिटणीस, म. शा. परिभाषामंडळ यांजकडून ]

## रसायन–प्रकरण

पुढें जी मौलमालिकेची नामावळी दिली आहे तिजवरून किती अंगांनी परिभाषेचा विचार कर्तव्य असतो याचें थोडक्यांत दिग्दर्शन होण्याजोगें आहे. जें नांव द्यावयाचें त्यावरून त्या त्या द्रव्याचा बोध व्हावा हा हेतु असतो. कांही द्रव्यें मराठी भाषा बोलणारांच्या पूर्व–परिचयाचीं आहेत. त्यांना अगोदर मराठी नांवें आहेतच; त्यांचीं मूळ संस्कृत नांवें घेतलीं. उदा० ताम्र, पारद, सीस, लोह, यशद, वंग, रजत, सुवर्ण हीं धातुनामें. यांचे मराठी पर्याय संस्कृताहून फारसे भिन्न नाहीत. संस्कृत शब्द मराठीमध्यें ठाकठीक बसणारे असून हिंदुस्थानांतील इतर भाषांमध्येंहि खपण्याजोगे आहेत. पुष्कळ प्रसंगीं युरोपियन शास्त्रकारांनी त्यांच्याच चालू भाषेपेक्षा लॅटीन सारख्या जुन्या भाषेंतील नांवें अधिक पसंत केलीं आहेत. उदा० ऑरम्, आर्जेन्टम् इ० त्यांना अधिक जवळचीं म्हणून कांही संस्कृत नांवें मुद्दाम सुचविलीं आहेत उदा० हिरण्य व रजत. गंधक हें नांव संस्कृत तसें मराठीहि आहे.

नवीन नांव देतांना जुन्या परिचयाच्या एकाद्या नांवावरून थोडा फरक करून किंवा आगे मागे कांही पुरवणी लावून तीं बनविण्याचीं बरींच उदाहरणें आहेत. असें करतांना जुन्या परिचयाच्या द्रव्या-वरून नव्या द्रव्याची ओळख करून देण्याचा हेतु असतो उदा० समुद्राच्या मिठांतून निघणारा म्हणून समुद्र, पळसासारख्या झाडांच्या राखेंतला म्हणून पालाश, खटिका किंवा खडूमधील धातु म्हणून खट, वैडूर्य मण्यांतला म्हणून विदुर, टंकणांतला म्हणून टंक, सोमलांतला म्हणून सुमल, सुरम्यांतला म्हणून सुरम, आणि शिलेतला शैल. पुष्कळ युरोपीय नांवामध्ये सुद्धां अशाच तऱ्हेची व्युत्पत्ति आढळते. उदा० सोड्यांतला म्हणून सोडियम्, पॉट–ॲश–मधला म्हणून पोटॅसिअम्, बेरिलमधला म्हणून बेरिलिअम्, ॲलुमिना मधला म्हणून ॲलुमिनिअम् इ०.

कांही नांवें पूर्वपरिचयाच्या एकाद्या द्रव्याच्या नांवावरून न देतां त्या नवीन द्रव्याच्याच एकाद्या ठळक गुणावरून दिलीं आहेत. उदा० रक्तांक, नीलांक, शोणद. या धातूंचीं लवणें वर्णहीन ज्योतीमध्यें धरलीं असतां त्याच्या ज्या विशिष्ट वर्णरेखा दिसतात त्यांजवरून हीं नांवें दिलीं आहेत. यापैकीं पहिल्या आणि दुसऱ्या धातूचीं युरोपीय नांवें सुद्धां अशाच संदर्भावरून आलेलीं आहेत. तिसऱ्याचें युरोपीय नांव त्याच्या मूळ गांवावरून आलेलें आहे. पोळतो म्हणून प्लुष, रंग (किंवा प्रसंगविशेषीं) प्राणहि हरण करतो म्हणून हर, मंजन करण्या-च्या द्रव्यांतला म्हणून मंज, रंगीत खनिजांतला म्हणून रंज, रजतासारखा म्हणून राजत, स्फुरतो म्हणून स्फुर, रदन पावतो म्हणजे फुटतो म्हणून रद, अशीं कांही नांवें योजिलीं आहेत. यापैकीं हर आणि स्फुर हीं बऱ्याच वर्षांपूर्वी मराठींत येऊन बसलेलीं आहेत. त्याचप्रमाणे नत्र शब्द सुद्धां आधुनिक मराठींत रूढ झालेला असून हवेंतील बहुल वायु या नात्याने न त्रायते इति, जीवाचें रक्षण न करणारा, असा अर्थ त्याला देण्यासारखा आहे. मग्न, भारद, इत्यादि शब्दांना थोड्याबहुत दूरान्वयाने अर्थ देता येतो. स्कंद, यत्र, यासारखे कांही थोडे शब्द केवळ युरोपीय नांवांचे संस्कृत घाटाचे पर्याय म्हणून बनविलेले आहेत. लोहावरून केवळ त्याच्याच गणांतले म्हणून कोह आणि नोह हे शब्द बनविले आहेत. निकल याचें मूळ नांव ' कुप्फर निकेल ' म्हणजे नकली तांबें–तांब्याच्या पाषाणामध्येंच सरमिसळ असल्यामुळें–असें होतें ही एक मौजेची गोष्ट सहज ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

या यादींत ऑक्सीजन याला ' प्राण ' याच्या ऐवजीं ' प्राण्य ' ( = श्वसनीय ) असा शब्द सुचविलेला आहे; त्यांतील हेतु असा कीं प्राण शब्दाचा मूळचा अर्थ श्वास घेणाऱ्यांचा जीव हा कायम ठेवणें अपरिहार्य आहे. म्हणून श्वसनक्रियेसंबंधीं तसेंच प्राण्यांच्या इतर व्यापारासंबंधीं बोलतांना मूळ अर्थाबरोबर लाक्षणिक अर्थानेंहि तोच शब्द वापरण्याचा प्रसंग येऊं नये; एवढ्याकरतां त्याला ऑक्सि-जन असा अर्थ न देणेंच बरें.

ऑक्सिजन याला ऊर्व हें नांव फारच सोईचें आहे. या शब्दाचा अर्थ संस्कृतांत 'अतिशय व्याप्तिमान्' (व 'वडवानल') असा आहे. पृथ्वीची रासायनिक घटना पाहिल्यास ती पन्नास टक्के ऊर्वघटित आहे असें दिसून येते; बाकी शैल २५ टक्के, आश्म ७ टक्के, लोह ३ टक्के इत्यादि. हा शब्द सुटसुटीत असून त्यांत समासानुकूलता चांगली आहे; शिवाय त्यापासून ऊर्वण, ऊर्वित इ० शब्द क्रियात्मक, विशेषणात्मक असे चांगले मिळतात. परंतु प्राण शब्द ऑक्सिजन वाचकशब्दांत कोणत्या ना कोणत्या तरी रूपांत हवाच असें वाटत असल्यास निदान 'प्राण्य' अशा रूपांत तरी वापरावा अशी सूचना आहे.

कार्बन याला कर्ब असा शब्द वापरतात; परंतु अर्व असा शब्द संस्कृतांत असून कानाला अधिक बरा लागणारा आहे. त्यापासून आर्वण organic आणि अनार्वण inorganic अशी नांवे रसायनशास्त्राच्या दोन मुख्य खंडांना देतां येतील; व ती कानाला इंग्लिश नांवांच्या सारखीं अतएव लक्ष्यांत राहण्याला सोपी होऊन अर्थदृष्ट्या मात्र जास्त सरस होतील. ज्या द्रव्यांमध्ये 'अर्व' हा प्रमुख घटक आहे अशीं द्रव्यें असाच organic substances याचा आधुनिक अर्थ आहे

आटोपशीरपणा हा परिभाषेचा अत्यंत आवश्यक गुण. त्यांतल्या त्यांत रसायनशास्त्रांतील द्रव्य नामामध्यें तो विशेषच असावा लागतो. नाना द्रव्यांचीं परस्परांशीं जो रसायनविषयक नाता जडलेलीं असतात तीं होतील तितक्या स्पष्ट परंतु आटोपशीर रीतीनें मांडून दाखविण्याकरतां शास्त्रकारांनीं पुष्कळ ऊहापोह करून एक पद्धत ठरविलेली आहे. केवळ स्पष्टपणाच साधावयाचा असता तर प्रत्येक द्रव्याला एकाद अंक किंवा वर्ण ओळीनें दिला असता तर काम भागण्यासारखें होतें: उदा० शहरांतील घराचा नक्की पत्ता सांगावयाचा म्हणजे शहराचा विभाग आणि त्यांतील त्या घराचा अनुक्रम सांगितला म्हणजे बरोबर काम भागतें. परंतु या रीतीनें जरी नक्कीपणा किंवा स्पष्टपणा साधला तरी सुलभता साधत नाही. शहरांतील घराचा पत्ता देखाल शनीच्या पाराजवळ, शिवाजीच्या पुतळ्याजवळ, असा सांगितला तर सहसा विसरत नाही पण थोडा संदिग्ध मात्र होतो. रासायनिक नामकरणाच्या बाबतींत युरोपीय शास्त्रज्ञांनीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणे कांहीं ठळक अनुबंध राखून नांवें ठरविलीं परंतु तीं आटोपशीर करण्याकरतां त्यांचीं एक एक किंवा फार तर दोन आद्याक्षरें हीं चिन्हें म्हणून संकेत केला. यांतील हेतु केवळ आटोपशीरपणा साधणें हाच होय. वरील मराठी परिभाषेतील पुष्कळसे शब्द अगोदरच दोन अक्षरी आहेत. कांहीं थोडे तीन अक्षरी आहेत परंतु याहून लांबट एकही नाही. बहुधा यांचा आणखी संक्षेप करण्याची गरज भासणार नाही. भासलीच तर एक किंवा दोन आद्याक्षरें ठेऊन चिन्हें बसविणें मुळींच जड जाणार नाही.

द्विमौलिक संयुगांना नांवें देण्याबाबत सामान्यतः दोन रीती सुचविल्या आहेत. एक रीत अशी कीं नुसतीं दोनहि मौलांचीं नांवें एका शेजारी एक अशीं ठेवणें उदा० सामुद्र-हर. दुसरी रीत अशी कीं यापुढे आणखी एक अक्षर क किंवा द हें ठेवावें उदा० सामुद्रहरक किंवा सामुद्रहरद. नुसत हरसंयुग या अर्थी नांव पाहिजे असेल तेव्हा मात्र हरक, किंवा हरद असें सप्रत्यय नांव वापरणेंच भाग आहे. लघुत्वाकरतां उज्जाचा उल्लेख आरंभीं उत् असा करावा आणि गंधकाचा उल्लेख समासांत गंध असा करावा.

तीन मौलांचीं संयुगें असल्यास नुसतीं एकापुढे एक मौल-नामें ठेवणें स्पष्टतेस ठीक असत परंतु सुबोधपणास बाधक असत म्हणून युरोपीय भाषामधून अम्ल अल्क यांची परिभाषा सांकेतिक धारणांनें अगोदर अधिक आटोपशीर करून मग त्यावरून लवणांची परिभाषा साधली आहे. त्याच धरतीवर मराठी परिभाषा रचिली आहे. मुळांत कांहीं दोष आहेत ते मात्र टाळले आहेत. अम्लांच्या नांवांत उज्जाचा उल्लेख मुद्दाम करण्यांत स्वारस्य नाही तो सर्वत्र असावयाचाच म्हणून तो गाळला आहे. तसंच नत्रप्राण्यकांचीं नांवें फार आडनिडीं आहेत तीं मराठांत अम्लावरून सोईचीं करून घेतलीं आहेत.

उपकरणांचीं नांवें स्वयंस्पष्टच आहेत. त्यावर विशेष खुलासा करण्याची आवश्यकता नाही.

---

# मौलावर्त अथवा मौलपर्यय कोष्टक.

# THE PERIODIC TABLE.

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | Hydrogen<br>H उज्ज | | | | Nitrogen<br>N नत्र | Oxygen<br>O प्राण्य, ऊर्व | Fluorine<br>F प्लुष | | | |
| **Helium**<br>**He हेल** | Lithium<br>Li लीथ; माव | Beryllium<br>(Glucinum)<br>Gl विदुर | Boron<br>B टंक | Carbon<br>C कर्ब; अर्व | Phosphorus<br>P स्फुर | Sulphur<br>S गंध–क | Chlorine<br>Cl हर | | | |
| **Neon**<br>**Ne नीव्य** | Sodium<br>Na सामुद्र;सज्ज | Magnesium<br>Mg मग्न | Aluminium<br>Al आश्म, स्फट | Silicon<br>Si शैल; सिक | Vinadium<br>V विनद | Chromium<br>Cr रंज | Manganese<br>Mn मंज | Iron<br>Fe लोह | Cobalt<br>Co कोह, | Nickel<br>Ni नोह |
| **Argon**<br>**A अर्ग** | Potassium<br>K पालाश | Calcium<br>Ca खट | Scandium<br>Sc स्कंद | Titanium<br>Ti तित; | Arsenic<br>As सुमल | Selenium<br>Se सूम्य | Bromine<br>Br ब्रोम | | | |
| | Copper<br>Cu ताम्र | Zinc<br>Zn यशद, | Galium<br>Ga गल | Germanium<br>Ge जर्मण; | Columbium<br>Cb कलंब | Molybdenum<br>Mo मेदिन्य | | Ruthenium<br>Ru रूथ | Rhodium<br>Rh रोह | Paladium<br>Pd पलाद |
| **Krypton**<br>**Kr कृप** | Rubidium<br>Rb रक्तांक | Strontium<br>Sr शोणद | Yttrium<br>Yt यत्र | Zirconium<br>Zr क्षीर | Antimony<br>Sb सुरम | Telurium<br>Te भूम्य | Iodine<br>I योद | | | |
| | Silver<br>Ag रजत | Cadmium<br>Cd कद | Indium<br>In इंद | Tin<br>Sn वंग | Tantalum<br>Ta तंत | Tungsten<br>W तुंग | | Osmium<br>Os ऊष | Iridium<br>Ir इर | Platinum<br>Pt राजत |
| **Xenon**<br>**Xe क्षेन** | Caesium<br>Cs नीलांक | Barium<br>Ba मारद | Lanthanum<br>La लीन | Cerium<br>Ce सीर | Bismuth<br>Bi बिस | Uranium<br>U वारुण | | | | |
| | Gold<br>Au स्वर्ण; | Mercury<br>Hg पारद रस | Thalium<br>Tl थाल | Lead<br>Pb सिस | | | | | | |
| | | Radium<br>Ra रद | | Thorium<br>Th थर्व | | | | | | |

# पारिभाषिक शब्दकोश

[ चिटणीस, म. शा. परिभाषामंडळ यांजकडून ]

## रसायन प्रकरण २[१]

Chloride = हरक हरद
Oxide = प्राण्यक. प्राण्यद, उर्वेक
Hydroxide = उदप्राण्यक, उदोर्वेक
Sulphide = गंधक
Ammonia = अमोद
Ammonium = अमोदीय
Amido = अमोध
Amino = अमोदीन
Ferrous = लोहित
Ferric = लोहिक
Nitrogen Monoxide $N_2O$ = नत्रिम प्राण्यक
Nitrogen Oxide NO = नत्र-प्राण्यक
Nitrogen Trioxide $N_2O_3$ = नत्रित प्राण्यक
Nitric Oxide = $N_2O_4$ = नत्रीय प्राण्यक
Nitrogen Pentoxide $N_2O_5$ = नत्रिक प्राण्यक
Hydrochloric acid = हराम्ल
Hypochlorous acid = उपहराम्ल
Chlorous acid = हरिताम्ल
Chloric acid = हरिकाम्ल
Perchloric acid = प्रहरिकाम्ल
Orthophosphoric acid = सं स्फुरिकाम्ल
Pyrophosphorid acid = परिस्फुरिकाम्ल
Metaphosphoric acid = परा स्फुरिकाम्ल
Sulphurous acid = गंधिताम्ल
Sulphuric acid = गंधिकाम्ल
Thyosulphuric acid = गंध गंधिकाम्ल, गंगंधिकाम्ल
Potassium chlorate = पालाश हरिक

Asbestos = तपत्राण
Blowpipe = फुंकनळी
Beaker with spout = चोचपेला
Burette = मोजनळी
Burner = जाळमुख
Condenser = गारठाण
Corkborer = बुचाची वेधणी; बूचवेधण.
Crucible = मूस
Deflagrating Spoon = जाळ पळी
Desiccator = कोरडें भांडें, उदा० करंडा सुकठाण
Distilling Vessel = उफाळणी
Evaporating Vessel = वाफराळें
Enameled Vessel = मिन्याचें भांडें
Flask = चंबू
,, Conical = लोटी
,, with long neck and distilling tube = बकपात्र
Forceps = चिमटा
,, toothed = सांडस (संदंश)
Heater = तापवणी
Oven = भट्टी; धगठाण
Pipette = शोसनळी
Receiving Vessel = धारणी; ग्रहणी

---

[१] रसायनप्रकरणीं शब्दकोशाचा पहिला हप्ता वर्ष ३ अंक ३ मध्यें आलेला आहे.

**Refrigerator** = शीतालय; थंडीठाण
**Retort** = हंसपात्र
Stand = ठेला, ठीया, ठाण, घोडा
Test tube = पारखणी
Test tube stand = पारखाळें
Thermostat = तपस्थापक
Tube = नळी
,, Bent = बाक नळी
,, Drying = सुकाऊ ''
,, Inlet = आयात ''
,, Outlet = निर्यात ''
,, Combustion = जाळनळी
Trough = दोणी, तसराळें

---

## उष्णता-प्रकरण

Absolute Temperature Scale = मौलिक तापावलि
Absolute Temperature = मौलिक तपमान
Adiabatic Expansion = असंक्रम विस्तार
Athermanous = ( उष्णतेला ) अनिर्गम्य
Boiling = १ उकळणें, २ विप्लव
Boiling Point = विप्लव-बिन्दु
Calorific Power = उष्मदायकता
Calorimeter = उष्ममापक, उष्णतामापक
Calorimetry = उष्णतामापन, उष्ममापन
Centigrade Scale = शतक्रमी तपावली
Change of state = अवस्थान्तर
Circulation = संसरण
Coefficient of Expansion = वृद्धिगुणक
Condensation = १ द्रुति, द्रव बनणें, द्रवत्व पावणें, ( वायु अवस्थेंतून द्रवावस्थेंत येणें ), २ घनभाव, [ Rarefaction विरलभाव ]
Conductor, good = सुवाहक
Conductor, bad = दुर्वाहक
Conductivity, thermal = उष्मवाहकता
Contraction = संकोच
Conduction ( of heat ) = संसर्प
Cooling = निवणें, निवविणें, निर्तापण
Critical Temperature = द्रवान्तिक तपमान
Convection ( of heat ) = अपोह, उष्मापोह
Degree of temperature = तपांश
Density = घनता
Dew Point = सेक बिन्दु
Diathermanous = उष्मनिर्गम्य, निर्गम्य
Dissipation of Heat = उष्मविसर्जन
Ebullition = उकळणें, उकळी
Evaporation = १ उडून जाणं २ उत्प्लवन
Emission of Heat उष्मविसर्जन
Emissivity = विसर्जकता
Efficiency = तत्परता
Engine = इंजन, एंजिन
Expansion = वृद्धि
,, Linear = आयामवृद्धि
,, Superficial = क्षेत्रवृद्धि
,, Volume = आकारवृद्धि
Expansion ( of a gas ) = विस्तार [ संकोच Contraction ]
Fusion = वितळणें, विलय
Freezing mixture = गोठवण
Heat = उष्णता, उष्म
Heat Capacity = उष्माहार
Heat Engine = उष्मयन्त्र

Heat Radiated out = लसितोष्म प्रारितोष्म

Heat Rays = उष्मकिरण

Humidity = आर्द्रता

Hygrometer = आर्द्रतामापक

Input ( Mechanical Energy ) = कृत-आदान, (आत्त शक्ति ), अन्न

Input-Output ( Ratio ) = अन्न-निष्पन्न संबंध

Isothermal = समतप

Isothermals = समतप रेखा

Isothermal Expansion = ससंक्रमविस्तार

Kinetic Molecular Hypothesis = चलद्रेणुकल्पना

Latent Heat of Fusion = विलयोष्म

Latent Heat of Vaporization = विप्लवोष्म

Liquefy a gas = वायूला द्रवावस्थेंत आणणें, वायूला द्रवविणें

Melting = १ वितळणें २ विलय

Melting Point = विलयबिन्दु

Specification उपाधि

| | |
|---|---|
| Mass = वस्तुमान<br>Volume = आकारमान<br>Temperature = तपमान<br>Pressure = प्रेरण | वस्त्वाकार-तप-प्रेरणानि |

Maximum-Minimum Thermometer = सीमान्तमापक

Mechanical Energy = स्थूल ( यामिक ) शक्ति; शक्ति

Mechanical Equivalent of Heat = उष्मयामिक संबंध, उष्मयामिक तुल्यांक

N. T. P. = सांकेतिक तप-प्रेरण, सां. त. प्रे.

Output ( Mechanical Energy ) = कृतनिष्पत्ति; कृतसंपादन, निष्पन्न

Performance of work = कृत-करण

Pressure = प्रेरण

Pyrometer = उग्रतपमापक

Radiation ( of heat ) (of energy ) = प्रारण

Saturated Steam = संपृक्तबाफ, द्रविष्णुबाफ

Solidification = गोठणें, स्तम्भ

Specific Heat = तपोष्म

Superheated Steam = उत्तापित बाफ

Sublimation = सप्लवन

Temperature — तपमान

Temperature Scale = तपावलि

Thermometer = तपमापक

Thermal Capacity = उष्माहार

Transference of Heat = उष्मसंक्रम, उष्मसंक्रमण

Unit = एकधेय

Vapour = बाफर

Vapour Pressure = बाफरदाब

Vapour Tension = बाफेचें उत्केलन

Water Equivalent ( of Calorimeter ) = पात्रोष्म

Work = कृत, कृतमान

# अभिप्राय

" पालवी "—बडोदे येथील साहित्य-विकास ग्रंथमालेचें हें तिसरें पुष्प श्री० ल. ब. हळवे यांनीं प्रसिद्ध केले आहे. यांत श्री० साने, ठोकळ, घारपुरे व हळवे यांच्या एकंदर २७ कविता संग्रहित करण्यांत आल्या आहेत. पैकी १५ कविता श्री० साने ( गाङ्गेय ) यांच्या आहेत. काव्य ही कळा आहे. सौंदर्यावांचून काव्य नव्हे. जी कविता पुन्हा पुन्हा वाचावीशीं वाटतें, जी कविता अंतःकरणांत ठसते व वाचल्यानंतर अगर ऐकल्यानंतर जींमधील चरण न कळत आपण गुणगुणावयास लागतों, तीच कविता चांगली होय. या दृष्टीनें पाहतां आजकाल प्रसिद्ध होणाऱ्या साधारण दर्जाच्या पुस्तकांपैकीच हें एक आहे. पालवी कोवळी आहेत. वेगवेगळ्या गेय चाली व विषयांची विविधता हे संग्रहाचे विशेष होत. पण श्री० ठोकळ यांच्या पांच, श्री० गाङ्गेय यांच्या तीन-चार व श्री. घारपुरे यांची एक इतक्याच कविता फक्त चांगल्या आहेत. सदर्हू पुस्तकांत शुद्धलेखनाच्या चुका भरपूर आहेत. शुद्धलेखनाची अशी हेळसांड होतां कामा नये.

श्री. हळवे यांची एकहि कविता उल्लेखण्यासारखीं नाहीं. त्यांच्याविषयीं अधिक न लिहिणेंच बरें.

श्री. घारपुरे यांच्या सदर्हू संग्रहांत दोनच कविता आहेत. म्हणून त्यांचे विषयीं फारसें लिहितां येणार नाहीं. त्यांची ' अश्रुमाळ ' ही कविता बऱ्यापैकीं आहे. त्यांची भाषा नादमधुर आहे. मात्र केवळ भाषेच्या गोडीसाठीं निरर्थक शब्दरचना टाळण्याची त्यांनीं आतांपासूनच खबरदारी घ्यावी.

तुज शोक फुलांचा बाई। देवते किशोरे येई। एकाच कडव्यांत तीन संबोधनें आल्यामुळें त्यांना शब्दांची अडचण पडली कीं काय अशीं शंका येतें. शिवाय बालिकेला—किशोरीला— ' देवता ' कसें म्हणतां येईल.

श्री. गाङ्गेय व श्री. ठोकळ हे जरी नवीन कवि असले तरी ते महाराष्ट्राला अगदींच अपरिचित नाहींत. श्री. गाङ्गेय यांच्या कांहीं कविता ' महाराष्ट्र शारदा, ' भाग दुसरा, यांत प्रसिद्ध झाल्या असून ' यशवन्त ' मध्यें मधूनमधून ते कविता प्रसिद्ध करीत असतात. श्री. ठोकळ यांच्या कविता ' माधवी ', ' गुंजारव ', ' महाराष्ट्र शारदा ', भाग दुसरा, यांत प्रसिद्ध झाल्या असून कांहीं कांहीं मासिकांत क्वचित् वेळीं त्यांच्या कविता झळकतात.

श्री. गाङ्गेय यांच्या कवितेंतील विषयांत विविधता आहे. तात्त्विक विषयांकडे त्यांचा ओढा दिसतो. ( उदा० ' जीवनवीणा ' व ' जादुगार ' ) पण त्यांत त्यांना यश मिळेलसें वाटत नाहीं. त्यांच्या कवितेंत अनेक रसांना स्थान आहे पण एकंदरीनें त्यांच्या कवितेंत प्रसाद कमी आहेत. त्यांची ' सौंदर्यहीना ' ही कविता सौंदर्यपूर्ण

आहे. कवितेची भूमिका उच्च आहे. कवीला "रूप प्रेमापुढे फोल' वाटते. कवितेतील उपमाहि समर्पक आहेतः—

काळी सागरीका परी अंतरींच्या रत्नराशी । उजळल्या प्रेमपाशीं
मेघमाळा काळी परी अंतर न तिचें काळें । भरलेलें गोड जळें.

प्रणयिनी 'प्रेमापायीं भिकारीण' होऊन पुढे 'सारें प्रेम लया गेलें' असताहि ती म्हणते:—

झुरूं देत माझे प्राण प्रेम लाभो तुला पण । विरहाचें माझें धन
विरहाचें माझें धन आणिक हे तुझें ध्यान । कोणी न घे हिरावून

निर्व्याज प्रेमाचें हें लक्षण नव्हे काय? कवितेंतील भाषाहि चांगली आहे.

'बाळ-गाऱ्हाणें' यांतील प्रसंग अगदीं साधा व व्यवहारांतला आहे पण त्यांतील दृश्य करुणास्पद आहे. हृदय उतूं येण्याची कल्पना चमत्कारिक वाटतें. श्री. गांङ्गेय यांच्यावर निरनिराळया कवींचा पगडा बसलेला दिसतो. त्यांची रचना कांहीं संस्कृत पद्धतीची, कांहीं चमत्कारिक शब्दांनी युक्त अशी आहे. चमत्कारिक शब्द :— पुंगरी, बेसुरी, संनिधी, निंदाङ्कल वगैरे कांहीं कवितेंत भावनांचा गोंधळ झाला आहे. त्यांच्या कवितेंत व्याकरणाच्या चुकाहि आढळतात. ( उदा. तूं दिसेना, वाट तूं बघते—. इत्यादि. ) संग्रहाचें शेवटीं कवि आपली 'फूल नव्हें फुलाची पाकळी' प्रेमानें व विनयाने रसिकवृंदास समर्पण करीत आहेत. 'ही स्नेहरसाची वाहिनी' त्यांनी म्हटलें आहे हें ठीक आहे, पण पुढील चरणांत त्यांनी सुमन म्हटलें आहे. प्रथम फूल नव्हें फुलाची पाकळी असे म्हणुन मधेच सुमन झालें. शेवटच्या चरणांत तर 'आत्मदल'झालें आहे. पुढे तावडतोब 'भावदळ' झालें आहे; हा सर्व घोटाळा आहे. असले दोष आतापासूनच टाळण्याची त्यांनी खबरदारी घेतल्यास त्यांचे हातून पुढील काव्याची निपज निर्दोष व चांगली होईल अशी आशा आहे. 'प्रीतीच्या खुमारी'-तहि वरील प्रमाणे गोंधळ झाला आहे. राष्ट्रीय कवितेपैकी 'गाऊं कुणाचें गान!' ही कविता चांगल्यापैकी आहे. कवींची राष्ट्रीय भावना स्वाभाविकपणे त्यांच्या कवितेंत व्यक्त झाली आहे म्हणून त्यांनी त्या प्रांताकडे विशेष लक्ष पुरविल्यास त्यांना बरेंच यश मिळेलसें वाटतें.

श्री. ठोकळ हे प्रतिभाशाली कवि आहेत. आतापर्यंत निरनिराळ्या संग्रहांत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कविता पाहतां असे कळून येईल कीं त्यांच्या कविता विविधरसांनी परिप्लुत असून ती मृदु, मंजुळ व कोमल आहे. "त्यांची प्रतिभा आकाशांत स्वैरपणे विहरत असतांना देखील तिला मातींतलें सोनें आढळतें" असे 'पालवी'चें प्रस्तावनाकार— प्रो. वि. पां दांडेकर M. A. म्हणतात :— प्रसादपूर्ण व नादमधुर रचना, वेंचक शब्द, साचे प्रसंग घेऊन ते खुलविण्यांतच दिसून येणारी कुशलता, हे त्यांच्या काव्यांतील विशेष होत. शेतकऱ्यांच्या जीवनाबद्दल लिहिलेलीं गीतें, 'एकोक्ति' पद्धतीने दुसऱ्यांचे उद्गार चितरण्यांत त्यांचें दिसून येणारें कसब यामुळे आणि वर

उल्लेखलेल्या विशेषणांमुळे त्यांचें काव्य नाविन्यपूर्ण आहे. आतापर्यंत महाराष्ट्र कवींचें किसानगीतांकडे ( Pastorals ) फारसें लक्ष गेलें नाही. श्री. ठोकळ यांची किसान-गीतें निःसंशय उच्च प्रतीची आहेत. शेतकरी जीवनाचें त्यांनी सूक्ष्म निरीक्षण केलेलें दिसतें. त्यांच्या सुखदुःखाशीं ते चटकन् समरस होतात. यशवंत-गिरीश या कवि-द्वयांनी जानपदगीतें लिहिण्याचा प्रयत्न केला आहे; पण यशवन्तांचें 'न्याहरीचा वखूत' हें गीत वगळल्यास बाकीचीं अयशस्वी ठरली आहेत असे म्हणण्यास हरकत नाही. 'महाराष्ट्र शारदा', भाग २ मधील श्री. ठोकळांचें 'मोटेवरलं गाणें' उत्कृष्ट दर्जाचें आहे. 'पालवीं'तील 'तुझ्याबिगर' हें जानपदगीत त्या मानाने कमी दर्जाचें आहे. 'कारभारणी'ला माहेरी पाठवून पस्तावा चांगला व्यक्त झाला आहे. निरालस विनोदामुळे सात्त्विकहास्य मनांत उद्भूत होतें.

'घरीं' कवितेमधील भावना चांगल्या व्यक्त झाल्या आहेत. घरची स्मृति सुखद वाटते व त्या स्थितीचा अनुभव घ्यावासा वाटतो. शाळेंत जाणाऱ्या मुलांच्या भावना अशाच असतात. कवितेंतील स्वाभाविक वर्णनावरून आणि 'न्याहारी' या शब्दावरून शाळेंत जाणारा मुलगा मराठा अगर शेतकरी वर्गांतील दिसतो. खेडेगांवांत बहिणीला 'ताई' म्हणत नाहीत– 'बाई' म्हणतात. वृत्तदोष टाळण्यासाठी 'सांगेन'च्या ऐवजी 'सांगिन' झालें आहे. तथापि क्वचित् ठिकाणी सांपडणाऱ्या असल्या दोषांमुळे त्यांचे काव्यगुण झांकळले जात नाहींत.

'शोध'मध्ये कल्पनेच्या उंच उंच भराऱ्या आहेत.
तुझ्या कंठातुनि येती तिथे का गोडशी गाणीं
तयांनी हालतें का गे समुद्राचें निळे पाणी
किती गोड कल्पना ही !

'आईचें दूध' ही कविता जोरदार व आवेशदायक आहे पालवींतील ही उत्तम कविता होय. अत्यंत हीन दशेंत अगर बिकट प्रसंगीं हाडाचें मराठे तोफेच्या गोळ्यांना न डगमगतां शत्रूपुढें छातीठोकपणे उभे असतात. चालू राष्ट्रीय चळवळींत त्यांच्या कवितेंतील उक्तीचें प्रत्यंतर हजारों हिंदपुत्रांनी व हिंदकन्यांनी आज जगास पटविलें आहे.

शीर घेऊनी तळहाती चाललो रणाला
अहर्निश झुंजुनी आणूं जिंकुनी यशाला
रक्त मराठ्यांचें अंगीं आमुच्या सळाळे

यांत कवींचा स्वदेशाभिमान चांगल्या रीतीने व्यक्त झाला आहे. 'त्वेश खाणें' जरा चमत्कारिक वाटते; त्वेश येणे–चढणे–असे म्हणतात. अशीच काव्यसेवा चालू ठेवल्यास ते लवकरच नामांकित कवि होतील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

विठ्ठल महादेव घुले, संगमनेर.

# परीक्षण

## अनासक्तियोग — ( किंमत ३ आणे )–ले. मो. क. गांधी

( ना. गो. चापेकर )

आजपर्यंत गीतेचा अर्थ सांगण्याचा प्रयत्न अनेकवेळां अनेकांकडून झाला आहे. याचा उघड अर्थ असा होतो की गीताकारांचा खरोखर आशय काय होता हें अद्यापि कोणासच समजलें नाही. प्रत्येक नवीन प्रयत्न म्हणजे पूर्वी केलेल्या अर्थाहून निराळा अर्थ लावणें होय. पुढच्यास पाठीमागल्याचा अर्थ अभिप्रेत नसल्यामुळे तो स्वतः आपल्या बुद्धीप्रमाणे निराळा अर्थ लावून दाखवितो. या अशा भाष्यांगणावर रथी–महारथी अवतरल्यामुळे अज्ञ माणसांचें अज्ञान अधिकच अज्ञानमय होतें. खरा अर्थ कोण सांगतो याविषयी ते बुचकळ्यांत पडतात. टिळकांनी गीतेचें रहस्य सांगून फार काळ लोटला नाही तोंच गांधीनाही आपल्या गुजराथी बांधवांस आपण गीतेचा काय अर्थ समजतों हें सांगण्याची आवश्यकता भासली. ज्याला जें पाहिजे असेल तें गीतेंतून काढतां येतें असा लोकांचा समज झालेला पाहून मूळ गीताकार, आज जर ते जिवंत असते तर थक्कच होऊन गेले असते. टिळक आणि गांधी हे स्वतः कर्मयोगी असल्यामुळे गीता ही कर्मयोगाने मुक्ति मिळवून देते असें त्यांस वाटणें स्वाभाविक आहे. गीतेमध्ये निःसंशय कर्मयोगाचें विवेचन आहे; पण त्याबरोबरच ध्यानयोग आणि सांख्ययोग यांचेंही विवरण गीतेंत केलेलें आहे ही गोष्ट कोणी अमान्य करणें शक्य नाहीं. मग गीता कर्मयोग शिकवते याचा अर्थ कर्माच्या योगाने मनुष्याला मोक्ष मिळतो, असा केल्याशिवाय गत्यंतर नाही. गीतार्थासंबंधाने टिळकांचा किंवा गांधींचा अखेरचा शब्द आहे असें आम्हांस वाटत नाही. गीतेंत अनासक्तियोग आहे—आणि कर्मयोगापेक्षा अनासक्तियोग हे नांवच आम्हांला अधिक यथार्थ वाटतें—तथापि गीता म्हणजे अनासक्ति योग ही जी गांधींची समजूत झालेली दिसते ती आम्हांस चुकीची वाटते. क्षणभर मोह पावून कर्तव्यपराङ्मुख झालेल्या अर्जुनाला कर्तव्याच्या मार्गावर कृष्णाने आणलें आणि तसें करण्याकरितां कृष्णाला सर्व तत्त्वज्ञान अर्जुनाला सांगणें भाग पडलें. अर्जुनाचें अज्ञानपटल दूर झालें नसल्यामुळे युद्ध कर हाच उपदेश अर्जुनाला करणें क्रमप्राप्त होतें. यावरून ज्ञानानंतरही ज्ञान्याने कर्म करीत रहावें हें अनुमान कसें निघतें हें आम्हांस समजत नाही. मी युद्ध करणार नाहीं हा अर्जुनाच्या ठिकाणीं अहंकार होता. यालाच कांही लोक वैराग्य म्हणून समजतात ही त्यांची मोठी चूक होय. अर्जुन हा ज्ञानी होता अथवा भगवंतांच्या उपदेशानंतर तसा झाला असें म्हणण्यास यत्किंचितहि आधार नाही. उलट—

॥ अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यासि विनंक्ष्यसि । ”
॥ कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् । ”

हीं वचनें गीताश्रवणानंतर अर्जुन वेदांतदृष्ट्या अज्ञानीच असल्याचें सिद्ध करितात. म्हणून अज्ञान अथवा ज्ञानपूर्व स्थितीमध्ये उचित असाच कर्मरत होण्याचा उपदेश कृष्णाने केला असेंच मानलें पाहिजे.

मोक्षाची व्याख्या वाटेल त्याला आपआपल्यापुरती ठरवितां येईल; म्हणजे मोक्षाचें स्वरूप आपआपल्या कल्पनेप्रमाणे ठरविण्यास प्रत्येकजण मुखत्यार आहे; पण गीताकार मोक्ष म्हणजे जन्म मृत्यु टळणें असेंच समजतात——

“ जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ ”

हा अशा प्रकारचा मोक्ष त्रिगुणात्मक प्रकृति अथवा जग यांचें अतिक्रमण केल्याशिवाय प्राप्त होत नाही ( अध्याय १४--२० ). नुसत्या सत्त्वगुणावर आरूढ झालेल्या माणसालाही मोक्षाची प्राप्ती गीताकार सांगत नाहीत. मोक्षाचें साधन जें ज्ञान तें प्राप्त करून घेण्यास रज अथवा तम या गुणांचा उपयोग होत नसून फक्त सत्त्वगुणाचाच उपयोग होतो हें अध्याय १४ श्लोक १७ यावरून व्यक्त होतें. नुसत्या सत्त्वगुणाचा प्रकर्ष झाला असतां उत्तम लोकाची प्राप्ति होईल ( १४—१४ ) ; परंतु जन्ममृत्यूचा फेरा टळणार नाही. तसेंच कर्म करण्याची बुद्धि ही रजोगुणापासून उगम पावते.

“ लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ ” १२ ॥ अ. १४

सत्त्वप्रधान मनुष्याची कर्म करण्याला प्रवृत्तीच होणार नाही. बोरीच्या झाडाला आम्रफल धरत नसतें. आता रजाचें फळ दुःख म्हणून सांगितलें आहे ( १४-१६ ). तात्पर्य गीतेप्रमाणे सात्त्विक मनुष्य आपण होऊन कर्मे करणार नाही, मग ज्ञानी मनुष्याकडून कर्माची अपेक्षा कोण कशी करणार? आपण होऊन जेव्हा मनुष्य कर्म करण्यास उद्युक्त होतो तेव्हा अहंकार, हेतु, फल, या तिहींचें तेथे अस्तित्व अपरिहार्य असतें. आता ज्ञान्याच्या हातून कर्म होणार नाही असें नाही. देह आहे तोपर्यंत निःशेष कर्म सुटत नाही. ( १८-११ ) ही गोष्ट गीतेला मान्य आहे. कर्माशिवाय शरीरयात्रा ही चालावयाची नाही ( ३-८ ) आणि म्हणून केवळ शारीरकर्म करणाऱ्या माणसाला दोष लागत नाही असें गीताकारांचें म्हणणें आहे. ( ४-२१ ); परंतु गुणातीत अथवा मुक्त अथवा स्थितप्रज्ञ यांनी कर्म करणें म्हणजे सूर्याने अंधःकार प्रसवणें होय. आत्मतृप्त मनुष्याला कांहीही करावयाचें उरत नाही. ( ३-१७ ). म्हणूनच सर्वारंभपरित्यागी हें मुक्ताचें लक्षण गीतेने सांगितले आहे. ( १४-२५ ). वैराग्याशिवाय ज्ञानाचा उदय होत नसल्यामुळे जनसमूहांत जाऊन मिळण्याचा त्याला कंटाळा असतो (अरतिर्जनसंसदि ). अर्थात् एकांतवासच त्याला प्रिय होतो,

(१३-१०). सर्वसंकल्प संन्यासी (६-४) हें गीतेने ज्ञान्याला लावलेलें दुसरें विशेषण वरील सिद्धान्ताला पोषकच आहे. आपण होऊन जें कर्म करतों, तें निष्काम असणें शक्यच नाही. कारण कांहीतरी हेतु मनांत धरल्याशिवाय मूर्खाची सुद्धा कर्माकडे प्रवृत्ति होत नाही. हें तर खरेंच पण शिवाय त्या कर्माच्या ठिकाणीं अहंकारबुद्धि असते. परंतु अहंकारवृत्तीला ठार करणें हें तर मनुष्याचें ध्येय गीतेंत वर्णिलेलें आहे. या दृष्टीने विचार करितां ज्योतिष्टोम यज्ञ करून स्वर्ग मिळवूं पाहणारा मनुष्य अगदी हीन ठरतो. कारण अशा कर्मांत अहंकार, हेतू, फल सर्व कांही आहे. निष्काम कर्म शास्त्रविहित कर्माच्या संबंधानेच फक्त शक्य आहे. वर्णाश्रमधर्म हे शास्त्रविहित असल्यामुळे तदनुसार कर्तव्य म्हणून निरपेक्ष बुद्धीने संसारी माणसानी आपआपलें यथोचित कर्म करीत असावें. असें कर्म करणारीं माणसें शास्त्राचे गुलाम असतात. धन्याच्या आज्ञेने चाकराने केलेल्या कर्माचें पापपुण्य जसें त्याला लागत नाही त्याच जातीचें वरील पुण्य असतें. फलहेतु मनांत नसल्यामुळे गीतेंत वर्णिलेली समत्वबुद्धि अशा माणसाच्या ठिकाणीं संभवते. याच कर्माने कर्त्याची चित्तवृत्ति शुद्ध होते. आमच्याकडे विधिशास्त्राचा विस्तार होण्याला हें एक बलवत्तर कारण आहे. जन्मल्यापासून अथवा देहधारणेपासून शास्त्राने नियत केलेलें कर्म मनुष्याने करावयाचें असतें. तें कर्म दोषयुक्त आहे या सबबीवर दुसऱ्याचें कर्म करण्याची अनुज्ञा शास्त्राने दिली नाही याचें कारण आता निराळें सांगावयास नको.

शास्त्रविहित कर्में करणारा संसारी मनुष्य जरी निष्पाप असला तरी त्याच्या ठिकाणीं नित्यानित्यविवेक अथवा संसाराबद्दल विरक्ति असतेच असें नाहीं. आत्म्याव्यतिरिक्त बाकी सर्व नश्वर आहे असा एकदा विचार सुरू झाला म्हणजे शास्त्रविहित कर्माच्या ठिकाणीं सुद्धा आसक्ति रहात नाही. सत्कर्म फार तर स्वर्गाला नेईल; परंतु स्वर्गच जेथे नश्वर ठरला, तेथे तत्साधनांची मातब्बरी कोण मानणार? म्हणून मुमुक्षु स्थितींतच कर्माचा त्याग आपोआप घडून येतो. मुक्त झालेला मनुष्य तर शास्त्राचा गुलाम नसल्यामुळे कोणतेंच कर्म त्याला करतां येत नाही. कर्में दोन प्रकारचीं असतात हें आपण पाहिलेंच आहे. एक फलाची आशा धरून अहंकार बुद्धीने केलेलें कर्म. हें तर अधम जातीचेंच ठरलें. दुसरें शास्त्रविहित निष्काम कर्म होय. परंतु ज्ञान्यावर शास्त्राचा अंमल चालत नसल्यामुळे तेंही कर्म करावयास त्यास शिल्लक रहात नाही. मग अशा मनुष्याने कोणतें कर्म करतां येणें शक्य आहे याचाच काय तो विचार करणें शिल्लक राहिलें. शरीर आहे तोंपर्यंत शारीरिक कर्में होणार हें आपण वर पाहिलेंच आहे. कर्तव्याच्या अभावीं शारीरिक कर्माशिवाय दुसरें एखादें कर्म ज्ञान्याकडून झालेंच तर तें यज्ञार्थच कर्म होईल. यज्ञकर्मव्यतिरिक्त अन्य कर्म हें बंधाला कारणीभूत होतें (३-९). यज्ञाच्या हेतूने नव्हे तर केवळ आपलें पोट भरावें म्हणून अन्न शिजविणारे पापी मोठेंच पाप करतात असें निक्षून सांगणारी गीता (३-१३) ज्ञान्याने कर्म करावें असा विधी घालील हें संभवत नाही. अर्वाचीन भाषेत बोलावयाचें

म्हणजे देशकार्य करणें हे बंधनकारक होत नाही, असें प्रतिपादन केलें जातें; परंतु तात्विक दृष्ट्या देशार्थ हा एक प्रकारचा स्वार्थच आहे असें मानल्याशिवाय गत्यंतर नाही. ज्ञानी मनुष्य झालाच तर जगाचा होईल, देशासारख्या मर्यादित स्थलाचा अभिमानी होऊं शकणार नाही.

ज्ञान्याने लोकसंग्रहार्थ कर्म करावें असें मत सध्या जनतेपुढे ठेवण्यांत येत आहे आणि त्याच्या समर्थनार्थ गीतेच्या तिसऱ्या अध्यायांतील १९ ते २५ श्लोक पुढे करण्यांत येतात. ज्ञान्याला कांहीच करावयाचें असत नाही असें अगोदरच्या दोन श्लोकांत सांगितल्यानंतर १९ व्या श्लोकांत तस्मात् या श्लोकाने आरंभ करून अर्जुनाला सतत नियतकर्म करण्याबद्दल कृष्ण उपदेश करतात हें जरा चमत्कारिक दिसतें. या श्लोकांत कार्यकारणभाव तर मुळीच दिसून येत नाही. मधले श्लोक गाळले असावे असें म्हणणें आज कित्येकांना अविचारीपणाचें वाटण्याचा संभव आहे; तथापि शंकराचार्यांप्रमाणें 'आत्मज्ञान्याला कांहीं करावयाचें नसलें तरी तूं आत्मज्ञानी नाहीस, अज्ञानी आहेस म्हणून तूं असक्तबुद्धीने नियतकर्म करीत रहा' असा अर्थ घेणें प्राप्त पडतें. शंकराचार्यांनी केलेला अर्थच युक्त आहे. १६ व्या श्लोकाच्या पुढे १९ वा श्लोक वाचला पाहिजे. मधल्या दोन श्लोकांत विरुद्ध सिद्धांत समाविष्ट केला आहे. १७ व्या श्लोकांतील ' तु ' या शब्दाने विरुद्ध स्थिति निर्दिष्ट केली आहे. म्हणून १९ व्या श्लोकाबरोबर पुढल्या श्लोकांतील पुढला चरण या विचाराची पूर्तता होण्याकरता वाचला पाहिजे. अर्जुना तूं कार्य म्हणजे नियतकर्म कर याला कृष्णांनी जनकादिकांचा दृष्टान्त दिला आहे. हे राजे कर्म करूनच (क्रमाक्रमाने) मोक्षाप्रत पावले. यानंतर दुसऱ्या चरणांत कृष्णांनी अगदी दुसराच मुद्दा उत्पन्न केला आहे. तो लोकसंग्रहाचा होय. विसाव्या श्लोकांतील दुसरा चरण हा एकविसाव्या श्लोकाबरोबर वाचला पाहिजे. कृष्णाचें म्हणणें लोकसंग्रहाच्या दृष्टीनेसुद्धा तुला कर्म केलेंच पाहिजे. कारण समाजांतील श्रेष्ठ पुरुष—ज्ञानी नव्हे— जसे वागतात, तसे सामान्य लोक वागतात. मोठ्या लोकांचें अनुकरण करण्याकडे सामान्य लोकांची प्रवृत्ति असल्यामुळे बहुजनसमाजाला भलतेंच वळण लागूं नये म्हणून त्यांच्या दृष्टीने अनवश्यक असें आचरण त्यांना स्वतः करावें लागतें. याला दृष्टान्त कृष्णांनी आपला स्वतःचा दिला आहे. ते म्हणतात मला जरी कांही मिळवावयाचें नसलें तरी लोकांचा अकर्माने नाश होऊं नये म्हणून मी स्वतः कर्म करीत असतों. या दृष्टान्तावरून ज्ञान्याने कर्म करावें असें अनुमान निघत नाही. ईश्वराचा अवतार आणि देहधारी ज्ञानी यामध्ये मोठा भेद आहे. ज्ञान्याचा देह प्रारब्धाने बनतो. परंतु ईश्वराच्या ठिकाणीं प्रारब्धाचा नियम लागू पडत नाही. प्रारब्धाचा नाश भोगानेंच होतो. तेव्हा देह आहे तोंपर्यंत ज्ञान्याच्या ठिकाणीं पूर्णपणें ईश्वरत्वाची सिद्धि झाली असें म्हणतां येणार नाही. लोकसंग्रह हा मुमुक्षूंकडूनच होत असतो. जनकादि राजे मुमुक्षु होते हें "एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः। तस्मात्कुरुकर्मत्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम्" या

वचनावरून स्पष्ट होतें. ज्ञानी मनुष्याने कर्म केलेंच तर तो यज्ञार्थ म्हणजे ईश्वर-विषयक कर्म करील लोकसंग्रहार्थ कर्म करणार नाही. यावरून लोकसंग्रहाचा युक्तिवाद किती भ्रामक आहे हे निर्विकार बुद्धीच्या माणसाला समजण्यास अडचण पडणार नाही अशी आम्हांस आशा आहे.

याच अध्यायांतील २५ श्लोकापासून पुढचे १० दहा श्लोक हे मुमुक्षूच्या वर्तनासंबंधाचे आहेत, ज्ञान्याच्या नव्हे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. गीता ही उत्कृष्ट वकिलीचा व वक्तृत्वाचा आदर्श आहे, ही गोष्ट गीता वाचतांना ध्यानांत ठेवणें अत्यंत आवश्यक आहे. प्रतिपाद्य विषयाच्या समर्थनार्थ जेवढें कांही म्हणतां येण्यासारखें होतें तेवढें सर्व कृष्णांनी अर्जुनाला सांगून टाकलें आहे; म्हणून गीतेंतील प्रत्येक वाक्य सिद्धान्तरूप मानणें अन्यायाचें होईल. गीताकालीं सांख्यतत्त्वज्ञानाची प्रौढी विशेष होती. अर्थात् त्या तत्वज्ञानाला अनुसरून कृष्णाने अर्जुनाला असा उपदेश केला की मानसिक, शारीरिक, सांकल्पिक वगैरे कोणत्याहि जातीचें कर्म होणें हा प्रकृतीचा धर्म आहे. मी प्रकृतीहून भिन्न आहें. प्रकृतीच्या चेष्टांचें पापपुण्य मला नाहीं असें तूं मान म्हणजे कर्माचा लेप तुला लागणार नाहीं. सांख्यांचें तत्त्वज्ञान वेदांत्यांस बऱ्याच हिश्याने असंमत आहे हें ब्रह्मसूत्रांवरील आपल्या भाष्यांत शंकराचार्यांनी सांख्यमताचें खंडण केलें आहे त्यावरून दिसून येईल. पुरुषाला बोध झाला म्हणजे प्रकृति आपल्या चेष्टा बंद करते हें जर खरें असेल तर गीतेंत वर्णन केलेल्या स्थितीचें असंभावित्वच सिद्ध होईल. परंतु कृष्णांनी सांख्यमताचा एक युक्तिवाद योजिला एवढेंच. तेव्हा प्रकृतिपुरुषविषयक वचनें युक्तिवादापुरतींच उपयोजावयाचीं आहेत, सिद्धान्त म्हणून त्यांचें ग्रहण करावयाचें नाही हें विसरूं नये. सारांश ज्ञान्याने कर्म करावें असा गीतेचा मथितार्थ असणें अशक्य आहे असें आमचें मत आहे.

जगामध्ये यच्चयावत् कर्म जें केलें जातें तें मनुष्य स्वतंत्रतेने करतो, अथवा परतंत्र होऊन तें त्यास करावें लागतें म्हणून करतो. पहिल्या कर्माच्या योगाने मनुष्य जन्ममरणाच्या फेऱ्यांत सापडतो आणि दुसऱ्या कर्माच्या योगाने पापपुण्याचा जरी तो धनी नसला तरी जन्ममृत्यु त्याला टाळतां येत नाही, कारण नित्यानित्यवस्तुविवेक-बुद्धीचा उदय त्याच्या ठिकाणीं झालेला नसतो. प्रत्येक मनुष्याने शास्त्राचा दास बनून नियतकार्य अथवा शास्त्रोक्त कर्म करावें असा गीतेचा कटाक्ष आहे. यासाठी गीतेने कर्मयोग विस्तारपूर्वक वर्णन केला आहे. गीतेचा कर्मयोग हा वैराग्य उत्पन्न न झालेल्या संसारी माणसांकरता आहे. अनित्य जो संसार तो सोडून नित्य जो आत्मा त्याचा विचार एकदा करण्यास मनुष्य प्रवृत्त झाला म्हणजे तो शास्त्राची कास सोडतो; शास्त्राचें बंधन त्याच्यावरचें उडून जातें आणि त्याच्या कर्माचें शास्त्र अथवा त्याचा कर्मयोग हा निराळाच बनतो. या दृष्टीने गीतारहस्यांत विचार न झाल्यामुळे रहस्यांतील विवरण दोषयुक्त झालें आहे. ज्ञानी मनुष्य कदाचित् कर्म करील असें मानलें तरी त्याने शास्त्राला चिकटून तदनुसार कां वागावें याचें कारण कोणी दिलें नाही.

ज्ञानी मनुष्य स्वतः शास्त्रकार बनतो आणि त्यामुळे कदाचित् शास्त्रोक्त कर्म त्याचे हातून घडेल, तथापि अज्ञजनाप्रमाणे शास्त्राचा अनुचर म्हणून तो कधीही वागणार नाही. निष्काम कर्माची कल्पना जगांतल्या दुसऱ्या कोणत्याही वाङ्मयांत सापडावयाची नाही आणि संस्कृत वाङ्मयांतही ही कल्पना गीतेप्रमाणे इतरत्र कोठेही जोराने मांडली नाही. या कारणास्तव गीतेचें अपरंपार महत्त्व लोकांस वाटूं लागलें. संसारांत राहून कर्तव्य म्हणून निष्काम बुद्धीने कर्म करणें ही जरी गीतेची महत्त्वाची शिकवणूक असली तरी असल्या कर्माने मोक्षप्राप्ति होते अथवा ज्ञानोपलब्धीनंतर म्हणजे जगाचें मिथ्यात्व पटल्यावर त्रिगुणात्मक जें शास्त्र त्या शास्त्राला डोक्यावर बाळगून तदनुसार आचार ठेवावा अशी असमंजसपणाची व अशास्त्रीय शिकवणूक गीतेची असणें शक्य नाही. निष्कामतेचा सिद्धान्त नियतकर्मासंबंधानेच लागू पडतो. गीतेचा हा कर्मयोग एवढ्यापुरताच आहे. हा कर्मयोग ज्ञानाप्रत नेणारा आहे; पण ज्ञानोत्तर कर्माला कोठेही जागा नाही. आमच्यामतें मूर्तिमंत कर्मयोगी असणाऱ्या महात्मा गांधींना कर्माच्या पलीकडे जाऊन विचार करण्यास सवड झाली नाही अथवा त्यांच्या कर्मयोगाच्या तीव्रतेमुळे त्यांना तो विचार करणें शक्य झालें नाही. यामुळें बुद्धीला न पटणारा असा गीतेतील श्लोकांचा अर्थ त्यांनी अनेक ठिकाणीं केला आहे. या कर्मयोग्यांच्या मनांतला भाव असा दिसतो कीं, माणसाने मनामध्यें हेतू योजून कर्म करावें; मात्र त्या कर्माच्या फलाबद्दल निरिच्छ असावें. म्हणजे घर बांधावें परंतु घरामध्ये राहण्याची इच्छा मनांत आणूं नये. फलाबद्दल अनासक्त असणें हें निराळें आणि फलाचा हेतू मनांत ठेऊन कर्म करणें निराळें. घरांत राहतां यावें म्हणून घर बांधण्यास मनुष्य आरंभ करील परंतु घरामध्ये रहावयास कदाचित् सापडले नाही तर त्यामुळे, कर्माच्या ठिकाणीं आसक्ति नसल्यामुळे मनुष्य खिन्न होणार नाही. गीताकार तर "मा कर्मफलहेतुर्भूः" म्हणजे फलाचा हेतू मनांत योजून कर्म करण्याचा निषेध करतात. कर्माचें फल मिळणें हें मनुष्याच्या स्वाधीन नसल्यामुळे त्या फलाबद्दल त्याने आसक्त असूं नये हें म्हणणें अगदी सयुक्तिक आहे, पण कोणताही हेतु धरून जर कर्म करावयाचें नसेल तर कर्म करण्याची प्रवृत्ति होणार नाही हें उघड आहे[1] म्हणूनच संसारी माणसाने शास्त्रोक्त कर्म तेवढेंच करावें असें सांगणें गीतेला भाग पडलें. सर्वारंभपरित्यागी, सर्वसंकल्पसंन्यासी या सारख्या शब्दांचा अर्थ शब्दशः केल्याशिवाय गत्यंतर नाही हें विचारांती कोणालाही दिसून येईल. सर्वारंभपरित्याग म्हणजे कर्मफलत्याग असा अर्थ करणें अनुचित होय. आत्मसाक्षात्कारावर गांधींचा विश्वास नाही असें दिसतें. कारण ज्ञान प्राप्त करून घेणें, भक्त होणें, हेंच त्यांचें आत्मदर्शन होय. साधनाची पराकाष्ठा तोच मोक्ष असा सिद्धांत प्रतिपादन करणाऱ्या गांधींनी गीतेचा भलताच अर्थ करावा यांत आश्चर्य नाही. तसेंच मनाची शांति यालाच ते मोक्ष समजतात. यावरून हें उघड होते की, व्यावहारिक माणसापुरतें

१ अकामस्य क्रिया काचिद्दृश्यते नेह कर्हिचित् ॥ मनु.

गांधींचें तत्त्वज्ञान पुरेसें वाटलें तरी आत्मा व जग यांचें कोडें उलगडण्यास त्यांच्या तत्त्वज्ञानाचा किमपिही उपयोग होणार नाही. फलत्याग म्हणजे फलविषयींच्या आसक्तीचा अभाव हे गांधींचें म्हणणें आम्हांस मानवतें; पण कर्माला प्रवृत्तिच कां व्हावी याचें कारण एका कर्तव्याशिवाय दुसऱ्या कशांतही आढळणार नाही. अद्वितीयतत्त्वाचा अनुभव घेणाराला कोणतें कर्तव्य राहणार याचा विचार करण्याचें कर्मयोगवादी टाळतात. अद्वैतसिद्धांत ज्यांना मान्य नाही त्यांनी द्वैताचा अवलंब करून कर्तव्य करणें हेंच मोक्षदायक आहे असें म्हणणें स्वाभाविक आहे; परंतु जगाचें मिथ्यात्व मानल्याशिवाय अद्वैताची सिद्धि होत नाही आणि जग ही माया आहे असा प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या माणसाला तूं या जगाच्या धारणार्थ कर्म कर असें सांगणें वेडगळपणाचें होणार नाही काय? गीतेमध्ये कर्मयोग हा अंतिम धर्माकरिताच सांगितला आहे, धर्माच्या अथवा मोक्षाच्या माडीवर चढून जाण्याचा तो जिना आहे आणि म्हणून व्यवहार व धर्म यांची फारकत करता येत नाही या गांधींच्या म्हणण्याशी कोणाचाही मतभेद होणार नाही. गीतेंतील अनासक्तियोगाने माणसाचें जीवन सरळ होतें आणि त्याला शांति मिळते यांत आम्हांला मुळीच संशय वाटत नाही. गीतेंतला संन्यासी 'अतिकर्मी' आहे असें म्हणण्यास गांधींना गीतेंत आधार सापडेल असें आम्हांस वाटत नाही. गांधींच्या या अपुऱ्या तत्त्वज्ञानामुळे त्यांनी केलेला श्लोकांचा अर्थ व दिलेल्या टीपा या पुष्कळांना संमत होणार नाहीत अशी आम्हांस भीति वाटते.

गांधी हे अद्वैती नसून द्वैती असावे; त्याशिवाय खरें ज्ञान पारमार्थिक कर्मामध्ये परिणत झालें पाहिजे असें त्यांनी म्हटलें नसतें (पान ६०). १७ व्या टीपेंत (टीपांची संख्या दिली असती तर बरें झालें असतें) नियत शब्दाचा अर्थ शास्त्रोक्त कर्म न घेतांना इन्द्रियांना नियमांत राखून करावयाचें कर्म असा अर्थ करणें हें एकंदर गीतेंतला कर्मयोग कोणत्या विषयाबद्दल शक्य आहे याविषयी अज्ञान दर्शवितें. कर्म नियत नसतें, इन्द्रियें नियत असतात. तसेंच पुढल्या टीपेंत यज्ञ म्हणजे परोपकारार्थ, ईश्वरार्थ केलेलें कर्म असें गांधी म्हणतात. परोपकार आणि ईश्वर हे एकच होत असें गांधींचें मत झालेलें दिसतें. एखादा नास्तिक परोपकारी असूं शकतो. मग त्याने ईश्वराला लाथाडलें तरी परोपकार करण्याने ईश्वराचीच सेवा घडली असें कदाचित् ईश्वर मानून घेत असेल! १९ व्या टीपेंत तर ईश्वराची सृष्टि म्हणजेच देव असें स्पष्ट विधान गांधींनी केलें आहे. परपीडा करणारा मनुष्य ईश्वराची सेवा करीत असला तरी ती खरी सेवा नव्हे हें कोणीही मान्य करील; पण याच्या उलट सिद्धांत प्रतिपादणें मतभेदाला कारणीभूत झाल्याशिवाय राहणार नाही. एकंदरींत कृष्णाने अर्जुनाला देशभक्त होण्याचा उपदेश केला म्हणावयाचा! या देशसेवेच्या कल्पनेचें ग्रहण न सुटल्यामुळे आत्मदर्शी मनुष्याला लोकसंग्रहाशिवाय जिवंत राहणें शक्य नाही असा विलक्षण सिद्धांत ५८ व्या टीपेंत त्यांनी नमूद केला आहे. कर्मयोगी गांधी जग हें सत्य समजतात असें दिसतें. ७५ वी टीप ही चुकीची दिसते.

अ. ९ श्लोक २३ हा फार महत्त्वाचा आहे. त्यावरून हिंदुधर्माचें स्वरूप उत्तम रीतीने समजतें. कोणत्याहि देवाची—मग तो अल्ला असो अगर आकाशांतील बाप असो—श्रद्धायुक्त अंतःकरणाने भक्ति करा, ती भक्ति मलाच पोचते, अविधिपूर्वक ती उपासना झाली इतकेंच. असा या श्लोकाचा अर्थ आहे. धर्मा ( Religion ) चें वेड लागलेल्यांनी हा श्लोक मनन करावा. तसें झाल्यास धर्म ( Religion ) ही चीज जगांतून लवकरच नाहीशी होईल. गांधीनी केलेला अर्थ बरोबर नाही. १०१ व १०२ या टीपांत शास्त्र या शब्दाचा अर्थ अगदी योग्य आहे असें आम्हांस वाटतें. असो. मुळांतच मतभेद असल्यामुळे टीपांचा अधिक परामर्श घेण्याचें कारण नाही.

श्री. लिमये यांचें मराठी भाषांतर कित्येक ठिकाणीं बेढब झालें आहे. 'आत्म्या-**मार्फत**' (५३) '**खूब** ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत' (९०); 'प्रभु करतेपण **रचीत** नाही' (९७); 'सर्व प्राण्याच्या **बाबत** द्वेषरहित....' (१८८) वरील रेखांकित शब्द बोजड आहेत.

असो. संसारी मनुष्य जें जें कर्म करतो तें सर्व सकाम असतें ह्या गैर-समजाने गीतेचा अनर्थ करण्यांत येत आहे. नियत कर्मे शास्त्रोक्तच असतात आणि तीं कर्तव्य म्हणूनच करावीं लागतात. त्यांत फलाची आशा नसते. निदान जें फल मिळणार, तें कर्त्याच्या इच्छेचें नसतें. शास्त्राने त्याच्यावर तें लादलेलें असतें. तात्पर्य, असें कर्म करण्यास स्वतःच्या हेतूने तो उद्युक्त होत नाही व स्वतःच्या फलाची आशा धरून तो तें करीत नाही. परंतु तो कर्मासक्त असतो. ज्ञान्याने कर्मासक्तहि असतां कामा नये : न 'कर्मस्वनुषज्यते.' गीतेंतील लोकोत्तर कर्मयोग हा संसारी माणसां-करता आहे; संसाराविषयी विरक्ति ज्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली आहे त्याच्याकरता नाही. गांधींनी आपल्या अनुभवाप्रमाणे गीतेचा अर्थ केला आहे, पण ती गीता नाही वा तें तत्त्वज्ञानहि नाही.

---

**१ पडत्या फळाचा संदेश.** ( लेखक- **डॉ. आपटे**, प्रकाशक, **इचलकरंजी-ग्रंथ-माला**, पुणें; किंमत १२ आणे)

**२ सामान्य पदार्थविज्ञान.** ( लेखक व प्रकाशक **डॉ. आपटे**, B. SC., M. B., B. S., २८१ सदाशिव पेठ, पुणें, किंमत ५ आणे. )

हीं पुस्तकें शाळेच्या वरच्या इयत्तेतील विद्यार्थ्यांकरतां लिहिलेलीं असून त्यांपैकीं पहिल्यांत यंत्रें व गतिनियम आणि दुसऱ्यांत स्थाणु, द्रव, वायु यांचे सामान्यधर्म याविषयीं विवेचन केलेलें आहे. पहिल्या पुस्तकांत गतिनियमांचें उद्घाटन हा मुख्य प्रतिपाद्य विषय आहे. गतिनियमांचा प्रणेता न्यूटन याला हें ज्ञान कसें स्फुरलें हें ऐतिहासिक कथाप्रसंगाने वर्णन करून सांगितलें आहे. अर्थात् 'पडत्या फळाचा

संदेश ' हें पुस्तकाचें नांव यामुळे सार्थ झालें आहे यांत शंका नाही. संदेश ऐकण्याला उत्सुक असलेल्या जिज्ञासूंच्या कानांत फळ एकदम बोलूं लागत नाही. त्याकरतां अगोदर अधिकार प्राप्त करून घ्यावा लागतो. कांही सोप्या आणि परिचयाच्या यंत्रांच्या अभ्यासानें हा अधिकार मिळवितां येतो म्हणून ग्रंथकारानें प्रथमतः गतीला कारणीभूत होणाऱ्या प्रेरकांचा विचार करून यंत्रांचे नियम प्रतिपादिले आहेत.

या पहिल्या भागांत कृततत्त्वाची ओळख एकदम करून दिल्यासारखी वाटते. त्या तत्त्वाचा उपयोग न करतां देखील संस्थितीचे नियम मांडतां येतील आणि तसे ते या पुस्तकांत पहिल्या दोन यंत्रांच्या संबंधांत मांडून दाखविलेहि आहेत. तथापि एकंदरांत सस्थितिनियम, त्यावरून सौकर्य, व प्रेरकांची चाल यांची सांगड, त्यावरून कृततत्त्व अशी साखळी विद्यार्थ्यांची समजूत पटण्यास अधिक सोपी जाईल असें वाटतें. अर्थात् हा व्यक्तिगत अनुभवाचा प्रश्न आहे आणि तो अमुकच क्रमानें सोडवावा असा आग्रह स्वतः ग्रंथकारहि धरणार नाही अशी आशा आहे. या पुस्तकांत न्यूटनच्या सिद्धांतांचें विवरण चांगलें साधलें आहे. हा विषय केवळ ग्रंथावरून समजणें केव्हाहि कठीणच, परंतु शिक्षकाचे मदतीने होणारा तत्त्वपरिचय या ग्रंथानें चांगला दृढ होईल अशी खात्री वाटते

अभ्यास-पुस्तकांच्या योगानें दोन गोष्टी साधावयाच्या असतात. एक नेमलेल्या विषयाचें विवरण करणें आणि दुसरें त्या विषयामध्यें अधिक ज्ञानलालसा उत्पन्न करणें. प्रस्तुत पुस्तकांत विद्यार्थ्यांना जरूर त्या भागाचें विवरण तर उत्तम झालेलेंच आहे परंतु विद्यार्थ्यांची दृष्टि विशाल करण्याचा उपक्रमहि चांगला झालेला आहे. न्यूटनचे सिद्धान्त केवळ पृथ्वीवरील पदार्थमात्रालाच लागू आहेत असें नसून अखिल विश्वाला गवसणी घालणारे आहेत ही गोष्ट केप्लरच्या गृहगतीसंबंधाच्या मतांचा उल्लेख केला आहे त्यावरून समजून येईल. प्रश्नावलीमध्यें बहुशः गणितात्मक प्रश्न घालण्याची वहिवाट मामुली आहे. परंतु प्रस्तुत पुस्तकांत या प्रश्नांमध्यें पुष्कळ नवीन बोध आणि जिज्ञासा जागृत होईल अशी व्यवस्था केलेली आहे. शेवटच्या संग्रहामधील प्रश्नांवरून ध्वनीचा वेग, प्रकाशाचा वेग, व केप्लरचें तत्त्व, याविषयी जिज्ञासा व विचार खास जागृत होतील, आणि आपण शिकलेल्या तत्त्वांचा प्रसार किती मोठा आहे याची थोडीतरी कल्पना येऊन शास्त्रीय विचारास चांगलीच चालना मिळेल.

सामान्य पदार्थविज्ञानाचें विवरण फारच सुगम रीतीनें केलेलें आहे. प्रसंगानुसार ऐतिहासिक माहिती मार्मिकपणें दिलेली असल्यामुळे तत्त्वप्रतिपादन विशेष खुलून दिसतें.

दोनही पुस्तकांत घातलेली दर्शनी चित्रें विशेष उद्बोधक असून त्याखालील श्लोकांची रचना मोठ्या चातुर्यानें केलेली दिसते. ग्यालीलीओच्या तसबिरीखाली 'विद्वत्त्व च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन' हें सुभाषित वाचून कोणाला सानंद कौतुक वाटणार नाही ?

हीं पुस्तकें वाचतांना वाचकांनी एक गोष्ट ध्यानांत आणली पाहिजे ती अशी. खेडेगांवांतून ' मुमई 'ला गेलेला एखादा गडी स्वकीयांची ओळख विसरून जातो आणि त्याला आपल्या गांवचीं माणसें बोजड ( कंट्री ) वाटूं लागतात, तसाच कांहीसा प्रकार येथें होण्याचा संभव असतो. इंग्रजी पुस्तकावरून स्वतःचें शिक्षण झालेलें, फक्त त्या भाषेतील ग्रंथाचाच परिचय आणि त्यावरच आसक्ति असें असल्यामुळे मराठींतून केलेल्या विषयप्रतिपादनाकडील दृष्टि कलुषित असण्याचा संभव फार. अशा शास्त्रीय पुस्तकांत कांही पारिभाषिक शब्द नवीन असणार आणि कांहींची मूळची ओळख आपण विसरलों असणार हें जाणून मुद्दाम बुद्धि स्थिर करून वाचलें पाहिजे. म्हणजे कधकाळा आरंभींच भासणारी आगंतुक क्लिष्टता पार निघून जाईल. अशा दृष्टीनें डॉ. आपटे यांनी लिहिलेलीं हीं पुस्तकें वाचलीं असतां विषयप्रतिपादन योग्य व समजण्यास सुलभ असें झालें असें कळून येईल.

याचप्रमाणें इतर शास्त्रांसंबंधी पुस्तकें लिहून शाळेपुरती तरी मराठींतून लिहिलेल्या वास्तवशास्त्रीय पुस्तकांची उणीव भरून काढण्याचें श्रेय ग्रंथकार लवकरच घेतील अशी आशा आहे.

शंकर दत्तात्रय गोखले

———

अभिनवकाव्यप्रकाश. ( ले. प्रो. रा. श्री. जोग. )

मराठींत चांगलें पुस्तक हातीं पडणें म्हणजे कपिलाषष्ठीचा योग समजला पाहिजे; आणि खरोखरच गेल्या साठ वर्षांत काव्यशास्त्राची चर्चा करणारा प्रस्तुत ग्रंथामारखा अन्य ग्रंथ झाला नाही. संस्कृत व इंग्रजी काव्यशास्त्रावरील ग्रंथांचें मंथन करून सोपपत्तिक व चर्चात्मक पद्धतीनें लिहिलेला अभिनव काव्यप्रकाश हा पहिलाच ग्रंथ होय असें म्हणावयास हरकत नाही. मात्र प्रो. जोग यांनी आपल्या ग्रंथाला अभिनव हें विशेषण कां जोडलें हें समजत नाही. काव्य या शब्दाचा अर्थ व्यापक असल्यामुळे त्यांत कादंबरी, नाटकें, कविता या त्रयीचा समावेश होतो. वस्तुतः या तिहींमध्ये बराच महत्त्वाचा भेद आहे. अद्भुत कादंबऱ्या खेरीजकरून बाकी कादंबऱ्या व नाटकें यांचें स्वरूप प्रायः वस्तुस्थितिनिदर्शक असतें. कल्पनेची संभाव्य, असंभाव्य उड्डाणें, कवितांप्रमाणें कादंबरी-नाटकांत खपत नाहीत म्हणून प्रस्तुत पुस्तकांतील विवेचन काव्याचा कविता हा जो भाग एवढ्यापुरतेंच ग्रंथकर्त्यांनी मर्यादित केलें हें योग्यच आहे. यासाठीं प्रस्तुत परीक्षणांत येणाऱ्या काव्य या शब्दानें पद्यमय रचनाच वाचकांनी समजली पाहिजे.

काव्य आणि शास्त्र यांमधील भिन्नता स्पष्ट केल्याशिवाय काव्याचें स्वरूप नीट ओळखतां येणार नाही. आमच्या मतें शास्त्र हें बुद्धीवर अधिष्ठित झालेलें असतें तर काव्य हें भावनापर असतें. बुद्धि व भावना हीं दोन जशीं भिन्न आहेत त्याप्रमाणें त्यांचें कार्यक्षेत्रहि भिन्न असणार हें उघडच आहे. बुद्धि व भावना यांमध्ये अपरिहार्य विरोध असल्याचें आपणांस अनेक वेळां प्रतीतीस येतें. बुद्धिप्रधान मनुष्य भावनावश नसतो आणि भावनाप्रधान मनुष्य बहुशः अप्रबुद्ध असतो हें सर्वांच्या अनुभवाचेंच आहे. भावनेपेक्षा बुद्धि श्रेष्ठ समजली जाते याचें कारण मनुष्यामध्ये भावना जितक्या सहज आढळतात तितक्या प्रमाणानें बुद्धि आढळून येत नाही. " शास्त्रज्ञांचें हृदय तात्त्विक विचारांमध्यें गुंग असतें. कवीचें मन मनुजसहज अशा राग, द्वेष, लोभ, मोह, मद, मत्सर इत्यादि दोष व प्रेम, भक्ति, परोपकार, दया, शांति इत्यादि भावनांमध्ये गुंग असतें " ( पान ३८ ). प्रो. जोग, यांची ही विचारसरणी आम्हांस सर्वथैव मान्य आहे. भावना या सर्व माणसांत प्रायः सारख्याच प्रमाणांत अनुभवास येतात, परंतु बुद्धि मात्र सर्वांत सारखीच असल्याचें आढळून येत नाही. अशिक्षित व रानटी मनुष्य बुद्धिहीन असला तरी भावनायुक्त असतो. तसेंच बौद्धिक शिक्षण भावना दुर्बल करण्यास कारणीभूत होतें ही गोष्ट विचारांत घेणे अवश्य आहे. सारांश, बुद्धि आणि भावना यांचा व्यतिरेकसंबंध विचारांत घेणे काव्यशास्त्रावर लिहिणाराचें आद्यकर्तव्य आहे. मानवी उत्कर्ष भावनांपेक्षा बुद्धिप्रकर्षावरच अधिक अवलंबून असल्यामुळे बुद्धीची मातब्बरी भावनांपेक्षा विशेष असते. काव्योत्पत्तीस अवश्यक असा जो एक गुण कवीमध्ये असावा लागतो तो उत्कट भावनात्मकता हा होय.

प्रो. जोग यांना ही गोष्ट मान्य असल्यामुळे शास्त्राहून काव्याची योग्यता कमी असली पाहिजे हें त्यांस संमत होईलच. उत्कृष्ट काव्यनिर्मितीला व शास्त्रीय शोधाला प्रतिभा ही सारखीच असल्यामुळे तिचा विचार करण्याचें कारण नाही. काव्याचा विषय भावना एकदा

दुसऱ्यांच्या सांगोशिकवणीने झाली तरी उत्कृष्ट प्रकारें वठणार नाही. दुसऱ्या प्रकारची कामगिरी ही एकप्रकारें स्वयंस्फूर्तीनेच सुरू होणारी असली तरी अनेक वेळां ती जाणून बुजून व अनेकांच्या सह-कार्यानेहि घडवून आणिली पाहिजे. तिच्या अभावीं गांठीं असलेलेंच अमूल्य मांडवल गमावून सारस्वत नगराच्या बाजारपेठेंत पत नाहीशी झाल्यामुळे वाङ्व्यवहार करणारांना आपलें दुकान गुंडाळून बसावें लागेल किंवा व्यवहाराचा आरंभ करणें कठीण जाईल व 'जुनें ठेवणें मीपणें तें कळेना' अशी आठवण काढीत पश्चात्ताप करण्याची पाळी येईल.

विद्यमान अभिजात वाङ्मयाचें रक्षण करण्याच्या कामगिरीचेहि दोन भाग पडतात. एक ग्रंथाच्या शरीराचें रक्षण व दुसरा ग्रंथाचा आत्मा जो अर्थ त्याचें रक्षण. शरीर जीवंत असलें म्हणजे आत्मा त्यांत असावयाचाच, त्याचें निराळें रक्षण तें काय करावयाचें असें वाटण्याचा संभव आहे. परंतु आत्मा नुसता असून भागत नाही. शरीर नष्ट झालें तरी तो असणारच. तेव्हां जिवंत शरीरांत आत्म्याचें रक्षण म्हणजे त्याची ओळख कायम राखणें होय. सरळ बालावयाचें म्हणजे ग्रंथ जसजसे जुने होत जातात तसतसा त्यांचा प्रसार कमी होत जाण्याचा संभव असतो त्यामुळें व कालगतीने भाषेंतील शब्दांचे अर्थ बदलत असल्यामुळे व ग्रंथलेखनकाळची परिस्थितिहि बदलत असल्यामुळे त्यांचा अर्थ दुर्बोध होण्याचा संभव असतो. हा अर्थ जागरूक ठेवण्याचें काम व्याख्यानें, टीका, टीपा, शब्दार्थ, चर्चा, प्रवचनें, निरूपणें वगैरे द्वारांनी लेखक व वक्ते करीत असतात. महाराष्ट्र सारस्वताच्या कोषागारां-तील 'जुनें ठेवणें' ही संज्ञा ज्यांना देतां येईल, परंतु अस्सल रत्नांप्रमाणेच ज्यांची लकाकी नव्या लेण्यांप्रमाणेच डोळ्यांना दिपविण्यास समर्थ आहे व ज्यांची पहिली चमक थोडयाच वेळाने रूपान्तर पावून प्रशान्त व आल्हादकारक तेजाप्रमाणे डोळ्यांस निववितें असे ग्रंथ कोणते आहेत तें त्यांचा नाम-निर्देश करून सांगण्याची आवश्यकता नाही. महाराष्ट्र वाङ्मय-वाटिकेंतील या पुष्पवृक्षांच्या घम-घमाटाने सर्व 'आनंदभुवन' कित्येक शतकांपासून दरवळून गेलेलें आहे. परंतु अभिनव मधु लुटण्यास लोलुप झालेल्या वाङ्मयोपासक भ्रमरांस हे चंपकवृक्ष आहेत की काय असें वाटून स्वस्वभावानुरूप हे भ्रमर[1] त्यांचा आस्वाद न घेतांच त्यांस डावलून जातील की काय अशी भीति कधी कधी वाटते.

प्रस्तुत विचार मनांत येण्याचें कारण फर्ग्युसन कॉलेजांतील प्रो. केळकर यांनी प्रसिद्ध केलेली 'तुकारामाच्या अभंगांची चर्चा' हें होय. चर्चेचा पहिला भाग तीन वर्षांपूर्वी व दुसरा भाग सुमारें दीड वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाला. इतक्या उशीरां त्यांचें परीक्षण लिहिणें चमत्कारिक दिसेल. तथापि चर्चेचे अजून चार भाग तरी प्रसिद्ध व्हावयाचे आहेत व मराठी साहित्यपत्रिकेंत प्रसिद्ध झालेल्या चर्चेचें परीक्षण आलेलें नाही, म्हणून हें परीक्षण लिहिण्याचें योजिलें आहे.

चर्चेची आवश्यकता--तु. म. चे अभंग समजण्यास सोपे असतील ही समजूत चुकीची आहे अशा प्रकारचे उद्गार ६० प० जोगबुवा यांनीच आपल्या सार्थ गाथेच्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत काढिले आहेत. इतर कवींच्या ग्रंथांवर शब्दार्थांच्या टीपा असल्या म्हणजे प्रौढ वाचकांचें तरी काम भागतें; परंतु विशिष्ट परिस्थितीमुळे तु. म. स व्याकरणव्युत्पत्तीचा तादृश संस्कार नसल्यामुळे व परमार्थांत तिची कांहीच मातब्बरी नसल्यामुळे वाक्यार्थ, अन्वय वगैरे बाबतींतील शैथिल्यामुळे वाङ्मयदृष्टीने अभंग वाचतांना ठिकठिकाणीं थबकावें लागतें. शब्दार्थ व सरळ वाक्यार्थ यांच्या मदतीने सुद्धा पुष्कळ आशंका शिल्लक राहतात. वादग्रस्त, दुर्बोध, गूढ व गंभीर स्थळांच्या अर्थाची छाननी केल्याने मनाचें थोडें तरी जास्त समाधान होतें व स्वतः अर्थाचा विचार करण्याची कुवत अंगीं येऊं लागते. यामुळे प्रस्तुतसारख्या चर्चेची मदत बहुमोल आहे अशी कोणाचीहि खातरी पटेल.

१ भुंगे चांफ्याच्या झाडाकडे जात नाहीत या संस्कृत कवींच्या संकेतावर येथे कटाक्ष आहे.

प्रस्तुत चर्चेला आरंभ ह० प० जोगांची सार्थ गाथा प्रसिद्ध होण्यापूर्वी आठ वर्षें झालेला होता. प्रार्थनासमाजाचे एक प्रमुख अध्वर्यु डॉ० भाण्डारकर यांच्या धुरीणत्वाखाली तुकाराम-चर्चा मंडळाची स्थापना १९०१ सालीं झाली. व मंडळाचें काम १९१५-१६ पर्यंत चाललें, वगैरे हकीकत प्रो. केळकर यांनी पहिल्या भागाचे प्रस्तावनेंत दिली आहे. ती जिज्ञासूंनी पहावी. तु. म. च्या साडे-चार हजार अभंगांपैकीं १८०० अभंगाच्या चर्चेचीं टिपणें तयार झालीं व तितकीं शाबूत आहेत. त्यांपैकी सध्या दोन भागांत मिळून ७५० अभंगाची चर्चा छापून निघाली आहे.

चर्चेची मांडणी-प्रथम माडगांवकर गाथेप्रमाणे अभंगाचा क्रमांक, त्याखालीं चरणांपुढे क्रमांक घालून अभंगाचा पाठ, त्यानंतर पाठभेद-हे सर्वच नमूद केलेले नाहीत-, त्यानंतर अर्थ. दुसऱ्या भागांत चरणाच्या अर्थालाहि अनुक्रमांक दिलेले आहेत. ही सोय हवी अशीच आहे. नंतर दुर्बोध स्थळांची चर्चा. त्यानंतर कठीण शब्दांचे अर्थ. त्यापुढे 'लक्ष्यप्रयोग' या नांवाचें एक सदर आहे. (त्याचा अर्थ आम्हांस नीटसा समजला नाही. लाक्षणिक कीं काय ?) व नंतर शेरा अशा तऱ्हेची चर्चेची मांडणी आहे व तिच्यामध्ये एकप्रकारची सुरेख व्यवस्था आहे व ती प्रो. वा. ब. पटवर्धन यांनी घालून दिलेली आहे. व्याकरण, व्युत्पत्ति, यांसारख्या बाबी शब्दार्थ, चर्चा वगैरेंतच अन्तर्भूत आहेत. ह्या निरनिराळ्या बाबींसंबंधाने आम्हांस जें कांही कमीजास्त लिहावयाचें आहे तें आता पाहूं.

अर्थ-चर्चेचा मुख्य हेतु 'अर्थनिश्चिति' हा होय व तो साध्य करण्यास चर्चेचा चांगलाच उपयोग होतो. चर्चा करणारांमध्यें डॉ. भाण्डारकर, रा. ब. मराठे व प्रो. पटवर्धन हे प्रमुख होत. इतरहि १५ मंडळी असत. त्यामुळे दुर्बोध स्थळांच्या अर्थासंबंधाने निरनिराळे पक्ष मांडले गेले आहेत. डॉ. भाण्डारकरप्रभृतींचा कल समाजमताकडे. याचें एक सुंदर उदाहरण अ. ३८२ मधील 'सर्व मंगळाचें सार। मुख सिद्धीचें भाण्डार।' यावरील चर्चेत 'मुख' याचे ऐवजीं 'सुख' असा पाठ असेल तर बरा असें म्हटलें आहे. परंतु या अभंगांत सगुण मूर्तीच्या दर्शनाचा आनंद वर्णिला आहे हें पहिल्या चरणांतील 'रूप दृष्टी न्याहाळितां' या अर्थावरून स्पष्ट आहे. म्हणून पांडुरंगाचें नांव हें सर्व मंगळाचें सार आहे या समाजमतासहि अनुकूल अर्थात् अनुरूप पाठ सुचविण्याची कांही आवश्यकता नाही. असो. प्रो. पटवर्धन हे कांहीं प्रार्थनासमाजिष्ट नव्हते, पण जुन्या परंपरेबद्दलहि त्यांची विशेषशी सहानुभूति नव्हती. प्रो. केळकर हे मात्र या कामीं चांगले मध्यस्थ लाभले आहेत व तु. म. चा सांप्रदाय लक्षांत घेऊन वरील मंडळींनी ठरविलेल्या अर्थावर ते टीका करतात व स्वतंत्र अर्थ देतात. ह. प. जोगांच्या अर्थासहि कित्येक वेळां त्यांनीं आपली पसंती दर्शविली आहे. अर्थात् हें वादग्रस्त स्थळांबद्दल होय. इतक्या भिन्न प्रकृतींच्या व मतांच्या विद्वानांनी केलेली चर्चा अर्थात् उद्बोधक व मनोरंजक झाली आहे. चर्चेत ठरलेल्या अर्थाहूनहि क्वचित् निराळे सरस अर्थ सुचवितां येतील; पण ही चर्चा मार्गदर्शकच समजली पाहिजे.

शब्दार्थ—पा. ३० भा. १ यांत चरणार्थांत मोकलणें म्हणजे सोडणें अर्थ दिला आहे; पण शब्दार्थांत मोकलणें म्ह० कंठ मोकळा करून रडणें म्हटलें आहे. हा अर्थ 'धाय मोकलणें' याचा आहे. सोवळें याची व्युत्पत्ति समंगल नसून सुमंगल असावी. भा. १ पा. ९२ 'धीर मंगलिया पाठीं कीर.' म्ह० कीर म्हणावें लागतें असा अर्थ असेल. हुतुतूच्या खेळांत पकडलेल्या गड्यास 'कीर' म्हटल्याशिवाय सोडीत नाहीत. भा. १ पा. १०५. खत्र्याळ म्ह० फार खोडकर असा शब्द कोंकणांत रूढ आहे. पा. ११. वर निध = ठेवा एवढ्याने न भागून Treasure हा इंग्रजी शब्द कां लागावा ? पैंजण म्ह. पायाच्या बोटांतील दागिना असा अर्थ एके ठिकाणीं दिला आहे. त्याचा अर्थ नूपुरें असा पाहिजे. कोडी शब्द इंग्रजी score पासून सुचविला आहे. पण तो संस्कृत कोटी या संख्यावाचका-

पासून आलेला दिसतो. पा १४३ वर मतितार्थ हा शब्द मथितार्थ असा पाहिजे. पा. २७१ वर बुझावी याची व्युत्पत्ति बुध्यतेपासून दिली आहे ती 'बोधय' पासून पाहिजे. अभं. १९२ 'नेणतां नाडली' =अज्ञानाने नाडली गेली असें पाहिजे. नाडली म्ह. बहकली हा अर्थ बरोबर वाटत नाही. कचाटींत सापडली, छळली गेली असा पाहिजे. पा. २७० 'पढियंत' हा शब्द प्रेयस यापासून असेल काय ? अ. १५८ 'घासील भूमिसी वदन यम' यावरील चर्चेत कुस्तीचा उल्लेख आहे. हा 'स्वारी' या पेचाचा उल्लेख आहे असें दिसतें. अभंग ५८३ 'गळा बांधेन पायीं'–यावरील चर्चेतहि 'गळखोड्याचा पेच' असा उल्लेख पाहिजे. पुण्याच्या लेखकांना पेचांचीं नांवें पडताळावयास अडचण पडूं नये. तु. म. खेळांचे उल्लेख पुष्कळ करतात. ते स्वतः कुस्त्या खेळले नसले तरी त्यांनी बघितल्या असल्याचा संभव आहे. असो. वरील उदाहरणांवरून शब्दार्थांचे बारकाईस पुष्कळ जागा आहे असें दिसून येईल. 'गदा-रोळ' म्हणजे 'गादआरोळी' अशी व्युत्पत्ति करण्यापेक्षा 'भीमदुर्योधनाच्या युद्धाची धुमश्चक्री' असेल काय ?

संदर्भ, अवतरणें, शास्त्रपरिचय वगैरे या बाबींतहि अपुरेपणा व उपेक्षा आढळते. भा. १, ७७च्या अभंगाचें तात्पर्य की 'देवाशिवाय भक्त नाही व भक्ताशिवाय देव नाही,' याशीं केकावलींतील 'तुझेचि यश तारितें' हा श्लोक तोलण्यास सांगितलें आहे. पण सदरहू केकेंत भागवत भेटले नाहीत तर अज्ञास भगवद्यशाची गोडी लागत नाही, असें म्हटलें आहे. त्या व या अर्थांत साम्य कोठे आहे ? ७९ अभं.च्या शेन्यांत 'हाक मारा म्ह. दार उघडेल' हें वाक्य बायबलांतलें दिसतें. विचारसादृश्यासाठीं ग्रंथाचा नामोल्लेख असावा. अभं. १०२ 'परीक्षितीने मरण चुकविलें' असें म्हटलें आहे. पण त्याचें मरण चुकलें नाही. त्याने भागवतश्रवणाने 'जन्ममरण' चुकविलें. तक्षकाकडून त्यास मृत्यु यावयाचा तो आलाच. अभं. १०५ –श्येन शिबिकथा महाभारतांत प्रसिद्ध असतां ती मराठ्यांच्या नांवावर कां विकावी ? कर्णाचा दांत सोन्याचा होता हा संदर्भ स्पष्ट केला नाही. पिंगला ही तु. म. स परिचित असलेल्या भागवतांतच आहे. भा. १ पा. २९० 'देह कर्वतले' ते ताम्रध्वजाने कीं त्याचा बाप जो मयूरध्वज त्याने ? का बापाचा देह मुलाने कर्वतला म्हणून दोघांनाच श्रेय द्यावें ? क्वचित् संस्कृत ग्रंथांतील वचनें उद्धृत केलीं आहेत. त्यांचा स्थलनिर्देश केला नाही. 'यदि सन्ति गुणाः पुंसां' हा भाग 'या दिसन्ति गुणाः' असा छापला आहे (अभं. १५०). त्याचप्रमाणें अ. २७५ च्या चर्चेत अवतरलेला भागवतांतील श्लोक बरोबर घेतलेला दिसत नाही. या चुका क्षुद्र आहेत; पण चोखपणाच्या दृष्टीने थोडक्याशा श्रमाने टाळतां आल्या असत्या. कित्येकदा खिळे जोडणारा वेताळहि फसवील; नाही असें नाही.

भागवत धर्माला वेदान्ताची पृष्ठभूमि आहे व त्या दृष्टीने चर्चा करणारास वेदान्ताची सूक्ष्म माहिती असणें अवश्य आहे. तु. म. नी गीताभागवतादि वेदान्त ग्रंथ, पौराणिक कथा व पूर्वीच्या साधुसंतांचे ग्रंथ अर्थरूपाने तरी आत्मसात् केले होते. म्हणून त्यांची छाया त्यांच्या अभंगांवर भरपूर आहे. या गोष्टीची जाणीव चर्चाकारांत कित्येक स्थळीं दिसत नाही. त्रिपुटी म्ह. ध्येय, ध्याता व ध्यात नव्हे तर ध्यान. शब्दार्थ देऊनहि अर्थ काय म्हणून प्रश्न कायमच आहे. पा. १९० वर (भा. १) प्रारब्धाचा नाश मोक्षाशिवाय होत नाही. संचिताचा नाश भोगानेच होतो असें म्हटलें आहे. त्याऐवजी प्रारब्धाचा नाश भोगाने होतो व संचिताचा नाश ब्रह्मात्मैक्य ज्ञानाने किंवा परमेश्वरसाक्षात्काराने होतो असें पाहिजे. अभंग १६० चा शेवटचा चरण 'सारीं झालीं मेलीं लटिकें वचन। बद्धमुक्तशीण तुका म्हणे ॥ ५ ॥ यांत सारी म्ह. शारी म्ह. सोंगटी हा अर्थ. सोंगटी झाली म्ह. कटेवर लागली, मेली वगैरे खेळणाऱ्यांच्या कल्पना होत. हा दृष्टान्त वरील चरणांतून आलेल्या मृगजळ वगैरे दृष्टान्तासारखाच आहे. व बद्ध मुक्त शीण। तुका म्हणे। हें वाक्य 'न निरोधो न चोत्पत्ति र्न बद्धो न च साधकः। न मुमुक्षु र्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥' या वेदान्तांतील प्रसिद्ध श्लोकाचा अनुवाद दिसतो. ऋद्धिसिद्धि, मुक्तीचे प्रकार वगैरे बाबींत केलेल्या चुकांची इतरत्र हजेरी झाली आहे; म्हणून तिचा पुनरुच्चार करण्याचें

कारण नाही. परंतु याबद्दल कांही टीकाकारांनी ग्रंथकारांवर फार आग पाखडली आहे. असो. आता शेवटचें सदर जें शेरे त्याविषयी लिहून परिक्षणाचा समारोप करूं.

शेरे—चर्चेचा पहिला भाग प्रसिद्ध झाल्यावर जीं परीक्षणें झालीं त्यांत शेऱ्यासंबंधी दोन पक्ष झाले. संप्रदायाभिमान्यांनी त्यांत दोष दाखविले व शेरे नसावेत असा त्यांचा ध्वनि दिसला. आधुनिक चिकित्सकांनी शेऱ्यांच्या न्याय्यान्याय्यतेचा तादृश विचार न करितां त्या कृतीस उचलून धरलें. शेरे योग्य तऱ्हेने दिल्यास सांप्रदायिक झाले तरी त्यांस नांवें ठेवणार नाहीत. शेऱ्याचे प्रकार पुढे दिल्याप्रमाणे आढळतात. ( १ ) कित्येक अभंगास शेरा हें सदर नाही, (२) सदर दाखवून 'नाही' हा शेरा, ( ३ ) क्वचित् व्याकरण वगैरे विषयक, ( ४ ) अभंगतात्पर्यदर्शक किंवा लोकस्थिति वगैरेंचे निदर्शक शेरे, व शेवटचा प्रकार, ( ५ ) मनोविकासदर्शक शेरे. पहिल्या चार प्रकारांबद्दल अर्थातच कोणीहि आक्षेप घेणार नाही. पांचव्या प्रकारासंबंधाने मात्र मतभेद व वाद आहे. त्याचा विचार करूं.

चिकित्सक पद्धतीप्रमाणे कोणत्याहि ग्रन्थकाराचा मनोविकास त्याच्या ग्रंथांत प्रकट झालेल्या उद्गारांवरून ठरवीत असतात. या पद्धतीने कोणत्याहि विशिष्ट संप्रदायांत न जन्मलेले पुरुष विकासवादाच्या वाटचालीबरोबर कधीं आस्तिकतेकडून नास्तिकतेकडे तर कधी नास्तिकतेकडून आस्तिकतेकडे तर कधी या दोन टोंकांच्यामध्ये संशयवादाच्या किंवा अज्ञेयवादाच्या तारेवर कसरत करीत असलेले दृष्टोत्पत्तीस येतात. परंतु तु. म. हे विशिष्ट सांप्रदायाचा अंकुर आनुवंशिकतेने बरोबर घेऊन आले असल्यामुळे त्यांच्या पारमार्थिक विकासाचा आरंभ, बिंदु, मध्य व अखेर मुक्कामाचें स्थळ हीं निश्चितच होतीं. अगदी बद्धावस्थेपासून आरंभ करून

'आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे
कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः'

असा श्रीशुकाचार्यांनी भागवतांत वर्णिलेला मार्ग त्यांस आक्रमावयाचा होता. अद्वैतसाक्षात्कार झाल्यावरहि द्वैताच्या पायरीवर येऊन,

सत्यपि भेदापगमे नाथ तवाऽहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः—

म्ह. हे नाथ, तुझा माझा अभेद असला तरी मी तुझा आहें, तूं माझा नाहीस. तरंग समुद्राचा असतो, समुद्र कांही तरंगाचा नसतो.—याप्रमाणें श्रीशंकराचार्यांनी वर्णिलेलें भक्तिसुख अनुभवण्याचा तो मार्ग होय. अंगीं अधिकार आल्यामुळे मुमुक्षुजनांस उपदेश करून त्यांचा उद्धार करणें हें सहज कार्य अशा सत्पुरुषांच्या हातून घडतें.

तु. म. ची ही भूमिका लक्षांत घेतली म्हणजे तिजकडे दुर्लक्ष्य झाल्यामुळे विशेषतः प्रो. पटवर्धनांचे शेरे कसे गैर होतात तें पहा. कित्येक अभंगांवर मूर्तिपूजेचा पगडा असलेला म्हणून तरूणपणचा ( अभं. १ व ६ ), अद्वैतपर म्हणून मध्यम वयांतील ( अभं. २० ), अद्वैतपर प्रौढपणींचा (अभं. २७), लौकिक मूर्तिपूजेचा ( अभं. ३४ ), अशा प्रकारचे शेरे आहेत ते चिन्त्य आहेत. पारमार्थिक विकास वयोऽवस्थेवर ठरविणें चुकीचें होईल. तसेंच धार्मिक समजुतीने 'लौकिक' हा शेरा चुकीचा ठरेल. तु. महाराजांच्या ज्या समजुतींवर 'लौकिक' असा शेरा आहे त्या पुष्कळ वेळां प्रचलित स्मृति, पुराणें वगैरेंना धरूनच असतात. अशा समजुतीस पाहिजे तर सांप्रदायिक म्हणा. उ. कलियुगामध्ये धर्मभ्रष्टता झाली आहे ही पौराणिक समजूत होय. 'लौकिक समजूत,' याचा अर्थ धर्मग्रंथाबाहेरील म्ह. नास्तिकपणाची असा होईल. अशा समजुतींवर कोरडे ओढले असतात ते त्यांतील दम्भाचा स्फोट करण्याकरिता व मुमुक्षूंना खालच्या पायरीवरून वरच्या पायरीवर चढविण्याकरिता असतात. यावरून शेरे द्यावयाचे

ते बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध व ज्ञानंतर लोकसंग्रही अशा अवस्थानुसार यावे. २ ऱ्या भागांत अवस्थानुसार शेरे देण्याची पद्धत ज्यास्त दिसून येते. किंवा उत्तमाधिकार, मध्यमाधिकार व कनिष्ठाधिकार या पायऱ्या शेऱ्याने दाखवाव्या.

अभंगांत मूर्तीचें वर्णन असलें तरी तें सिद्धावस्थेंतहि खालच्या भूमिकेवर उतरून भक्तिसुख अनुभवण्याकरिता असेल किंवा कीर्तनप्रसंगाने भाविक लोकांकरिता असेल तें तरुणपणचेंच असें हटकून म्हणतां येणार नाही. सार्थ गाथेच्या प्रस्तावनेंत ह. प. रा. पांगारकर यांनी, सद्गुरुप्रसाद झाल्यावर तु. म. स कवित्वाची स्फूर्ति झाली अशा अर्थाच्या त्यांच्या 'याती शूद्रवंश' इ. प्रसिद्ध उद्गारांवरून शेऱ्यांचा सर्वच प्रश्न कसा उलटाच्या पालटा होऊन जातो तिकडे चिकित्सकांचें लक्ष ओढलें आहे तें विचार करण्यासारखें आहे. असो.

चर्चेला आरंभ कोणीहि केला असला तरी आता हें कार्य महाराष्ट्रभाषाभिमान्यांचें व तु. म. च्या अभिमान्यांचें (व त्यांचा अभिमानी नाही असा महाराष्ट्रांत कोण दुर्दैवी असेल ?) आहे व तें तडीस जाईल याबद्दल सर्वांची सर्वतोपरी मदत झाली पाहिजे. प्रो. केळकर हे या कामीं चांगले संपादक लाभले आहेत. त्यांस एक विनंती अशी आहे की पारिभाषिक व सांप्रदायिक किंवा विशिष्टशास्त्रीय गोष्टींची छाननी त्यांनी तज्ज्ञांच्या नजरेखालून घालावी. यांत त्यांस कमीपणा आणण्याचा उद्देश नाही. कारण एकाच माणसाच्या हातून नजरचुका होण्याचा संभव असतो.-ज्ञातकार्योऽपि खल्वेकः संदिग्धे कार्यवस्तुनि- अशा कामीं मुख्य अडचण पैशाची व ती दूर करण्याची सूचना साहित्यसंमेलनाध्यक्षांकडून जनतेला होईल तर बरें असें आमच्या अल्प समजुतीस वाटतें. पुस्तकाची छपाई, बांधणी वगैरे उत्तम आहे.

वि. ह. निजसुरे

---

# अभिप्राय

**काव्य-शास्त्र-विनोद** (प्रकाशकः- वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर, किंमत १ रुपया) हें पुस्तक नगर जिल्ह्यांतील वाङ्मयप्रेमी मंडळींनी गेल्या फेब्रुवारी महिन्यांत भरलेल्या नगर–नाशिक जिल्ह्याच्या संमेलनाच्या प्रसंगीं प्रसिद्ध केलें आहे. संमेलनाचें दृश्य स्वरूप जनतेपुढे रहावें, व वाङ्मयप्रेमी मंडळीचा एकमेकांशीं जास्ती परिचय व्हावा ह्या दोन हेतूंसाठी पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलेलें आहे. 'पुस्तकाची कल्पना फारच सुंदर आहे; त्यांत विशेष मौजेची गोष्ट अशी आहे की, स्त्रियांनी त्यामध्ये भाग घेतला आहे; अशा तऱ्हेने साहित्यभक्तांचें संमेलन भरविण्याची कल्पना प्रथमतःच निघाली व चांगल्या रीतीने सिद्धीस गेलेली आहे हें पाहून नगरच्या मंडळींचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे. बागेंत निरनिराळ्या ठिकाणीं असलेल्या फुलांचा गुच्छ तयार झाल्यानंतर जो आल्हाद मनाला होतो, त्याच प्रकारचा आल्हाद हें पुस्तक वाचल्यानंतर होतो असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही.

पुस्तकाच्या नांवावरूनच ह्या पुस्तकाचे तीन भाग झालेले आहेत असें ध्वनित होतें; काव्यविभागांत अर्थातच कविता दिलेल्या आहेत; शास्त्रविभागांत, शास्त्रीय लेखांचा संग्रह केलेला आहे; (शास्त्र ह्या शब्दाचा नेहमीचा 'आधिभौतिक शास्त्रें'

अर्थ न घेतां विस्तृत अर्थ घेतला पाहिजे.) ‘विनोद’ — विभागांत कांही गोष्टी, व नाट्यछटा दिलेल्या आहेत. पुस्तकाचे तीन भाग केले असल्याकारणाने लेखांमध्येहि पुष्कळच विविधता दिसून येत आहे. काव्यविभागांतील श्रीयुत ठोकळ यांची, ‘या बसा पाव्हनं असं रामराम घ्या’; श्रीयुत गिरिजात्मज ह्यांच्या ‘वेड्याचें गाणें’, व ‘पाहिजे साथ कुणाची तरी’ विठ्ठलराव घाटे ह्यांच्या ‘आई’, व ‘प्रेमाने ध्यास’ व गोमा गणेश ह्यांची— ‘ऐकिव तव बांसरी, मुरारी’— ह्या कविता विशेष वाचण्यासारख्या आहेत; ह्या कविता अर्थाच्या दृष्टीने व चालींच्या दृष्टीनेहि चांगल्या साधलेल्या आहेत. शास्त्रविभागांतील बरेचसे लेख चांगले साधलेले आहेत; विशेष नवलाची गोष्ट अशी आहे की, निरनिराळ्या विषयांची मांडणी फारच सोप्या भाषेंत केलेली आहे. श्रीयुत टेंभुर्णीकर ह्यांचा ‘काव्यकला’ ह्या विषयावरील निबंध, श्रीयुत हिवरगांवकर यांचा ‘वास्तुसौंदर्य’ हा लेख, श्रीयुत जोशी ह्यांचा ‘चित्रकला’ हा लेख व श्रीयुत परशरामी ह्यांचा ‘नाट्यकला’ हा लेख— हे सर्व लेख पाहिले असतां वरील विधानाची सत्यता दिसून येणार आहे. ह्याशिवाय श्रीयुत दामले ह्यांनी ‘कविवर्य ‘केशवसुत’ यांच्या पुण्यतिथीचा निर्णय’ ह्यासंबंधीं दिलेली हकीकतहि विचारांत घेण्यासारखी आहे. ‘केशवसुत’ कधी निधन पावले हा अलिकडे बराचसा वादाचा विषय झालेला आहे; परंतु श्रीयुत दामले यांनी दिलेली माहिती पाहिली असतां आता पुण्यतिथीबद्दल वाद उत्पन्न होण्याचें कारणच शिल्लक रहात नाही. श्रीयुत दामले ह्यांनी दिलेली तारीख ७ नोव्हेंबर १९०५ हीच बरोबर असल्याबद्दल त्यांनी त्या वेळचीं कांहीं पत्रें प्रसिद्ध केलेलीं आहेत; हीं पत्रें बरोबर नसावींत असा संशय सुद्धा येण्यास जागा नाही. तर ह्यानंतर हा सर्व वाद थांबवून ता. ७।११।१९०५ हीच तारीख खरी धरण्यास कोणत्याहि तऱ्हेचा प्रत्यवाय दिसत नाही.

विनोदविभागाबद्दल लिहिण्यापूर्वी स्त्रीलेखिकांचा निर्देश केला पाहिजे;— सौ. सप्तर्षि, सौ. घाटे, सौ. हिवरगांवकर, व सौ. मायदेव ह्यांनी ह्या पुस्तकांत आपले लेख प्रसिद्ध करून हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या मूळ कल्पनेला पुष्कळशी मदत केलेली आहे. ह्याचप्रमाणे स्त्रियांनी प्रत्येक गोष्टींत जर भाग घेतला तर आपला ऊर्जितावस्थेचा काल बराचसा जवळ आलेला आहे असें म्हणावयास हरकत नाही.

विनोदभागांतील नाट्यछटा बऱ्या साधलेल्या आहेत. एकंदरीने पाहिलें असतां ग्रंथाची कल्पना फारच सुंदर साधलेली आहे. आंतील छपाई पुणें येथील ‘विजय’ प्रेसने केलेली असल्यामुळे तीहि चांगली झालेली आहे असें निराळें लिहिण्यास नको. ह्या कल्पनेप्रमाणे ज्या ज्या प्रांतांत साहित्यसंमेलनें भरविलीं जातात, त्या त्या प्रांतांतील वाङ्मयप्रेमी मंडळींनी अशा तऱ्हेने एखादा ग्रंथ प्रसिद्ध केल्यास त्या प्रांतांतील वाङ्मयसेवकांचा परिचय आपोआप इतरांना होईल व तो कायमच्या स्वरूपांत चांगल्या तऱ्हेने होईल.

ग. स. जोग, एम्. ए., एलूएल्. बी., वकील, बेळगांव.

# भारतीय कृषिशास्त्र – वृक्षविद्या

( लेखकः—कै. कृष्णाजी विनायक वझे )

द्यौः पुमान् धरणी नारी बीजमंभो दिवश्च्युतं ॥
द्युधात्रीबीजसंयोगाद्धान्यादीनां तु संभवः ॥
अन्नं हि जगदाधारं सर्वमन्ने प्रतिष्ठितं ॥
मूलमापो हि अन्नस्य तस्मादापो हि जीवनं ॥
अप्तृणसूर्या हि ओषधयः ।

आकाश हा नवरा असून भूमि ही त्याची बायको आहे व आकाशांतून पडणारें पाणी हें त्या पुरुषाचें वीर्य आहे. याप्रमाणे आकाश, पृथ्वी व बी यांच्या संयोगापासून सर्व वनस्पति उत्पन्न होतात व त्यांना 'अप्तृणसूर्य' असें म्हणतात. अन्न हें सगळ्या जगाचा आधार आहे, कारण 'अन्नमय प्राण' आहेत. शरीरांतील सर्व शक्ति अन्नामुळे आहेत व तें अन्न पाण्यापासून उत्पन्न होतें म्हणून पाणी हें 'जीवन' होय. यासाठी शेतीचा विचार करण्यापूर्वी पावसाच्या पाण्याचा अंदाज व विचार करावा लागतो.

पावसाचा अंदाज करण्याचे तीन प्रकार आहेत; त्यांना (१) दिव्य (२) आंतरीक्ष्य व (३) भौम असें म्हणतात. ते प्रकार खाली दिल्याप्रमाणेः

१ दिव्य—दिव्य प्रकारांत आकाशांत जे सूर्य, तारे व ग्रह आहेत त्यांच्या स्थितीवरून अंदाज करीत असतात.

वर्षोपलब्धिः बृहस्पतेः स्थानगमनगर्भाधानेभ्यः, शुक्रस्य उदयास्तमयचारेभ्यः, सूर्यस्यप्रकृतिवैकृताच्च। सूर्याद्बीजसिद्धिः। बृहस्पतेः सस्यानां स्तंबकरिता।शुक्राद्वृष्टिरिति।

पाऊस हा बृहस्पति (गुरु) याचें स्थान, गमन व गर्भाधान यांच्यावर, शुक्राचा अस्त, उदय व मयचार यांवर आणि सूर्याच्या स्वच्छपणावर व डागांवर अवलंबून असतो. त्यांत सूर्याच्या स्थितीवरून धान्य कसें येईल हें समजतें, गुरूच्या स्थितीवरून गवत* कसें येईल हें समजतें व शुक्राच्या स्थितीवरून पाणी पुरवठा कितपत होईल हें कळतें. सूर्याच्या स्थितीवरून अनुमान करण्यासंबंधाची माहिती वराहमिहिरांनी आपल्या बृहत्संहितेंत 'केतुचार' या प्रकरणांत दिली आहे. सूर्यावरील डागांना त्यांनी 'केतु' असें नांव दिलें असून या केतूंचा आकार, त्यांची संख्या व त्यांचें सूर्यबिंबावरील स्थान या गोष्टींवरून अंदाज करण्यास सांगितलें आहे. वराहमिहि-

---

भाताचा चूड (सं. म. शा. प.).

रांनी तेहतीस केतूंची माहिती दिली आहे. गुरुशुक्रांवरून अंदाज करण्याची माहिती फलज्योतिषग्रंथांत मिळेल. याशिवाय हल्ली ग्रहांच्या युति व प्रतियुतींवरून पावसाचा अंदाज करण्याचा प्रघात रा. करंदीकर वगैरेंनी पाडला आहे. तात्पर्य, ज्योतिषशास्त्राधारें जो पावसाचा अंदाज करतात त्याला ' दिव्य ' प्रकार म्हणतात.

२ आंतरीक्ष्य—पृथ्वीच्या सभोवार जें वायुमंडल आहे त्याच्यांत होणाऱ्या फेरफारांवरून जो पावसाचा अंदाज करतात त्याला आन्तरीक्ष्य अंदाज म्हणतात. ही अंदाज करण्याची पद्धति वराहमिहिरांनी आपल्या बृहत्संहितेंत दिली आहे. कार्तिक व॥३० पासून आकाशांत दररोज जे ढग येतात त्यांची वाऱ्याची दिशा व वेग यांची नोंद ठेवून दोनशे चाळीस दिवसांनी त्यांचें अमुक फळ येईल असें सांगणें ही यांत प्रमुख गोष्ट आहे. याला मेघांचें गर्भाधान असें म्हणतात. हे गर्भमेघ फुटले, स्रवले अगर बिघडले हें पाहून हा अंदाज करतात. चैत्र शु॥ १ (प्रतिपदे)पासून अश्विन्यादि दिननक्षत्रांवरून त्या त्या सूर्यनक्षत्रीं पावसाची काय स्थिति असेल असाहि अंदाज करण्याची एक पद्धति आहे. इंग्रज सरकारचे वायुशास्त्रज्ञ वायूची गति, दिशा, हिमालयावर पडणाऱ्या बर्फाचें माप व प्रमाण वगैरेंवरून पावसाचा अंदाज करीत असतात. उंच वातावरणांतील गति वगैरेंवरूनसुद्धा अंदाज करण्याची चाल आहे. तात्पर्य, वातावरणांतील फेरफारांवरून करण्यांत येणाऱ्या अंदाजाला ' आंतरीक्ष्य ' अंदाज म्हणतात.

३ भौम—पृथ्वीवरील वनस्पति, प्राणी वगैरेंच्या परिस्थितीवरून जो पावसाचा अंदाज करतात त्याला 'भौम' अंदाज म्हणतात. वसंतऋतूंत झाडांना नवी पालवी येते, मोहोर येऊन फळें येतात, पशुपक्षी माजतात, अंडीं घालतात अगर गाभण रहातात. यावरून पावसाळ्यांत पावसाची काय स्थिति असेल याचा अंदाज करणें म्हणजे भौम अंदाज होय. हा प्रकार हल्ली मुळींच प्रचारांत नाही; यासाठी याची थोडी माहिती खाली दिली आहे.

फलकुसुमपत्रवृद्धिं वनस्पतीनां विलोक्य विज्ञेयं।
सुलभत्वं द्रव्याणां निष्पत्तिश्चापि सस्यानां ॥
न्यग्रोधेन च यवकाः तिंदुकवृद्ध्या च षष्टिको ज्ञेयः ॥
अश्वत्थेन ज्ञेया निष्पत्तिः सर्वसस्यानां ॥
जंबूभिः स्थलमापाः शिरीषवृद्ध्या च मुद्गनिष्पत्तिः ॥
गोधूमाश्च मधूकैर्यववृद्धिः सप्तपर्णेन ॥
करिणश्च हस्तिकर्णैर्निर्देश्या वाजिनोश्वकर्णेन ॥
गावश्च पाटलाभिः कदलीभिरजाविकं ज्ञेयं ॥
आम्रैः क्षेमं भल्लातकैर्भयं पीलुभिस्तथारोग्यं ॥
खदिरशमीभ्यां दुर्भिक्षं अर्जुनैः शोभना वृष्टिः ॥
पिचुमंदनागकुसुमैः सुभिक्षमथ मारुतः कपित्थेन ॥
निचुलेनावृष्टिभयं व्याधिभयं चैव कुटजेन ॥

झाडांना पानें फुलें फळें किती आलीं आहेत हें पाहून त्यावरून पुढील सालचा सर्व अंदाज करावा तो असा :—

पिंपळावरून नाचणी, टेंभुरणीवरून तांदूळ, वडावरून बाजरी जोंधळे, जांभळीवरून उडीद, शिरीषावरून मूग, मोहड्यावरून गहू, सातवणीवरून सातु, हस्तिकर्णावरून हत्ती, अश्वकर्णावरून घोडे, पाडळीवरून गाई, चवेणीवरून शेळयाभेंढया, आंब्या-वरून कल्याण, बिब्यावरून भय, पीलूवरून आरोग्य, खैरशमीवरून दुष्काळ, अर्जुनावरून पाणीपुरवठा, पिचुमंदावरून सुकाळ, कवठावरून वारा, निचुलावरून पावसाचा तुटवडा, कुडयावरून रोगराई यांचा अंदाज करावा.

याप्रमाणे अनेक गोष्टींचें सूक्ष्म अवलोकन करून त्याचा निष्कर्ष त्या वर्षाच्या पंचांगांत मांडण्याची आपल्यांत चाल आहे. चैत्र पाडव्याला ही माहिती जोश्यांनी घरोघर जाऊन सांगावयाची म्हणजे घरधनी त्याप्रमाणे आगाऊ सावध असतो. यंदा कोणत्या हंगामांत केव्हा किती पाऊस पडणार आहे हें समजलें तर त्या बेताने पिकांची योजना व पेरणी करून पडणाऱ्या पावसाचा योग्य फायदा घेतां येतो अगर न पडणाऱ्या पावसामुळे नुकसान होऊं नये अशी खबरदारी घेतां येते.

असा पावसाचा नुसता अंदाज करूनच आपले पूर्वज थांबले नाहीत तर त्यांनी त्या अंदाजांचे पडताळे पाहून ते बरोबर उतरतात कीं नाही, कोठे चुकतात, कां चुकावेत याचा विचार करून दुरुस्त्याहि केलेल्या आढळतात. यासाठी दररोज पडणारा पाऊस मोजून जोशांनी त्याची नोंद ठेवावयाची असते व मग अंदाजाशीं या नोंदींचा पडताळा पहावयाचा असतो. हें काम खाजगी व्यक्ति करीत असत.

हल्ली जसे इंग्रज सरकार पाऊस इंचांत मोजतें त्याप्रमाणे प्राचीन काळीं पाऊस द्रोणांत मोजीत असत. ही मोजण्याची पद्धति वराहमिहिरांनी आपल्या बृहत्संहितेंत खालीलप्रमाणे दिली आहे.

हस्तविशालं कुंडं समधिकृत्यांबुप्रमाणनिर्देशः ॥
पंचाशत्पलमाढकमनेनमिनुयाज्जलं पतितं ॥ बृहत्संहिता २३।२

एक हात चौरस चुनेगची कुंड करून त्यांत पावसाचें पाणी मोकळेपणें पडूं द्यावें. त्यांत फक्त पावसाच्या थेंबांचें पाणी घ्यावयाचें आहे. पाऊस थांबला म्हणजे कुंडांत जमलेलें पाणी ओल्या फडक्याने टिपून घेऊन तोलावें. अडीच तोळ्यांचा पल, पन्नास पलांचे आढक व चार आढकाचा द्रोण या मापाने पावसाचें माप द्रोणांत व आढकांत आणि पलांत सांगावें. याप्रमाणे आजचा एक इंच पाऊस हा एकदशांश द्रोण होतो.

हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या भागांत किती पाऊस पडतो हें कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रांत नमूद केलेलें असून शिल्पशास्त्रकारांनी निरनिराळ्या भागांतील

पावसाच्या मानानें छपरांचे ढाळ निरनिराळे असावे असें सांगितलें आहे. पावसाचें मान व ढाळ यांची माहिती वेश्यशास्त्रांत दिली आहे तिचा सारांश खाली दिला आहे.

षोडशद्रोणं जांगलानां वर्षप्रमाणं, अध्यर्धं आनूपानां देशवापानां अर्धत्रयोदशं अश्मकानां, त्रयोविंशतिः अवंतीनां, अमितमपरांतानां, हैमन्यानां च, कुल्यावापानां च कालतः ।

जांगल देशांत सोळा द्रोण पाऊस पडत असतो, कोरडवाहू देशांत दीड द्रोण पाऊस पडतो, अश्मक देशांत साडेसहा द्रोण पाऊस पडतो, अवंती देशांत तेवीस द्रोण पाऊस होतो, अपरांत देशांत बेमाप पाऊस पडतो, हिमालयांतील प्रदेशांत नेहमी व कुल्यावाप ( सिंध ) देशांत क्वचित्काळीं पाऊस पडतो.

| देशाचें नांव | पाऊसमान | छपराचा ढाळ | |
|---|---|---|---|
| | इंच | गाळा | उंची |
| सिंध | ०ते५ | १२ | १ |
| राजपुताना, कच्छ | ५ते१० | ७ | १ |
| मारवाड, काठेवाड | १०ते१५ | ५ | १ |
| वऱ्हाड वगैरे | १५ते३० | ४ | १ |
| बहार ओरिसा | ३०ते५० | २ | १ |
| संयुक्त प्रांत | ५०ते७५ | ९ | ७ |
| माळवा वगैरे | ७५ते१०० | ७ | ५ |
| कोंकण वगैरे | १००ते१५० | ७ | ६ |
| काश्मीर वगैरे | १५०ते३०० | १५ | १४ |

उत्तम पावसाळा म्हणजे कसा असावा हेंहि ठरविलें:

वर्षत्रिभागः पूर्वपश्चिममासयोः, द्वौ त्रिभागौ मध्यमयोः ।
त्रयः सप्ताहिका मेघा अशीतिः कणशीकराः ॥
षष्टिरातपमेघानां एषा वृष्टिः समाहिता ॥
वातमातपयोगं च विभजन्यत्र वर्षति ॥
त्रीन् कर्षकांश्च जनयन् तत्र सस्यागमो ध्रुवः॥ कौटिल्य १।२४ (४५? सं.म.सा.प)। ४१

एकंदर जो पाऊस पडत असेल त्याचा तिसरा हिस्सा पाऊस पहिल्या व शेवटच्या अशा दोन महिन्यांत पडावा व बाकीचा दोन हिस्से पाऊस मधल्या दोन महिन्यांत पडावा. पावसाळ्यांत तीन सातेरी ( सात सात दिवसांचा एक एक सप्ताह ) झड लागावी. ऐंशी दिवस थुसपुस थुसपुस पाऊस पडावा, साठ दिवस उघड झांप पाऊस पडावा असें झालें म्हणजे पुरेसा पाऊस झाला. पाऊस पडावा, उन्ह पडावें. अशा गोष्टी आळीपाळीने व्हाव्या व तीनदा पेरण्या करतां येतील इतका पाऊस पडावा म्हणजे पिकें खात्रीने येतात.

कोणतीं पिकें केव्हा पेरावीं व त्यांना किती पाऊस लागतो हेंहि ठरविलेलें आहे.

शालीव्रीहिकोद्रवतिलप्रियङ्गुदारकवरकाः पूर्ववापाः।

मुद्गमाषशैब्या मध्यवापाः।

कुसुंभमसूरकुलत्थयवगोधूमकलामअतसीसर्षपाः पश्चाद्वापाः।

तांबडें भात, पांढरें भात, कोद्रु, तीळ, नाचणे, जोंधळे, वऱ्या हीं धान्यें पहि, ल्याने पेरावीं; मूग, उडीद, तूर, पावटे हीं कडधान्यें मध्ये पेरावीं; करडई, मसूर-कुळीथ, सातु, गहू, हरबरे, आळशी, मोहऱ्या हीं धान्यें मागून पेरावींत.

शाल्यादि ज्येष्ठं। मुद्गादि मध्यमं। यवादि कनिष्ठं।

इक्षुः प्रत्यवरः। इक्षवो हि बह्वाबाधा व्ययग्राहिणश्च।

साळींना पाऊस फार पाहिजे, मूग वगैरे कडधान्यांना मध्यम पाहिजे, गहू वगैरेंना थोडा पुरतो. उसाला मात्र पाणी नेहमी पाहिजे. उसाला भय फार व खर्चहि जास्त येतो. यासाठी पाण्याची शाश्वती व खताची खात्री असल्याशिवाय तो पेरूं नये. पाणी देणें तें जशी सोय असेल त्याप्रमाणे नदी वगैरे वाहत्या पाण्याचे अगर तलावाचे पाट काढून द्यावें, अगर विहीर वगैरेंचे उचलून द्यावें अगर खांद्यावरून अगर जनावरावरून वाहून आणून द्यावें. वरील प्रकार एकापेक्षा एक गौण (पिकाच्या दृष्टीने कमी योग्यतेचे) आहेत; परंतु जमीन उतरण्याच्या दृष्टीने श्रेष्ठ आहेत. पाटाच्या पाण्याने जमीन लवकर कसाला उतरते व घागरीने पाणी घातल्यास जमीन मुळींच उतरत नाही

धान्य वगैरे पेरण्यापूर्वी काय करावें तें असें सांगितलें आहे.

तुषारपायनं, उष्णशोषणं च आ सप्तरात्रादिति धान्यबीजानां, त्रिरात्रं वा कोशीधान्यानां, मधुघृतसूकरवसाभिः शकृद्युक्ताभिः काण्डबीजानां, छेदलेपो मधुघृतेन कंदानां, अस्थिबीजानां शकृदालेपः, शाखिनां गर्तदाहो गोस्थिशकृद्भिः काले दौहृदं च।

प्ररूढांश्च आशुष्ककटुमत्स्यांश्च स्नुहिक्षीरेण पाययेत्।

मोरचुताचे पाण्यांत भिजवून सात दिवस उन्हांत वाळवून गहू जोंधळा असलीं धान्यें पेरावींत. ज्या धान्यांवर टरफल आहे तीं धान्यें तीनच दिवस वाळविलीं तरी पुरे. तुकडे लावावयाचे असले तर त्यांना मध, तूप, डुकराची चरबी व विष्ठा यांचें खत द्यावें. कांद्यांचे तुकडे लावणें असतील तर त्या फाकींना मधतुपाचा हात द्यावा. कठीण कवचीचें बी शेणांत मुरवावें. फांद्या लावणें असतील अगर झाडें लावणें असतील तर अगोदर खड्डा भाजावा, मग त्यांत गाईचीं हाडें व शेण यांचें खत वेळोवेळीं जरूरीप्रमाणे द्यावें.

रोप लावतांना त्याच्या बुडाशीं मूठभर वाळलेले खारे मासे व शेराचा चिक हीं घालावीं.

गाईम्हशींचें शेणखत झाडांच्या लवकर आंगीं लागतें. माणसांचें सोनखत आंगीं लागण्यास जास्त वेळ लागतो. खेचर, घोडा, उंट, गाढव यांचें शेण आंगीं लागण्यास बरेच दिवस लागतात व शेळ्या मेंढयाच्या लेंडया आंगीं लागण्यास तर फारच दिवस लागतात हें लक्षांत ठेवून खत त्या बेताने आगाऊ जमिनींत घालीत जावें.

झाडांना जमिनींतील रस शोषून घेतां यावा म्हणून ती जमीन पाणी शोषून घेणारी पाहिजे. तींत मुळांचा प्रवेश होण्यासाठी ती भुसभुशीत पाहिजे व तींतील द्रव्यें पाण्यांत विरणारीं पाहिजेत. जमीन कडक असेल तर तींत मुळें शिरणार नाहीत व तींतील द्रव्यें पाण्यांत विरणारीं नसतील तर तीं द्रव्यें झाडांना घेतां येणार नाहीत व पाणी नसेल तर तीं द्रव्यें पाण्यांत विरणार नाहीत व त्यामुळेहि झाडांची उपासमार होईल. यासाठी पहिल्याने जमीन नांगरून भुसभुशीत केली पाहिजे. हें नांगरण्याचें काम पीक निघतांच करावें म्हणजे जमीन मऊ असल्याने ती नांगरण्यास सोपी जाते, ती उन्हाने तापली म्हणजे तिच्यांतला कठीण भाग पिचतो, दगड विरतात, त्याचें कूट होतें व वरची जमीन खाली व खालची जमीन वर होते. नेहमी पिकें करण्याने वरची जमीन निकस होते व वरच्या जमीनींत निरनिराळ्या वस्तूंचें खतांत रूपांतर करणारे सूक्ष्म जंतु असतात. हे जंतु खाली गेले म्हणजे तेथील मातींत खत निर्माण करतात. हे जंतु फार खोल गेले तर तेथे त्यांना हवा व सूर्यप्रकाश न मिळाल्याने ते मरतात किंवा त्यांना खत निर्माण करतां येत नाही. यासाठी जमीन फार खोल नांगरूं नये. सामान्यतः जमीन वीत दीड वीत नांगरावी. जमिनीचा वरचा भाग निकस झाला असेल व मातीचा थर पुष्कळ खोल असेल तर वरची माती काढून एक साल काढून तालीसारखी सभोवार टाकावी व मग जमीन नांगरावी म्हणजे पहिली माती काढल्यावर नव्या वरच्या भागांत एक साल हे सूक्ष्म जंतु निर्माण होतील व मग जमीन नांगरल्यावर पूर्वी खोल असलेल्या जमीनींतील कस पिकांत येईल. नुसता खोल नांगर मारण्याने हित न होतां वरचे जंतु खोल खाली जाऊन मेल्याने पिकाला कमीपणा मात्र येतो, हें ध्यानांत असूं द्यावें व नवीन वर आलेल्या जमिनींत जंतु उत्पन्न होण्यास वेळ लागतो.

चत्त्वारिंशत्तयाचाष्टौ अंगुलानि कुटः स्मृतः ॥
ऊर्ध्वार्धमंगुलैर्मेद्या हलीनां वेधतश्च यः ॥
षोडशैव तु तस्याधः षड्विंशति तथोपरि ॥
वेधस्तस्य च कर्तव्यः परिमाणे षडंगुलः ॥
सुतीक्ष्णो लोहफालः स्याद् मृत्काष्टाद्यविकारि च ॥
सालादिशुभकाष्टानां हलिना विदुषां मते ॥
न सीरक्षीरवृक्षस्य न बिल्वपिचुमंदयोः ॥
प्लक्षाक्षयोर्न तत्कुर्यात् सारकाष्टैः कृतं भवेत् ॥
चतुर्हस्तं युगं कार्यं स्कंधस्थानेर्धचंद्रकं ॥
मेषशृंग्याः कदंबस्य सालाद्यन्यतमस्य च ॥

प्रतोददंडमग्रंथि वैणवं च चतुःकरं ॥
तदग्रे न च कर्तव्यं यवाकारं तथांकुशं ॥
नीचोच्चवृषमानेन प्रज्ञास्तज्ज्या वदंति च ॥
एवं धान्यादिलाभार्थं कर्तव्यं कर्षणं तरैः ॥

नांगराचा खुंट अठ्ठेचाळीस अंगुलें लांब असावा; या खुंटाला खाली सोळा अंगुलें व वर सव्वीस अंगुलें जागा सोडून मध्ये भोक पाडून त्यांत दांडा घालावा. हा दांडा व भोक सहा अंगुलें जाडीचीं असावींत. जो माती, मुळ्या वगैरेंनी बिघडणार नाही असा चांगला अणीदार फाळ करावा. नांगराला लाकूड साल वगैरे मजबूत जातीचें असावें. क्षीर झाडाचा, बैल, पिचुमंद, प्लक्ष वगैरे मऊ झाडांचा नांगर करूं नये. तो बाभूळ, शमी, खैर अशा कठीण लाकडांचा करावा. त्याला जू लावणें तें चार हात लांब असावें व त्याचा खांद्यावर येणारा भाग निमगोल किंवा अर्धचंद्राकृति करावा. हें जू मेषशृंगी, कदंब अशा चिवट झाडाचें असावें. साल लाकूड याला वापरूं नये. चाबकाची ( आसुडाची ) काठी बिनगाठीची असावी. ती चार हात लांब असावी व ही बांबूची भरीव असली तर बरी; तिच्या शेवटीं आरी किंवा त्रिशूळ न करतां चापट पट्टी लावावी. बैल उंचठेंगणे असतील त्याप्रमाणे कासरा लांब असावा. याप्रमाणे नांगर करून शेत नांगरावें. नांगराच्या फाळाला माती लागते ती आसुडाच्या शेवटीं असलेल्या उलथण्याने पाडावी.

जमीन नांगरणें ती तिला जो ढाळ असेल त्याशीं गुण्यांत नांगरावी म्हणजे नांगराच्या तासानेच पाणी वाहून जमीन धुपत नाही. शेतीसाठी जमीन असणें ती दक्षिणपश्चिमेकडे किंवा नेहमी जिकडून जोराने पाऊस येतो तिकडे ढळती नसावी. उत्तरेकडे जमीन ढळती असली म्हणजे उन्हाळ्यांत तिजवर सूर्यकिरण लंब पडतात व ती चांगली तापून निघते. नांगराचे तास या ढाळाला गुण्यांत असले म्हणजे पावसाचें पाणी या तासांत सांचून जमीनींत चांगलें मुरतें व जमीन धुपत नाही तें निराळेंच. नांगर सरळ रेषेंत, तासाला तास लागून हाकणें हें एक कौशल्य आहे. नांगराला चार बैल लावावे. त्यांत दोन पुढचे तापट व दोन मागचे धीमे असावे. धीमे बैल नेटाला दमदार असतात व तापट बैल वेगाला जास्त असतात. गाडी, नांगर वगैरेंना जनावरें लावणें तीं केव्हाहि एका स्वभावाचीं नसावींत. त्यांत नेहमी डावा उजवा हात असावा म्हणजे बरें असतें. दोन्ही जनावरें तापट असलीं तर गाडी भडकून जाण्याचें भय असतें व दोन्ही मंद असलीं तर गाडी हळूहळू चालते. बैलांचा रंग काळा, विशेषतः खूर काळे असावेत. काळे खूर पक्के असतात व त्यामुळे जनावरांचे पाय तळावत नाहीत. सडकेवरून नेहमी जावें लागणाऱ्या बैलांच्या पायांना नाल मारतात; परंतु शेतांत चिखलांत ज्यांना काम करावें लागतें त्यांना नाल नकोत. पाण्यांत हे नाल ढिले होतात व यांच्या कडा दुसऱ्या पायांना वगैरे लागून त्यांना इजा होते. यासाठी नाल काढून बैलांना शेतीच्या कामीं वापरावेत.

नोषरां वाहयेद्भूमिं, न चाश्माशर्करान्विता ॥
न गोचरां, प्रदत्तां न, न नदीपुलिनं द्विजः ॥
न दूरे वाहयेत्क्षेत्रं, न चैवात्यंतिकं तथा ॥
न वाहयेत्पथिक्षेत्रं, वाहयन्दुःखितो भवेत् ॥
क्षेत्रेष्वेवं वृतिं कुर्यात् यामुष्ट्रो न विलंघयेत् ॥
न लंघयेत्पशुं नाश्वो न भिंद्यायां च सूकरः ॥
बंधादि यत्नतः कार्या मृगादित्रासनार्थ च ॥
तथैवोपद्रवं राजतस्करादिसमुद्भवं ॥
अनवद्यां शुभां स्निग्धां जलावगाहनक्षमां ॥
धरणीं वाहयेद् निम्नां यत्र तोयं स्थिरीभवेत् ॥
वाहयेत्सलिलाकीर्णां अवृष्टौ सेकसंभवां ॥

खाऱ्या जमीनी, खडक, बाळवंट, गुरचराई, दान दिलेली, नदीचे पात्र या जमीनी चांगल्या माणसाने पेरूं नयेत. शेत गांवापासून फार लांब असूं नये तसेंच तें फार जवळ असूं नये. जवळ असलें तर शेतास गांवाची वर्दळ बाधते व लांब असलें तर चोर व हरणें डुकरें वगैरे वन्य पशूंचा त्रास होतो. तसेंच रस्ता शेत म्हणून पेरूं नये किंवा शेत अगदीं रस्त्याकडे असूं नये; असलें तर शेतकऱ्याला त्रास होतो, शेताचे सभोवार असें कुंपण करावें की उंट, घोडा, गाय वगैरे जनावरें त्यावरून शेतांत येऊं शकूं नयेत. तसेंच तें कुंपण डुकरांना मोडून टाकतां येऊं नये. हरणें वगैरेंनी त्रास देऊं नये म्हणून शेतांत फांस वगैरे ठेवावे. त्याचप्रमाणे राजाचे अधिकारी अगर चोर यांपासून शेतांतील पिकाला त्रास होऊं नये असा बंदोबस्त ठेवावा. हलकी नाही अशी, चांगली मऊ, फुटीर नव्हे अशी, जिला पाणी लागू शकेल अशी. व जींत पाणी ठरतें व मुरतें अशी, धरणी (पिकणारी) जमीन पेरावी. तसेंच जमीत पाण्याच्या जवळची पेरावी म्हणजे पावसानें ताण दिल्यास पाणी देतां येतें व नीं जमीन खोलगट असावी म्हणजे पाणी उभें रहातें व ओल टिकतें.

जमिनींत ओल मुरावी व ती टिकावी म्हणून ती भुसभुशीत असावी व तिज वर साय धरूं देऊं नये. पाऊस पडला की जमीन वखरीत जावी म्हणजे तिचा पृष्ठभाग खरबुडीत रहातो व मग तो फार तापत नाही व पाणी वाळूं देत नाही. जमिनींत लहान लहान गोटे असले तर चांगले. हे गोटे नांगराला नडतील असे मोठे नसावेत, म्हणजे त्यांच्या खालचें पाणी लवकर वाळत नाही व या पाण्याचा पिकाला फार उपयोग असतो. यावरून म्हण पडली आहे की "जमीन असावी धोंडाळ, बायको असावी तोंडाळ व कणीस असावें गोंडाळ" म्हणजे त्रास होत नाहीं. वखरलेल्या जमिनविर जें पाणी पडेल तें आंत मुरतें व ऊन आणि वारा यांच्यायोगाने तें लवकर वाळत नाही. यासाठी शेत वरचेवर वखरीत जावें.

शारद्यमुञ्चके भूमौ कंग्वाद्यं वापयेद् झलीन् (?) ॥
अधित्यकासु कार्पासं वदंत्यत्र च हैमजं ॥
वासंतं ग्रीष्मकालीनं वाप्यं स्निग्धेषु तद्विदा ॥
केदारेषु तथा शालीर्जलोपांतेषु चेक्षवः ॥
मूलवृन्ताकशाकादिकंदकानि जलांतिके ॥
मिश्रेऽतिवृष्टिपानीयक्षेत्रेष्वेव यवादिकं ॥
गोधूमांश्च मसूराश्च खल्वाः खलकुशास्तथा ॥
समभूमिषु तु वाप्या धान्यान्यन्यानि योगतः ॥
कुलत्था मुद्गमाषाश्च राजमाषादिकास्तथा ॥
वाप्या भूमिविशेषेषु भूमिजीवं विजानता ॥
तिला बहुविधा वाप्या अतसीशणमेव च ॥
मृदंबुयोगतः सर्वं वापयेत्कृषिकृन्नरः ॥

डोंगराच्या पायथ्याच्या जमिनींत पावसाळीं ( शारद्य, खरीफ ) पीक पेरावें. दलदलीच्या जागीं तांदूळ, नाचण्या, कांदे पेरावेत. डोंगरपठारावर कापूस वगैरे कमी पाणी लागणारीं पिकें पेरावींत व येथेच हिंवाळी ( हैमज, रब्बी, शिआळू ) पिकें पेरावींत. उन्हाळी (वासंत) पिकें, स्निग्ध (न फुटणाऱ्या) जमिनींत लावावीं. केदार ( ताली घातलेलें शेत, चारी बाजूंनी वरंबे घातलेलें शेत ) यांत साळी पेराव्यात. ऊस जेथे पाणी पुष्कळ आहे तेथे पेरावा. मुळे, कांदे, वगैरे भाज्या व माळवें हें पाण्याजवळ लावावें. ( मळ ज्या शेतांत पडतो त्या शेताला मळा म्हणतात. मळा म्हणजे खतावलेली जमीन. हींत माळवें लावावें). जेथे पाऊस फार, पाणी जास्त व जमीन मिसळ तेथे सातु, जवस वगैरे धान्यें पाऊस संपल्यावर पेरावींत. गहूं, मसूर, हरबरे, वाटाणे हीं धान्यें सातु वगैरेंच्या ठिकाणींच पेरावींत. इतर धान्यें सम ( सारख्या ) जमिनींत त्यांची त्यांची योग्यता पाहून पेरावींत. ज्या जमिनींत पाऊस, किंवा दुसरी कोणतीही गोष्ट फार नाही अशी साधारण जमीन होय. ज्याला जमिनीचा मगदूर कळतो अशा शेतकऱ्याने कुळीथ, मूग, उडीद, मटक्या वगैरे धान्यें त्यांना योग्य अशा विशिष्ट जमिनींत पेरावींत. या झाडांना पाऊस पाहिजे, परंतु पाणी साचूं नये; तें वरचेवर निचरून जावें अशी जमीन लागते. नानाप्रकारचे म्हणजे काळे, पांढरे, कारळे वगैरे तीळ, सण, ताग, आंबाडी, जवस वगैरे धान्यें विशेष प्रकारच्या जमिनींत विशेष उद्देशाने लावावींत. शेती करणाराने जमिनीची जात व गूण व पाण्याचा हंगाम व पुरवठा यांचा विचार करून जिन्नस पेरावे. एका शेतांत नेहमी एकाच प्रकारचें पीक केलें तर तींतील विशिष्ट द्रव्यें मात्र वापरलीं जाऊन त्या बाबींत ती जमीन निकस होते. यासाठी पिकें पाळीपाळीने बदलीत जावींत. एकदल धान्यानंतर द्विदल धान्य, उथळ मुळांच्या धान्यानंतर खोल मुळांचीं धान्यें, पुष्कळ पाणी लागणाऱ्या धान्यानंतर कमी पाणी लागणारीं धान्यें, खत पाहिजे असणाऱ्या पिकानंतर खताची

जरूर नसणारी पिकें, असे बदल करावेत म्हणजे जमीन सारखी खपत जाते व एकाच प्रकारचीं द्रव्यें फार खपून जात नाहीत. धान्य पेरतांना सुद्धा दहा वीस रांगा एका जातीच्या तर पांच सात दुसऱ्या जातीच्या अशा पेराव्यात. या दुसऱ्या प्रकाराला थड म्हणतात. रोगसंबंध आला, किंवा हवेंत एकदम बदल झाला तर त्याची बाधा एका पिकाला होते परंतु दुसऱ्या पिकास होत नाही व यामुळे सर्वस्व-नाश होत नाही. रोगांची बाधा तर थड पिकापर्यंतच होते व थांबते आणि पलीकडील पीक तसेंच रहातें.

जमिनीला खत देतांनासुद्धा जमिनींत कोणतीं द्रव्यें किती आहेत व पिकाला कोणतीं द्रव्यें किती लागतील हें पाहून कमी असलेल्या द्रव्यांची उणीव भरून निघेल अशा बेताने ती द्यावी. यासाठी शेतकऱ्याला कोणत्या धान्यांत कोणतीं द्रव्यें आहेत, कोणत्या जमिनींत कोणतीं द्रव्यें आहेत व झाडांना कोणतीं द्रव्यें कोणत्या परि-स्थितींत घेतां येतात हें ठाऊक पाहिजे. विशिष्ट पिकांना विशिष्ट प्रकारचींच खतें लागतात व त्यासाठी त्या पिकांपूर्वी शेतांत विशिष्ट जनावरें अगर पांखरें बसतील, रहातील, हगतील व खत पुरवितील अशी व्यवस्था करावी लागते. कित्येक वेळां खतासाठीच विशिष्ट वनस्पतीची लागवड करून तें पीक बरेंच आलें म्हणजे मोडून त्याचा खतासारखा उपयोग करण्यांत येतो. झाडांचा हिरवा पाला, वाळलेलीं व नंतर कुजलेलीं पानें यापेक्षा जास्त हितकर असतो व यासाठी या कच्च्या पिकाचा चांगला उपयोग होतो.

सम्यक्कृष्टे समे क्षेत्रे माषानुप्त्वा तिलांस्तथा ॥
सुनिष्पन्नानपनयेत्तत्र बीजोप्तिरिष्यते ॥
अथर्तुपक्वात्फलतोवशोषितान् विकृष्य बीजान्पयसा निषिच्य ॥
विशोषितान् पंच दिनानि सर्पिषा विडंगमिश्रेण च धूपये ततः ॥
क्षीरनिषिक्तं बीजं बृहतीतिलभस्मसर्पिषा लिप्तं ॥
गोमयमृदितमथोप्तं सद्यो जायेत धूपितं वसया ॥
पयसि निषिक्तं बीजं गोमयपरिमर्दितं विशोष्य ततः ॥
माक्षिकविडंगचूर्णे बहुशो मृदितं प्रजायेत ॥
जंबूपनसचूतानां सरलं लकुचस्य च ॥
क्षीरसिक्तं वपेद्बीजं घृतगोविड्विडंगवत् ॥

जमीन सपाट असून ती सारखी नांगरून वखरून काढल्यावर तींत उडीद किंवा तीळ पेरावेत व ते बरे आले म्हणजे तें पीक मोडावें व त्यांत धान्य पेरावें. असें करण्याने हरळी, कुंदा वगैरेंचें बीं बूड होतें व पिकाला हिरवें खत मिळतें. योग्य ऋतूंत झाडावर पिकलेल्या फळांतून बिया काढून त्या चांगल्या वाळवाव्यात, मग त्या बिया दुधांत भिजवून पांच दिवस वाळवाव्या व त्यांना चरबी व वावडिंग यांचें मिश्रण जाळून धूप द्यावा. याच्यायोगाने बियांतील व बाहेरील कीड मरते. हें काम हल्लीं

मोरचुताने करतात. दुधांत भिजविलेलें बी डोरलें, तीळ, राख व लोणी यांच्या मिश्रणाने चोपडावें व मग शेणखतांत माती घालून त्यांत लावावें म्हणजे तें तत्काळ उगवतें. त्याला चरबीचा धूप दिलेला असावा. दुधांत भिजविलेलें बी शेणाने सारवावें व वाळवावें. माक्षिक ( लोखंडाचा गंज ) व वावडिंग यांचा लेप दिला असतां त्याला पुष्कळ पानें व फळें येतात. जांभूळ, फणस, आंबा, सरल, व लिंबू यांचें बीज दुधांत भिजवून लावावें. लावण्यापूर्वी त्याला तूप, गाईचें शेण व वावडिंग यांच्या मिश्रणाचा हात द्यावा. वावडिंग ही जिन्नस सर्व प्रकारचे जंतु नाहीसे करणारी आहे व यासाठी शेतींत याचा फार उपयोग होतो.

जांगलानूपसामान्यस्वभावापि च मेदिनी ।
भेदैः सा भिद्यते षड्भिः वर्णतो रसतस्तथा ॥
विषपाषाणवल्मीकबिलदुष्टास्त्थोषिरा ।
दूरोदका शर्करिला तरुभ्यो न हिता मही ॥
इंद्रनीलशुकपक्षकोमला शङ्खकुन्दकुमुदेन्दुसंनिभा ।
तप्तकाञ्चनविकासिचंपकस्पर्धिनी वसुमती प्रशस्यते ॥
समा समासन्नजला हरित्तरुतृणांकुरा ।
तस्यां सर्वे यथायोग्यं प्ररोहंति महीरुहः ॥
न जांगला न चानूपा भूमिः साधारणा शुभा ।
पनसलकुचतालीवंशजंबीरजंबु-
तिलकवटकदंबाम्रातखर्जूरपूगाः ।
कदलितिनिशमृद्वीकेतकीनालिकेर- ।
प्रभृतय इति चान्ये प्रायशोनूपजाः स्युः ॥
बीजपूरकपुन्नागचंपकाम्रातिमुक्तकाः ।
प्रियंगुदाडिमाद्याश्च साधारणसमुद्भववाः ॥

मेदिनी ( पीक देण्यालायक जमीन ) ही स्वभावाने तीन प्रकारची आहे. ते प्रकार म्हणजे जांगल, अनूप व साधारण हे होत. या जमीनींचे फिरून रंगावरून व रसावरून सहा सहा प्रकार होतात. निरनिराळ्या रंगांच्या जमीनिवर सूर्यकिरणांचा निरनिराळा परिणाम होतो व निरनिराळ्या रसांच्या जमीनींत भिन्न भिन्न क्षार असतात यामुळे या जमिनींचा झाडांवर भिन्न भिन्न परिणाम होतो. झाडांची वाढ मुख्यतः त्यांना जमिनींतून मिळणारे पोषण ( जमिनींतील रस ) व सूर्यकिरणांमुळे होणारें रसांचें शोषण या दोन गोष्टींवर अवलंबून असते व म्हणून जमिनीचा रंग व रस यांचा विशेष विचार करावा लागतो. विशिष्ट प्रदेशांत विशिष्ट झाडेंच होतात, चांगलीं वाढतात व फळें देतात याचें कारण त्या जमिनीची रचना, हवा पाण्याची परिस्थिति व रंग आणि सूर्यप्रकाश ह्यांची भिन्नता हेंच होय. ज्या जमिनींत घातक क्षार आहेत, कठीण खडक आहेत, वारुळें वाळवीसारखे जीव आहेत, उंदीर,

ससे वगैरेंचीं बिळें आहेत, मिठासारखे खार आहेत, जींत पाणी लागत नाही, जी वाळूने भरलेली आहे, अशी जमीन झाडांना चांगली नाही. पोपटाच्या अगदी लहानपणच्या हिरव्या गार पंखाप्रमाणे कोंवळी, शंख, कुंद, कुमुद, चंद्र याप्रमाणे स्वच्छ, रंगाची ( पिवळट पांढऱ्या रंगाची ), जिच्यापुढे तापविलेल्या सोन्यासारखी चंपकपुष्पें फिक्कीं पडतात अशी म्हणजे हिरव्या रंगाची, किंवा पिवळट पांढऱ्या रंगाची किंवा सोन्यासारखी पिंवळ्या रंगाची जमीन शेतीला चांगली. सारखी सपाट, जिच्यांत पाणी जवळ लागतें ती, हिरव्या गार रंगाचीं झाडें व गवत जीवर येते अशी जमीन सर्व प्रकारच्या झाडांना उत्तम मानवते. जी जमीन जांगल नाही, तशीच अनूप नाही ती साधारण जमीन होय. ही साधारणपणें बरी असते.

फणस, लिंबें, ताल, बांबू, पेरू, जांभूळ, तिलक, वड, कदंब, आंबा, खजूर, सुपारी, केळी, तिवस, द्राक्षें, केवडा, नारळी, या जातींचीं झाडें अनूप जमिनीवर लावण्यास योग्य होत.

महाळुंग, उंडण, चंपक, आंबा, रायनेवाळी, प्रियंगु ( गहुला ), डाळिंब, हीं झाडें साधारण जमिनींत उत्तम होतात.

निधिदेवमहीपानां प्रभावाच्चातियत्नतः ॥
असात्म्यभूमिसंपन्ना अपि सिद्ध्यंति पादपाः ॥

पैसे, परमेश्वरी कृपा किंवा राजाचा जोर यामुळे अतीशय प्रयत्न केल्यावर वाटेल तें झाड वाटेल तेथे येईल. परंतु तो अपवाद होय. साधारणपणें जेथे जें झाड होईल असें दिसतें त्याच ठिकाणीं तें झाड लावावें म्हणजे थोड्या प्रयत्नाने यश येतें व कल्याण होतें.

हस्तप्रमाणान्पयसा सुसिक्तान् संक्रामयेन्मूलवतः समृत्कान् ॥
सर्पिर्मधुक्षीरविडंगलिप्तान् बिले निदध्याच्च करीषयुक्ते ॥
अवालुकाश्लक्ष्णमृदा पूरिते गर्तशोधिते ॥
कोदंडार्धमिते खाते जलसिक्ते वपेत्तरुं ॥
कदलीक्षीरिणौ रोप्यौ मूले दत्वा च गोमयं ॥
रंभायाः सुपरिणतैः फलैर्विलिप्तां संशुष्कांभुवि निहितां पलालरज्जुं ।
शुद्धायामुपरि तृणेन गाढगुप्तां आसिंचेदबहुजलैर्बहून्यहानि ॥
सा रज्जुस्तदनु तमालनीलभासो बिभ्राणानरुणरुचोंकुरान्प्रसूते ।
भूयस्तानुपचितपत्रकांडमूलान् आरोप्य प्रथितविधानतो निषिंचेत् ॥

झाडांचीं रोपें हातभर उंचीचीं झालीं म्हणजे त्यांना एके दिवशीं पोटभर पाणी द्यावें व मुळें व मातीसकट काढून लोणी, मध, दूध व वावडिंगें यांच्या मिश्रणाने सारवावीं व खत घातलेल्या खड्यांत तीं लावावीं. झाडांचें रोप असेल तर तें दोन हात खोल खड्यांत वाळू नसलेली मऊ माती भरावी व ती पाण्याने चांगली भिजवून मग त्या खड्यांत मोठ्या झाडांचें रोप लावावें. केळ व खिरणी यांचें रोप

लावतांना त्यांच्या बुडांत शेण घालावें. चवेणीच्या मुळ्यांची एक दोरी वळावी व तिला पिकलेल्या केळ्यांचा गीर चांगला चोपडावा व ती दोरी जमिनींत पुरून पुष्कळ दिवस तिला थोडें थोडें पाणी द्यावें म्हणजे तिला तांबडे लाल कोंब फुटतात. हे कोंब पुढे केळीच्या झाडांसारखे रांगांनी लावावे म्हणजे यांना फार उत्तम व बी नसलेलीं केळीं येतात.

आषाढे श्रावणे मासे बीजावपनरोपणे ॥
ग्रीष्मादन्यत्र वल्लीनां बुधा इच्छंति रोपणं ॥

आषाढ व श्रावण हे महिने बी पेरण्यास व झाडें लावण्यास उत्तम होत. वेली लावणें असल्या तर ग्रीष्म ऋतूशिवाय इतर ऋतूंत त्यांचें रोप तयार करून तें काढून लावावें. रोप काढून लावण्याने मुळें पुष्कळ फुटतात व तीं फार खोल जात नाहीत. मुळांचीं टोंकें रोप काढतांना तुटल्यामुळे त्यांना फाटे जास्त फुटतात. व त्यांची चांगली वाढ होते. झाडें सुद्धा थोडीं वाढलीं म्हणजे त्यांचा शेंडा खुडावा म्हणजे त्याना फांद्या जास्त फुटतात व तीं उंच वाढत नाहीत. हरबरा, करडई वगैरे झाडांची भाजी काढण्यांत पुष्कळ फांद्या फुटून झाड फार उंच होऊं नये असाच उद्देश असतो.

पाटला दाडिमी प्लक्षकरवीरवटादयः ॥
मल्लिकोदुंबरः कुंदो बीजकांडोद्भवा मताः ॥
कुंकुमार्दरसोनालुकंदाः कंदसमुद्भवाः ॥
एलापद्मोत्पलादीनि बीजकंदोद्भवानि च ॥
तांबूली तगराद्याश्च सिंदुवारश्च कांडजाः ॥

पाडळी, डाळींब, पिंपळ, कण्हेर, वड, मालती, उंबर, कुंद हीं झाडें बियांपासून होतात व यांच्या फांद्याहि लागतात. हळद, आलें, लसूण, आळूं हीं झाडें कांद्यापासून उत्पन्न होतात. वेलदोडा, कमळ, उत्पल वगैरे झाडें बीं व कांदे यांच्यापासून उत्पन्न होतात. पानवेल, तगर, श्वेत निर्गुंडी वगैरे झाडें केवळ तुकड्यांपासूनच होतात. निरनिराळ्या झाडांचे निराळे भागच लावावे लागतात. कांही झाडांना फळेंच येत नाहीत; त्यांचे तुकडेच लावले पाहिजेत; उदाहरणार्थ जाई, जुई, मोगरा, रताळीं, ऊंस. कांहींचें बीच लावावें लागतें कारण त्यांना फांद्याच नसतात. उदाहरणार्थ नारळ, पोफळ, जोंधळा, बाजरी यांना फांद्या फुटतात, परंतु त्या लागत नाहीत. हीच स्थिति तांदूळ, गहू या झाडांची आहे. कांहींच्या फांद्या लागतात त्याचप्रमाणे बीही लागतें; उदाहरणार्थ आंबा, लिंबु, संत्रें, डाळिंब. कांहींचे नुसते डोळे लागतात; उदाहरणार्थ गुलाब, बटाटा. याप्रमाणे निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळीं झाडें वाढत असल्यामुळे त्यांची लागवड निरनिराळ्या प्रकारें करावी लागते, परंतु साधारणपणें असा नियम करतां येईल की योग्य जोपासना केली तर सर्व झाडांच्या फांद्या लागू शकतील. या फांद्यांना कलमें असें म्हणतात. या संबंधाची

सविस्तर माहिती पुढे 'वृक्षारोपण' या सदरांत दिली आहे.

सांद्ररोपणमवृद्धिकारणं वातभीतिरतिदूररोपणाद् ।
भिन्नवर्गरचनाल्पपीडना नैव युक्तिरितरा प्रशस्यते ॥

ओल्यांत रोपें लावणें व तीं दाट लावणें यांच्यायोगानें तीं वाढत नाहीत. जर लांब लांब अंतरावर लावलीं तर तीं वाऱ्याने पडतात. वाऱ्याशीं टक्कर देण्यासाठी झाडांची जूट पाहिजे. या जुटीला 'राई' असें म्हणतात. भिन्नवर्गांचीं झाडें मिसळून लावलीं तर त्यांना रोगराई होण्याचें भय नसतें. एका जातीच्या झाडाच्या योगानें दुसऱ्या जातीच्या झाडावर पडलेल्या रोगाला प्रतिबंध होतो. निरनिराळे हवापाण्यांत फेरफार एकाएकी झालें तर झाडें मरत नाहीत. उदाहरणार्थ, गारा फार पडल्या तर इतर झाडें गारठून वठतात व मरतात, परंतु याच गारठण्याने गुलाबाला जास्त बहार येतो. हिमालयांत गुलाबाचीं बनें मैलचे मैल पसरलेलीं दिसतात याचें कारण हेंच. याशिवाय सर्व झाडें उत्तम प्रकारें येण्याची दुसरी युक्ति नाही. तात्पर्य, झाडें फार दाट आगर फार पातळ नसावीं. साधारणपणें एका झाडाच्या फांद्या दुसऱ्या झाडाच्या फांद्यांना स्पर्श मात्र कराव्या इतक्या अंतरावर झाडें असावीं. त्यांच्या निरनिराळ्या रांगा असाव्या परंतु एकाच प्रकारच्या झाडांच्या दोन रांगांमध्ये दुसऱ्या प्रकारची झाडांची राई असावी.

अंतःसार झाडें राईंत आंत लावावीं व बहिःसार झाडें बाहेरून लावावीं. शेतांत झाडांची रांग लावणें तर ती पूर्वपश्चिम असावी म्हणजे झाडाच्या सावलीने शेत फार खराब होत नाही. एका झाडाची सावली दुसऱ्या झाडावरच पडते. झाडांच्या अशा दोन रांगांमध्ये जवस, कॉफी वगैरे सांवलींत होणारीं झाडें लावावीं. शेतांत जमीन वाया घालविणें बरें नाही. सगळ्या जागेचा पूर्ण उपभोग मिळाला पाहिजे. या बेताने लागण करावी. जोंधळा व तूर किंवा करडई एकत्र पेरतात यांत हाच उद्देश असतो. जोंधळे भराभर वाढतात व करडईच्या किंवा तुरीच्या झाडांपेक्षा उंच जातात व पीक येऊन मरतात. हें पीक काढलें की त्यांची जागा मोकळी होऊन तूर किंवा करडईला वाढण्यास उपयोगी पडते. शिवाय जोंधळा एकदल असून करडई किंवा तूर द्विदल आहे. यामुळे यांची रचना निराळी, खाद्य निराळें असल्यामुळे त्यांची एकमेकांस अडचण होत नाही.

सर्वस्यापि नवोप्तस्य सायंप्रातर्निषेचनं ।
शीतातपसमीरेभ्यो रक्षेच्च सुविधानतः ॥
हेमंते शिशिरे देयं जलं एकांतरे दिने ।
वसंते प्रत्यहं ग्रीष्मे सायंप्रातर्निषेचनं ॥
वर्षासु च शरत्काले यदा वृष्टिर्न दृश्यते ।
तदा देयं जलं तज्ज्ञैः आलबाले महीरुहां ॥
वारिणा यावता यस्य मूले सौहित्यमिष्यते ।

तावत्तस्य तरोर्देयं किं घटार्थविवक्षया ॥
आलवाले स्थितं तोयं न शोषं भजते यदा ।
अजीर्णं तद्विजानीयाद् न देयं तादृशं जलं ॥
समीपजातं यत्नेन तृणगुल्मलतादिकं ।
स्फोटनीयं विधिज्ञेन द्रुमाणां वृद्धिमिच्छता ॥

सगळ्या नवीन लावलेल्या झाडांना सकाळसंध्याकाळ पाणी द्यावें व त्यांचें थंडी, उन्ह व वारा यांपासून योग्य रीतीने संरक्षण करावें. झाडांना उन्ह पाहिजे परंतु त्यांना करपविणारें उन्ह नको, झाडांना थंडी पाहिजे परंतु त्याचा रस गोठेल अशी थंडी नको, झाडांना वारा खेळता पाहिजे परंतु त्यांच्या फांद्या मोडतील इतका मोठा वारा नको. वारा फार लागत असला तर झाडांभोंवती कणगी घालाव्या म्हणजे त्यांना वाऱ्यापासून त्रास होत नाही. झाडांना फार उन्ह लागत असलें तर त्यावर सावली करावी. झाडांना फार थंडी लागत असली तर त्यांच्याभोंवती भात्याण गवत घालावें किंवा झाडांवर कांचेचें छप्पर करावें.

हेमंत व शिशिर ऋतूंत लहान झाडांना एकदिवसाआड पाणी द्यावें. वसंत ऋतूंत दररोज पाणी द्यावें; ग्रीष्मऋतूंत दिवसांतून दोनदा म्हणजे सकाळीं थंड वेळीं पाणी द्यावें. दुपारीं भर उन्हांत पाणी देऊं नये. दुपारीं पाणी दिल्यानें झाडांचीं मुळें शिजून निघतात. वर्षा व शरद् या ऋतूंत जेव्हा पाऊस बराच उघडला असेल तेव्हा त्यांना पाणी द्यावें. हें पाणी झाड कुंड्यांत आहे तोंवर व जमीनींत लावल्यावर आळें करून त्यांत द्यावें. जितकें पाणी झाडाला मानवेल तितकेंच तें द्यावें. यांत अमुक घागरी पाणी द्यावें असा निर्बंध घालतां येणार नाही. तथापि जेव्हां झाडाच्या बुडांतील पाणी वाळत नाही तेव्हा त्याला अजीर्ण होईल असें समजावें व इतकें पाणी देऊं नये. तात्पर्य, रोज झाडाचें बूड कोरडें झालें पाहिजे या बेताने पाणी द्यावें. झाडाच्या बुडांत उगवलेलें गवत वगैरे नेहमी खुरपून काढीत जावें. या योगानें झाडाचें खत व पाणी दुसरीं वायफळ झाडें खात नाहीत. हें गवत कुजवावें म्हणजे झाडालाच तें खत उपयोगीं पडतें. झाडाला प्राण्यांचें मांस, चरबी वगैरेंचें खत, झाडांना झाडांचीं पानें वगैरे कुजविलेलें खत व झाडांना लोखंडाचा गंज, मीठ वगैरे खनिज खत अशीं तिन्ही प्रकारचीं खतें पाहिजेत व मानवतात. झाडें मातींतील क्षार, बुडांत घातलेलें पाणी व हवेंतील हारिमाण Carbonic Acid वायु व सूर्यप्रकाश यांवर आपला चरितार्थ चालवितात.

नीहाराच्चंडवाताच्च धूमाद्वैश्वानरात्तथा ।
जालकारात्प्रयत्नेन रक्षणीया महीरुहाः ॥
पंक्तिमध्ये तु सुफला बाह्ये तत्परतोऽपरे ।
वृक्षाः कार्या युता वृत्या सा चापि परिखावृता ॥

विद्युता हतवृक्षस्य भूतिमादाय सर्वतः ।
रक्षार्थं विकिरेदेषां तया न हिमबाधनं ॥
दीप्तोप्यग्निः शमं याति वज्रदग्धद्रुभस्मना ।
सितशाल्योदनं दध्ना सैंधवेन युतं वने ॥
क्षेपणीयं च परतो गराणां वृष्टिवारणं ।
शलभाखुपतंगानां पिपीलीकाभये सति ॥
कार्पाससारं निर्मोकं सर्पस्य च समाहरेत् ।
न सर्पास्तत्र तिष्ठंति धूमो यत्रैष तिष्ठति ॥

झाडांना गारा व बर्फापासून, तुफान वाऱ्यापासून, धूर व वणव्यापासून आणि गारोड्यापासून भय असतें. व या भयांपासून झाडांचें संरक्षण करावें लागतें. फळें येणारीं झाडें मध्ये लावावीत व फळें न येणारीं झाडें बाहेरून लावावीं. झाडांच्या सभोंवार कुंपण असून कुंपणाभोंवती खंदकासारखा चर असावा. विजेने जळून गेलेल्या झाडाची राख घेऊन ती चोहोंकडे टाकावी. या राखेने झाडांना थंडीची बाधा होत नाही. या राखेच्या पलीकडे वणवा सुद्धा जात नाही. पांढऱ्या तांदळांचा भात, दही व सैंधव घालून चोहो-कडे फेकावा म्हणजे गारांचें भय नसतें. पानमळेवाल्यांना गारांपासून फार भय असतें व गारा पडूं नयेत म्हणून ते हा तोडगा ( उपाय ) करीत असतात. टोळ, उंदीर, पतंग ( पांखरें ), मुंग्या ( वाळवी ) यांच्यावर सुद्धा हा उपाय चालतो. सापाची कात घेऊन तींत कापूस भरावा व ती पेटवून द्यावी म्हणजे त्या वासाने व धुराने साप त्या जागीं रहात नाहीत. सापांना वेखंडाचाही वास सोसत नाही. वेखंड हे सुद्धा सापांना घालवून टाकण्याच्या कामीं उपयोगी आहे.

अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः शलभाः शुकाः ।
स्वसैन्यं परसैन्यं च सप्तैता ईतयः स्मृताः ॥

दैवान्यष्टौ महाभयानि—अग्नि, उदकं, व्याधिः दुर्भिक्षं मूषका व्यालाः सर्पाः रक्षांसीति । तेभ्यो जनपदं रक्षेत राजा ।

अतीशय पाऊस पडणें, पाऊस मुळींच अगर फार कमी पडणें, उंदीर होणें, टोळ होणें, पाखरें ( पोपट ) होणें, आपल्या लष्कराने लुटणें व शत्रूच्या लष्कराने लुटणें, अशीं सात संकटें शेतीवर येत असतात.

देशावर आठ महासंकटें येत असतात : ( १ ) आग ( २ ) पूर ( ३ ) रोग ( ४ ) दुष्काळ ( पाऊस फार अगर अगदी कमी ) ( ५ ) उंदीर ( ६ ) हिंस्र पशु ( ७ ) साप व ( ८ ) राक्षस ( दुष्ट लोक ); यांपासून देशाचें रक्षण राजाने केलें पाहिजे तें असें:-

१ अतिवृष्टि—पाऊस फार झाला तर जागोजाग पाणी काढून द्यावें, वसती करणें ती पुरापेक्षा उंच करवावी, व नावा, तराफे वगैरेंनी लोकांना वाचवावें.

अनावृष्टि — पाऊस फार कमी पडला तर जागोजाग तलाव बांधून त्यांत

पाणी सांठेल असें करावें. परदेशांतून धान्य वगैरे स्वदेशांत आणावें व स्वदेशांतील लोकांना परदेशांत पोट भरण्यास जाण्यास सवलती द्याव्या.

३ उंदीर—उंदीर झाले तर शेतांत मांजरें मुंगसें सोडावीं. माणसांनी उंदीर मारावे. शेराचा चीक लावलेलें धान्य शेतांत टाकावें. पिठांत सोमल कालवून गोळ्या करून टाकाव्या.

४ व ५ टोळ—टोळांना हाच उपाय व पांखरें फार झालीं तर त्यावरही हाच उपाय करावा.

६ स्वचक्र—आपल्या सैन्याला ताकीद देऊन कडक शिक्षा करावी.

७ परचक्र—शत्रूला पायबंद द्यावा व जेर करावा.

१ आग—आग पसरूं नये म्हणून शेजारचीं घरें पाडावीं. आग विझविण्यासाठी पाणी किंवा माती यांचा उपयोग करावा. आग विझविणारे लोकांना जलचामर Asbestos चे कपडे द्यावे व माल व माणसें वाचविण्यास मदत करावी.

२ पूर—अतिवृष्टींत याचें विवेचन आलें.

३ दुर्भिक्ष—अनावृष्टींत याचें विवेचन येऊन गेलें.

४ उंदीर—वर यांबद्दल सांगितलें.

५ हिंस्र पशु—शिकारी माणसें घेऊन यांचा संहार करावा. जाळीं, पिंजरे, खड्डे, वगैरेचा उपयोग करावा.

६ सर्प—गारोडी, मंत्री, वैद्य जागोजाग पाठवावे.

७ व्याधि—औषधें घेऊन वैद्य व शांति व भजन करीत तापस यांनी गांवांत फिरावें व लोकांना औषधें व धीर द्यावा.

८ राक्षस—लोकांनी टोळ्या करून सर्वत्र सशस्त्र फिरावें. सांपडतील त्यांना कैद किंवा ठार करावें. ज्यांना पीडा झाली असेल त्यांना सर्व प्रकारें मदत करावी.

मायायोगविदस्तस्माद्विषये सिद्धतापसाः ।
वसेयुः पूजिता राज्ञा दैवापत्प्रतिकारिणः ॥

दैवाने येणाऱ्या संकटांचा प्रतिकार करण्यास समर्थ असे विद्वान राजाने पदरीं बाळगावे व यांनी असल्या संकट प्रसंगीं काय करावें याचा नेहमीं विचारप्रयोग करीत असावे. Medical Research वगैरे संस्था अशाच कामासाठी असतात. शक्य तर पुढे येणाऱ्या संकटांची लोकांना आगाऊ सूचना मिळावी. राजाला सुद्धा आगाऊ बंदोबस्ताची तयारी करतां यावी, निदान पुढील प्रसंगासाठी उपाययोजना सिद्ध ठेवतां यावी. यासाठी हा वार्षिक खर्च सर्व राजसंस्था करीत असतात. सुख वाढविणें व दुःख कमी करणें असे दोन्ही प्रकारचे उपाय माणसांनी नेहमीं आचरीत असावे.

## वृक्षरोगचिकित्सा.

कीटजग्धेऽग्निसंप्लुष्टे वातभग्नेऽशनिक्षते ।
वृक्षे छेदोपतापादिपीडिते च पृथक् क्रिया ॥

झाड जर किड्यांनी खाल्लें, आगीने होरपळलें, वाऱ्याने मोडलें, विजेने तपाटलें किंवा त्याला कोणी घाव करून त्रास दिला तर या प्रत्येक दुखण्यांत त्याला निराळें औषध वगैरे उपाय करावे लागतात.

कृशो दीर्घो लघू रुक्षो निद्राहीनोऽल्पचेतनः ।
न धत्ते फलपुष्पाणि वातप्रकृतिकस्तरुः ॥
आतपासहनः पांडुः शाखाहीनो मृदुर्यदि ।
अकालफलवाकी च शाखी पित्तात्मकः कृशः ॥
स्निग्धशाखादलः शाखी सम्यक्पुष्पफलान्वितः ।
लतापरीतगात्रस्तु कफप्रकृतिजस्तरुः ॥

माणसांना ज्याप्रमाणे वात, पित्त व कफ हे त्रिदोष आहेत त्याप्रमाणे ते सर्व साशन पदार्थांना आहेत. येथे तूर्त झाडांच्या त्रिदोषांचा विचार केला आहे.

१ रोड, उंच, हलका, रुक्ष, झोप न घेणारा, थोडी चेतना असलेला व फलपुष्पें कमी असणारा वृक्ष वातप्रकृति आहे असें समजावें.

२ ज्याला उन्ह सोसत नाही, पांढरा झालेला, फांद्या नसलेला, मलूल, भलत्याच वेळीं फळें येऊन तीं पिकतात असा वृक्ष हा पित्तप्रकृति समजावा.

३ ज्याच्या खांद्या व पानें चिवट आहेत, फळफुलें रगड येणारा, ज्यावर लता चढतात, असा वृक्ष कफप्रकृति समजावा.

कटुतिक्तकषायरसैः पवनः पित्तं कटूष्णलवणाम्लैः ।
स्निग्धमधुराम्ललवणैः श्लेष्मा कोपं प्रयाति तरोः ॥

वातप्रकृति झाडांना तिखट, कडू व तुरट हे रस सोसत नाहीत. तिखट, उष्ण, खारट व आंबट पित्तप्रकृति झाडाला मानवत नाहीत व तेलकट, मधुर, आंबट व खारट हे रस कफप्रकृति झाडाला सोसत नाहीत हें जाणून शहाण्यांनी खतांची योजना करावी.

सुस्निग्धैः पिशितरसैः प्रयाति वातः सुस्निग्धैर्मधुरहिमैर्जलैश्च पित्तं ।
कटुम्लैरहिमजलैः कषायरूक्षैः श्लेष्माणि क्रमविहितैः प्रयान्ति नाशं ॥

तेलकट मांसाच्या रसांनी वातरोग नाहीसा होतो; तेलकट व गोड अशा थंड पाण्याने पित्त शमतें; व तिखट, आंबट, तुरट अशा गरम पाण्याने कफ जातो. यासाठी हीं लक्षणें नीट तपासून त्याप्रमाणे उपाययोजना केली पाहिजे.

रौक्ष्यं ग्रंथिः कुटिलता वाताद्वृक्षस्य जायते ।
गोविड्लोध्रवसाकुणपजलैस्तज्जयो भवेद् ॥

दोषैर्यस्य विना प्रवालकुसुमम्लानिर्विरूढं वपुः ॥
मूले तस्य तरोर्भवंति कृमयो यत्नाच्च तानुद्धरेत् ॥
गोमूत्राज्यविडंगसर्षपतिलैर्लिप्तः प्रनष्टैस्ततः ।
सिक्तः क्षीरजलैरुदेति सहसा धूमैश्च धूपायितः ॥

ज्याला वात झाला आहे त्या झाडाला रुक्षपणा आलेला असतो, गाठी होतात व वाकडेपणा येतो, त्या झाडांत ताठ उभें रहाण्याइतकी शक्ति नसल्याने तें वाकत असतें. अशा झाडाला गाईचें शेण, लोध्र, चरबी व मांसाचें पाणी किंवा प्रेताचें रक्त घालावें म्हणजे हा वातरोग जातो.

कांहीही दृश्य दोष नसतांना ज्या झाडाचीं पानें फुलें म्लान सुरकुतलेलीं अशीं असतात त्या झाडाच्या बुडाशीं किडे लागले आहेत असें समजावें. याला गोमूत्र, तूप, वावडिंगें, मोहऱ्या व तीळ हे लावावे व बुडाशीं घालावे म्हणजे ते किडे मरतील व कीड मेल्यावर त्यास दूधपाणी मिसळून घालावें व पौष्टिक धूर द्यावा म्हणजे तें झाड हुशार होतें. नवीन येणारीं पानें, फुलें कोमेजलेलीं व सुरकुतलेलीं अशीं येत नाहीत असें दिसलें म्हणजे कीड मेली असें समजावें व मग त्या झाडाला पौष्टिक खुराक त्याच्या प्रकृतीप्रमाणे द्यावा.

## झाडांना खुराक.

सायंप्रातस्तु घर्मर्तौ शीतकाले दिनांतके ॥
वर्षारात्रौ भुवः शोषे सेक्तव्या रोपितद्रुमाः ॥
विडंगघृतपंकाक्तान् सेचयेत् शीतवारिणा ॥
फलनाशे कुलित्थैश्च माषैर्मुद्गैर्यवैस्तिलैः ॥
घृतशीतपयःसेकः फलपुष्पाय जायते ॥
आविकाजशकृच्चूर्णं यवचूर्णं तिलानि च ॥
गोमांसमुदकं चैव सप्तरात्रं निधापयेद् ॥
उत्सेकः सर्ववृक्षाणां फलपुष्पादिवृद्धिकृत् ॥
मत्स्यांमसश्च सेकेन वृद्धिर्भवति शाखिनः ॥
विडंगतंडुलोपेतं मत्स्यं मांसं च दोहदं ॥
सर्वेषामविशेषेण वृक्षाणां रोगनाशनं ॥

उन्हाळ्यांत झाडांना सकाळसंध्याकाळ पाणी घालावें. थंडीच्या दिवसांत एकदा संध्याकाळीं घालावें. पावसाळ्यांत जमीन कोरडी झाली म्हणजे रात्रीं घालावें. ज्यांना वावडिंग, तूप व माती चोपडली असतां त्यांना गार पाणी घालावें. तोंडलीं वगैरे वेलींना तेल व कोमट पाणी घालावें. झाडांना फळें येत नसतील अगर गळत असतील तर कुळीथ, उडीद, मूग, सातू, तीळ यांचें चूर्ण, तूप व गार पाणी द्यावें म्हणजे पुष्कळ फळें येतील. झाडाला पानें पुष्कळ यावींत असें वाटत असल्यास त्याच्या वरील फांद्या वेळोवेळीं तोडाव्या व फळें जास्त यावीं असें वाटत असेल तर त्याच्या

मुळ्या जमिनीजवळच्या तोडीत जाव्या. मेंढ्या, शेळ्या यांच्या लेंड्यांचें चूर्ण व सातु व तीळ यांचें चूर्ण व गाईगुरांचें मांस व रक्त या जिनसा सात दिवस रात्रीं खत म्हणून घालाव्या म्हणजे झाडांना फुलें फळें पुष्कळ येतात. माशांचें कूट व पाणी घातल्याने झाड चांगलें माजतें व त्याला पुष्कळ पानें येतात. मासे, मांस, वावडिंगें व तांदूळ या जिनसा सर्व झाडांना उत्तम होत व त्यांत विशेषतः फळायला झालेल्या झाडांना चांगल्या होत.

करंजारावधारिष्टसप्तपर्णत्वचाकृतः ॥
उपचारः कृमिहरो मूत्रमुस्तविडंगवान् ॥

करंज, थोरला बाहवा, अरिष्ट सातवण यांच्या सालीचा काढा करून त्यांत गोमूत्र, नागरमोथे व वावडिंगे घालावीं. हा काढा झाडांना पाजला असतां त्याला लागलेली कीड नाहींशी होते.

कुणपजलपयोनिषिक्तमूलः
सरसिजकंदविलिप्तसर्वगात्रः ।
तरुरनलहतो बिभर्ति भूयो
मरकतरंगहरिंति पल्लवानि ॥

मत्स्याचें रक्त किंवा मांसाचें पाणी व दूध हें झाडाच्या बुडाशीं घातलें व त्याच्या अंगाला कमळकंदाचा उगाळून लेप केला तर विस्तवाने हाळावलेलें झाड फिरून हिरवीगार पालवी धारण करते.

सुरभिसुमनोलब्धामोदां निधाय च मृत्तिकां
धवखदिरयोः क्वाथांभोभिः सुगंधिभिरुक्षणात् ।
मलयजरजोलेपाद् धूपाद्धृतस्य च भूरुहां
व्रजति कुसुमं निर्गंधानां अतीव सुगंधताम् ।

ज्या झाडाला सुंदर फुलें येतात परंतु त्यांना वास नसतो अशा झाडांना सुगंधी फुलांनी वास आणलेली माती घालावी. धावडा व खैर यांच्या काढ्याने शिंपणें केल्याने व चंदनाच्या चूर्णाने धूप दिला असतां त्या झाडाच्या फुलांना चांगला वास येतो.

खरतुरगविण्निवेशिततापितयायःशलाकया मूले ॥
तिर्यग्विद्धा कदली फलति फलं करिकराकारं ॥

गाढव व घोडा यांच्या लिंदीचा निखारा पाडावा व त्यांत एक लोखंडाची सळई लाल करावी. या सळईने केळीच्या मुळाला तिरपा डाग दिला तर त्या केळीला हत्तीच्या सोंडेसारखीं केळीं येतात. सामान्य केळीच्या झाडाला मोठमोठीं केळीं येण्यासाठी हा सोपा उपाय आहे.

प्राचीनामलकतरोः प्रिया हि माषाः ।
क्षीरांभो हितमिह बालतिंदुकानां ॥

प्रीयंते यवरजसा च नालिकेराः ।
सर्वेषां भवति रुचिर्हि निम्नभूमौ ॥

म्हाताऱ्या आवळ्याच्या झाडांना उडीद मानवतात, कोंवळ्या टेंभुरणीच्या झाडांना दूधपाणी चांगलें; नारळाच्या झाडाला सातूचें पीठ मिळालें म्हणजे आनंद होतो व खोलगट जमिनीची आवड सगळ्या झाडांनाच आहे.

यस्त्रिफलाशफरीघृतलिप्तो
धूपित आद्यफलत्रयधूपैः ।
आम्रफलैः सह दाडिमशाखी
तालफलानि विडंबयतीव ॥

जें डाळिंबाचें झाड व आंब्याचें झाड त्रिफळा व माशांचें तेल यांनी लिप्त ( सारविलेलें ) असून त्रिफळाच्या धुरानें धूप दिलेलें असेल त्याला ताडगोळ्यांपेक्षा मोठमोठीं फळें येतात.

सर्पिर्गुडक्षीरमधूपचारं
दत्वा निषिक्तौ च कपित्थबिल्वौ ।
पीयूषकल्पान्यतिमांसलानि
फलान्यनस्थीनि सदा दधाते ॥

लोणी, गूळ, दूध व मध यांचें मिश्रण कवठ व बेल या दोन झाडांना खतासारखें दिलें व हें मिश्रण या झाडांवर शिंपडलें तर या झाडांना अमृतासारखीं गोड, अतीशय मऊ व भरीव, व ज्यांत बिया किंवा रेषा वगैरे नाहीत अशीं फळें येतात.

बिनबियांचीं फळें म्हणजे नपुंसक फळें होत. हीं फळें दोन वर्गांचा संकर केला म्हणजे होतात. घोडा व गाढव यांचें जसें खेचर होतें तसेंच आंबा व फणस यांचे पराग एकमेकांत संकर केले तर बिनबियांचीं फळें येतात.

नखैर्विलिखने यस्याः पापमाहुर्मनीषिणः ।
तस्याः सीरविदारेण किं न पापं क्षितेर्भवेद् ॥
तृणैकच्छेदमात्रेण प्रोच्यते क्षयमायुषः ।
असंख्यकंदनिर्णाशाद् असंख्यातं भवेदघः ॥
वर्णानां च गृहस्थानां कृषिवृत्त्युपजीविनां ।
तदेनसो विशुद्ध्यर्थं धान्यभागः प्रदीयते ॥
ग्रामेशस्य नृपस्यापि वाणिजां कृषिकारुणां ॥
सस्यभागः प्रदातव्यो यतस्ते बलिभागिनः ॥
वयांसि चान्यसत्वानि क्षुत्तृष्णापीडिता जनाः ॥
उपयुंजंति सस्यानि क्षेत्री पापाद्विमुच्यते ॥

थोर महात्म्यांनी ज्या जमीनीवर नुसत्या नखाने रेघ ओढली तर पाप लागतें असें सांगितलें आहे, त्या जमिनीला नांगर, व खर यांनी ओरखडली तर किती पाप लागत असेल ? तसेंच गवताची एक काडी तोडली तर आयुष्य क्षीण होतें असें सांगतात मग ज्या शेतींत शेकडों गवतांचें बीबूड करण्यांत येतें व हजारों धान्यझाडें चरचरा कापण्यांत येतात तेथे किती आयुष्य जात असेल बरें? यासाठी चारी वर्णांच्या गृहस्थांनी—विशेषतः ज्यांचा शेतीवर निर्वाह चालतो त्यांनी—या पापराशींचा क्षय व्हावा म्हणून धान्याचा कांही भाग धर्मादाय देत जावा. गांवच्या मुख्याचा ( गांवपंचायतीचा ), राजाचा, व्यापाऱ्यांचा व शेतीच्या कामीं उपयोगी पडणाऱ्या कारागिरांचा भाग शेताच्या उत्पन्नांत आहे असें जें ठरविलें आहे तें हें जाण्यासाठीच आहे. लोकांचे आपल्यावर झालेले उपकार फेडणें हा मनुष्यमात्राचा धर्म आहे. व समाजाच्या उपकारासाठी पंचायत, राजव्यवस्थेच्या उपकारासाठी कर, व्यापारी वगैरें-च्या उपकारासाठी शिक्षण व कारागिर वगैरेंच्या उपयोगासाठी बलुतें असे उपकार-फेडींचे भाग धर्माने निश्चित करून दिलेले आहेत. शिवाय पांखरें दाणें खातात, गुरें वैरण खातात व इतरही जीव शेतांतील अन्न पाणी भूक तहान लागली असतां घेतात व या उपकारांमुळे सर्व शेती करतांना घडणारें पाप नाहीसें होतें.

राज्ञो दत्वा च षड्भागं देवानां चैकविंशकं ।
त्रयस्त्रिंशश्च विप्राणां कृषिकर्मा न लिप्यते ॥
प्रतिग्रहाच्चतुर्थांशं, वणिक्कार्याद् तृतीयकं ।
कृषितो विंशकं चैव ददतो नास्ति पातकं ॥

राजाला उत्पन्नाचा सहावा भाग, गांवपंचायत किंवा जात यांना दैव म्हणतात यांना एकविसावा भाग व ब्राह्मणांना तेहतिसावा भाग द्यावा म्हणजे शेतकरी सर्व ऋणांतून मुक्त होतो. दान मिळालेल्या जिनसांचा चौथा हिस्सा, व्यापारांत मिळालेल्या उत्पन्नाचा तिसरा हिस्सा व शेतींतला विसावा हिस्सा दिला म्हणजे त्या गोष्टींत कळून न कळून झालेलें पाप नाहींसें होतें.

अवस्त्रत्वं निरन्नत्वं कृषितो नैव जायते ॥
अनातिथ्यं च दुःस्थत्वं गोमतां न कदाचन ॥
निर्धनत्वं असत्यत्वं विद्यायुक्तस्य कचिद् ॥
अस्थानित्वं अभाष्यत्वं सुशीलस्य न कर्हिचिद् ॥

शेती करणाराला अन्न नाही किंवा वस्त्र नाही असें होणार नाही किंवा होऊं नये. इतर गोष्टी किंवा वस्तूंची त्याला वाण भासेल, परंतु अन्न व वस्त्र यांस तोटा नसावा. गाई पाळणाराला आदरातिथ्य करण्यांत व आरोग्य संभाळण्यांत कठीण पडूं नये. विद्या मिळविलेल्या माणसाला पैसे मिळण्यास अडचण नसावी व खोटें बोलावें लागूं नये. आणि सुशील माणसाला जागा नाही व कोणी बोलत नाही असें होऊं नये. तात्पर्य, हे गूण असणारांना हीं सुखें सहज प्राप्त व्हावीं असें शास्त्रकार

म्हणतात व तसें होत नसेल तर त्या वस्तु भ्रामक अगर खोट्या आहेत असें समजावें.

शेती ही दैवप्रधान आहे. माणसांनी कितीहि प्रयत्न केला तरी शेतींत कित्येक गोष्टी माणसांच्या आवाक्याबाहेर रहातात असा आपल्या हिंदु लोकांचा अनुभव आहे इतकेंच नव्हे तर अमेरिकेंत सुद्धा हाच अनुभव आहे. नळ्या लावून पावसाप्रमाणे वृष्टि केली, खतें घालून योग्य खुराक दिला, जाळ्या लावून पांखरें, पशु यांपासून बचाव केला तरी अज्ञात कारणाने पिकांत कमीपणा येतो असें अमेरिकेंत अनुभवास आलें आहे. यासाठी परमेश्वरावर भरंवसा टाकून शेती करावी असें हिंदु शास्त्रकार सांगतात.

शक्तिसूनोर्विना नाम्ना सीतायाः स्थापनं विना ॥
विनाभ्युक्षणरक्षाभ्यां सस्यं भक्षंति राक्षसाः ॥
वापने लवने मर्दे खले धान्यप्रवाहने ॥
एष एव विधिः प्रोक्तो धान्यानां च प्रवेशने ॥
सर्वबीजानां तु प्रथमवापे सुवर्णोदकसंप्लुतां पूर्वमुष्टिं वापयेद् ।
अमुं च मंत्रं ब्रूयाद् ।
प्रजापते काश्यपाय देवाय च नमः सदा ॥
सीता मे ऋध्यतां देवी बीजेषु च धनेषु च ॥

कार्तिकस्वामी ( देवांचा सेनापति ) व सीतादेवी यांची स्थापना न केली व अभ्युक्षण करून संभाळ केला नाही तर राक्षस धान्य खाऊन जातात. यासाठी यांची पूजा पहिल्याने करावी. पेरणें, कापणें, मळणें, उडणें, पाखडणें व धान्य घरीं नेणें वगैरे सर्व क्रिया करतांना याप्रमाणे परमेश्वराची प्रार्थना करून मग जें करणें तें करावें. धान्य पहिल्याने पेरतांना सोन्याचें पाणी त्यावर शिंपडावें व खालील मंत्र म्हणून पहिली मूठ पेरावी. त्या मंत्राचा अर्थ असाः— प्रजापति कश्यप देवाला नमस्कार असो. माझी शेती मला कल्याणकारक होवो. धन ( गुरें ) व धान्य या दोन्ही बाबींत माझें कल्याण होवो.

आता वृक्षारोपणासंबंधाने थोडे सांगून हें वृक्षविद्येचें प्रकरण संपवूं. वृक्षारोपण हें पांच प्रकारांनी करतात.

१ बीजारोपणः— बीं लावून. हा प्रकार सर्वांना माहित आहे.
२ कांडारोपणः— बारीक तुकडे ( कलमें ) लावून. आंबा, जाई वगैरे.
३ स्कंधारोपणः— मोठ्या खांद्या लावून. वड, पिंपळ वगैरे.
४ अंकुरारोपणः— डोळे लावून. गुलाब, संत्रे वगैरे.
५ परागारोपणः— पुरुषकेसर घेऊन स्त्रीकेसरांत मिळवून.

यांपैकी पहिले चार प्रकार पुष्कळांना माहीत असतील. कारण हे नेहमी वापरण्यांत आहेत. गुलाबाचे डोळे कसें काढून लावतात हें कदाचित कोणाला माहीत

नसेल. बाकी तीन सर्व शेती करणारांच्या परिचयाचे आहेत. सबब येथे शेवटच्या प्रकाराचीच माहिती सांगतों.

घोडा व गाढव यांच्या संयोगाने खेचर हा प्राणी उत्पन्न होतो. हा मजबूत असून नपुंसक आहे. नपुंसक म्हणजे याला संतति होत नाही. झाडांत नपुंसक म्हणजे बियांशिवाय फळें ज्यांना येतात तीं झाडें होत. केळीं, बेदाणा वगैरे फळें याचीं उदाहरणें होत. एकाच वर्गातील परंतु दूरचे दोन वृक्ष घेऊन त्यांच्या परागांचा संयोग केला तर बिनबियाचीं फळें येतील या अंदाजाने परागारोपणाची कल्पना सुचली. फुलांतील स्त्रीकेसर पक्व झाला म्हणजे गुणवान् झाडाचे पुरुषकेसर घेऊन ते त्या स्त्रीकेसरांशीं मिळवावे. मग त्या फुलांतील सर्व पराग काढून टाकून त्या ( फळ ) स्त्रीकेसरांभोवती कापडाची अगर कागदाची पिशवी घालून ठेवावी म्हणजे दुसऱ्या पुरुषकेसरांचा संयोग होण्याचें भय उरत नाही. याला 'परागारोपण Hybridization' असें म्हणतात. प्रयोग हल्ली अमेरिकेंत फार चालू आहेत. यामुळे बिनबियांचीं फळें निर्माण होतात. केळीं, बेदाणा हीं फळें आपण पूर्वीं अशीं तयार केलीं आहेत.

कलम हा जुन्या झाडाचा तुकडा असल्यामुळे त्याचें आयुष्य जुन्या झाडाइतकेंच फार तर असतें. जुन्या झाडाला मोहोर आला म्हणजे कलमाला मोहोर येतो. असे जुन्या झाडांचे दोष कलमांत येतात. परागारोपणाने तयार होणारें झाड सर्वथैव नवीन असल्यामुळे या झाडाचें आयुष्य नव्या झाडासारखें पूर्ण असतें. याची रचना व ठेवण स्वतंत्र असल्यामुळे यांत जुन्याचा संबंध नसतो. यांचे दोष वगैरे सर्वच गोष्टी नवीन होत. ही एक झाडांची नवी जातच निर्माण होते. व ही नपुंसक असल्यामुळे हिच्यांत फेरफार होण्याचें भय असत नाही अशा परागारोपणांत फायदा आहे. गुणांचा योग्य निवड व वाढ करण्याचें कसब साधलें मात्र पाहिजे. सृष्टींत चाललेल्या क्रियांचा फायदा घेऊन आपलें इष्टकार्य साधण्याचा माणसाचा पूर्वापार रिवाजच आहे. शास्त्रें या कामासाठीच निर्माण झालीं आहेत.

यानंतर पुढे पशुविद्येचा विचार करूं.

---

# ‘ गोमन्तक ’

( लेखकः—पांडुरंग वामन काणे )

ह्या विषयावर ‘ महाराष्ट्र-साहित्य-पत्रिके ’च्या ३ ऱ्या वर्षाच्या दुसऱ्या अंकांत मीं एक सहा पानांचा चर्चात्मक लेख लिहिला. त्यावर ‘ विविधज्ञानविस्ताराच्या ’ १९३१ जानेवारीच्या अंकांत एकोणीस पानांची टीका ‘ वसणूक ’ ह्या ग्रंथाचे प्रसिद्धकर्ते ‘ शणै गोंयबाब ’ ( रा. वर्दे ) यांनी लिहिली. ह्या लेखाचे शेवटीं विजयश्रीचा आव आणून रा. वर्दे यांनी मला बहुतेक आज्ञाच केली आहे की मीं ‘ विनाकारण आडरानांत न शिरतां व भलत्याच मुद्यांची गुंतागुंत न करितां सरळपणाने तें ( सत्य ) मान्य करावें. ’ परंतु मला मोठ्या कष्टाने त्यांना सांगणें भाग आहे की त्यांच्या विद्वत्तापूर्ण व विस्तृत लेखाने माझें मुळींच समाधान झालें नाही व विजयश्री तूर्त त्यांना माळ घालीत नाही. त्यांच्या लेखांत अनेक गैरलागू, चुकीचीं व क्वचित् हास्यास्पदही विधानें आहेत, परंतु त्यांच्या एकोणीस पानांच्या लेखांतील सर्व दोष दाखविणें झाल्यास त्यांनी खर्च केलीं त्याहून जास्तच पानें खर्चावीं लागतील. माझे व त्यांचे मुद्दे वाचकांपुढे आहेतच. त्यांच्या लेखांतील कांही महत्त्वाच्या विधानांचाच मात्र येथे परामर्ष घ्यावयाचा आहे. तो व मूळ दोन्ही लेख वाचून वाचकांनी आपआपलें मत ठरवावें.

प्रथम वादाचा मुद्दा स्पष्ट केला पाहिजे. हल्लीं ज्या प्रदेशाला गोवें म्हणतात त्याला गोमन्तक कांही शतकें म्हणत आहेत याबद्दल वाद नाही. प्राचीन ग्रंथांत ‘ गोमन्तक ’ हें पर्वताचें नांव, ‘ गोमन्त ’ किंवा ‘ गोमन्तक ’ असें देशाचें किंवा लोकांचें नांव म्हणून सांगितलें आहे. याशिवाय गोवें या नगराचा उल्लेख शिलालेखांत व ताम्रपटांत आहे. मीं आपल्या मूळ लेखांत गोवें ह्या शहराबद्दल कांहीच विधान केलें नव्हतें. मीं ( पान ९३ वर ) जें विधान केलें आहे तें हें की ‘ ५।६ व्या शतकांत गोमन्तक असे **देशाचें** नांव प्रसिद्ध नव्हतें. ’ म्हणजे हल्लीं ज्याला गोमन्तक देश म्हणतात त्याचें तें नांव ५।६ व्या शतकांत प्रसिद्ध नव्हतें असें माझें म्हणणें आहे व तें खोडून काढण्याला रा. वर्दे यांनी कांही पुरावा दिला नाही. त्यांनी जो पुरावा म्हणून दिला आहे त्याची वासलात लवकरच मी लावणार आहें. हा पहिला मुख्य मुद्दा झाला. दुसरा मुद्दा, महाभारतांत सभापर्वांत गोमन्त म्हणजे द्वारकेजवळचा पर्वत असें ठाम आहे व हें रा. वर्दे यांस कबूल आहे ( वि. वि. पान १८ ); फक्त त्यांचें इतकेंच म्हणणें आहे की श्रीकृष्ण हल्लीच्या गोमन्तकांत प्रथम आला व नंतर द्वारकेस गेला व तेथे रैवतक पर्वताला ‘ अनुकरणदर्शक गोमन्त ’ असें म्हणूं

लागला. म्हणून हरिवंशांत ज्याला गोमन्त पर्वत म्हटलें आहे तो कोठे होता हा दुसरा वादाचा मुख्य मुद्दा आहे.

गोमन्तक याची ' गोम + अन्तक ' अशी रा. राजवाडे यांनी दिलेली व्युत्पत्ति मला मान्य नाही व साधारणपणें कोणासच 'ती मान्य होण्यासारखी नाही' हें मीं आपल्या मूळ लेखाच्या आरंभींच स्पष्ट सांगितलें होतें. ज्या विषयासंबंधाने दोन मतें किंवा पक्ष असतात त्यावर निःपक्षपाताने निर्णय देतांना ज्या पक्षाच्या विरुद्ध निर्णय अखेर देण्यांत येतो त्या पक्षाच्या बाजूने जास्तींत जास्ती काय म्हणतां येईल हेंही सांगावें असा निःपक्षपाताने निर्णय देण्याच्या कामाचा मला जो अनुभव आहे त्यावरून माझें मत झालें. परंतु रा. वर्दे यांच्या दरबारांत याच्या उलट निर्णय करण्याची पद्धति दिसते. मीं ' गोम ' व 'माच' या दोन भावांचा प्राचीन लेखांतील उल्लेख दिला त्यावर रा. वर्दे यांनी अकाण्डताण्डव केलें आहे. प्रथम ते म्हणतात 'तिच्या ( व्युत्पत्तीच्या ) धोरणाने एखाद्यास कधीकाळीं तर्कट रचावयाची लहर लागल्यास त्या संबंधाची थोडीबहुत सोई ते ( काणे ) अगाऊच करून ठेवतात' व शेवटीं त्यांनी म्हटलें आहे, 'सत्य शोधण्याच्या मार्गावर उभें राहून प्रो. काणे ह्यांनी या दिशाभूल करणाऱ्या बादरायण संबंधाकडे मुद्दाम बोट कां दाखवावें तें समजत नाही.' अशा रीतीने माझ्यावर रा. वर्दे यांनी मीं मुद्दाम तर्कट रचणाऱ्यांस मदत करण्यासाठी ही माहिती दिली असा आरोप केला आहे. मीं वर उल्लेखिलेली निर्णयपद्धति रा. वर्दे यांस बिलकुल मान्य नाही असें दिसतें. रा. वर्दे यांचा स्वमताविषयी अभिनिवेश किती तीव्र असतो व त्यांच्याविरुद्ध मत देणाऱ्या माणसाच्या हेतुविषयी ते सहज कसे आरोप करूं शकतात याचा हा एक मासला आहे. ' शितावरून भाताची परीक्षा करावी ' इतकेंच या ठिकाणीं म्हटल्याशिवाय राहवत नाही.

महाभारताचा व हरिवंशाचा संबंध व काळ यांविषयी रा. वर्दे यांनी केलेलीं बरीच विधानें चुकीचीं आहेत. ' **सांप्रत प्रचारांत** असलेलें महाभारताचें संस्करण खिस्तपूर्व २५०—३०० वर्षें झालें असावें असें तज्ज्ञांचें मत आहे ' असें (पान ३) रा. वर्दे म्हणतात. हे तज्ज्ञ कोण ते रा. वर्दे सांगत नाहीत. महाभारताला संस्करणें किती झालीं, केव्हा झालीं वगैरे विषयांवर मोठमोठ्या विद्वानांत मतभेद आहेत. हल्ली भांडारकर-प्राच्यविद्या-संशोधकसंस्थेकडून महाभारताची आवृत्ति तयार करविण्यांत येत आहे त्यावरून हें स्पष्ट होतें की महाभारतांत घुसवाघुसवी करण्याचें काम निरनिराळ्या प्रांतांत अखण्ड चाललेलें होतें व कांहीं भाग तर अगदी अलीकडच्या कित्येक शतकांत घुसडून देण्यांत आले आहेत. फार तर इतकें म्हणतां येईल की, हल्लीच्या महाभारताचा जो विस्तार आहे त्या सुमाराचा विस्तार इ. स. च्या ३।४ शतकाचे पूर्वीचा असावा. परंतु त्या ग्रंथाची हल्ली प्रचलित असलेली स्थिति इ. स. पूर्वी २५०।३०० वर्षें या सुमारास झाली हें क्वचितच कोणी मान्य करील. महाभारताच्या

अठरा पर्वांनंतर हरिवंश लौकरच झाला असें रा. वर्दे (पान ८) म्हणतात व तो ग्रंथ महाभारताइतकाच प्राचीन व प्रमाण आहे असें त्यांचें मत आहे. हा मतभेदाचा प्रश्न आहे. १८ पर्वांचें महाभारत व हरिवंश एकाच ग्रंथकाराने लिहिलें हें मला मान्य नाही. आदिपर्वांत पर्वसंग्रहपर्वांत प्रथम महाभारताचीं शंभर पर्वें सांगितलीं आहेत त्यांत शेवटचीं दोन हरिवंशपर्व व भविष्यत्पर्व हीं आहेत व त्या दोघांनाही खिल म्हटलें आहे आणि पुढे. अठरा पर्वांचें परिगणन नांवें घेऊन केलें आहे. पण तेथे हरिवंशपर्वाला एकोणिसावें पर्व म्हटलें नाही, तर महाभारताचीं अठराच पर्वें आहेत मात्र त्याच्या खिलांत हरिवंश व भविष्यत् हीं येतात असें सांगितलें आहे (अष्टादशैवमेतानि पर्वाण्युक्तान्यशेषतः। खिलेषु हरिवंशश्च भविष्यच्च प्रकीर्तितम्॥). त्याचप्रमाणे खिल ग्रंथांना मूळग्रंथांइतकें प्रामाण्य नसतें असा प्राचीन संप्रदाय आहे असें माझें मत आहे. ऋग्वेदाचीं जीं खिलसूक्तें आहेत त्यांना अस्सल सूक्तांइतका मान व प्रामाण्य नाही.

हरिवंश फार प्राचीन आहे याचें प्रमाण म्हणून त्यांत श्रीकृष्णादि यादवांनी रेड्याचें मांस खाल्लें असे उल्लेख आले आहेत त्यांचा निर्देश रा. वर्दे यांनी केला आहे. अहिंसेकडे प्रवृत्ति उपनिषत्कालापासून झाली होती. महावीर किंवा भगवान् बुद्ध यानेच तिला प्रथम पुढे आणलें असें नाही. शिवाय बुद्धानंतर शेंकडों शतकांनी झालेल्या स्मृतिग्रंथांतही ब्राह्मणादि वर्ण मांस खात असत असें स्पष्ट दाखविणारीं वचनें आहेत. निवृत्तमांस होणें व मांस खाणें ह्या दोन्ही प्रवृत्ति एकाच कालीं होत्या हें मनुस्मृति अध्याय ५ श्लोक २७–५६ यांवरून दिसून येतें. बुद्धानंतर अनेक शतकांनी झालेल्या याज्ञवल्क्यस्मृतींत (१. १२५) दर सहा महिन्यांनी गृहस्थाने निरूढ पशुयाग करावा, श्वावित्, गोधा, कांसव, शल्लक, ससा ह्या पंचनख प्राण्यांचें मांस खाण्यास हरकत नाही; त्याचप्रमाणे सिंहतुण्ड, रोहित, पाठीन, राजीव इत्यादि मत्स्यांचें मांस द्विजातींनी खाण्यास हरकत नाही (याज्ञ. १. १७७-१७८) असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणे दुष्काळांत किंवा व्याधींनी प्राणसंकट उपस्थित झालें असतां, श्राद्धांत प्रोक्षणसंस्कार केलेल्या पशूचें मांस, देवांसाठी व पितरांसाठी सिद्ध केलेलें मांस आणि ब्राह्मणांनी इच्छा प्रदर्शित केल्यावरून त्यांना वाढून शिल्लक राहिलेलें मांस खाल्यास दोष नाही असेंही याज्ञवल्क्याने (१. १७९) सांगितलें आहे व श्राद्धांत गेंड्याचें वगैरे मांस वाढल्याने पितरांची तृप्ति कशा प्रकाराने होते याचेंही वर्णन त्याने (१. २५८–२६१) केलें आहे. सर रामकृष्ण भांडारकर यांनी आपल्या वैष्णव व शैव पंथांवरील पुस्तकांत युरोपियन लेखकांवरही ताण करून याज्ञवल्क्यस्मृतीचा काळ इ. स. च्या ६ व्या शतकापर्यंत आणून ठेविला आहे तो रा. वर्दे यांस मान्य असल्यास बुद्धानंतर हजार वर्षांनीहि मांसाशन ब्राह्मणादि सर्व वर्णांत चालू होतें असें दिसून येईल. मला सर रामकृष्ण यांनी दिलेला याज्ञवल्क्यस्मृतीचा काल मान्य नाही. तथापि ती स्मृति इ. स. पूर्वी १०० ते इ.

स. ३०० या काळांत झाली असें माझें मत आहे. म्हणून हरिवंशाचें प्राचीनत्व केवळ त्यांत मांसभक्षणाचें मनमुराद वर्णन आहे यावरून सिद्ध होण्यासारखें नाही. रा. वर्दे यांच्या तीक्ष्ण दृष्टींतून हरिवंशांतील भविष्यपर्व अ. १९ (कलकत्ता प्रत) यांतील कांही श्लोकांचा अर्थ सुटल्यासारखा दिसतो.[1] ह्या श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे की जनमेजयाचे नंतर कलियुगांत अश्वमेध करणारा असा एक ब्राह्मण सेनापति होईल. हा सेनापति दुसरा कोणी नसून शुंगसाम्राज्य--संस्थापक सेनापति पुष्यमित्र (ज्याचें नांव कालिदासाचे मालविकाग्निमित्रांतही येतें) हाच होय. पुष्यमित्राने अश्वमेध इ. स. पूर्वी १५० च्या सुमारास केला. यावरून हरिवंशाची रचना इ. स. पूर्वीच्या पहिल्या शतकापूर्वी झाली नसली पाहिजे हें स्पष्ट होतें. हरिवंशाचा उल्लेख बाणभट्टाने केलेला आहे यामुळे हरिवंशाचा रचनाकाल इ. स. पूर्वीचें पहिलें शतक ते इ. स. ४ थें शतक या मुदतींत असला पाहिजे. यापेक्षा जास्त विवेचन या कालविषयक मुद्यावर करण्याचा येथे जरूर नाही.

सभापर्वांत 'गोमन्तपर्वत' हा द्वारकेजवळ होता हें स्पष्ट आहे. भीष्मपर्वाच्या ९ व्या अध्यायांत 'गोमन्ता मन्दकाः खण्डा विदर्भा रूपवाहिकाः' असा श्लोक आहे. मी यावर आपल्या मूळ लेखांत लिहिलें की 'गोमन्ताः' या देशाचें स्थान या ठिकाणीं निश्चित करितां येत नाही व शिवाय 'गोघ्नताः' असा दुसरा पाठही असल्याचें मी सांगितलें. त्यावर रा. वर्दे यांनी पुष्कळच अवास्तव चर्वितचर्वण केलें आहे. जें सिद्ध करावयाचें तेंच गृहीत धरण्याची विवादपद्धति रा. वर्दे यांनी अंगिकारिली आहे. भीष्मपर्वांत 'गोमन्ताः' शब्द येतो. झालें; तो हल्लीच्या गोमन्तकाचाच उल्लेख असला पाहिजे असें गृहीत धरून उलट त्यांनी मला निक्षून सांगितलें आहे की इ. स. ५१६ च्या पूर्वी ७०० वर्षें 'गोमन्त' देश (हल्लीचा) याचें नांव माहीत होतें व 'तो देश व कोंकणांतील गोमन्तक देश हे निराळे नाहीत हें निर्विवाद सिद्ध होतें' (पान ३). या मताचे पुष्टीकरणार्थ त्यांनी विल्सन साहेबाचा आधार घेतला आहे. साहेबाचें नांव ऐकून दडपून जाण्याचे दिवस आता राहिले नाहीत. भीष्मपर्वांत जेथे 'गोमन्ताः' हा जनपद आला आहे त्याचे पूर्वी कुन्ति, अवन्ति, अपरकुन्ति हे देश व नंतर विदर्भ हे प्रख्यात देश आले आहेत. तेव्हा साहचर्याने पाहिल्यास गोमन्त हा मध्यहिंदुस्थानाला जवळ असला पाहिजे असें अनुमान होतें. खेरीज सभापर्वांत गोमन्त हा जर रैवतकपर्वत म्हणजे सौराष्ट्रांत होता तर भीष्मपर्वांत तरी 'गोमन्ताः' म्हणजे निराळाच प्रदेश असें इतर सबळ कारणांशिवाय कसें मानितां येईल. एकाच ग्रन्थांतील वचनांचा समन्वय केला पाहिजे. त्यांत होतां होईल तो विरोध सबळ कारण नसतां मानितां येत नाही. याशिवाय रा. वर्दे यांनी आपण होऊनच मार्कण्डेयपुराणांतील उतारा (प्राग्ज्योतिषाश्च मद्राश्च विदेहास्ता-

---

१ उत्पत्स्यन्नो देवेषु ब्राह्मणेपूपपत्स्यते । तेजसा व्याहृतं तेजस्तेजस्येवावतिष्ठते ॥ औद्भिज्जो भविता कश्चित् सेनानीः काश्यपो द्विजः । अश्वमेधं कलियुगे पुनः प्रत्याहरिष्यति ॥ श्लोक ३९-४०.

प्रलिप्तकाः । मल्ला मगधगोमन्ताः प्राच्या जनपदाः स्मृताः ) देऊन मला मदत केली आहे. याठिकाणीं प्राग्ज्योतिष, विदेह, ताम्रलिप्त, मगध हे देश निःसंशय भारतवर्षाच्या पूर्वभागांतील आहेत व त्यांच्याच जोडीला गोमन्त हा देश मार्कण्डेयकाराने बसविला आहे. म्हणजे 'गोमन्त' असा देश भारतवर्षाच्या पूर्वेस होता असें स्पष्ट झालें. पण हें कबूल करणें रा. वर्दे यांस अशक्य असल्यामुळे त्यांनी निःशंकपणें ठासून सांगून दिलें की, 'गोमन्त' हा प्रदेश पश्चिम भागीं सांगण्याऐवजी पूर्वभागीं सांगितला ही मार्कण्डेयकाराची चूक झाली. अशा रीतीनें नडणाऱ्या वचनांची वासलात लावावयाची असल्यास मग कोणतेंच वचन नडणार नाही. नडेल तेथे लिहिणारा चुकी करितो असें म्हटलें कीं काम झालें. रा. वर्दे यांनी पुराणांतील वचनांचा मेळ घालण्याची अजब युक्ति शोधून काढली असें म्हणावें लागतें. या बाबतींत त्यांनी दिलेली युक्ति किंवा उपपत्ति हास्यास्पद आहे. ते म्हणतात 'पूर्व भागांत जर खरोखर गोमन्त असता तर पश्चिम भागांतील गोमन्तकाप्रमाणेच आजलाहि तो कोणत्या तरी अपभ्रष्ट रूपाने अस्तित्वांत असल्यावांचून राहिला नसता. परंतु तो तसा नाही (पान ४).' रा. वर्दे यांचें असें म्हणणें आहे काय की प्राचीन काळचीं सर्वच देशांचीं, नगरांचीं, नद्यांचीं नांवें आज अपभ्रष्ट स्वरूपांत पाहण्यास मिळतील ? तसें असतें तर हल्लीच्या वादविषयक गोमन्तप्रकरणीं येणाऱ्या क्रौञ्चनगर, खट्वांगा नदी, यज्ञगिरि यांचीं कोणतीं अपभ्रष्ट रूपें आज शिल्लक आहेत ? प्राचीन लेखांत येणाऱ्या तगरपुराच्या स्थानाबद्दल अनेक वर्षें विद्वानांत कां वाद चालू होता ? धेनुकाकट म्हणजे हल्लींचें कोणतें नगर ? तेव्हा 'गोमन्ताः' ह्या भीष्मपर्वांतील शब्दावरून हल्लीच्या गोमन्तक देशाचा बोध होत नाही हें जें माझें मत त्याला बाध येण्यासारखें रा. वर्दे यांनी कांहीच प्रमाण दाखविलें नाही. केवळ त्यांच्या वचनावर वेदवाक्य म्हणून विश्वास ठेविला तर मात्र गोमन्ताः म्हणजे हल्लींचा गोमन्तक हें सिद्ध होईल.

टॉलेमीच्या भूगोलवर्णनांत येणाऱ्या Kouba शहराचा मॅकक्रिंडलने गोवा शहराशीं संबंध जोडला आहे. तो बरोबर असेल किंवा चुकीचा असेल. त्याला नामसादृश्याशिवाय कांही आधार नाही. आणि मॅकक्रिंडल साहेबहि म्हणतो कीं, 'This is generally taken to be Goa'. यापेक्षा तोहि आधार देत नाही. Kouba म्हणजे गोव्याशिवाय कोणतें दुसरें शहर हें जरी कोणाला दाखवितां आलें नाही तरी Kouba म्हणजे गोवा हें समीकरण त्याने लागलेच मान्य केलें पाहिजे असें होत नाही. नामसादृश्याने पुष्कळ फसले आहेत. Kouba व गोवा यांचें सादृश्य आधाराला घेऊन रा. वर्दे यांनी त्याला आपली एक पुस्ती जोडून 'गोमन्तदेश' (हल्लीचा) इ. स. च्या पहिल्या शतकांत त्या नांवाने ओळखला जात होता असें स्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांची पुस्ती ही की 'गोमन्त किंवा गोमन्तक याचें अपभ्रष्ट रूप गोवा' (पान ४). गोमन्त याचें अपभ्रष्ट रूप गोवा आहे हेंच मुळीं मला कबूल नाही. रा. वर्दे गोमन्तपर्वत, गोमन्तदेश व गोवानगर या तिहींचा जागोजाग घोटाळा घालीत

आहेत. गोवानगर कदाचित् प्राचीन असेल पण म्हणून तो गोमन्तकाचा अपभ्रंश असण्याचें कारण नाही, उलट गोवानगर प्रसिद्धीस आलें तेव्हा त्याच्या आसपासच्या प्रदेशाला गोमन्तक हें नांव लावूं लागले हें जास्त संभवनीय दिसतें. मूळ नगरीचें नांव गोपक होतें व त्याचा अपभ्रंश गोवा आहे हें सरळ दिसतें. षष्ठदेवाच्या कलियुग ४३४८ या वर्षाच्या लेखांत गोपकपुराच्या उत्तरभागांतील एक भातशेत दान दिल्याचा उल्लेख आहे[१]. कादम्बवंशांतील जयकेशी (पहिला) याने गोपकपट्टन किंवा गोपकपुरी ही आपली राजधानी इ. स. १०५२–५३ मध्ये केल्याचा उल्लेख आहे[२]. इ. स. १३९१ मधील माधवमन्त्र्याच्या लेखांत गोवा ही कोंकणाची राजधानी असें म्हटलें आहे[३]. टॉलेमीचा Kouba हा उल्लेख सोडून दिला तर गोवा हें नगर इ. स. ८।९ शतकापूर्वी अस्तित्वांत असल्याचा शिलालेख, ताम्रपट्टादि यांचा पुरावा रा. वर्दे यांनी दिलेला नाही. तो त्यांचे वाचनांत असल्यास त्यांनी द्यावा. म्हणजे आधी गोवें शहर इ. स. ५।६ व्या शतकाचे पूर्वी असल्याचें शाबीत झालें पाहिजे. गोमन्तक हें नांव हल्लीच्या त्या प्रदेशाला फार प्राचीन काळीं लावीत होते याबद्दल भीष्मपर्वांतील वाक्याशिवाय पुरावा नाही. त्याचा अर्थ काय करावयाचा हें वर दाखविलें आहे. राहतां राहिला हरिवंशांतील उल्लेख त्याचें विवरण पुढे करावयाचें आहे.

पान ६ वर मला रा. वर्दे प्रश्न विचारितात ' गोमन्तगिरीचें वर्णन जर खोटें म्हणावयाचें तर प्रत्यक्ष श्रीकृष्णाचा अवतार, गोकुळांतील त्याच्या बाललीला,........ कंसवध इत्यादि कथा खोट्या कां मानूं नयेत ह्याचें समाधानकारक उत्तर प्रो. काणे देतील काय ? हा प्रश्न हास्यास्पद आहे व त्याविषयीं मीं जास्त लिहीत नाही. पण मीहि रा. वर्दे यांस एक प्रश्न विचारतों, जर मार्कण्डेयकार पश्चिमेकडे असलेल्या प्रदेशाला पूर्वेकडे घालण्याइतकी घोडचूक करितो ( वि. वि. पान ४ ) असें आपण म्हणतां तर आपण मार्कण्डेयपुराणांतील बाकीचीं वर्णनें तरी सर्वच्या सर्वच खोटीं मानतां काय ? याचें उत्तर रा. वर्दे यांनी द्यावें म्हणजे त्यांतूनच मला विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देतां येतील.

हरिवंशाच्या पुराव्यासंबंधाने लिहिण्यापूर्वी रा. वर्दे यांचा एक भोळा गैरसमज दूर केला पाहिजे. ( पान १४ ) ते लिहितात "कुवेशी घाटावरूनहि धबधबा वहातो व तो दुधसागर ह्या नांवाने जगप्रसिद्ध आहे. परंतु तो प्रो. काणे यांनी अद्यापि पाहिला आहे असें दिसत नाहीं. दुधसागर ह्या नांवावरून तो सागर आहे किंवा धबधबा आहे हें त्यांना पक्कें माहीत नसावें. न पेक्षा ' धबधबा म्हणून दुधसागराचा उल्लेख केला आहे ' असें विचित्र विधान त्यांनी केलें नसतें. दुधसागर हा धबधब्यांत

१ इन्डियन आन्टिक्वेरी व्हॉ. १४ पान २९८.

२ J. B. B. R. A. S. Vol. 9 p. 301.

३ J. B, B. R. A S. Vol. 4 p. 115 ' गोवाभिधां कोंकणराजधानीमन्येन मन्येरुण-दर्णवेन '.

मोडत नसून समुद्रांत मोडतो असें प्रो. काणे यांचें म्हणणें आहे काय ?" रा. वर्दे यांच्या माहितीसाठी सांगतों की मडगांव येथील साहित्यसंमेलनाला गेलों त्यावेळीं 'जगप्रसिद्ध' दुधसागर पाहिल्यावर 'गोमंतक' हा लेख लिहिण्याची इच्छा झाली व तिकडून आल्यावर एक महिन्याने तो लेख लिहिला आहे. तेव्हा त्यांनी माझ्या अज्ञानाची कींव करूं नये. दुधसागर हा जगप्रसिद्ध धबधबा नाही. त्यांनी एखाद्या प्रसिद्ध Encyclopaedia Britannica सारख्या विश्वज्ञान कोशांत पहावें म्हणजे त्यांना त्यांत दुधसागराचा पत्ता लागणार नाही पण गेरसप्पाच्या धबधब्याचा लागेल. मी दुधसागराला सागर समजलों नाही व 'धबधबा म्हणून दुधसागराचा उल्लेख केला आहे' हें माझें विधान विचित्र नाही. त्यांचे बुद्धीला विकार झाल्यामुळे तें विधान त्यांना विचित्र वाटलें. त्यांनी जर माझ्या लेखांतील मागचीं पुढचीं वाक्यें काळजीने वाचलीं असतीं तर 'धबधबा म्हणून' इत्यादि वाक्याचा काय अर्थ आहे हें त्यांच्या लक्षांत आलें असतें. त्यांच्या विविधज्ञानविस्तारांतील लेखांत म्हटलें होतें की हरिवंशांत गोमन्ताचें वर्णन असून तो पर्वत सह्याद्रीच्या ओळींत असून त्याच्या शिखरावरून धबधब्याचे लोट वहातात. हरिवंशांत धबधब्याचें नांव नाही, फक्त धबधब्याचा उल्लेख आहे तो दुधसागराबद्दल आहे असें रा. वर्दे यांचें म्हणणें आहे असें लिहिण्याचा माझा आशय आहे व म्हणून 'धबधबा म्हणून दुधसागराचा' इ. वाक्य मी लिहिलें.

नद्यांचा मोठेपणा त्यांच्या नुसत्या लांबीवरून ठरविण्याचा नसतो. रा. वर्दे म्हणतात त्याप्रमाणे काळी नदी शरावतीपेक्षां लांब असेल. पण शरावतीला प्राचीन काळीं मोठें माहात्म्य होतें तें काळीला असल्याचें दिसत नाहीं. भीष्मपर्व अध्याय ९ श्लोक २० येथे पयोष्णी, शरावती, वेणी, भीमरथी, कावेरी या नद्यांचा उल्लेख आहे. अमरकोशांतहि शरावती व कावेरी यांचा उल्लेख आहे व शरावती ही भारतवर्षाची मर्यादा आहे असें म्हटलें आहे ( लोकोयं भारतं वर्षं शरावत्यास्तु योवधेः ). गणरत्नमहोदधींत 'वती' प्रत्यय शेवटीं असलेल्या अनेक नद्या दिल्या आहेत त्यांत शरावती आहे. हरदत्तानें आप. ध. सूत्रांवरील टीकेंत ( २.७.१७.७ ) शरावती नदीच्या उत्तरेकडील ते उदीच्य अशी प्राचीन व्याख्या दिली आहे. यांतील कांही ठिकाणीं शरावती म्हणून दुसरी नदी होती असें म्हणतां येणें शक्य आहे हें मला कबूल करावें लागेल. परंतु भीष्मपर्वांत दाक्षिणात्य नद्यांच्या समूहांत असलेली शरावती दुसरी असणें संभवनीय नाही. धबधब्याचा मोठेपणा नुसत्या नदीच्या लांबींत नाहीं. गेरसप्पाचा धबधबा त्याची उंची, त्याचा जोर, त्याचें सौंदर्य व त्याच्या पाण्याचा लोट यांनी हिंदुस्थानांतच काय पण सर्व जगांत प्रसिद्ध आहे व त्यापेक्षा या सर्व बाबतींत मोठे धबधबे जगांतही थोडे आहेत. दुधसागराची त्याच्याशीं तुलनाच करितां येत नाहीं.

'गेरसप्पाचा धबधबा मलयपर्वताच्या टापूंत पडतो. सह्याद्रीचा शेवट कारवारच्या मागे काळीनदीजवळ होतो व त्याच्या खाली मलयपर्वत लागतो' ( वि. वि.

पान १३ ) व 'गेरसप्याच्या धबधब्याभोंवतालचा प्रदेश सह्याद्रीच्या टापूंत नसून मलयपर्वताच्या टापूंत आहे' ( पान १६ ) असें रा. वर्दे बजावतात व आपल्या म्हणण्याचे समर्थनार्थ बॉम्बेगॅझेटीयर व्हा. १५ पा. ४ चा आधार देतात. रा. वर्दे यांची ज्या साक्षीदारावर भिस्त आहे त्याची सर्व जबानी त्यांनी वाचिली नाही असें दिसतें. कारण त्याच गॅझेटीयरच्या सातव्या पानावर गेरसप्पाचा धबधवा व नदी ही सह्याद्रींतील कड्यांवरून खालीं पडतात असें सांगितलेलें आहे. इ. स. चे आरंभीं लिहिलेल्या हरिवंशासारख्या ग्रंथांतील पर्वताच्या लांबीचें प्रमाण १९ व्या शतकांत साहेबानें लिहिलेल्या ग्रंथांवरून ठरविणेंच मुळांत धाडसाचें आहे व तसें नसलें तरी गेरसप्पाचा धबधबा सह्याद्रीचेच टापूंत आहे असें बॉ. गॅझेटीयर व्हा. १५ पान ७ येथे म्हटलें आहे[१]. पान ४ वरहि गेरसप्पा मलयाचे टापूंत आहे असें म्हटलेलें नाहीं. तर मलयपर्वत शरावतीच्या दक्षिणेस सुरू होतो असे म्हटलें आहे. म्हणजे गॅझेटीयर-चाही आधार वास्तविक रा. वर्दे यांच्या या विधानाला नाहीं. शिवाय हरिवंशाइतकेच प्रमाण व बहुतेक प्राचीन असे जे दुसरे ग्रंथ आहेत त्यांवरूनही सह्याद्रीचे टापूंत शरावती नदी आहे असें सिद्ध होतें. ब्रह्मपुराण ( अ. २७. ३५.३७ ), वायुपुराण ( अध्याय ४५. १०४–१०५ ) व मार्कण्डेयपुराण ( अ. ५७. २६–२७ ) ह्या ग्रंथांत सह्यपर्वतापासून उगम पावणाऱ्या नद्या गोदावरी, भीमरथी, कृष्णा, वेण्या, तुंगभद्रा, सुप्रयोगा व कावेरी ह्या होत आणि मलयपर्वतापासून उगम पावणाऱ्या नद्या कृतमाला, ताम्रपर्णी, पुष्पजा, सूत्पलावती होत असें सांगितलें आहे.[२] ह्या तिन्ही पुराणांत थोडे पाठभेद ह्या श्लोकांत आहेत परंतु कावेरी ही सह्यपर्वतापासून निघाली आणि मलयपर्वतांतून निघाली नाही हें त्यांत स्पष्ट आहे. कावेरीचा उगम कुर्गप्रांतांत आहे त्यांचे अक्षांश १२° २५ ( उत्तर ) आहेत[३]; गेरसप्पाचे अक्षांश १४° १४ (उत्तर) आहेत. म्हणजे गेरसप्पाचे खालीं सुमारे १०० मैलपर्यंत निःसंशय सह्याद्रिपर्वत आहे. वरील विवेचनावरून गेरसप्पाचा धबधबा सह्याद्रिचे रांगेंत आहे याचे विरुद्ध जें रा. वर्दे यांनी लिहिलें आहे त्यांत कांहीच अर्थ नाही हें स्पष्ट होईल.

---

१. 'The Baraganga, Shiravati or Gersappa river ....... then passes about 20 miles west or about seventy miles in all to the sea at Honavar. Soon after touching the border of Kanara, the Baraganga, in four different bodies of water, among magnificient forests and wild granite cliffs, dashes over the West face of the Sahyadris, a height of 825 feet, into a pool 350 feet deep.' Bombay Gazetter Vol. 15. p. 7.

२ गोदावरी भीमरथी कृष्णा वेण्या तथापरा। तुंगभद्रा सुप्रयोगा वाह्या कावेर्यथापगा ॥ सह्य-पादविनिष्क्रान्ता इत्येताः सरिदुत्तमाः। कृतमाला ताम्रपर्णी पुष्पजा सूत्पलावती। मलयाद्रिसमुद्भूताः नद्यः शीतजलास्त्विमाः ॥

३ येथील व पुढील अक्षांश Imperial Gazetteer of India वरून घेतलेले आहेत.

'अपारद्वीपभूषणं' ह्याचे अर्थाची ओढाताण मी केली आहे असें रा. वर्दे म्हणतात ( वि. वि. पान १५ ). पण रा वर्दे यांस लागलेच कबूल करणें भाग पडतें की ते जो अर्थ ह्या पदाचा करितात तो करण्यासाठीं 'वास्तविक पाहिलें असतां अपार याचा अर्थ येथें शब्दशः न घेतां आलंकारिक रीतीने अनेक किंवा असंख्य असाच घेतला पाहिजे.' अशा रीतीने त्यांना लक्षणेचा आश्रय करावा लागतो म्हणजे त्यांचा अर्थ ओढून ताणून आणलेला. माझा अर्थ मात्र वाच्यार्थ असल्यामुळे सरळ आहे असें माझें म्हणणें आहे. रा. वर्दे म्हणतात की माझ्या ( रा. काणे यांच्या ) अर्थाप्रमाणे 'अफाट द्वीप कोणतें तें दाखविण्याची जबाबदारी प्रो. काणे ह्यांच्यावर येऊन पडते.' रा. वर्दे यांच्या 'वसणूक' या ग्रंथावरून व वि. वि. लेखांवरून त्यांचें प्राचीन व अर्वाचीन भूगोलाचें अगाध व विस्तृत ज्ञान दिसून येतें. त्यांच्या सारख्यांना हें अफाट द्वीप कोणतें तें इच्छा असती तर सहज सुचलें असते. आता ते शिंगें मोडून वांसरांत शिरतात तरी त्यांना मी सांगतों की अफाट द्वीप म्हणजे जम्बुद्वीप. सातद्वीपांचे सभोंवार सातसमुद्र आहेत, जम्बुद्वीपाचे वाटोळा क्षारसमुद्र आहे असा पौराणिक समज. उत्तर किंवा मध्य भरतवर्षांतील मनुष्याला सागराचें दर्शनच होत नसल्यामुळे सागराचें वर्णनच त्याला वाचावें लागतें. परंतु जेव्हा सह्याद्रीच्या रांगांत मनुष्य येतो तेव्हा या अफाट जम्बुद्वीपाला वेष्टणारा सागर हा त्याच्या भूषणाप्रमाणे दिसतो असा हरिवंशकाराचा आशय आहे. किंवा अफाट हें सागराचें विशेषण घेण्यासहि विशेष हरकत नाही ( सागर हा जम्बुद्वीपाचें अफाट भूषण आहे ). 'द्वीप' म्हणजे जम्बुद्वीप हा अर्थ जर ह्या ठिकाणीं कोणाला मान्य नसेल तर द्वीप म्हणजे कोणताहि मोठा भूभाग हा अर्थ घ्यावा ( त्या ठिकाणीं गोमन्ताजवळचा भूभाग ) व ह्या अर्थीं द्वीप हा शब्द वापरीत असत हें दाखविण्यासाठी रघुवंशांतील श्लोक उद्धृत केला होता. मी रा. वर्दे यांचा अर्थ चुकीचा म्हटला. रा. वर्दे यांसारखाच फ्रेंचपंडित Langlois याने अर्थ केला. याने रा. वर्दे यांचे म्हणण्यास मुळीच बळकटी येत नाही. रा. वर्दे यांचें संस्कृतभाषापाटव फ्रेंचपंडितापेक्षां फार वरच्या दर्जाचें आहे असें मला वाटतें. पण त्यांचा अर्थ बरोबर नाही असें कष्टाने म्हणावें लागतें इतकेंच. फ्रेंचपंडिताने शंभर वर्षांपूर्वी हाच अर्थ केला होता याने माझे मतांत फरक पडणार नाही ! रा. वर्दे म्हणतात तो अर्थ [ अनेक बेटांनीं विभूषित ] घेतला तरी हें विशेषण गेरसप्पा जवळच्या शरावतीच्या कांठच्या प्रदेशालाहि लागण्यासारखें आहे. कारण त्या नदींतहि कांही बेटें आहेत.[1] जशी गोव्यांतील लहान बेटें आहेत तशींच हींहि खाडींतील लहान बेटें आहेत. दोहोंत विशेष फरक नाही.

हरिवंशांतील गोमन्त म्हणजे कुवेशी घांटच होय हें मत प्रस्थापण्यासाठी रा. वर्दे यांनी एक सबळ पुरावा म्हणून हरिवंशांतील [विष्णुपर्व ४१ अ.] तीन श्लोकांचा

[1] Bombay Gezetteer Vol. 15. p. 7.

आधार दिला आहे. पण ह्या श्लोकांवरून काढलेली युक्ति त्यांचेवरच कशी उलटते हें थोडक्यांत दाखवावयाचें आहे. त्या श्लोकांत सांगितलें आहे कीं श्रीकृष्ण चेदि-राजाबरोबर रथांत बसून गोमन्तावरून करवीरपुराला चवथ्या दिवशीं पोंचले व त्या रथाला वायूप्रमाणे जोराने चालणारे घोडे लाविलेले होते. रा. वर्दे यांचें म्हणणें की डोंगराळ प्रदेशांतून रस्ता होता, सर्व दिवसभर घोडा चालत नाही फार तर ८ तास चालणार व आठ तासांत घोडा डोंगराळ प्रदेशांत ३० मैल चालतो असें धरिलें तर चार दिवसांत १२० मैल प्रवास होतो. कोल्हापुराहून कुवेशीघांटापर्यंत ११५ मैल होतात. पण गेरसप्पा सुमारें १८० मैल आहे. तेव्हा गोमन्त म्हणजे कुवेशी घाट, गेरसप्पाचा टापू नव्हे हें सर्व गणित अत्यंत हास्यास्पद आहे. प्रदेश डोंगराळ असो किंवा कसाहि असो, चार घोडे जोडलेला राजाचा रथ जाण्यासारखी त्या प्रदेशाची स्थिति होती ('हयैः' असें अनेकवचन आहे). आज कोंकणांत अर्धपोटी रहाणाऱ्या माणसांतहि ८ तासांत तीस मैल जाणारीं माणसें मीं पाहिलीं आहेत. मग वायूशीं स्पर्धा करणारे असें ज्यांचें वर्णन कवीने केलें आहे ते अश्व ८ तासांत तीसच मैल (म्हणजे ताशीं ३॥। मैल) जात होते असें रा. वर्दे म्हणतात तरी ते राजाचे घोडे नसून हरदाशीं तट्टूंच होतीं असें रा. वर्दे यांचें म्हणणें आहे काय ? पुणें, खानदेश येथील टांग्याचा घोडाहि आज ताशीं आठ मैल जातो. मग राजाचे खास पागेंतील वायु-वेगाप्रमाणे चालणारे तलख वारू आठ तासांत ६० मैलहि जात नव्हते की काय ? रा. वर्दे यांस आपल्या लाडक्या कुवेशी घांटाशीं मेळ घालावयाच्या असल्यामुळे त्यांनी शामकर्ण वारूंना ताशीं ३॥। मैल या वेगाने चालावयास भाग पाडिलें तें ज्यांना मान्य असेल त्यांची खात्री करणे मला शक्य नाही. पण राजाच्या खास पागेंतील वारू दिवसास ६० मैल चालत होते असें जे मानतील त्यांना ह्या एकाच महत्वाच्या गोष्टीवरून (म्हणजे गोमन्तावरून कोल्हापुरास ४ दिवस रथाला लागले). मी म्हणतों त्याप्रमाणे गोमन्त म्हणजे गेरसप्पाजवळचा प्रदेश असावा असेंच वाटेल (कारण कोल्हापूरपासून गेरसप्पा १८० मैल आहे असें रा. वर्देच म्हणतात) व बाकीचीं रा. वर्दे यांचीं प्रमाणें सर्व ओढून ताणून मुद्दाम आडरानांत शिरल्यासारखीं आहेत हें स्पष्ट दिसेल.

आतां हरिवंश अध्याय ३७ ते ४१ यांतील भूगोलविषयक वर्णन पुनः एकदा साकल्याने येथे देतों. त्यांतील कांही नांवांबद्दल मतभेद असला तरी त्यामुळे मुख्य जी उपपत्ति हरिवंशांतील गोमन्त पर्वताचे स्थानासंबंधाने मी बसविली आहे तिला मुळीच बाध येत नाही. उदाहरणार्थ रा. वर्दे म्हणतात त्याप्रमाणे पद्मावत नांवाचें लहान राष्ट्र होतें व त्याची राजधानी वेणातीरावर करवीर होती, त्याच्यापुढे सारसाने स्थापिलेलें वनवासी असें मोठें राष्ट्र व त्याची राजधानी क्रौंचपुर व नंतर सारसाचा भाऊ

१ ते स्यन्दनगताः सर्वे पवनोत्पातिभिर्हयैः। भेजिरे दीर्घमध्वानं मूर्तिमन्त इवामयः॥ ते त्रिरात्रोषिताः प्राप्ताः करवीरं पुरोत्तमम्।

हरित याने स्थापिलेलें बेटावरील (होनावर जवळ असवराजदुर्ग या बेटावरील) राज्य होतें, हें सर्व गृहीत धरूं. त्याचप्रमाणे खट्वांगा नदी म्हणजे घटप्रभा हेंहि रा. वर्दे यांचें म्हणणें बरोबर आहे असें क्षणभर धरून चालूं. तथापि यामुळे हरिवंशांतील गोमन्त हा कुवेशी घाट होय (वि. वि, पान १५) हें मात्र मुळींच सिद्ध होत नाहीं.

जरासंध जेव्हा १८ व्या वेळीं मथुरेवर चालून आला तेव्हा यादवांनी सभा भरविली व त्यांत विकद्रु हा कृष्णाला यादववंशाचा इतिहास सांगूं लागला. मनु-वंशांतील हर्यश्व राजाची राणी ही मधुनामक दैत्याची मुलगी मधुमती नांवाची होती. हर्यश्वाच्या ज्येष्ठ भ्रात्याने हर्यश्वाला राज्यभ्रष्ट केलें तेव्हा पत्नीच्या सांगण्यावरून हर्यश्व आपला सासरा मधु याजकडे गेला व त्याने आपलें राष्ट्र हर्यश्वाला अर्पण केलें. व त्याला लवण नांवाचा मित्र दिला. त्या राष्ट्राचें नांव आनर्त. त्याचा पुत्र यदु. त्याला नाग राजाने आपल्या पांच कन्या दिल्या. त्यांच्यापासून पांच पुत्र झाले. ते मुचुकुन्द, पद्मवर्ण, माधव, सारस आणि हरित. मुचुकुन्दाने नर्मदातीरावर माहिष्मती नांवाची आपली राजधानी स्थापिली, पद्मवर्णाने सह्याद्रीच्या पाठीवर वेणा नदीच्यातीरीं आपली राजधानी केली. तिचें नांव करवीर व देशाचें नांव पद्मावत, तो देश लहान होता. सारसाने क्रौंचपुर स्थापिलें. त्यांत चंपक व अशोक पुष्कळ होते व त्या देशाला वनवासी म्हणतात. तो देश मोठा होता. हरिताने समुद्रांत एक बेट हें आपलें राष्ट्र केलें. त्याचे राज्यांत मद्गुर नांवाचे धीवर पाण्यांत बुड्या मारून समुद्राचें उदरांतून शंख बाहेर काढीत व दुसरे धीवर पोंवळीं व मोतीं काढीत. त्याच्या राज्यांत लोक मासे खाऊन रहात व मोठ्या नौकांत बसून व्यापार करून त्याला करभाराने श्रीमंत करीत. यदूच्या मागून माधव आनर्त देशाचे राज्यावर बसला. माधवाचा पुत्र सात्वत, सात्वताचा भीम, तो राज्य करीत असतां रामाचा भाऊ शत्रुघ्न याने लवणाचा वध करून मधुवनाचा नाश केला आणि त्याने मथुरा शहर वसविलें. त्यांत मग भीम राजा राज्य करूं लागला. भीमाचा पुत्र अश्वक व अश्वकाचा रैवत. रैवतक नांवाचा पर्वतहि सागराजवळ होता. रैवताचा पुत्र विश्वगर्भ, त्याचे चार पुत्र वसु, बभ्रु, सुषेण, सभाक्ष. वसूने कुन्तिदेशांत राज्य केलें. त्याचा पुत्र वसुदेव व दोन कन्या, कुन्ती ( पाण्डूची राणी ) व सुप्रभा ( चेदिराज दमघोषाची राणी ). अशा रीतीने यादववंश प्रसृत झाला. जरासंध बलवान् आहे. आपल्या नगरीला त्याने वेढा दिला तर फार वेळ सहन होणार नाही वगैरे ( ३८ अध्याय ). विकद्रूचें वाक्य ऐकून श्रीकृष्ण म्हणाला, मी समर्थ आहें तथापि सध्या तुमच्या म्हणण्याप्रमाणे करितों. मी बलरामा-सह दक्षिणापथांत प्रवेश करितों, करवीरपुर पाहीन, क्रौंचपुर पाहीन आणि नंतर गोमन्तपर्वताला जाईन. तसें झालें म्हणजे जरासंध मथुरेला सोडून आमचे पाठीवर चालून येईल. मग श्रीकृष्ण व बलराम सह्याचलाने शोभित झालेल्या करवीरपुराला आले. तेथे त्यांनी वेणानदीच्या तीरावर न्यग्रोध वृक्षाखाली एक मुनी पाहिला. तो परशुराम होता. त्याला श्रीकृष्ण म्हणाला, तूं बाण मारून समुद्राला हाकून शूर्पारक

नगर निर्माण केलेस आणि अपरांतांत समृद्ध देश निर्माण केलास. आम्हाला तूं युक्ति सांग. तेव्हा परशुराम म्हणाला, तुझ्या पूर्वजांनी हें करवीरपुर निर्माण केलें. हल्ली येथे शृगाल वासुदेव नांवाचा राजा आहे त्याने तुझ्या वंशांतील सर्व दायाद ठार मारिले. तुम्ही येथे राहूं नका. आजच वेणानदी उतरून दुसऱ्या देशांत निवास करूं. सह्याचा एक पोटभाग यज्ञगिरी म्हणून आहे त्या ठिकाणीं मांसभक्षण करणारे चोर रहातात तेथे एक रात्र राहूं. नंतर खट्वांगा नदी तरून जाऊं. तिचा धबधबा पाहूं. नंतर क्रौञ्चपुराला जाऊं. तेथे तुझ्या वंशांतील वनवास्य देशाचा राजा महाकपि नांवाचा आहे. त्या राजाला न भेटतांच आनडुह तीर्थावर जाऊं. नंतर सह्याच्या दरींत गोमन्त नांवाचा अनेक शिखरांनी विभूषित असा गिरि आपण पाहूं. त्याच्या सर्वांत उंच अशा महाशृंगावर सकाळीं संध्याकाळीं सूर्यचंद्र, कल्लोलयुक्त व अपार द्वीपभूषण असा सागर आपण पाहूं. त्या ठिकाणीं जरासंध तुमच्याशीं लढूं शकणार नाही. ( ३९ अध्याय ). तो गोमन्तपर्वत दरींतील धबधब्याच्या पाण्याच्या निनादाने भरून गेला होता.[१] तो चन्दन, तमाल, एला, मरिच यांनी दाट भरलेला होता. त्यावर हत्तींचे कळप होते (इत्यादि ४०). मग जरासंध गोमंत पर्वताकडे चालून आला. पर्वताला वेढा घालून तो फोडण्याची त्याने आज्ञा केली. जरासंधाला चेदिराट् म्हणाला. अशा रीतीने कृष्ण व बलराम यांचा पराभव होणार नाही. पर्वताला सर्व बाजूंनी सुकीं काष्ठें व गवत रचा व आग लावून द्या. त्याप्रमाणे आग लावून दिल्यावर तो पर्वत जळूं लागला. मग बलराम व कृष्ण यांनी पर्वतावरून खाली उड्डाण करून जरासंध याचे सैन्याची वाताहात केली. मग चेदिराट् ( दमघोष ) कृष्णाला म्हणाला मी तुझ्या आतेचा पति आहें. मी जरासंधाला कृष्णाशीं लढूं नको म्हणून सांगितलें परंतु त्याने ऐकिलें नाही. म्हणून मी त्याला सोडून देतों. आता आपण करवीरपुराल जाऊं, नंतर श्रीकृष्ण वायुवेगाने पळणाऱ्या घोड्यांनी युक्त अशा रथांत बसून फार थोडें अंतर ओलांडून चवथ्या दिवशीं करवीरपुराला आले ( अ. ४३ ). तेथे शृगाल वासुदेव कृष्णावर चालून आला कृष्णाने त्याचा वध केला. व नंतर त्याच्या पुत्राला करवीरच्या राज्यावर बसवून कृष्ण थोड्या काळांत दमघोषाशीं संगति करून सहावे दिवशीं मथुरेस पोंचला.[२]

ह्या ठिकाणीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे की करवीरपुराचे दक्षिणेस यज्ञगिरि, नंतर खट्वांगा नदी, नंतर ( दक्षिणेस ) वनवास्य देशाची राजधानी क्रौञ्चपुर, नंतर आनडुहतीर्थ व नंतर गोमंत. वनवास्य देशाची राजधानी क्रौञ्चपुर म्हणजे खानापूर तालुक्यांतील हलसी असें रा. वर्दे म्हणतात तें बरोबर नाही. अशोकाचे वेळेपासून

१ कादम्बाच्या ध्वजावर कपि होता. म्हणून हरिवंशांत या ठिकाणीं कादम्बराजाचा उल्लेख आहे असें वाटतें. दरी प्रपातांबुरवैश्छन्नं शार्दूलपल्लवः । ४०.८
नागयूथसमाकीर्णं मृगसंघातशोभितम् ।

२ तौ तु स्वल्पेन कालेन दमघोषेण संगतौ । अथाध्वविधिन्यतौ तु पंचरात्रोषितौ पथि ॥ दमघोषेणसंगम्य एकरात्रोषिताविव । ... नगरीं मथुरां प्राप्तौ वसुदेवसुतावुभौ ॥ अध्याय ४५.१-२.

वनवासी देश व नगर प्रसिद्ध आहे. मोग्गलिपुत्त याने जे बौद्ध मिशनरी पाठविले त्यांपैकी एक वनवासीला गेला होता असें महावंश या ग्रंथांत सांगितलें आहे. तसेंच टॉलेमीने पश्चिम किनाऱ्यालगतच्या प्रसिद्ध शहरांत वनवासी शहराचा उल्लेख केला आहे[1]. म्हणून वनवास्य देशाची राजधानी जगप्रसिद्ध जें बनवासी शहर तेंच मानिलें पाहिजे. हलसी ही कादम्बांची दुसरी राजधानी इ. स. ५ व्या शतकाच्या सुमारास होती. परंतु वनवासी ही जास्त प्राचीन राजधानी त्याच वंशाची होती आणि हरिवंशाच्या काळाचा विचार करितां व वनवासीची प्रसिद्धि पाहतां हरिवंशाच्या काळीं वनवास्य देशाचा विस्तार केव्हढाहि मोठा (रा. वर्दे म्हणतात त्याप्रमाणे) असला तरी राजधानी बनवासीच मानली पाहिजे. सातव्या शतकांतील इवल्लीच्या शिलालेखांतहि बनवासी ही राजधानी वरदा नदीच्या तटावर आहे असें सांगितलें आहे (इन्डियन ॲन्टिकिटी व्हा. ८ पान २४२). बनवासीच्याहि पलीकडे गोमन्त होता. बनवासीचे अक्षांश १४°·३२′ आहेत व गेरसप्पाचे अक्षांश १४°·१४′ आहेत. म्हणजे गोमन्त (गेरसप्पा) बनवासीचे जवळच दक्षिणेस येतो. हलसीचे अक्षांश (उत्तर) १५°·३२ आहेत आणि कॅसलराक (दुधसागराजवळ) याचे अक्षांश (उत्तर) १५°·२४′ आहेत म्हणजे दुधसागर हा जर गोमन्त तर तो वनवास्य देशाचे राजधानीपासून (म्हणजे रा. वर्दे यांचें मतें हलसीपासून) जितका दक्षिणेस असावा तितका येत नाही. आनडुहतीर्थ क्रौञ्चपुराचे दक्षिणेस व त्याचे पलीकडे गोमंत. पण रा. वर्दे हे आनडुहतीर्थ म्हणजे नन्दीतीर्थ समजतात. तें तर हलसीचे उत्तरेस आहे, दक्षिणेस नाही. तेव्हा त्यांचें आनडुहतीर्थाबद्दलचें म्हणणेंहि लटपटीचें दिसतें. आज तें तीर्थ उत्तरेस आहे पण पूर्वी हलसीचे दक्षिणेस असेल असें अनुमान करावें, ही सर्व मेळ घालण्याची लटपट ठरते. शिवाय धबधब्यांच्या पाण्याच्या निनादाचें वर्णन, हत्तींचे कळप, तमाल, एला, मरिच इत्यादि वृक्षांची गर्दी ह्या गोष्टींचें वर्णन सिर्शी, गेरसप्पा वगैरे यांच्या जवळच्या प्रदेशाला जसें लागू पडतें तसें कुवेशी घांटाला लागू पडत नाही असें मला वाटतें. दूधसागराजवळ वेलदोड्यांची लागवड होते की काय हा शोध रा. वर्दे काढून कळवितील तर बरें होईल. सिर्शीजवळ होते असें चौकशी करितां कळतें. तीन दिवसांत श्रीकृष्णाचा रथ किती चालला असेल याची कल्पना सहावे दिवशीं करवीराहून (किंवा निदान दमघोषाच्या चेदिदेशांतून[2]) कृष्ण मथुरेस पोंचला यावरून येते. म्हणून चार दिवसांत १२० मैल रा. वर्दे यांनी श्रीकृष्णाचे वारू चालविले तें अगदी अप्रयोजक आहे हें स्पष्ट होतें.

रा. वर्दे यांच्या लेखांत आणखीहि आक्षेप घेण्यासारखीं स्थळें आहेत. परंतु त्यांचा गोमन्ताच्या स्थळनिर्णयाशीं साक्षात् संबन्ध नसल्यामुळे व हा लेख आधींच फार वाढला आहे यामुळे हात आंखडता घेणें भाग आहे.

---

१ Mc Crindle's Ancient India as described by Ptolemy (Ed. of 1927) p. 179.  २ चेदि म्हणजे हल्लींचें बुंदेलखंड व जबलपूर हा प्रदेश.

# अभिप्राय

**भारतीय राष्ट्रध्वजः**— ( लेखक, डॉ. ना. सु. हर्डीकर, किं. १२ आ. ) नुसत्या लोकांच्या समुदायाला राष्ट्र ही संज्ञा कोणी लावीत नाही. ज्या लोकांचें ध्येय व आकांक्षा हीं एकच असतात त्याच लोकांना राष्ट्र असें म्हणतां येईल. परंतु समाजाचें ध्येय दृश्य स्वरूपांत नसल्यामुळे सामान्य माणसाला त्या ध्येयाकरिता झटण्याची हुरूप वाटत नाही. निराकार देवापेक्षा साकार देवाची उपासना लोकांना अधिक मानवते ह्याचें हेंच कारण होय. म्हणून राष्ट्रीय आकांक्षा व ध्येय यांचें प्रतीक लोकांपुढे ठेवणें भाग पडतें. या कारणास्तव राष्ट्रीय ध्वजाची कल्पना फार पुरातन काळीं लोकांना सुचली यांत नवल नाही. मात्र या भरतभूमीला एक-राष्ट्रध्वजाचा मान कधी मिळाला असेल असें वाटत नाही. एकराष्ट्रीयत्वाची भावना अलीकडेच जागृत झाल्यामुळे त्याबरोबरच राष्ट्रीय ध्वजाची कल्पना लोकांना सुचणें स्वाभाविक होतें. हिंदुस्तानचा चरखायुक्त तिरंगी ध्वज हा आता सर्वमान्य झाला आहे. राष्ट्रध्वजाची कल्पना प्रथमतः तरुणांच्या मनांत उद्भवली ही गोष्ट भावी उत्कर्षाचें सुचिन्ह समजण्यास हरकत नाही. स्वातंत्र्याची व एकराष्ट्रीयत्वाची भावना सदैव जागृत ठेवण्यास राष्ट्रध्वजाचा फार मोठा उपयोग होतो. अशा राष्ट्रध्वजाची थोडक्यांत सांग माहिती प्रस्तुत पुस्तकांत डॉ. हर्डीकर यांनी देऊन एक मोठें अवश्य असलेलें कार्य उरकलें आहे. खेड्यापाड्यांतून व घरींदारीं राष्ट्रीय निशाणें फडकत असण्याचा सुयोग आल्यामुळे या राष्ट्रध्वजासंबंधाने वागण्याचे नियम सर्वांनी सारखेच पाळणें जरूर होतें. हें कार्य डॉ. हर्डीकर यांच्या पुस्तकाने साधणार आहे. राष्ट्राने मान्य केलेल्या ध्वजांत यत्किंचितहि फेरफार करतां कामा नये ही गोष्ट प्रत्येकाने ध्यानांत ठेवणें अवश्य आहे कारण असा फेरफार केलेला ध्वज हा राष्ट्रध्वज या संज्ञेस पात्र होणार नाही. राष्ट्रध्वजाबरोबर जयजयकार हा येतोच. कोणत्याहि व्यक्तीचा जयजयकार करणें राष्ट्रीयत्वास विघातक आहे ही डॉ. हर्डीकर यांची सूचना प्रत्येकाने मनन करण्यासारखी आहे. स्वातंत्र्याचा ध्वज उभारल्यावर त्याचें संरक्षण करणारी एक जबाबदार संस्था असावी लागते. हें काम हिंदुस्तानी सेवादलाने पतकरलें आहे, ही आनंदाची गोष्ट होय. या राष्ट्रध्वजाभोवती सर्व हिंदुस्तान एकवटून जमेल व स्वातंत्र्याच्या बुद्धीने हा भारतीय राष्ट्रध्वज अधिक उज्ज्वल स्वरूपाचा होईल अशी भावना प्रत्येकाच्या अंतःकरणांत उद्भूत झाली पाहिजे. ह्या कामीं डॉ. हर्डीकर यांचे परिश्रम, यांची कळकळ व यांचा देशाभिमान हीं कारणीभूत होतील असा आम्हांस भरंवसा वाटतो.

---

# परीक्षण.

**धर्मकोश ( आदर्शरत्नम् ) विवाहकालः ( प्रकाशक धर्मकोशकार्यालय वाई. )**

महाराष्ट्रांत शब्दकोश, चरित्रकोश वगैरे सारखीं अत्यंत उपयुक्त जबाबदारीचीं व महत्त्वाचीं कामें आंगावर घेऊन पार पाडण्यांत येत आहेत तों त्यांतच प्राज्ञपाठशाळेचे नारायणशास्त्री मराठे यांच्या नेतृत्त्वाखाली होणाऱ्या धर्मकोशाची भर पडलेली पाहून कोणालाही सानंद अभिमान वाटल्याशिवाय रहाणार नाही. या धर्मकोशामुळे आमच्या धर्मशास्त्राचें वास्तविक स्वरूप समजून घेण्यास फारच उपयोग होणार आहे. आमच्यासमोर असलेला धर्मकोशाचा आदर्श म्हणजे नमुना ग्रंथ यामध्ये स्त्रियांच्या विवाहकालाविषयी श्रुति, गृह्यसूत्रें व स्मृति यांत जीं कांही वचनें आलीं आहेत त्या बहुतेक वचनांचा समावेश केला आहे. तसेंच अनेक प्रमुख प्रबंधांतही वचनें घेतलीं आहेत. ज्या प्रबंधांतून वचनें उद्धृत केलीं आहेत त्यांची निवड फार चांगली झाली आहे. अशा सर्व वचनांचें संकलन करून त्यावरून शास्त्रार्थ ठरविणें हाच शास्त्रीय मार्ग होय. आजपर्यंत अशी सोय नसल्यामुळे लोकांना खरा शास्त्रार्थ समजणें अगर मिळणें प्रायः अशक्यच होतें. एखादा दुसरा निबंधग्रंथ जवळ ठेवून त्याच्या आधारावर धर्मशास्त्री बनणारे पंडित ह्या धर्मकोशानंतर अस्तंगत होतील हेंहि कार्य या कोशाने होणार आहे. तसेंच मराठी भाषांतर लिहिल्यामुळे अर्धपठित शास्त्र्यांकडून शास्त्रार्थ समजून घेण्याची गरज अतःपर रहाणार नाही. सामान्य माणसालाही स्वतःचें मत बनविण्यास धर्मकोशकारांनीं सुलभ मार्ग तयार केला आहे. नुसते श्लोक वाचून वाच्यार्थ समजेल, परंतु शास्त्राचें रहस्य आकलन करतां येणार नाही. आमची आणखी अशी समजूत आहे की, जुन्या शास्त्र्यांमध्ये पुष्कळ वर्षांच्या व्यासंगानंतरही ज्या ऐतिहासिक दृष्टीचा पूर्णपणें अभाव आढळतो ती ऐतिहासिक दृष्टि त्यांच्या इच्छेविरुद्धही त्यांच्यांत उत्पन्न करण्याचें श्रेय धर्मकोशकारांस मिळणार आहे. ऐतिहासिक दृष्टीच्या अभावीं शास्त्रिपंडितांना योग्य शास्त्रार्थ देतां येत नाही असा नेहमीचा अनुभव आहे.

असो. या संग्रहावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते की, बालविवाहाचा मागमूसही सर्व श्रुतिग्रंथ धुंडाळूनहि कोणाला लागणार नाही, तर उलट स्मृति ग्रंथांत प्रौढ विवाहाचा सर्वत्र निषेध केलेलाच आढळेल. सूत्रग्रंथ मात्र बरोबर या दोहोंच्या दरम्यान बसतात; आणि म्हणून सूत्रकारांनी एक विशिष्ट व स्वतंत्र कार्य केलें असें प्रत्ययास येतें. ' अनग्निका तु श्रेष्ठा ' हें इतकें स्पष्ट वचन स्मृतींत आढळणार नाही; तें सूत्रग्रंथांतच सापडतें. ' अनग्निका ' म्हणजे ' ऋतुमती ' असाहि अर्थ गृह्यसंग्रहांत केला आहे. परंतु ' ऋतुमतीत्वनग्निका ' असा एकाने अर्थ केला म्हणून गोभिलगृह्यसूत्रांत त्याच अर्थाने ' अनग्निका ' शब्द उपयोजिला आहे की काय हाहि विचारार्ह प्रश्न आहे. रजस्वला व ऋतुमती हे पारिभाषिक शब्द असावेत.

बाराव्या वयापर्यंत मुलीला कन्या म्हणतात आणि त्याच्यापुढे रजस्वला ही संज्ञा तिला प्राप्त होते. परंतु प्रत्यक्ष रजोदर्शन झालेंच पाहिजे असा नियम नाही. नग्निकेला गौरी ही दुसरी संज्ञा आहे. आणि ' अष्टवर्षा भवेत् गौरी ' ह्या वचनावरून आठ वर्षांच्यापुढे गेलेल्या मुलीला अनग्निका असें म्हणतां येईल. तथापि गौरी, नग्निका वगैरे शब्द एकाच अर्थाने रूढ झालेले नव्हते असें मानण्यास या संग्रहांत भरपूर पुरावा मिळण्यासारखा आहे. कांही झालें तरी सूत्रांसंबंधाने तीं धरसोडीचीं आहेत हाच अभिप्राय कोणालाहि द्यावा लागेल. कारण त्यांपैकी कांही श्रुतिकालीन चालींचा पुरस्कार करतात तर कित्येक स्मृतींतील बालविवाहाचाच पुनरुच्चार करतात. सूत्रांतील चतुर्थी कर्म हें विवाहाच्यापूर्वी अनपेक्षित रीत्या कन्या ऋतुमती झाल्यासच लागूं पडतें. चतुर्थी कर्माच्या पद्धतीवरून ऋतुप्राप्तीनंतरच सर्व मुलींचें लग्न होत असेल असें अनुमान निघलच असें वाटत नाही. जुन्या गृह्यसूत्रांत तर वयोमर्यादा दिलेली आढळत नाही. या कोशांतील विषयानुक्रम फार महत्त्वाचा आहे, म्हणूनच तत्संबंधी वाक्यरचनेंत विशेष दक्षता बाळगली पाहिजे असें आम्हांस वाटतें. आमचा आशय समजावा म्हणून एक दोन उदाहरणें देतों. अनुक्रम नंबर सोळाचें गोभिलसूत्रांतील वाक्य उद्धृत केलेलें आहे. त्याचा अर्थ विवाहोत्तर चवथ्या दिवशीं गर्भाधानकाल असें कोणी म्हणतात परंतु गोहिलाच्या मतें विवाहानंतर ऋतुप्राप्त झाल्यावर रजोनिवृत्तीनंतर गर्भाधान करावें. आता विषयानुक्रमामध्ये ' रजःप्राप्तेरनन्तरम् विवाहः ' अशा शब्दांत या वाक्याचें सार दिलें आहे. परंतु आमच्यामतें रजःप्राप्तीनंतर अथवा पूर्वी विवाह करावा हा कांही गोभिलाचा सांगण्याचा मुख्य उद्देश नसून रजोदर्शनानंतर विवाह झाला असतां गर्भाधानकाल निश्चित करण्याचा आहे. तसेंच सोमादिभोगानंतर विवाह करावा असें ६५ ते ६७ या वचनांचें सार म्हणून दिलें आहे. यामध्ये ६५ नंबरचें वचन समाविष्ट कां केलें हें समजत नाही आणि ६५ आणि ६७ हीं ऋग्वेदांतील वचनें आहेत. श्रुतिवचनांत विधि कोठे सांगितलेला नसतो हें सर्वश्रुतच आहे. ' सोमाने ' प्रथम तुझा स्वीकार केला; त्यानंतर गंधर्वानें केला. अग्नि हा तुझा तिसरा पति होय आणि मनुष्य तुझा चवथा पति आहे. सोमानें ही कन्या गंधर्वाच्या आधीन केली. गंधर्वाने अग्नीच्या आणि अग्नीने ही कन्या, संपत्ती व पुत्र यांसह माझे स्वाधीन केलें आहे ! या वैदिकवचनांचा अर्थ बरोबर समजत नाही. फार तर यांत एका प्राचीनतम ऐतिहासिक चालीचा उल्लेख आहे एवढेंच म्हणतां येईल पण त्यावरून ' सोमादिभोगानन्तरम् विवाहः कार्यः ' हें अनुमान काढणें न्याय्य होणार नाही. त्याचप्रमाणे 'द्वादशवर्षोत्तरम् विवाहेपि कन्यायाः नास्ति दोषः ' हा सिद्धांत ' एवं चोपनतां पत्नीं नावमन्येत् कदाचन ' न तु तां बन्धकीं विद्यान्मनुः स्वायम्भुवोऽब्रवीत् ' या वाक्यावरून काढणें अनुचितच् होईल. ऋतुप्राप्त झालेल्या वधूचा विवाह जरी सदोष असला तरी त्यामुळे तिला बटकीसमान लेखूं नये एवढाच या वाक्याचा अर्थ दिसतो.

धर्मशास्त्रामध्ये श्रुतींचा समावेश जर होत नसेल तर अशा वचनांचा संग्रह

येथे देणें अवश्य आहे कां याचा विचार करावा अशी धर्मकोशकारांस आमची नम्र सूचना आहे. श्रुतींतील वचनें स्वतंत्र परिशिष्टांत संकलित करण्यास हरकत नाही त्याचप्रमाणे निबंधकाराने उद्धृत केलेलीं पण जीं विद्यमान स्मृतिग्रंथांत सापडत नाहीत अशा वचनांच्या प्रामाण्याबद्दल निःशंकितपणा रहात नसल्यामुळे त्यांचा समावेशहि परिशिष्टांतच करणें योग्य होईल असें आम्हांस वाटतें.

असो. पं. नारायणशास्त्री मराठे यांनी ही मोठीच जबाबदारी आपल्या शिरावर घेतली आहे. तथापि ते ती पार पाडण्यास सर्वथैव योग्य आहेत ही महाराष्ट्राच्या दृष्टीने अभिनंदनीयच गोष्ट होय, आणि त्यांत विशेष हें की राजाश्रयाविना केवळ जनतेवर विसंबून हें पर्वतप्राय कार्य अंगावर घेण्यास धजावणारीं माणसें महाराष्ट्रांत आहेत यांतच महाराष्ट्राच्या मोठेपणाचें बीज आहे असें आम्हांस वाटतें. तेव्हा जनतेकडून आश्रय मिळाल्याशिवाय रहाणार नाही अशी आम्हांस आशा आहे. प्राज्ञपाठशाळामंडळाकडून धर्मकोश लवकरच बाहेर पडावा अशी आमची उत्कंठा आहे.

---

**रसवंतीः**—( कवि, मल्हार बाळकृष्ण शिंदे, किं. १२ आणे ) श्री. शिंदे यांनी वेळोवेळीं प्रसिद्ध केलेल्या कवितांचा हा संग्रह आहे. सांगलांचे श्री. गोखले यांची विस्तृत व विवेचनात्मक प्रस्तावना संग्रहास जोडली आहे. प्रो. पंगू, विरागी व नागेश यांनी आपल्या अभिप्रायांत काव्यगुणवर्णन केलें आहे तें सर्वथैव युक्त आहे. श्री. शिंदे यांच्या वाणींत प्रसाद आहे. त्यांची दृष्टि छचोर नाही. अद्यापि ते कॉलेज विद्यार्थी आहेत, व असें असून त्यांची वृत्ति शांत विवेकी दिसते. हे पुढे उत्तम कवि बनतील असें अनुमान करण्यास प्रस्तुत संग्रहांत भरपूर साधन आहे. 'व्यभिचारीणी कोण ?' 'पोस्टमन,' तो काळ सुखाचा गेला, या कवितांत कवीच्या काव्यकौशल्याचें व प्रतिभेचें बीज आढळतें. राजारामस्तव हें कोल्हापूरचें राष्ट्रगीत होण्यास पात्र आहे. या होतकरू कविविद्यार्थ्याला प्रतिभासंपन्न काव्य निर्मितीच्यामार्गांत द्रव्याची अडचण भासणार नाही अशी खबरदारी कोल्हापूरचे महाराज घेतील अशी आशा करणें अयोग्य होणार नाही.

**अमृत–तुषारः**— ( किं. १ आणा. ले. केशव महादेव सोनाळकर ) या बारा तुषारांत कवि सोनाळकर यांनी गुण व वर्णाश्रम यांची तात्विक चर्चा केली आहे. ती एका अर्थाने वाचनीय आहे.

# शंका, चर्चा, इ.

## मराठी वाक्यरचना व लेखननियमन

कोणत्याहि भाषेची सर्वांगीण वाढ म्हटली म्हणजे तींत शब्दसमूह, ग्रंथसमूह, विषयसमूह, यांच्या वाढीचा समावेश होतो, तसाच लेखनशुद्धि व वाक्यशुद्धि यांचाहि होतो. या दृष्टींनी पाहिल्यास सांप्रत मराठी भाषा जरी अगदी अर्भकावस्थेंत नसली तरी अद्यापि ती बाल्याच्या आंत बाहेरच घोटाळत आहे. शब्दसमूहासंबंधाने पाहिल्यास एका दिशेने त्याची वाढ करण्याचे प्रयत्न होत आहेत, तर दुसरीकडून तो कांही अंशीं खर्ची करण्याचाहि प्रयत्न चालला आहे. शिक्षणप्रसार व उद्योगधंद्याचा आणि कलाकौशल्याचा अभ्यास यांच्या योगाने अवश्य म्हणून ग्रंथसमूह व विषयसमूह यांची वाढ थोडबिहुत होत आहे. लेखनशुद्धिदेखील लेखकांचें व मार्मिक विद्वानांचें लक्ष खेचूं लागली असून साहित्यपरिषदेच्या द्वारा लेखनांत नियमबद्धता आणण्याचा प्रयत्न चाललेला आहे. साहित्यपत्रिकेच्या गेल्या अंकांत शुद्धलेखनासंबंधाने शुद्धलेखनमंडळाने केलेले कांही निर्णय दिलेले आहेत. त्या निर्णयासंबंधाने कित्येकांचा मतभेद होण्यासारखा असला तरी साहित्यपत्रिकेचें शुद्धलेखन त्या निर्णयानुसार ठेवण्याचा प्रयत्न केल्यास त्याचा बराच उपयोग होईल. इतर वाङ्मयप्रकाशकांनी सुद्धा या बाबतींत आपआपले निर्णय ठरवून आपण प्रसिद्ध करीत असलेल्या वाङ्मयांत त्यांचा विनियोग केल्यास बरें पडेल. अशा रीतीने लेखनशुद्धीला नियमबद्धता येऊं लागली म्हणजे आज दिसत असलेला तद्विषयक स्वैराचार बंद होऊं लागेल व क्रमाक्रमाने मतभेदहि कमी होऊं लागतील. मतभेद सर्वथैव नष्ट होणें शक्य नाही व तसे ते राहिले म्हणजे विकल्परूपाने त्यांना स्थान मिळेल. असे थोडे मतभेद राहिले तर नियमबद्ध लेखनपद्धतीला ते गालबोटाप्रमाणे शोभादायकच होतील, तिला विरूपता देणार नाहीत.

लेखनपद्धतींतील नियमबद्धतेप्रमाणे वाक्यरचनेमध्येहि नियमबद्धता असणें इष्ट आहे. सांप्रत लेखनपद्धतीपेक्षा वाक्यरचनेच्या बाबतींत नियमबद्धता बरीच दिसून येते. तथापि या दृष्टीने अधिक चर्चा होणें इष्ट असल्यामुळे ग्रंथपरीक्षणांत थोडासा भाग या वाक्यरचनेस देण्याची गरज भासल्यास तद्विषयक दोषांची चर्चा अवश्य करावी. सर्वमान्य अशीं मासिकें व वृत्तपत्रें यांतील भाषापद्धतीची व सदोष वाक्यरचनेचीसुद्धा चर्चा करणें भाषासौष्ठवाच्या दृष्टीने इष्टच होईल. इंग्रजींतून रूपान्तर करून मराठींत आणिलेल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं मराठीच्या रूपाला साजेशी वाक्यरचना अनेक वेळां दृष्टीस पडते. इंग्रजी वळणाची सर्वच प्रकारची वाक्यरचना क्लिष्ट किंवा विरूप असेल असें नाहीं. यासाठी खरोखर ती तशी दिसेल तेव्हा ती कशी केली असतां सुबक दिसेल यासंबंधाने विधायक सूचना करून चर्चा करावी. अशी चर्चा होत गेल्यास मराठी वाक्यरचनेला अधिक तर्कबद्धता, सौष्ठव, ठसकेदारपणा, भारदस्तपणा, इत्यादि येऊं लागतील.

प्रस्तुत लेखांत उदाहरणासाठी म्हणून केसरीच्या लेखांतील कांही वाक्यें घेऊं. तारीख २९।१०।२९ च्या केसरीच्या अग्र लेखांत पुढील वाक्य आहे; 'या मिश्र कमिटींत ब्रिटिश इंडियाचे हितसंबंध जपले जाण्याची तजवीज खात्रीने होईल.' या वाक्यांत जाडया शब्दांच्या जागीं 'हितसंबंधांना जपण्याची'—असे शब्द पाहिजेत. जपणें म्हणजे काळजी घेणें या अर्थीं 'जप' धातु अकर्मक असल्यामुळे कर्मकर्तरि किंवा कर्मणि प्रयोग होणें व्याकरणदृष्ट्या शक्य नाही. यास्तव हा प्रयोग सदोष मानिला पाहिजे. असे प्रयोग आणखीहि कित्येक ठिकाणीं दृष्टीस पडूं लागले आहेत. परंतु ते सदोष असून अनवश्यक असल्यामुळे ते टाळणें अवश्यक आहे. त्याच तारखेच्या केसरींत स्फुट विचारांत (हिंदी असंतोषाची मीमांसा या भागांत) पुढील वाक्य आहे:—'देशांत श्रीमंती नांदत असून इंग्रज लोक येथे राज्य करीत असते तर असहकारितेच्या चळवळींत ज्या हजारों सुशिक्षितांनी आपल्या आहुति दिल्या तितक्या खास दिल्या गेल्या नसत्या' या वाक्यांतील जाडया शब्दांबद्दल 'हजारों सुशिक्षितांनी ज्या आपल्या आहुति दिल्या त्या खास दिल्या नसत्या' असें पाहिजे. या वाक्यांत संबंधी सर्वनाम व त्याचें दर्शक सर्वनाम यांसंबंधाने लेखकाचा घोटाळा झालेला आहे. असो, अशा रीतीची वाक्यरचनाविषयक चर्चा महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेंत होणें इष्ट आहे.

के. ल. ओगले.

## ग्रंथिक कीं ग्रांथिक ?

'पत्रिकेच्या' जानेवारी १९३१ च्या अंकांत 'ग्रंथिक कीं ग्रांथिक' या लेखामध्ये श्री. गो. पा. पावशे यांनी पुढील शंका मांडली आहे. ती अशी:—'ऊरुदघ्न' हा 'शब्द 'प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः (अष्टाध्यायी ५।२।३७) या सूत्राप्रमाणे दघ्नञ् प्रत्यय केल्यावर तयार होतो. आणि हा प्रत्यय ञित् असल्यामुळे 'तद्धितेष्वचामादेः' या सूत्राने 'ऊ'ला वृद्धी झाल्यावर औरुदघ्न असा शब्द होतो. परंतु सर्व ठिकाणीं तो प्रत्यय होऊन बनलेले शब्द वृद्धिरहितच दाखविले आहेत हें कसें! या शंकेचें उत्तर असें आहे कीं, ऊरुदघ्न या शब्दांतील प्रत्यय दघ्नञ् नसून दघ्नच् आहे. कारण 'प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः' या सूत्रावर भट्टोजीदीक्षितकृत प्रौढमनोरमेमध्ये 'द्वयसज्दघ्नचौ तु विशेषे स्मर्येते' असा उल्लेख आहे. तसेंच त्याच सूत्रावर वासुदेवदीक्षितकृत बालमनोरमेमध्ये 'अस्य प्रमेयस्य तत्प्रमाणमित्यर्थे प्रमाणे विद्यमानात्प्रथमान्तात् द्वयसच्, दघ्नच्, मात्रच् एते प्रत्ययाः स्युः।' असें स्पष्ट म्हटलें आहे. आणखीही असे आधार मिळतील. पण या दोन आधारांवरून असें सिद्ध होतें कीं, ऊरुदघ्न यामधील प्रत्यय ञित् नसून चित् आहे. तरी हा प्रत्यय ञित् नसल्यामुळे श्री. पावशे यांनी पाणिनि सूत्रावर घेतलेले आक्षेप निराधार व भ्रममूलक आहेत. 'प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः' या सूत्रांत दघ्नच् यामधील च् चा 'यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा' या सूत्राने ञ् झाला आहे. तेव्हा शब्दरूपें चुकीचीं आहेत, किंवा पाणिनीचें सूत्रच आर्ष म्हणून क्षम्य आहे असें मानण्याचें मुळीच कारण नाही. म. ना. गाडगीळ

३-४-३८३ तळ पृष्ठामध्ये दघ्नञ् हा प्रत्यय 'ञित्' धरला आहे, तें चूक आहे. 'द्वयसच्-दघ्नच्-मात्रच्' तीनही प्रत्यय 'चित्' आहेत. 'दघ्नच्, याच्या 'च्' पुढे, म्' अनुनासिक आहे म्हणून 'तन्मात्रं, चिन्मयं' इ. प्रमाणे त्या 'च्' चा 'ञ्' झालेला आहे. आणि म्हणूनच औरुदघ्न, पौरुषदघ्न असें होत नाही.

३-४-४२७ (तळ) पृष्ठामध्ये 'वाव' हा शब्द 'व्यर्थ' शब्दापासून उत्पादिला आहे. मला वाटतें 'व्यामोह' शब्दावरून तो उत्पन्न झाला असेल. जसें व्याम-वाव (४ हात). व्यामोह = भ्रम = भ्रमविषय = मिथ्या = व्यर्थ असा अर्थ संभवतो.

वे. शा सं. नारायणशास्त्री मराठे

## कोंकणस्थांचीं आडनावें

शंका (१) आडनावें दोनशें भरतात पण शेवटचे श्लोकांत २०२ लिहिलें आहे. (नेत्रां अधिक शतद्वय दोन साचे श्लोक १८)

उत्तरः— "शतद्वय असा पाठ सदर पोथींत असेल तर तो हस्तदोष आहे. आमचे मातामहांजवळील पोथींत "शत दोन साचे" असा असलेलाच पाठ आमचेहि तोंडीं अल्पवयांत पाठ केलेला आहे. आणि तोच यथार्थदर्शक आहे कीः— पाहूं गेल्यास आडनांवें जरी अधिक दिसतात, तरी खरे भेद २०० च आहेत. अधिक दिसणारे खरे नसून ते २०० चे पोटभेद अथवा दुसरीं नांवें होत.

शंका (२) रविसमये (श्लोक ६) याचा अर्थ नीट लागत नाही.

उत्तरः—"अन्वय" कपिने युक्त गोत्रा दलांला सहसंख्या रविसमये जाणा

अर्थः—कपि गोत्री आडनांवांच्या पाकळ्यांची (दलांला) एकूण संख्या (सह संख्या) सूर्यविषयी जो बाराचा संकेत (रविसमये) तितकीं आहेत. कपिगोत्राचीं आडनांवें १२ आहेत इत्यर्थ.

शंका (३) "विसवधु" (श्लोक १०)

उत्तरः—"विसवधु" हा हस्तदोष असावा "विसाविधु" असा पाठ आमचे तोंडीं वरील पोथींवरून आलेला आहे. विस आणि विधु म्हणजे चंद्र. संकेताने एक अतएव एकवीस आडनांवें कौशिक गोत्राची होत इत्यर्थ.

शंका (४) "तिसनव द्वितीयो" (श्लोक १७)

उत्तरः—अन्वय "शांडिलाचे तिस नव हे सर्व संख्या; द्वितीयो भेदः"

अर्थः—शांडिल्य गोत्री आडनांवांची तीन श्लोक मिळून तीस आणि नऊ एकूण सर्व ३९ ही संख्या (मोजल्यास ४० भरते ती नव्हे) कारण प्रस्तुत श्लोकांतील दुसऱ्या चरणांतील दुसरें अडनांव जें बेहरे तें मर्येयाचा (मर्ये वा किंवा; अथवा बेहरे) भेद म्हणजे पर्याय होय इत्यर्थ.

रामचंद्र वासुदेव सोमण.

---

# पेशवाईच्या सावलींत

( सं.--ना. गो. चापेकर )

## भोरकरांस कर्जाचा तगादा

श्री. नक्कल.

यांचे उत्तर श्रीमंत राजश्री पंतसचीव यांजकडे आमचा ऐवज येणे त्याचे तगाद्यास भोरास कारकून पाठवावयाचा म्हणोन राघो नारायण गुणे यांस सांगितले होते त्यावरून गुणे मा॥ निले याणी मल्हार बाबुराव खानवलेकर यास आणून भेटविले की हा ग्रहस्थ गरीब रिकामा आहे यास तगाद्यास पाठवावे. त्यावरून भोरास पंतसचीव याजकडे शके १७४५ चे साली तगाद्यास पाठवीले होते. आजमासे च्यार पाच महीने भोरास तगाद्यावर होते. पुढे तगाद्यावरून उठवून आणून खानवलेकर यांस नीरोप दील्हा. त्याजवर तो ग्रहस्थ कोठे गेले व कोठे आहे याची अम्हास माहीतगारी नाही. गुणे याचे घरी खानवलेकर मुकत्यार कारकून आहेत असे आम्हास कधी ठाऊक नाही. मिति आस्वीन व॥ १ रविवार शके १७४९ सर्वजीतनाम संवत्सरे.

## नारळीचा रस

......याने तीन सालचे कराराने म्हणजे शके १७८१ परीयंत करून घेतली आहे. त्याजवीसी लोखंडे यानी हरकत केल्यावरून मी खावंदाकडे अर्ज केला असून आखेर फर्स्ट मेहेरबान असिस्टंट साहेब बहाद्दुर यांचा हुकूम अर्जी नं ५१२० ता. ६ जुलै सन १८५७ इ. स. झाला. त्याप्रमाणे सदर्हु बागेतील झाडें नारळीचा रस काढण्याकरीता माझे ताबी झालीं. त्याप्रमाणे त्या झाडाचा रस काढण्याचा मालक मी असून त्याचा रस काढण्याची वहिवाट माझी आहे. हल्लीं सरकारातून कावजी नवरोजी पारसी यानी ता. १ जानेवारी सन १८५८ पासून रस घेण्याचा मक्ता केला आहे. यास्तव नारळीचा रस पांच शेर परयंत खपा पुरता ठेवून बाकी रस मक्तेदार पारसी यास विकत द्यावयाचा अशी समजूत रघुनाथ हरी चिपळूणकर यास मामलेदार हवेली याजकडुन मिळाल्यावरून चिपळोणकर यांसपासून मी पूर्वी झाडें पेशजी शके १८७७ साली नारळीचा रस काढण्याकरिता घेतली सबब चिपळोणकर यानी मक्तेदारास हुकमाची समजूत देली. त्याप्रमाणे पाचशेर खपापुरता ठेवून बाकी रस उत्पन्न होईल तो मक्तेदार यांस विकत देण्याविषीं कबूल असून मक्तेदार यास रस देण्यास गेलों असता ते घेत नाहीत असे आम्हास सांगितले. तेव्हा तो माल शिल्लक ठेवीला आहे. त्याचा नाश मक्तेदार घेत नाही. सबब होत आहे. याजकरितां खावंदानी मक्तेदार यांस समक्ष बोलावून रसाचा निरक सरकारचे मरजीस येइल त्याप्रमाणे ठरावून देऊन रस पारसी यास घेण्याविषीं हुकूम व्हावा.

## सीका नाणीं

श्री

यादी सीका मोजदात अस्वीन व॥ ३० शके १७५२ वीकृतिनाम संवत्सरे.

२६५४० हाली सीका
४४०८। रोख चांदवड
२४३८– पंचमेल वगैरे
८२ पंचमेल
५० अघेल्या पावल्या
४।' मलकापुरी
॥।– अलमगीरी
१०६ मादशाई ( मल्हारशाई )
२४३८–
२७२२३८–।

" सीका " नाण्याच्या मोजदादींत हाली सीका आहेच, परंतु पंचमेल, चांदवड, मलकापुरी वगैरे दुसरीं नाणींहि आहेत. तसेंच चांदवड, पंचमेल, मलकापुरी, अलमगिरी या शिकक्याचीं पोटनाणींहि आहेत.

## व्याघ्रगड किल्याचा सरंजाम

श्री

यादी कीले व्याघ्रगड सुमासलास अशेरमया तैन व अलफ कीले मजकूरचे सरंजामास बेरीज वाट सनद. रु. ७०००.

पो दुमाले हली चालत असता सरंजामाचे बेरजेत लागले ते ज्याचे त्याजकडे चालवावे म्हणोन चींतोपंत रावजी देशमूख याणी सांगीतले त्याबत बेरीज.

२४२॥ बाळाजी जनार्दन मौजे सरज्यापुर श्री बेलपागेकडेस
२५० तात्या बापट जमीन ईनाम मौजे हुमगांव पो
५० बापु सीवराम मुढे खरसीकर मौजे आरडे
६७४॥
१८३॥।'॥ ता। तांब व ता। तलवटी जरीबामुळे पेशजी कमी
२५० जकात घाट तीवरा येथील मार्ग चालत नाही सबब
३४०॥ कमावीस चीटी मसालेदादी फीर्यादी वगैरे बेरजा लागल्या आहेत त्या
१४४९८॥।

## गव्हरनराचा लोभ.

राजश्रीयाबीराजित राजमान्य राजश्री दाजीसाहेब चिपळूणकर स्वामींचे सेवसी पोष्य शंभूराव कृष्ण पटवर्धन मु॥ जंजीरे मुंबई. कतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशल ता॥ आश्वीन वद्य १३ पावेतों वर्तमान येथास्थीत असे विशेष आम्ही आपली मार्गप्रतीक्षा

येण्याची पुणे मुक्कामी केली परंतु आमचा लाभकाल नाही अस्तु दीपवालीपर्यंतही राहाणार होतो परंतु गवरनर यांची स्वारी लवकर जाणार यांजकरता निघून आलो हल्ली येथे आल्यावर गवरनर साहेब यांची भेट घेऊन मौजे कोरेगाव मु॥ ता॥ चाकण पो वाडे हा गांव मोबदला देण्याविसी याद लिहून दिल्ही आहे पेशजी गांव तुम्हास पाहीजे तो पाहून पुणे नजीक सांगावा म्हणोन जाहलाच होता त्यावरून हा गांव पसंत करून याद लिहून दिली आहे. वडील आसीरवादे करून हुकूम रॉबीनसन साहेब यांजकडे लवकरच जाईल तेथून चवकशी होऊन आल्यानंतर भोगवटीयास सनद सरकारांतून करून देतील. बडोद्याचे रेजिडंट उलियेम साहेब येथें आहेत गवरनर मलकम साहेब आल्यानंतर भेटून जातील त्यांची त्यांची दोस्ती फार आहे तेहि पंधरा वीस दिवसांत येऊन पोहोंचतील अशी येथें खबर आहे गवरनर अलपिष्टं साहेबही ते आल्यावर दो चवर दिवशी जाणार अशी खबर आहे. उलीयेम साहेब बडोद्याचे यांची मेहेरबानगी आपल्यावर आहे फार लोभ हल्ली करितात त्याजबरोबर जाऊन तिकडील कामे घारल्याप्र सीध करणार श्रीगजाननचरण व वडील आसिर्वादे घडोन येतील आम्ही कांही मजकूर चिरंजीव कुशाबाजवळ बोलिलो होतो तो मा॥र आपणास त्यांनी निवेदन केला असेल घरी चिरंजीव बयद आहे तिचे समाचारावीसी व हरयेकवीसीं मी ल्याहावे असे नाही उपरोधिक दिसेल.

चिरंजीव राजश्री कुशाबा यास शंभुराव याचा आसीर्वाद विनंती उपरि इकडील मा॥र दाजी सो यास लि॥ आहे त्यावरून कळेल तुम्ही दाजीसाहेबपासी गडी टेविला आहे तो आबदागिऱ्या आहे यांजकरिता तो गडी आम्हाकडे पाठवावा. उन्हाळा दिवस आहे आबदा-गीर धरावयास पाहिजे म्हणोन लिहिले आहे त्यास तो गडी पाठवावा सर्व मजकूर बडोद्यास गेल्यावर लिहीन साहेब फार लोभ करितो ही खूण समजावी पत्र कोणास दाखवू नये हे आसि-रवाद चिरंजीव तात्या व आप्पा सो॥ यांस आसिरवाद.

( का. शु॥ ३ शके १७४९ )

## तगादा

### श्रीगजानन

राजश्री हरीपंत दादा जोशी यांस विनंती विशेष रुपयांचे वायदे फार जाले. शेवटचा वायदा आपण केला होता तोहि आज भरून गेला असताहि अद्यापपावेतो आपलेकडुन रुपये येत नाहींत हे मोठे आश्चर्य आहे. आज सायंकाळपावेतो रुपये आले तर ठीक आहे नाहीपेक्षा उदईक तगाद्यास गडी पाठविणे जरूर पडेल तर असे करूं नये हेच सूज्ञास मागणे आहे कळावे हे विनंति. मि॥ जेष्ठ व॥ ३०

रानडे

## सत्याग्रहाचा नमुना

वाटणी व्हावी याजकरिता आम्ही वैशाख व॥ १० दशमीस जाऊन उपोषण अडीच प्रहर पावेतो केले. नंतर या वाड्यांत येऊन अस्तमान जाला. असे तीन दिवसपर्यंत जाले. परंतु वाटणीवीसी पहिला दिवस आहे. चिरंजीव आनंदराव याचे लग्न अद्यापि जाले नाहीं. व

केशवराव याचा व्रतबंध जाला नाही. व चिरंजीव अंबूचेही लग्न जाले नाही. ... ... ...

## भावे यांची मिळकत

......राजश्री सीवाजी नरसींगराव भाव्ये मोगलांईत जातेसमयीं ऐवजास गाहाण वाईचा वाडा व वाईची बाग इनाम शेरीची व पाटणकर याचे इनाम खरेदी घेतले ते व बाग कोथरूड येथील व वाडा चीकटे याचा पंढरपुरचा गाहाण होता तो व मौजे अडूरगांव इनाम येथील चौथाई हीसा कुलकर्णसुध्धा व शेटये याचा वाडा त्याजकडे आहे तो लिहून साहा मैन्याचे मुदतीचे खत करून देऊन

दाजी प. करमरकर यांचें पत्र श. १७४५

## ( चिंतामणराव आप्पासाहेब सांगलीकर यांच बायकोचा मृत्यू कोल्हापूरकरांचा दंगा )

शेवेसी. राजाराम जगनाथ एकबोटे चरणावर मस्तक ठेवून सिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत आश्वीन शु॥२ रविवार पावेतो मुकाम सांगली येथे आपले अशीर्वादे करून सुखरूप असो विशेष–इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री. चिंतामणराव आपासाहेब यांची बायको भाद्रपद व॥ १४ गुरुवार प्राथकाली सुर्यउदयी नित्याप्रो उठोण शौचेस शेत खाण्यात गेली तेथेच काय व्यवस्था जाली ते नकले. आत पडली तो प्रानोत्क्रमण जाले. बाहेर दोन घटका कुणविणीणी वाट पाहिलो. उठोण येत नाहींत म्हणोन दरवाजा उघडून पाहिला तो आत पडली आहे. उठवून उचलून आणली तो प्रान नाहीं. नंतर दोन चार घट (का) वैय उपाय केले. नंतर प्रान गेला असे ठरले. मग पुढील कार्याचा उद्योग केला या प्रों॥ वर्तमान जाले. इकडे महामारीचा उपद्रव जाला आहे. ईश्वर इच्छेने जे घडेल ते खरे मी चिंचणीहून काल श्री भागिर्थी स्नानास आलो आज निघोन चिंचणीस गेलो चिंचणीकर हे चार दिवस दम धरावा म्हणतात कारण कीं श्री करवीरकर यांचा दंगा आहे. ऐवजाची सोय जाली पाहिजे. त्यात यांचे दोन ठाणे एकसंबे व भोज ऐसे दोन ठाणे घेतले व तेथे पागेचे सिंगरे दाहा बारा होते ते मेले आणि गावास बहुत खराबी केली. त्यामुले चिंचणीकर वगैरे मंडळी पटवर्धन सारे सिबंदी ठेवितात. दोनशे च्यारशे माणसे व स्वार असे ठेवले आहेत. त्यामुले राहा म्हणतात हिसेब आद्याप करीत नाहींत. करूं म्हणतात. मागाहून काय होईल ते लिहून पा. जमखंडीकर राजश्री गोपाळराव निमा ऐवज देईन म्हणतो. देत असल्यास घ्यावे. नाहींतर जावे. साफ उत्तर सांगितले. त्यास काय करावे ते लिहून पो॥......

दाजीबा चिपोळणकर यास पत्र शके १७४९

## ( कोटोला सावकाराची कैफियत )

साहेब मुषफक मेहेरबान ककेफर्माय दोस्ता ईडवर्ड ह्यूम ठौसन साहेब बहाद्दुर पोलटक्याल सललाहुर

आज दील एखलास वासुदेव बापूजी चिपोळणकर मु॥ पुणें सलाम बादत सलाम अके येथील आशापोन आपली शादमानी कलमी करीत असावी दीगर आसाहेबानी छ. २६ माहे

ऑगस्ट सन १८३९ इसवीची याद व यादीबरोबर राधाबाईसाहेब रामदुर्गकर यांजकडील जबाबाची नकल छ. २५ मोवल सुमा अरबैन मया तैन व आलफची पाठवीली ती पोचली जबाबांत बाईसाहेब यांनी इसील मजकूर कलमी केला आहे जे चवघा सावकाराबरोबर चीपोळणकर यार्णी ही तोड करून घ्यावी म्हणोन व आसाहेबाचे यादींत ही अभीप्राय पाहता चवघा सावकाराबरोबर तोड पाडून घ्यावी म्हणोन आहे ऐसीयास आमचे बराबरीचे सावकार राजश्री विनायकराव देशमुख व दीनकरपंत देव व ||| पुणें यार्णी काही तोड अद्याप करून घेतली नाही. दातार व नगरकर व मूळचंद हे खराबीत बहुत प्रपंच चालणे कठीण ऐणादशेस आले तत्राप बाईसाहेबास व्याज सुद्धा ऐवज देणेचे सामर्थ असोत एक पैसाही देईनात. थोरावरोबर वाद सांगणे शक्ती नाही या सबबेने नाइलाज होऊन सदरीचे दातार वगैरे त्रिवर्ग यार्णी व्याज सोडून मुद्दल ऐवजास हसेबंदी करून घेतली. म्हणून ऐकितो. थोर सावकार देशमूख वगैरेणी तोड करून घेतली नाही कारण बाईसाहेबास सावकारलोकांचा ऐवज व्याजसुद्धा देण्यास खुप सामर्थ आहे ही गोष्ट आम्हीच विदीत करीतो ऐसे नाही सर्वांस जाहीर आहे. आम्ही येवीसीचे मजकुरानीसी असल अर्जी करून पांच वर्षे सुमार फार खराब जालो ते कितीं कलमी करावे अलीकडे दौलत खराबीस आली म्हणोन बाईसाहेब आसाहेबास कलमी करीतात परंतु बाईसाहेब लोकास कर्ज-वाम देऊन सावकारी बेहार करवीतात आणि आम्हा सावकार लोकास मात्र बुडवावे या हेतूने खराबीचा मजकूर कलमी करीतात ही गोष्ट ताजूब वाटते आसाहेब सर्वजाण आहेत आम्ही तो ऐवज देऊन बहूत खराब जाहलो. सरकार कायदे माफक आम्हास पार करतील हा भरवसा धरून अर्ज करीतो. सर्व सावकार यास हसेबंदी करून दिली आम्ही एकच तक्रार करीतो ऐसें नाही बाईसाहेबा सारीखे थोर दौलतदार व पैकेपूर लोकांनी नातवानी सांगू लागल्यास आम्हा सावकार लोकांचा परीणाम कसा लागावा. सावकार लोकास इनाम व सरंजाम काही नाही फक्त चार रुपये कर्जवाम देऊन त्याचे व्याजावर कुटुंब निर्वाह करावा लागतो ते व्याज बुडवून मुदलास हसेबंदी करून घ्यावी म्हटल्यास आमचा परीणाम कसा लागेल हा विचार सरकारांनी पाहवा. आमचा फैसला सरकानी केला आहे तो कायम ठेवीला असता आमचा बचाव होईल. आम्हाकडील बयाजवार मजकूर राजश्री पांडुरंग परशराम कारकून विनंती करीत वीदीत होईल. जादा काय लिहीणें.

रवाना कागद ता. २८ सप्टेंबर रोजी

कागद दिला मिती भाद्रपद शु. २ शुक्रवार

# अभिप्राय

**वार्षिक वासंतिक उपदेश:** — (क्र. ३६ वा. विषय—आपल्या विद्यालयाचें साफल्य, कर्ता—दत्तो वामन पोतदार.) हे उपदेशाचे चार शब्द प्रो. दत्तोपंत पोतदार यांनी वार्षिक क्रमाप्रमाणे यंदाचें सालीं आपल्या विद्यालयीन छात्रांना सांगितले आहेत. प्रोफेसरसाहेबांनी आपल्या विद्यार्थ्यांपुढे ठेवलेल्या ध्येयापेक्षा उच्चतर व जास्त उदार ध्येयें कोणतीं असणार? परंतु हीं ध्येयें साध्य होण्याकरिता विद्यालयीन शिक्षणाचा विद्यार्थ्यांना कितीसा उपयोग होतो याबद्दल शंकाच वाटते महाराष्ट्रांत अव्वल इंग्रजींत विद्यादानाचें कार्य जर कोणी अत्यंत स्वार्थत्यागाने, नेटाने व उत्साहाने सुरू करून चालू ठेवलें असेल तर तें डे. ए. सो. व शि. प्र. मं. या दोन संस्थांनीच; परंतु या दोन मंडळींचे हेतु कितीहि उच्च असले तरी त्यांची कार्यक्षमता मुंबई विद्यापिठाच्या धोरणावरच अवलंबून राहणार ही गोष्ट लक्षांत घेतां मंडळीच्या ध्येयसाधनांत जर कांही कमीपणा येत असेल तर तो मंडळीचा दोष नाही हें निर्विवाद होय.

विद्यार्थ्यांचा बौद्धिक, शारीरिक व मानसिक विकास पूर्णपणें होऊन त्याला उत्तम नागरिक बनविण्याकरिता मंडळीच्या आर्थिक परिस्थितींत व मुंबई विद्यापिठाच्या दास्याखाली जें जें करतां येणें शक्य आहे तें तें सर्व मंडळीने केलें आहे यांत शंका नाही.

मुंबई विद्यापिठाच्या पदवीधराचा अनुभव पाहिला असतां इतका काल, पैसा व बुद्धि विद्यालयीन शिक्षण संपादन करण्यांत घालवून त्याचा पूर्ण मोबदला विद्यार्थ्यांस मिळत नाही असें लक्षांत येईल व येथे कांहीं तरी चुकतें आहे खास असें प्रत्येकास वाटल्यावांचून राहणार नाही. मुंबई विद्यापिठांत सुधारणा म्हणून पुष्कळ घडामोडी झाल्या व प्रत्यही होत आहेत. परंतु विद्यापिठास लागलेली कीड निघून जाऊन विद्यापीठ खरोखर कार्यक्षम व्हावयास पाहिजे असेल तर त्याची पुनर्घटणाच होणें इष्ट आहे असें आम्हांस वाटतें.

विद्यापीठच जर कार्यक्षम नसेल तर त्याच्या नेतृत्वाखाली असणाऱ्या संस्था कितीही उच्च ध्येयांनी प्रेरित झालेल्या असल्या तरी त्यांच्या आकांक्षास पूर्ण वाव मिळणें शक्य नाही तथापि आहे या स्थितींतच प्रस्तुत सारख्या उपदेशाच्या मार्गांनी विद्यार्थ्यांना आपल्या शिक्षणाचा हेतु काय याचें स्मरण करून देणें अवश्य आहे यांत शंका नाही. या उमद्या उपदेशाचें मनन विद्यार्थी करतील अशी आम्हांस आशा आहे.

---

# शब्दसंग्रह

## राजापूर प्रान्तांतील नांगराविषयी माहिती.

**नांगर**— ह्याचे प्रकार दोन.

( १ ) मोठा ( हा शेतजमिनीची प्रथमची उखळ व बेर करण्याकरिता).

( २ ) लहान ( हा चिखलीच्या वेळीं उपयोजिला जातो. ह्याला "कोळसें" म्हणतात).

ह्या दोहोंचें स्वरूप एकसारखेंच असतें फक्त लहान व मोठा हा आकारभेद.

**नांगराचे अवयवः**—

( १ ) खडसा– ( आकार – साधारणपणें १२०°च्या विशाल कोनाप्रमाणे ) ह्याचा खालील बाजूंत लोखंडी फाळ बसवितात.

( २ ) फाळ– हा जमीन उकरण्याच्या उपयोगी लोखंडी असतो.

( ३ ) फाळेटू— हें खडशावर ठेवलेला फाळ न हलण्यासाठी दाबरूप होय. हें बहुधा खैराचें असतें.

( ४ ) रूमणी— ही खडशाच्या उभ्या बाजूला बाहेरून उभी जोडलेली असते. हिची मूठ जोत्या माणसाने हातांत धरावयाची.

( ५ ) डिमरी ( डिंबरी )— ही ( खडसा व रूमणी ह्यांत बसविलेलें) इसाड पुढे सरकूं न देण्यासाठी इसाडाच्या मागच्या शेवटाजळ पाडलेल्या भोकांत घट्ट बसवावयाची ( आडवी ) खुंटी.

( ६ ) सडी— ही ( खडसा व रूमणी ह्यांत बसविलेलें ) इसाड घट्ट राहण्याकरिता इसाडाबरोबर खालच्या बाजूने मारलेली खुंटी.

( ७ ) इसाड— हें खडसा व रूमणी ह्यांच्या भोकांत एक ( मागचें ) शेवट बसवून पुढे बैलांच्या मानेवरील जोखडास मधोमध बांधावयाचें. ( हें सुमारें पांच हात लांब, चार बोटें रुंद व दीड बोट जाड असतें. हें सुरमाडाच्या साडाचें उत्तम, नाहीपक्षीं साडाचें किंवा धामणीचें करितात).

( ८ ) जोखड— बैलांच्या मानेवरील जूं. हें बहुधा शिवणीचें चांगलें. ह्याच्या मधोमध इसाड बांधावयाचें.

( ९ ) नागवसा, नागोसा— जोखडाच्या मधोमध बसविलेला लहान खिळा. ( इसाड बांधावयाच्या जुपणाचे फेरे ह्या खिळ्याच्या दोन्ही बाजूंनी घेतले म्हणजे इसाड कोणत्याही बाजूला न सरकतां मधोमध राहून दोनही बैलांवर वजन सारखें पडतें.

( १० )शेळघा— जोखडाला उभ्या बसविलेल्या खुंट्या. ( ह्या बैलांच्या मानेबरोबर असल्याने बैल निसटून जात नाहीत. )

( ११ )जुवणी-- शेळव्यांच्या खालील टोकास बांधिलेली दोरी, बैलांच्या माने-खालून आंतील बाजूने जोखडास अडकविण्याची.

( १२ )जुपण, जुपणी-- इसाड जोखडाला बांधण्याची तिपेडी दोरी.

## शेतजमीन तयार करण्याचीं एकंदर साधनें

साधारण ( खरीप व वर्कस )

१ नांगर ( ह्यांचें अवयवादि वर्णन पूर्वी केलें आहे ), २ बैल २, ३ नांगऱ्या गड्डी, ४ काठी ( हाकणेची ), ५ मुसकीं ( बैलांच्या तोंडावर बांधण्याच्या जाळ्या जरूर तर ), ६ कुदळ, ७ खोरें, ८ इतर माणसें.

२ विशेष ( भातजमिनीकरिता )

१ ढपसा ( मोठमोठीं ढेकळें फोडण्याकरिता ), २ दातेफळी ( चिखल सारखा करण्याकरिता फणीप्रमाणे ), ३ रहू ( भिजवून कोंब फुटलेलें भात ), ४ रोप ( किंवा दाढ लावणीकरिता ), ५ शेण वगैरे खत ( जरूर तर व असल्यास वरकसकरिता).

१ गुठेफळी ( नांगरलेली जमीन खाचखळगे उंचवटे नाहींसे करून सपाट होण्याकरिता.

## चर्मकाराची पोतडी.

हत्यारें:- या पोतडींत प्राय: खालील वस्तू असतात.

ऐरण-- ही लोखंडाची केलेली असून जमिनींत पुरतात. तिच्यावर जोडा ठोकतात अगर खिळे मारतात.

अरी--- टोच्यासारखें लोखंडी हत्यार.

अस्ति--- या लोखंडी हत्यारानेच शिवलेला भाग ऐरणीवर ठोकून साफ करतात.

रापी--- 'सळ' कापण्याकडे उपयोग होतो. ( सळ- कातड्याची अरुंद पट्टी अगर दोरी ).

सांडस-- खिळे उपसण्याचें हत्यार.

कातडीं--

मसडे--- म्हशीचें कातडें. बाळदी--- बैलाचें कातडें.

सागळ--- शेरडाचें कातडें. मेशी--- मेंढराचें कातडें.

हरनळ--- हरणाचें कातडें. गायवट--- गाईचें कातडें.

वासरट-- वासराचें कातडें.

टाळे लावणें-- तळाला कातडें लावणें. तजा--- जोड्याची वरची बाजू.

सुरळी--- जोड्याचा वरचा वक्रडा भाग. [ बैलाचें कातडें--- विशेषत: त्याच्या खुब्याजवळील भागाचें - तळाला घालतात. बैल बसून बसून या भागाचें कातडें निबर झालेलें असतें. म्हशीचें टाचेला व शेरड्याचें वरच्या बाजूला वापरतात. ]

खुरें--- जोड्याचीं टाच. चांदवडी जोडा--- याला वरच्या बाजूला कोरून बनात लावतात.

नीळकंठ शंकर नवरे, सोलापूर

# परिषद्वार्ता

## हैद्राबाद येथे भरलेल्या बैठकीचा वृत्तान्त

परिषदेच्या १५ व्या नियमाप्रमाणे हैद्राबाद येथे संमेलनाच्या प्रसंगीं परिषदेची साधारण सभा भरली. सभेच्या बैठकी ता. ७, ८, ९ मे ह्या तीनहि दिवशीं भरत होत्या. परिषदेच्या सदस्यांपैकीं अदमासें ५० मंडळी उपस्थित होती. त्यांत नागपूर, बडोदें, इंदूर, धारवाड इत्यादि दूरदूरच्या प्रांतांतील लोकहि होते. कांहीं कारणामुळे सभेची सूचना सर्व सभासदांस योग्य वेळीं पोंचली नव्हती, यास्तव सभेचें काम चालवितां येणार नाहीं अशी शंका प्रदर्शित करण्यांत आली व आक्षेपहि घेण्यांत आला. पण अध्यक्ष सरदार किबे यांनी सभेचें काम चालण्यास कायदेशीर हरकत नाहीं असा निर्णय दिल्यावर सभेचें काम पुढे चालू झालें. सभेंत पुढील ठराव मान्य झाले.

१ परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यास नेण्यांत यावी.

२ परिषदेच्या घटनेसंबंधीच्या नियमांत खाली दिल्याप्रमाणे दुरुस्ती व्हावी.

(अ) निदान ५० सदस्यांचें एक नियामक मंडळ असावें.

(आ) त्यांपैकीं ५ सभासदांचें एक कार्यकारी मंडळ असावें.

(इ) नियामक मंडळाने आखून दिलेल्या अंदाजपत्रकाप्रमाणे व कार्यक्रमाप्रमाणे कार्यकारी मंडळाने कार्य करावें.

(ई) संमेलनाचे वेळीं भरावयाची परिषदेची साधारण सभा आगाऊ सूचनेच्या अभावीं नियमबाह्य ठरूं नये.

३ अध्यक्ष किबेसाहेब ह्यांनी दोन महिन्यांच्या आंत ट्रस्टीकडील हिशोब रीतसर तपासून आणलेले असे परिषदेस सादर करावे.

४ सभेंत पुढीलप्रमाणे नेमणुका झाल्या.

अध्यक्षः— सरदार माधवरावसाहेब किबे.

उपाध्यक्षः— १ श्री. चिंतामणराव वैद्य २ श्री. नरसिंह चिंतामण केळकर ३ श्री. वामन मल्हार जोशी ४ श्रीमंत संपतराव गायकवाड ५ श्री. केशवराव कोरटकर.

कार्याध्यक्षः— श्री. ना. गो. चापेकर.

चिटणीसः— श्री. माधवराव त्रिंबक पटवर्धन, २ श्री. कृ. पां कुलकर्णी.

कोशाध्यक्षः— श्री. सुंदरराव भास्कर वैद्य, मुंबई.

हिशेब-तपासनीसः— १ श्री. परुळकर मुंबई, २ श्री. ग. स. मराठे, पुणें.

कार्यकारी मंडळः— १ श्री. ना. गो चापेकर, २ प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, ३ श्री. कृ. पां. कुलकर्णी, ४ श्री. चिं. ग. कर्वे, ५ श्री. शं. गो. घैसास.

## नियामक मंडळांतील सदस्यांचीं नांवें

| | |
|---|---|
| प्रो. पां. वा. काणे, मुंबई | प्रि. ज. रा. घारपुरे, मुंबई |
| प्रो. द. वा. पोतदार, पुणें | रा. आपटे, बडोदें |
| श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदोर | श्री. यशवंतराव दाते, पुणें |
| रा. दामोदर सावळाराम यंदे, मुंबई | रा. न. र. फाटक, मुंबई |
| प्रो. पेंडसे, नागपूर | प्रो. बनहट्टी, नागपूर |
| प्रो. सांवर्डेकर, गोंवें | श्री. द. त्र्यं. पै, गोंवें |

| | |
|---|---|
| प्रो. श्री. नी. चापेकर, पुणें | रा. ब. रा. पटवर्धन, धारवाड |
| रा. ना. म. भिडे, भोर | रा. प्र. धों. कानिटकर, भोर |
| रा. आ. बा. लट्ठे, बेळगांव | रा. य. खु. देशपांडे, यवतमाळ |
| रा. ब. ग. खापर्डे, उमरावती | प्रो. आघारकर, कलकत्ता |
| श्री. वा. ना देशपांडे, सातारा | प्रो. पाटणकर, नाशीक |
| श्री. बा. रा. रणशिंग, धुळें | श्री. वामनराव नाईक, हैद्राबाद |
| श्री. रा. ब. महाजनी, अकोला | श्री. यादवराव काळे, बुलढाणा |
| श्री. गं. गो. कानेटकर, जबलपूर | श्री. जी. पी. पटवर्धन, ( सोलापूर ) |
| सौ. सुलोचनाबाई हुदलीकर, पुणें | प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर |
| डॉ. लेले, बडोदें | प्रो. क्षीरसागर, हैद्राबाद |
| श्री. विनायक हरी आपटे, इंदोर | श्री. मो. ब. माकोडे, ग्वाल्हेर |
| सरदार चंद्रोजीराव आंग्रे, ग्वाल्हेर | श्री. कृ. कोल्हटकर, जळगांव |
| श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई | डॉ. केतकर, पुणें |
| प्रो. पंगु, कोल्हापूर | श्री. वि. द. घाटे, नगर |

नियामक मंडळांत रिकाम्या राहिलेल्या जागा भरण्याचा अधिकार नियामक मंडळास देण्यांत आला.

५ रा. फाटक व रा. ओगले ह्यांनी चिटणीस म्हणून आजपर्यंत केलेल्या कामगिरीबद्दल ही सभा त्यांची फार आभारी आहे.

परिषदेच्या कार्याला सर्व प्रकारें मदत करण्याचें अभिवचन अनेकांकडून आलें ही संतोषाची गोष्ट आहे. परिषदेच्या चालू गाड्याला खीळ पडूं नये अशी सर्वांची उत्कंठा दिसली. श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे यांनी प्रचारकाचा सहा महिन्यांचा खर्च द्यावयाचें कबूल केलें आहे. तसेंच राजा धुंडिराज बहादुर यांनी हैद्राबादेतून १००० रुपये देण्याचें अभिवचन दिल्यामुळे परिषदेचा आर्थिक उन्हाळा थोडा थमला जाण्याचा संभव आहे. सामान्य लोकांनीहि अर्पण होऊन परिषदेला साहाय्य करावें हें त्यांचें कर्तव्य आहे. परिषद ही महाराष्ट्रांतील सर्व मराठी भाषा बोलणाऱ्यांची संस्था आहे. तिच्यांत कोणाकाहि मज्जाव नाही. मात्र ती आपल्या सभासदांसच जबाबदार आहे. परिषदेचे एक हजार तरी सभासद तावडतोब झाले पाहिजेत. ठिकठिकाणचीं वाङ्मयसेवामंडळें परिषदेशीं संलग्न होऊन तीं परिषदेचे सभासद सहज वाढवूं शकतील. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचा पाडव्याचा आणि आषाढी एकादशीचा असा जोड अंक आषाढांतच प्रसिद्ध होईल.

साहित्य-पत्रिकेसंबंधीचा पत्रव्यवहार श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर ह्या पत्त्यावर करावा; आणि परिषदेसंबंधी वर्गणी भरणें व पत्रव्यवहार रा. कृ. पां कुलकर्णी, ५९१ सदाशिव पेठ पुणें, या पत्त्यावर करावा.

ना. गो. चापेकर,
कार्याध्यक्ष, म. सा. परिषद.

## हैद्राबाद येथील सोळाव्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनांत मंजूर झालेले ठराव

( १ ) गेल्या वर्षी गोमंतकांत भरलेल्या १५ व्या संमेलनापासून आजतागायत खाली निर्दिष्ट केलेल्या व इतर साहित्यभक्तांच्या निधनाने महाराष्ट्र वाङ्मयाची फार मोठी हानि झाली असून त्याबद्दल हें संमेलन आपला खेद व्यक्त करीत आहे.

ज्ञानप्रकाशाचे श्री. हिंगणेकर, कवि कुमार यशोद, गोस्वामी पृथ्वीगिरजी हरिगीरजी, राजकोशकर्ते श्री. काळेले, डॉ. विठ्ठलराव चव्हाण, लेफ्टनंट एस्. एस्. नलावडे.

( २ ) महाराष्ट्र-साहित्यसंमेलन हैद्राबाद शहरीं भरविण्यास दक्षिणाधिपति निजाम सरकार यांनी परवानगी देऊन हैद्राबादकर व बृहन्महाराष्ट्रीय साहित्यभक्त यांना परस्पर परिचय करून घेण्याची संधि दिली, याबद्दल हें संमेलन त्यांचे आभारी आहे व त्यांना आयुरारोग्य प्राप्त व्हावें अशी प्रार्थना करीत आहे.

( ३ ) अ— निजाम संस्थानांतील मराठवाड्यांत जुने मराठी हस्तलिखित ग्रंथ पुष्कळ आहेत. तरी या संस्थानाच्या निरनिराळ्या जिल्ह्यांतील विद्याव्यासंगी माणसांचें एक मंडळ योजून त्यानें जुन्या ग्रंथांचा संग्रह करून तो सुरक्षित ठेवण्याचें व त्यांतील उपयुक्त तेवढें छापून प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घ्यावें.

ब— येथील उस्मानिया युनिव्हर्सिटी कॉलेजांत यंदापासून संशोधनशाखा उघडली असून त्याकरिता दरमहा ७५ रुपयाची शिष्यवृत्ति दिली आहे, याबद्दल ही सभा युनिव्हर्सिटी कौन्सिलचें मनःपूर्वक अभिनंदन करीत आहे. व त्यांच्या संशोधनशाखेस अशा संग्रहाचा फार उपयोग होण्यासारखा असल्यामुळे युनिव्हर्सिटी कौन्सिलने ह्या कामास सढळ हाताने मदत करावी अशी ही सभा विनंती करीत आहे.

( ४ ) हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विद्यापीठांतून सुरूं असलेल्या मराठी भाषेच्या अध्ययनांत एकसूत्रीपणा येणें इष्ट असल्यामुळे मॅट्रिकपासून एम्. ए. पर्यंत परीक्षांचे मराठी विषयांचे अभ्यासक्रम व तदनुसार वाङ्मयांतील ग्रंथांची तपशीलवार विभागणी करण्यासाठी गतवर्षी ( १५ वें संमेलनांत ) एक मंडळ स्थापन करण्यांत आलें होतें. त्या मंडळाने अद्याप अहवाल सादर केला नाही; तरी त्या कार्याचें महत्त्व जाणून मंडळाने शक्य तितक्या लवकर अहवाल प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करावी, व मंडळाचे संयोजक ( कन्व्हीनर ) प्रो. शं. दा. पेंडसे यांस नेमिलें असून कमिटीच्या खर्चाकरिता २५ रु. मंजूर केले आहेत.

( ५ ) मराठी भाषेच्या अभिवृद्धीकरता निजाम सरकारने पुढील सूचना अमलांत आणाव्या अशी या संमेलनाची विनंति आहे.

( अ ) उस्मानिया विद्यापीठाच्या विद्यमानें मराठी भाषा व वाङ्मयाच्या विषयावर वेळोवेळीं तज्ज्ञांचीं व्याख्यानें करण्यांत यावीं.

( आ ) हैद्राबाद संस्थानांतील मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याकरिता एका तज्ज्ञाची नेमणूक करावी व मराठी विभागांत असलेल्या वाङ्मयाचें संशोधन व संकलन करून त्यांच्या संग्रहाची व त्यापैकी निवडक ग्रंथांच्या प्रसिद्धीची व्यवस्था करावी.

( इ ) हैद्राबाद स्टेट लायब्ररींत उर्दू, फारशी, अरबी व इंग्रेजी ग्रंथांप्रमाणे मराठी ग्रंथांचाहि एक विभाग ठेवण्यात यावा व अशी सार्वजनिक मोफत ग्रंथालयें जिल्हानिहाय स्थापन करून त्या त्या जिल्ह्याच्या भाषेतील ग्रंथांना प्राधान्य देण्यांत यावें.

( ६ ) निजाम इलाख्यांत ' ज्ञानप्रकाश ' वरील बंदीचा हुकूम काढून घेतल्याबद्दल ही परिषद संतोष व्यक्त करते व ' केसरी ' वगैरे वर्तमानपत्रांवर असलेली बंदी काढून टाकण्याबद्दल ही परिषद निजाम सरकारास आग्रहाची विनंती करिते; त्याचप्रमाणे ' हैद्राबाद व देशी संस्थानें ' वगैरे उपयुक्त ग्रंथांवरील बंदीहि तावडतोब उठवावी असें सुचविते.

( ७ ) निजाम इलाख्यांतील मराठी विभागाच्या सर्व अदालतींची भाषा ब्रिटीश इलाख्यांत प्रचलित असलेल्या पद्धतिप्रमाणे मराठी असावी अशी या संमेलनाची विनंती आहे व त्याचप्रमाणे पाटील, कुळकर्णी, तहशील व तालुकदारांच्या कचेरींतील दप्तरें मराठींत असावीत.

( ८ ) संमेलनाचीं अधिवेशनें प्रतिवर्षी नाताळांत भरविण्यांत यावीं अशी या संमेलनाची शिफारस आहे.

( ९ ) ( अ ) निजाम इलाख्यांतील मराठी विभागांत मराठी प्राथमिक शिक्षणाची सोय समाधानकारक नाही, तरी मराठी शिक्षणाच्या स्वतंत्र शाळा उघडून त्यांत मराठी मातृभाषा असणाऱ्या शिक्षकांसच नेमावे अशी या संमेलनाची विनंती आहे.

( ब ) ज्याप्रमाणे उस्मानिया विद्यापीठाच्या दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून सर्व शिक्षण उर्दू भाषेच्या द्वारें दिलें जातें, त्याचप्रमाणे तें मराठी विभागांत मराठी भाषेच्या द्वारें देण्याची व्यवस्था करण्यांत यावी.

( १० ) निजाम सरकारने कोणतीहि सभा परवानगीशिवाय भरवूं नये असा जो हुकूम काढला आहे, तो वाङ्मयात्मक चर्चेस व शिक्षणप्रसारास विघातक असल्यामुळे शक्य तितक्या लवकर रद्द करावा, अशी या संमेलनाची विनंती आहे.

( ११ ) निजाम सरकारच्या शिक्षणखात्यानें खाजगी शाळासंबंधाने जो कायदा चालू केला आहे तो मराठी भाषेच्या प्रगतीस विघातक आणि महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांच्या शिक्षणक्रमांत अडथळा उत्पन्न करणारा असल्यामुळे हें संमेलन सदरहू कायद्याचा निषेध करितें; व निजाम सरकारने हा कायदा तावडतोब रद्द करावा अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

( १२ ) संमेलनांत पास झालेले ठराव अमलांत आणण्याचें कार्य करण्याकरिता व साहित्यपरिषदेशीं सहकार्य करण्यासाठी व जेव्हा अवश्य वाटेल तेव्हा तें कार्य स्वतः करण्यासाठी हें संमेलन खालील गृहस्थांचें कार्यकारी मंडळ नेमित आहे. सदर मंडळाने आपल्या कार्याचा अहवाल पुढील संमेलनास सादर करावा.

अध्यक्षः—डॉ. केतकर. उपाध्यक्षः—राजा धुंडिराज बहादूर. संयोजकः—श्री. र. धु. जोशी.

सभासदः—श्री. वामनराव नाईक, श्री. केशवराव, श्री. का. वैद्य, प्रो. हुदलीकर, प्रो. बनहट्टी, श्री. ताम्हनकर, श्री. य. खु. देशपांडे व प्रो. पेंडसे.

( १ ) मराठी साहित्यसंमेलनाचे प्रसंगीं इतर देशी भाषांच्या परिषदांना आपले प्रतिनिधी पाठविण्यासाठी विनंती करण्यांत येत आहे.

( १४ ) (अ) मराठी भाषेचें उच्च शिक्षण देण्याचे बाबतींत निरनिराळ्या प्रांतांतील शिक्षणाधिकारी जें अक्षम्य दुर्लक्ष करीत आहेत त्यबद्दल ही सभा तीव्र नापसंती व्यक्त करते.

( ब ) मुंबई इलाख्यांत देशी भाषांच्या अध्यापकाचे पगार निम्मे करण्यांत आले या गोष्टीचा ही सभा निषेध प्रदर्शित करते.

( क ) निरनिराळ्या कायदेकौन्सिलांतील मराठी सभासदांना ही दुरवस्था दूर करण्याची खटपट करावी अशी या संमेलनाची त्यांना विनंती आहे.

( १५ ) (अ) राष्ट्रांत नवचैतन्य व नवस्फूर्ति उत्पन्न होईल असें राष्ट्रीय गुणसंवर्धक वाङ्मय निर्माण करण्याचा साहित्य-लेखकांनी विशेष प्रयत्न करावा अशी त्यांना आग्रहाची विनंती आहे.

( १६ ) व्यक्तींत, समाजांत व राष्ट्रांत नवचैतन्य उत्पन्न करून राष्ट्रीय बल वाढविण्यास कारणीभूत होणाऱ्या व्यायामविषयक वाङ्मयांत लेखक वर्गाने यथाशक्ति भर घालण्याचा प्रयत्न करावा अशी ह्या संमेलनाची सूचना आहे.

# पेशवेकालीन मराठी भाषा*

(लेखकः—कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी)

भाषेच्या एकंदर जीवनावर राजवटींचा किंवा त्या त्या कालाच्या राजकारणाचा बराच परिणाम होतो. राज्यक्रांतीबरोबर धर्मक्रान्ति किंवा समाजक्रान्ति झाल्याचीं उदाहरणें प्राचीन इतिहासांत सापडतात. कोणत्या क्रान्तीमुळे कोणती क्रान्ति होते, कोण कोणाला कारण होतें ह्यासंबंधी मतभेद राहील. परंतु राज्यक्रान्ति, धर्मक्रान्ति, समाजक्रान्ति, विचारक्रान्ति इत्यादि क्रान्त्या ह्या साधारणपणें समसामयिक अशा असतात हें म्हणावयास कांही हरकत नाही. राज्यक्रान्तिहि भाषेला बरीच जाणवते. मोठमोठे कवि व लेखक हे विचारामध्ये क्रान्ति घडवून आणतात व त्यामुळे भाषाक्रांति होत असली पाहिजे, अशीहि विचारसरणी कांहीकांची असणें शक्य आहे. परंतु कवि, लेखक वगैरेंच्या वाङ्मयाने लोकांच्या बोलींत–रोजच्या व्यवहाराच्या भाषेंत–क्रांति किंवा पालट होते हें तत्त्व आम्हांस मान्य नाही. त्या वाङ्मयाने विचारपरिवर्तन होत असेल. भाषापरिवर्तन त्याने होत नाही. भाषापरिवर्तन होण्यास राज्यपरिवर्तनच व्हावें लागतें असें आम्हास वाटतें; व ह्या मतास अनुसरूनच मराठी भाषेच्या उद्गमापासून तो तिच्या वर्तमानकालीन स्थितीपर्यंत जे कालखंड पडतात त्यांना नांवें त्या त्या काळच्या मुख्य कवींवरून न देतां त्या त्या काळच्या राजवटीवरून दिलीं आहेत. मराठीचा उत्पत्तिकाल किंवा ग्रंथनिविष्टकाल जर शकोत्तर १००० धरला तर त्या सुमारास यादवांची राजवट होती. ह्याच कालांत पुष्कळ मानभावी साधु व ज्ञानेश्वर, मुकुंदराज होऊन गेले. पुढे बहामनी राज्य सुरू झालें. ह्या कालांत एकनाथ, दासोपंत वगैरे साधुसंत झाले. पुढे शिवशाही सुरू झाली. ह्या काळांतील विचारपरिवर्तक कवि रामदास–तुकारामादि झाले. त्यानंतर पेशव्याची अमदानी आली तेव्हा मोरोपंत, वामनपंडित, श्रीधर, मुक्तेश्वर हे कवि झाले. पेशव्यानंतर आंग्लाई सुरू झाली व ह्या काळांत नावाजण्यासारखा कवि जरी कोणी झाला नाही तरी चिपळोणकर, आगरकर, टिळक ह्यांनी आपल्या लेखणीची चमक दाखविली. मराठी भाषेचे असे जे पांच कालखंड पडतात ते १ यादवकालीन, २ बहामनीकालीन, ३ शिवकालीन, ४ पेशवेकालीन, ५ आङ्लकालीन—हे होत. ह्यांपैकी येथे फक्त पेशवेकालीन भाषेचा विचार करण्याचें योजिलें आहे.

ह्या कालखंडामध्ये आम्हीं साधारणपणें १७००–१८५० पर्यंतचा १५० वर्षांचा काल धरिला आहे. प्रत्यक्ष पेशव्यांच्या उदयास्ताच्या काळाबरोबर जरी ह्या

* ह्या निबंध भा. इ. सं. मं. च्या १९ व्या संमेलनप्रसंगीं वाचण्यांत आला.

कालखंड तंतोतंत बसला नाही तरी भाषेचा विचार करितांना ही १५० वर्षांची स्थूल मर्यादा कांही वावगी नाही. शिवशाहीचा व त्याबरोबरच स्वराज्यस्थापनेचा उत्साहव-आनंद ओसरून मराठयांच्या हाडींमांसीं शंभु छत्रपतीच्या अमानुष वधामुळे व शाहू-च्या कैदेमुळे एक प्रकारची सुडाची भावना सळसळत होती. व त्याच भावनेने राजा-रामाच्या कारकीर्दीत व पुढे कांही दिवस राज्यशकट चालला. परंतु शाहूच्या सुट-केने सर्व परिस्थिति एकदम बदलून एकीच्या भावनेने संघटित झालेल्या मराठशाहींत दुहीचें बी पेरलें गेलें. राजयंत्र चालविण्याची शिवकालीन कल्पना आणि शाहुका-लीन कल्पना ह्यांमध्ये फार अंतर होतें. स्वार्जित स्वराज्याबद्दल जो एक जागता अभिमान होता तो शाहुकालीं राहिला नाही. दिल्लीपतीच्या मोहबतीने आपण मुक्त झालों व त्याच्याच मोहबतीने आपण तख्तनशीन झालों आहों, तेव्हा त्याच्या कृपा-कटाक्षाप्रमाणे मराठयांचें राज्यतंत्र फिरलें पाहिजे अशी शाहूची कल्पना होती. शिव-शाहीमध्ये लावलेलें स्वराज्याचें रोपडें पुढे शाहुशाहीमध्ये जरी पेशव्यांच्या करामतीने जोरांत फोफावलें व अश्वत्थाच्या वृक्षाप्रमाणे वर, खाली, चहूंबाजूंस सर्वव्यापी म्हणून त्याची परिणति झाली तरी शाहूच्या वर दिलेल्या कल्पनेच्या पिशाचाने शाहूलाच पछा-डलें एवढेंच नव्हे तर सर्व हिंदुस्थानास गवसणी घालण्यास निघालेल्या कर्तृत्ववान् व्यक्तींसहि त्याने पछाडण्यास कमी केलें नाही. दक्षिणच्या सहा सुभ्यांच्या चौथाई-सरदेशमुखीसंबंधीच्या सनदा बादशहापासून शंकराजी मल्हार व सय्यदबंधू ह्यांच्यामार्फत शाहूला आणवाव्या लागल्या. तेव्हा शाहूचें राज्य बादशाहतीच्या सावलींत वाढणारें राज्य अशीच त्याची कल्पना झाली. ज्या ज्या वेळीं बाजीराव, चिमाजी अप्पा आपल्या बारगिरांसह उत्तरेकडे चढाईस जात त्या वेळीं बादशाहतीस न दुखवण्याबद्दल तो त्यांना सक्त ताकीद देत असे. मुख्य केंद्रवर्ती राजसत्तेची परकीयांबद्दल भावना ही अशा प्रकारची होती. हीच परकीयाबद्दल आत्मीयत्वाची भुरळ त्यांना भाषेसंबंधी पडली. परिस्थितींतील ह्याच परानुवर्तित्वाचा ठसा शाहुकालीन किंवा पेशवेकालीन भाषेंत उमटल्यास नवल काय ! मूळ समजूतच तशी होती म्हणून पेशवाई जरी ब्राह्मणशाही झाली तरी तिच्या अमदानींत मराठी भाषेच्या बाबत किंवा मराठा धर्माच्या बाबत जितकी जाज्वल्य ज्योत शिवशंभु ह्या छत्रपतींच्या काळांत तेवली तशी शाहुकालीं तेवली नाही हें खास. फारशी भाषेची मगरमिठी जी बहामनी कालांत बसली ती शिवकालांत तशीच राहिली किंवा थोडीशी ढिलावली; परंतु पेशवाईत मात्र ती ज्यास्त जखडून आवळली गेली. व शिवशाहींत जे कांही भाषेसंबंधी थोडेसे प्रयत्न झाले ते निरर्थक झाले. बरें, पेशवेकालीन लेखक कोणी इतर जातीय होते असें नाही. सर्व लेखक चांगले ब्राह्मण, प्रभू, किंवा सारस्वत ह्यांपैकीच कलमबहादर होते. प्रतिनिधि, सुमंत, सचिव, मुतालिक, चिमणाजी दामोदर, नारोराम, आनंदराव रघुनाथ, कृष्णराव जोशी, शंक-राजी केशव फडके, वासुदेव जोशी, पाटणकर दीक्षित, रेठरेकर, पुरंदरे घराणें, हिंगणेबंधु, अंताजी माणकेश्वर, नारोशंकर, पटवर्धन मंडळी, लिमये, जिवाजी गणेश, पेठे, सखा-

राम बापु, नानाफडणीस, इ. इ. वगैरे सर्व चांगले प्रबुद्ध, सुसंस्कृत मंडळी होती. परंतु ह्यांना मराठी भाषेस फारशीच्या कचाटींतून सोडावितां आलें नाही. राजदरबार, घरव्यवहार, बाजारहाट, सैन्यमुकाबला वगैरे हरएक क्षेत्रांत फारशीमय मराठीच वापरली जात होती असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें.

मराठी व फारशी यांचा संबंध दृढावण्यास आणखीहि एक कारण झालें. शिवाजीच्या वेळीं फार मुलुखगिरी झाली नाही. संभाजीचा काळ दंगलींत व गोंधळांतच गेला. तोच गोंधळ राजारामाच्या कारकार्दीत चालला तरी लोकांनी थोड्याच वेळांत सावरून स्वराज्यवृक्षाची मशागत सुरू केली. परंतु मुलुखगिरीची परमावधि पेशवाईच्या प्रथमार्धांतच झाली. बाजीरावाच्या घोड्याच्या पायास जर भोवराच होता. दक्षिणेंतून उत्तरेंत, उत्तरेंतून कोकणांत, कोकणांतून निजामाकडे व निजामाकडून कर्णाटकांत अशी मर्दुमकी करून त्या सर्वांचा आढावा देण्यासाठी पुन्हा सातार्‍यास शाहूछत्रपतींच्या चरणांशीं, अशा सारख्या येरजार्‍या त्याच्या चालल्या होत्या. "फौज फिरे आणि कर्ज फिटे" हा त्या कालचा राजमान्य शिरस्ता पडल्यामुळे जो तो त्या शिरस्त्याचाच अवलंब करी. बरें, मुलुखगिरींमध्ये हर्षामर्षाचे प्रसंग यावयाचे ते महमदीयांशीं किंवा अन्यभाषीयांशीं. तेव्हा अशा ह्या धुमश्चक्रींत कोण कोणाचे किती शब्द घेतो, कोणाच्या भाषेचा परिणाम आपल्या भाषेवर झाला, याजकडे लक्ष देण्यास कोणास फावत नव्हतें. परकीयांचें राजकीय जोकड मोडून फेकून देण्याकडे जेथे सर्व शक्ति वेचण्याची अहमहमिका चाले तेथे परकी शब्दांचें उच्चाटण करण्याकडे लक्ष नसल्यास आश्चर्य नाही; म्हणूनच आपणांस बह्मनी कालांत मराठीच्या भोंवती जी एक फारशी भाषेची पोलादी चौकट घातली गेली त्याच चौकटींत पेशव्यांच्या ब्राह्मणशाहींतहि मराठी भाषा जखडलेली दिसते.

ही झाली मराठीच्या नांदत्या घरांतील गोष्ट. परंतु ह्या सारखीच परिस्थिति तिच्या माहेरघरीं—मराठवाड्यामध्ये—मराठी भाषेसंबंधीं होती. पेशवाईच्याच काळांत ह्या मराठवाड्यांत निजामउल्मुलुख ह्याच्या सारखा धोरणी, हुशार व मिठास असा अधिकारी दक्षिणचा सुभा म्हणून कारभारावर होता. बह्मनी बादशाही किंवा त्याची झालेलीं उत्तरकालीन शकलें किंवा त्याच्यानंतर आलेली निजामत ह्या सर्वांची एक गोष्ट नावाजण्यासारखी होती, ती ही की ह्या सर्व राशीयती महमदी धर्माच्या होत्या तरी त्यांचा धर्माचा कडवेपणा इतका विकोपास न गेल्यामुळे इतर दृष्टीने स्थायिक लोकांत त्या समावून गेल्या होत्या. ह्या सत्तांबद्दल तेथील लोकांना परकीपणा वाटला नाही. उलट ह्या राशियती म्हणजे स्वराज्यच व आपल्या मर्दुमकीस, हुशारीस पूर्ण वाव देणार्‍या आहेत अशी त्यांची समजूत होती; व त्यामुळे अजाणताच त्यांच्या धर्मावर, भाषेवर महमदीयांच्या सान्निध्याचा परिणाम झाला. मराठीवरील फारशीचा परिणाम दृढावण्याचें हें आणखी एक कारण.

पेशवाईच्या उत्तरार्धीं मोरोपंत, वामन पंडित, श्रीधरस्वामी ह्यांनी मराठीला

एक सुसंस्कृत असें वळण लावलें. ह्यांच्या भाषेला आपण पण्डिती भाषा म्हणूं. सामान्य भाषेहून किंवा राजदरबारच्या भाषेहून ही बरीच निराळी होती. ही भाषा सामान्य लोकांना न पेलल्यामुळे व त्यांच्या रोजच्या व्यवहारापासून ती फार दूर असल्यामुळे हिचें क्षेत्र पण्डितापुरतेंच मर्यादित राहिलें. तेव्हा सामान्य व्यावहारिक भाषेचा एक आणि ह्या पण्डितांच्या काव्यांतील ग्रांथिक भाषेचा दुसरा असे दोन नमुने पेशवाईंतील भाषेचे दिसतात; पैकी दुसऱ्या नमुन्यांत अर्वाचीकरण झालें असल्यामुळे पेशवेकालीन भाषा अजमावण्यास तो नमुना उपयोगी पडणार नाही. त्याला त्या काळचा व्यावहारिक पत्रव्यवहारावरून मिळणारा नमुनाच पाहिला पाहिजे. पेशवेकालीन भाषेंमधील निरनिरनिराळया बाबींचा उलगडा पुढे केला आहे.

**वर्णप्रक्रिया—स्वर.** ( विकृत स्वर कंसांत दिला आहे.)

| आदि | मध्य | अन्त्य |
|---|---|---|
| अ—क्रपा (ऋ), सवराय( ॅ) जैसे ( अ ) | ठराविला ( अ ), साडम्बर ( आ ), अपरमित, उदासन ( इ ) धृतानसार ( उ ) | मूत्य, हेत ( उ ) |
| आ—लाखोटे, शाह, माजोरी, ( मुजोरी ) माहाभारत ( अ ) | | |
| इ—द्रिस्टि ( ऋ ) क्षिणक्षिण ( अ ), समरिसी ( ऋ ) | | |
| उ—द्रुस्टि ( ऋ ), कर्तुत्व ( ऋ ), विरुध्य ( उ ) | | |
| ए—येथास्थित्त (अ) येश, (य) संशये, येथाज्ञान, पारायेण ( अ ) | | वेस्तावेस्त ( अस्ताव्यस्त ) |
| ऐ—बैसला, ठैराव ( अ ) | | |
| ओ—दिसोन, भरोसा, दढोतर (दढतर) (ऊ) | | |
| औ—भौंश ( ॱ ) | | |
| संयुक्त—औघा ( अवघा ), | आपल्याधीन | |
| वियुक्त—मुख अवलोकम, ईश्वरी इच्छा, आइकणें, सवशय, उदिया | | |

**वर्णप्रक्रिया—व्यंजनें.**

| | आद्य | मध्य | अन्त्य |
|---|---|---|---|
| क | | पुरस्कर ( स ) | |
| ख | | पखवाणी ( क ) | मख्त (क) |
| ङ | | तङ्गचाई ( ण ) | |
| च | | राचकारण, पुण्याचबळ ( ज ), फडच्या ( श ) | |

शुद्ध तालव्य— विच्यार, च्यार, प्रयोज्यन, भोज्यनास, राज्यास.

| | आद्य | मध्य | अन्त्य |
|---|---|---|---|
| छ | | वसोछर्ग, वसोछार्ग, संवछर (त्स) | |
| ज | जाली, जाहाली (झ) | त्याजप्रमाणे ( च ) | औरंगाबाज ( द ) |

| | | |
|---|---|---|
| ड | लडाई ( ढ ) | |
| ण | धण्याचे ( न ) | कुलीण (न) |
| द | सकलाद ( Sack-cloth ) | |
| न | वर्तनुक ( ण ) | सामद्दान (म), बातनी (म) |
| फ | शफत ( प ) | |
| ब | हुबरीतुबरी ( म ) | |
| भ | | डाळिंभे ( ब ) |

म—मंधु (ब), मांधून (ब), परमाणगी ( व )

| | | |
|---|---|---|
| य | युध्य | |
| र | त्याजकरून ( ड ) | |
| ल | बदलामी ( न ), गलबळ (ड) | |
| व—वलख ( ओ ) | वोक | |

श—शांमा, शेनापती, स्नत (स) सांडश्वर, वर्श, हर्शमार्ष, औशध.

ष—षोध ( श )

| | | |
|---|---|---|
| स—सिञ्या (श) | रसानगी ( व ) | गोस्ट ( ष ) |
| ह | काहाडणें ( ढ ), ठह्रतील | |
| ळ = त्ल | सुरत्लीत, कत्लावे | |

वर्णागमः—काहाडणें, ठहरणें ( ह ) विज्यापुर, विच्यार ( य ).

वर्णलोपः—सकलाद ( सॅकक्लॉथ ), निर्गल ( निर्‌अर्गल ), सियासहसायु ( एका 'सह'चा लोप ),

राजकी वर्तमान ( यलोप ), प्रकर्ण, प्रजन्य ( पर्जन्य ).

'य' हा नेहमी 'ये' म्हणून उच्चारिला जात असे.

तृण—तृण, तृण, त्रुण, त्रण } इतक्या प्रकाराने लिहीत असत.
श्रुत—श्रुत्र, श्रुत, श्रृत

वर्णसंभ्रमः—ज्या वर्णांबद्दल संभ्रम होई असे वर्ण त्यांच्या उदाहरणांसह खाली दिले आहेत.

अपसूक—अपसूत, अपसूप; निपचीत—निपचीप, उघडीप—उवडीक, पुरस्सर—पुरस्कर, जपणे—जतणे, पर्यायेकडून—पर्यायेकरून, मुखेकडून—मुखेकरून, अदमासे—अजमासे, निजसुरे—निदसुरे, नित्सुरे; यथास्थित—यथास्छित, गुजरणे—गुदरणे, नुकसान—लुकसान, तसबीर—तजबीर, तसवीस—तजवीस, नजर—नदर, खाजगी—खासगी, खानगी; मिनेदार—मिनेगार, वाजवी—वाजबी, मेजवानी—मेजमानी, पंचेताळीस—पंचेचाळीस, सदतीस—सडतीस, सततीस; तरबेद—तरबेज, जहांबाज—जहांबाद, अमदाबाद—अमदाबाज, किमखाप—किनखाप, तावडतोब—तावडतोड,

वरील उदाहरणांवरून असें दिसेल की पेशवाई भाषेंत खालील वर्णसंबंधी संभ्रम होत असे.

स्><त्, ज्><द्, न्><ल्, च्><त्, प्><त्.

वर दिलेल्या स्वरप्रक्रियेच्या उदाहरणांवरून ज्या गोष्टी प्रामुख्याने नजरेस येतात त्या ह्याः—

१ बहामनीकालीन व शिवकालीन मराठीभाषेंत उच्चाराच्या बाबतींत आर्यवंशाची मराठी आणि मोगल अथवा तुराणी वंशाची फारशी ह्या दोन भाषांमध्ये जो झगडा सुरू झाला तोच पुढे पेशवेकालांतहि चालला. एकीकडे मातृभाषेंतील जन्मापासून किंवा आनुवंशिक प्राप्त झालेले उच्चार आणि दुसरीकडे राजदरबारांत व इतर व्यवहारांत क्षणोक्षणीं कानावर आघात करणारे राजपुरुष आणि त्यांचें अनुकरण करणारे इतर पांढरपेशे उपजीवी नोकर यांचे उच्चार ह्या दोहोंमध्ये तो झगडा चाले. फारशीचा परिणाम कंठ्य, दन्त्य—तालव्य वर्ण, महाप्राणमिश्रित वर्ण इत्यादि वर्णांच्या बाबतींत जास्त दृग्गोचर होतो.

२ शब्द व्यंजनान्त न उच्चारितां स्वरान्त उच्चारण्याची जी लकब मराठी भाषेने प्राकृत व अपभ्रंश भाषांपासून उचलली तीच मराठीने फारशी भाषेवर लादली. उदा. गुजरान्, निशान् वगैरे फारशीमधील जे व्यंजनान्त शब्द मराठींत आले ते सर्व स्वरान्त झाले.

३ ह्याच प्रवृत्तीने शब्दांत अंगभूत असलेलें आंतर व्यंजन सुद्धा स्वरान्त झालें. उदा. सर्कार>सरकार, अप्कारी>अपकारी, जर्तार>जरतार.

४ ह्याच्या उलट फारशी भाषेची एक लकब शब्दामधील 'अ' निभृत म्हणजे अस्पष्ट किंवा अर्धा, तोकडा उच्चारण्याची मराठींत आली. उदा. गव्त्, नव्ल् इ..

५ ए, ऐ, ओ, औ हे उच्चार जेव्हा शब्दाच्या आरंभीं येतात तेव्हा त्यांचा उच्चार ये, यै, वो, वौ असे केले जातात. ही लकब सर्व द्राविडी भाषांमध्ये आहे. तीच पेशवेकालीन मराठीने कानडीच्या संसर्गाने उचलली असावी.

ऐसीजे > यैसीजे, ऐवजी > यैवजी, यथा > येथान्याय,

एक > येक, ओक > वोक, औषध > वौषध, वोषध.

६ मूर्धन्य, तालव्य, व ऊष्मवर्ण ह्यांच्या उच्चाराच्या बाबतींतहि द्राविडी भाषांचा संसर्ग दिसून येतो.

**नामविभक्ति.**

| | | सर्वनामें |
|---|---|---|
| लिंग | हला, सला हे शब्द स्त्रीलिंगी वापरीत असत. तफावत ( पुल्लिंग ) | जे, हे, ते ( स्त्रीलिंग ) |
| प्र. | गोष्टी, खाम, अनीत, यादी (अनेकवचन) हेत, मृत्य, प्रकृत | कोण्ही, कोन्ही |

द्वि. (प्रत्यय स,सी.) पुणियास, नबाबासी, डेरियासी, साहेबा, मरतीया ( कलावे )

तृ. (प्रत्यय एँ,हीं.) जबानी (सांगता), नबाबाहीं, जातीनशी–सी प्रकारें, घाटें, चोरटीयांनीं, श्रीमंताहीं, राजश्रीहीं — त्याणीं, याणीं, कोणे, कोणे प्रकारे

पं. (प्रत्यय हून.) (तलेगांवीहून आला आहे) होऊन ह्या ल्यबन्तापासून 'हून' हा प्रत्यय आला आहे.

ष. (प्र.चा,स,ला.) मियाखानास निषेध ( चा ) — आपल्याले, कोण्हाचा, कुणाध्याने

स.(प्रत्यय इँ,आँ) रायपुरीं, (आम्ही) सातारा ( गेलों ), रात्रौ.

सामान्यरूप—–हत्तीची लडाइमंधी, पुणियास, याचे सिंगी, हातची बंदखेचा गोळा. चांभारगोंदेयास, पेशवियांची, शहरबाहेर, रतकियावर, उपाध्येयास, बोललियाचा अर्थ, यादीवरी, कारखानेयात, पुणेयांत, असेलिया, मुराररराव सोंडुरावर आहेची खबर आली. [वाक्यास विभक्तिप्रत्यय लागला आहे.]

विशेषणें—–१ विशेष्याच्या पुढें विशेषण. उदा. खुळ मातबर, सरदार मातबर. २ विशेषणाचें सामान्यरूप झालें. उदा. कितीका दिवसात, दो चौ घटकास, कुली ठाणीं, वरचील. ३ नासमज माणूस फटकाल गोष्टी, बुर्डिवी पेटारा, आम्ही पुर्वी केवढी होतो.

| क्रियाविभक्ति. | प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु. |
|---|---|---|---|
| वर्तमान | ( आपणच ) आहेत (आम्ही, ऐकतोंत, ( आम्ही कारांत ) येत नाहींत. | | बोलताती, म्हणताती, आहेती, असेति, म्हणताहेत. |
| भूत | मागो, जावो, करो (हीं रूपें आशीर्लिङ्गापासून आली कीं काय ?) | तुम्ही आलेस् | बैसला, दिधल्या, बळावला, निर्गला, जाला, एकिले, बोलिले. |
| भविष्य | (आम्ही) करून, जाऊन | | (स्थापना) होय (ऐशी केली पाहिजे) (विकल्प) आसल, (उपयोगी) पडे (ऐसा). |

आज्ञार्थ (लाऊन द्याल तर न) लावणें. (रोजमरा द्यावा) लागतो. ( तूं ) येणें.

विध्यर्थ (बहुत काय) लिहिणें.

तुमन्त म्हणो ( लागले ), सांगू ( पाठवितो ), (शब्द) लागों (दिल्हा नाही)

ल्यबन्त कृपाळून, पुसोन, फिरोन, जुपून

कर्मणि कृपा कीजे, लिहिजे, दीजे

णिच् —

अकरणरूप—ठेवळे न पाहिजे

कृदन्त लिहिलीं (आलीं), ठेवरे ( ठेवी ), बोलाऊन करून.

जेवण्यासी, मिळताऊ, पोहणाऊ, होये न होये करावें, घराऊ.

अव्ययें.

क्रियाविशेषण अव्यय—परिच्छिन्न. अविलंबेच [करतो], उपरांतीक, रुपरांतीक, निश्चयरूप, वरचेवरी, मागती, बहोत, मधल्यामधी, आतल्याआत, शहरबाहेर, लवनि, मिथ्य, देखतदेखत, महिनाभरा, जवळी, उपरा, वरी, जात्येसमई, यैवजी, उदियाआजी, सदंतर, कालीच, कालकाला, यदारंभी, गेल्यादारम्य, आल्यादारम्य, क्षणक्षण, तऱ्ही, जऱ्ही.

उभयान्वयी—-म्हणौं, होयेस्तवर, म्हणवून, त्यास.

शब्दयोगी—- (विप्रामाणसा) वाचून, ( आज्ञापत्र ) समागमे मलोजी (पावलें), तुम्हा सांगाते.

## नामविभक्तिप्रत्ययावरून उघड दिसणाऱ्या बाबी.

१ यादवकालीन प्रथमेचा प्रत्यय 'उ' हा शिवकालापर्यंत होता. पेशवाई मराठीमध्ये तो फारसा आढळून येत नाही.

२ सामन्यरूप चमत्कारीक तऱ्हेने होत असे. उदाः— हत्तीची लढाईमध्ये.

३ विभक्तीचे प्रत्यय कधीकधी वाक्यास लावीत असत.

४ सामान्यरूप हें षष्ठी विभक्तीच्या प्रत्ययाच्या अवशेषापासून बनलें आहे असें मानतात. परंतु त्याहून भिन्न असें एक मत पेशवेकालीन भाषेच्या पुराव्यावर पुढे येणें शक्य आहे. सार्वनामिक प्रत्ययावरून तें बनलें असावें असें वाटतें. उदा० :— "पुणे यास, कारखाने यांत, उपाध्ये यास, बोलणें याचा, इतकियावर ह्या रूपांवरून पुण्यास, कारखान्यांत, उपाध्यास, बोलण्याचा, इतक्यावर, हीं रूपें बनलीं.

५ विशेषण आणि विशेष्य ह्याचा स्थानभेद.

## पेशवेकालीन मराठी शब्दविशेष

पेशवेकालीन मराठीमध्ये जे कांहीं मनावर ठसण्यासारखे व जोरदार असे शब्द आढळतात त्यापैकी कांही खाली देतों.

अक्षतमरिष्ट, इदंन्याये, उभामार्ग (जकात), उपरोधिक (कमीअधिक), अपरोक्ष, इतला, उचापत, उपरशब्दी, आंतरभाव, बाहेरभाव, उपरान्त, आमदरफ्त.

कुष्टपिष्ट, कटकट, कमकसर, गर्गशा, (फौजेचा) गाहा, घावडाव, कुचोद्य, करार (नक्की), खामखा खानखा, खायेमखा, किलावा, कौल, कमरबंदी, छिटपीट, जंगजोड, झांवडाझांवड.

चौकी बसवणें, छबिना, जथणे.

टुमा, टक्कापैका, ठेचगा, ढालढकल, डौल, नक्षा.

तावीज, त्वष्ट, तष्ट; दबाव, द्रामुषाण, धातुपोषण, निरवणूक, स्यादारम्य, दुरंदेशी, दिलभरी, दुरोखी, निर्गमळा, तिवट, दुखणारु, दावघाव, दरद, निशा.

पोटाग, पोटतिडीग, पायगोवा, पायउतारा, फलादेश, भाईचारा, निवडिले, प्रतिपक्ष, पान्हव, पुरजे, फितवाफांदडा, भुकेबंग, मनोधारणा, पुस्तपन्हा, परिछिन्न, बेहबुदी, मल्ई, पासोडो, पैवस्ती, बाळाग्र, बदनक्ष, मवासी, पुरसीस, बिराडराखे, बजिन्नस, मनर्भाळ, रूपरान्त, लागभाग, वारापाणी (होणें), रुबरू, उरुबरू; लुगारे, वसवसा.

रासकर्दन, रफाकत.

शकटभेद, (प्रकृतांस) सावकाश, स्थलमोड, साविस्तरपूर्वक, शशोपंज, सकलाद, स्थलभरीत, सामानपूर.

हर्षामर्ष, हुबरीतुबरी, हालुखुद, हिल्लाहरक, हिसका, हरोली,

अर्थभेदः— वजीर, कारकून, हवालदार, जमादार, फडफाळ, वाडा, देवडी, राणीवसा, खबरदार. ह्या शब्दांच्या अर्थात फरक झाला आहे.

## पेशवेकालीन प्रयोगविशेष

राजकारणे करणें.
खुळ उभे करणे, माजणें.
गरिबाचा दुवा घेत असावे.
हिसका पडला, गुता उरकला.
तुमचे गोत्र घटित होळकरासी, नारोपंतासी नसते तर हे लिहिणें उचित.
ध्यानांत भरत नाहीं.
आमचे लोकांचे कैसें विकतें.
धुळीचे दिवे खात जाल.
चढ देणें, भर देणें.
होषा खादला. सिधांतसे ऐकतों.
आलस असिला न पाहिजे.
क्रिया देणें. क्रिया करणें.
क्रोधे येऊन ( नरम येऊन बोलले ).
बिडाहून पत्र आलें कीं अमल बंद केला म्हणून.
जे मुले आहेत ते राज्याकडे पाठऊन दिल्ही.
कारभाराविसी कान पाडिले आहेत.
कारभारास वाकीफ नाहीं जे तुम्हासी जावसाल करावा.
कारकून म्हणतो जे (संस्कृतच्या 'यद्'च्या धर्तीवर वाक्यरचना)
निरोपाचीं वर्खे जाहालीं.
यांचें गंतव्य होत नाहीं.
डावाडोलसे असमाधान आहेत.
या झाडास येरंड्याचीं फळें आलीं.
सर्वा गोष्टीस भयाची प्रीत आहे.
लहान माणसाचे पंक्तीस बसावें लागतें हाच मृत्य आहे.
रवानगी यैवजाची करावी. (दूरान्वय)
त्यास यैवज द्यावयासीं नाहीं.
यैसे तीन पत्रें आलीं ते आह्मास बजिनस दाखविलीं.
सेवकाचें पत्र राज्यानी पहावयास मागत असतात.

घोडा स्वाधीन नसल्यास बसणारा काय करील.
हत्तीचें तोंडीं लाकूड देऊन कार्य बिघडलें.
होणेरास उपाय नाहीं.
जीवाचा सतका माल व इजतीचा सतका जीव.
येथें फिर्याद आले आहेत.
कोणाचे डोळयांत मर्यादा राहिली नाहीं.
माणुस माणसास खावयाचा काळ आला आहे.
आपआपल्यांतच पाय तुडवितात.
जितके फितुरांत होते त्यांचें शीड उभारलें.
आपण ज्या पाण्यांत बुडा म्हणिजेल त्या पाण्यांत बुडावयास सिध आहों.
पैजार खाऊन दंतभंग जाला.
शुश्क वृक्षास पलव फुटून पुस्पित फळित होतो तद्वत्.
ईश्वराक्ष यैवज देणें तो (अन्तस्थ ह्या अर्थी)
उष्णकालीं माशाहि फार होतील. उगाच बसावें हे मर्जी.
अवसान ओळखणें.
सहजाची आरती, सहजाचा गजर.
सुनें रान सांपडल्यावर स्वापदांची प्रबलता होते.
श्रीमंताचा आमचा श्नेह चिखलपाण्या सारखा आहे. चिखल पाण्यास सोडत नाहीं व पाणी चिखलास सोडीत नाहीं. त्या चिखलमातीनें आपण इमारत बांधूं.
चार आभाळें उठलीं असतील तीं उठतील.
श्रमी चाकर, दुष्मन बराबर.
दिवे लावणीचा कौल देऊन रयत आणिली पाहिजे.
चिखलाचे बाहुलीस जसा चिखल पाहिजे तितका लावावा व पाहिजे तितका काढावा तसा प्रकार हा नव्हे.

कलीचा वास जेथें तेथें श्रीचा अभाव.
मनुष्य मनुष्या खाऊं म्हणतो.
उदक स्वच्छ गोड हि त्यासारखे तेंच.
नोसल्यास येऊन थोडाबहूत खंडदंड करून येऊन भेटला.
चक्रनीस सावकाश नाहीं.
जमावाचा डौल दाखवावा.
कल्पवृक्षाखालीं झोळीस गांठी द्याव्या हें अपूर्व.
सखारामपंत केवळ कोशकीटकाप्रमाणें कैद झाले.
चौघांनीं चारी तनवा धरल्यावर शिबीर उभें रहातें.
अंगावर आल्या गोणी, बळी चढे दुणी.
लढाईचा दंगा पुरवतो, उपासाचा दंगा पुरवत नाहीं.
गेल्याचें घर, मेल्याची बायको.
उदकापासून वृक्ष झाला त्याला उदक तारतें, बुडवीत नाहीं.
विना माणसावाचून भिंती भांडत नाहींत.
टीच भरली; चमक भरली.
भियाल्याची खूण मेल्यावाचून जात नाहीं.
ससयाचे पारधीस वाघाचे पारधीचें साहित्य करावें लागतें.
जैसें मरतिया अमृतपान द्यावें, यैसें जालें.
ना अस्मान ना जमीन असा प्रकार जाला.
सूक्ष्मत्वलमातिपल्लवितेम.
आम्ही कच्चा धाग्याचे बांधलेले आहोंत.
विहिरींत उतरून शिडी काढून घेतली. बरें, ईश्वरसत्ता.
ब्राह्मणाची व्यवस्था होय यैशी केली पाहिजे.
हत्तीची लढाईमधीं मरण झाडाचें.
स्वामीचे चरण सेवकाचे मस्तकीं आहेत.

( माझें डोकें आपल्या चरणावर आहे याच्या उलट )
अंगुष्टाच्या दशाशीर करून दाखवितात.
तथापि आपण कूर्मदृष्टीचे देखण्यांत कमी न करावी.
त्यांची बुधि अल्पायु आहे.
चिरंजीव व्यवहार कांहीं दिसत नाहीं.
आमच्या बाहीमध्यें आग ठेविली आहे.
दुर्ग जर दुर्गामध्यें राहिला तर कसे.
मिठाचे उणेपणानें लवणशाकाचे वाईट होईल.
बिसंचा संच करणें.
कोणाचें मडकें कोणाच्या मडक्यांत नाहीं.
असत्या पदार्थी बापू थोर.
मुखश्री दिसत नाहीं.
असा हिसका पडेल हें कानींमनीं नव्हतें.
ऊब जिंकणें.
फौज फिरे कर्ज मरे.
सुटले केश पाठीस शरण.
टका पैका.
बिगाड करील तर खिपत खातील.
मर्यादा परागंदा होते.
कोळसा उदकें उगाळितां सारें उदकच काळे, तेव्हां उदक व रंग मिवडूं जातां कसें घडेल ?
अकलेच्या भरें क्षीर नीर वेगळे करणार येसा क्वचित.
एके बाईकोस दोन भ्रतार ते श्रेहे चालतात हे कसे घडेल ?

———

# अभिप्राय

**हिंदुसमाज समर्थ कसा होईल ? :—** ( ले. महादेवशास्त्री दिवेकर, मूल्य १ रुपाया. )

हिंदुसमाजोद्धारक वाङ्मयमालेंतील हें पहिलें पुस्तक असून त्याची दुसरी आवृत्तिहि निघाली यावरून पुस्तकाची लोकप्रियता सिद्ध होते. लोकजागृति करणें हा उद्देश पुढे ठेवून दिवेकरशास्त्री आपलीं पुस्तकें लिहीत असतात. उद्देश सफल होईल अशा तऱ्हेचें प्रस्तुत पुस्तक वठलें आहे ह्यांत संशय नाही. सर्वांत अत्यंत क्लिष्ट प्रश्न म्हणजे हिंदु कोण हा होय. शास्त्रीबोवांनी श्री. सावरकर यांची व्याख्या मान्य केली आहे, परंतु ती सर्व विघ्नहरती आहे असें आम्हांस वाटत नाही. हिंदुस्थानाला जो आपली पितृभू व पुण्यभू समजतो तो हिंदु ह्या व्याख्येने सर्व अडचणींचा परिहार होत नाही. लिंगायत हे हिंदुस्थानाला पितृभू व पुण्यभू मानतात. हिंदुस्थान ही त्यांची पुण्यभूमि होय; तथापि शास्त्रीबोवांच्या हिंदूंत समाविष्ट होण्यास ते तयार नसल्यास पुढे काय करावयाचें ? पारशी हे संस्कृतीनेहि हिंदूंना जवळ आहेत. त्यांना हिंदु कां मानूं नये ? उद्या अफगाणिस्थान जिंकून हिंदुस्थानांत सामील केलें व आम्ही हिंदू त्या देशांत वसाहत करून राहूं लागलों तर आमचें हिंदुत्व जाणार काय ? बरें बिझांटबाई आपणांस हिंदु म्हणविते ती सावरकरांच्या व्याख्येने बाहेर पडेल त्याचें काय ?

तात्पर्य, हिंदु शब्दाची व्याप्ति ठरविणें दुःसाध्य कर्म आहे. जो आपणांस हिंदु म्हणवून घेईल तो हिंदु ह्यावर अखेरीस येतें; पण तितक्यानेहि काम भागतें असें नाही; म्हणून हिंदुसमाज जोपर्यंत निश्चित करतां येत नाही तोपर्यंत त्या समाजाच्या उत्कर्षाचे उपाय धुंडाळणें फोल आहे. आमच्या मतें हिंदु कोण हें निश्चित करण्याकरितां एक मोठी परिषद भरवावी. ह्या अखिल भारतपरिषदेंत दुसरें कोणतेंहि काम करूं नये. पुस्तकें लिहिण्यापूर्वी शास्त्रीबोवांनी अशी परिषद भरवून हिंदूंची व्याख्या स्पष्ट करून घ्यावी अशी आमची त्यांस सूचना आहे.

**कथासंग्रहः—**संग्राहक वा. त्रि. भाटे, एम्. ए., व ना. रा. सखदेव बी. ए., बेळगांव, किं. १ रुपाया

ह्यांतील कथा अथवा गोष्टी सामान्य आहेत. मुलांना करमणुकींत ज्ञान प्राप्त करून देणाऱ्या अशाहि कांही गोष्टी आहेत. डॉ. साठे यांस लघुकथालेखनकला चांगली साधेल असें भाकीत करण्यास हरकत नाही. विद्यार्थ्यांकरिता म्हणून लिहिलेल्या कथांत लीलेची गोष्ट नसती तर बरें झालें असतें. 'भाव तसा देव' ही गोष्ट चांगली आहे. एकंदरींत मुलांना वाचण्यालायक पुस्तक आहे.

ना. गो. चापेकर.

# परीक्षण.

**माझें रामायण** :— ( लेखक दत्तो अप्पाजी तुळजापूरकर बी. ए. एलूएल्. बी., मुंबई, किं. १। रु.) ' माझें रामायण ' ह्या कादंबरीचें परीक्षण करावयाचें म्हणजे ' माझें भारत ' तयार करणें होय. कारण श्री. तुळजापूरकर यांनी या कथानकाच्या मिषाने अनेक विषयांचा ऊहापोह केला आहे. हे सर्व विषय असेच आहेत की, प्रत्येकाला आपल्या आयुष्यांत त्यांत लोळण घेणें भाग पडतें. माझ्या मतें प्रत्येक स्त्रीने ही नवलकथा जवळ बाळगून या रामायणाचीं पारायणें करावीं इतक्या योग्यतेचें व महत्त्वाचें हें पुस्तक आहे. श्री. तुळजापुरकरांची आजपर्यंतची सर्व तपश्चर्या या ग्रंथांत ओतली आहे असा भास होतो. मात्र ग्रंथकर्त्याचें प्रस्तुत पुस्तक हें पहिलें व शेवटचें बालक न ठरो म्हणजे झालें.

पूर्व टीकाकारांनी ( सर्वांनीच नव्हे ) या कादंबरीवर अभिप्राय देतांना अश्लीलतेचा आरोप ग्रंथकर्त्याच्या माथीं लादला आहे. माझ्या मतें हा आरोप निराधार आहे. संततिनियमनाची चर्चा इष्ट असो वा अनिष्ट असो, ती एक समाजांत रूढ झालेली बाब आहे. तरुण मुलगे या मार्गाचें अवलंबन करतात. सहल करण्यास बाहेर पडलेल्या सभ्य व सुशिक्षित गृहिणी या विषयाची रस्त्यांतून चर्चा करतांना मीं ऐकलें आहे. मग रा. तुळजापुरकरांनी आपल्या कादंबरींत तो विषय पुढे आणल्याबद्दल त्यांस दोष कसा लागतो हें मला समजत नाही. उलट त्यांनी शिष्टाचाराचें यत्किंचितहि उल्लंघन न करतां मोठ्या कुशलतेने संततिनियमनाच्या या विशिष्ट प्रकाराचा फोलपणा व त्यापासून कौटुंबिक सुखांत माती कालवली जाण्याचा संभव हे लोकांच्या निदर्शनास आणले आहेत. याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. मला थोडा अश्लीलपणा भासतो तो ' व्रताचें उद्यापन करण्याचें काम दोघांचें' ( पा. ३३१ ) ह्या वाक्यांत. तसेंच ' वाहवारे मामंजी ' व ' पुण्यांतले एक गोरे गोमटे वकील ' या दोन भागांतल्यासारखी प्रतिष्ठित समाजांत बिनमुरवत वावरत असलेली घाण चव्हाट्यावर आणणें हें कादंबरीकाराचें पवित्र कर्तव्यच आहे असें मला वाटतें. आपल्या अनाथ झालेल्या हतभागी सुनेवर पापदृष्टि ठेवणारांची उपेक्षा करून कसें चालेल ! चांभाराच्या देवाला पायपोसांची पूजा लागत असते. तात्पर्य, या बाबतींतहि तुळजापूरकरांना नाकें मुरडणें अप्रशस्त होईल यांत संशय नाही. घरोघरीं घाण असतेच, पण ती जतन करून ठेवावी असें कोणी म्हणणार नाही. ती अंगणाच्या बाहेर काढून टाकिलीच पाहिजे.

एकंदरीत प्रस्तुत कादंबरी सर्व प्रकाराने वाचनीय झाली आहे. ग्रंथकर्त्याचें सूक्ष्म निरीक्षण, घरगुती पण प्रौढ भाषा, सुसंगतवार मुद्दे मांडण्याची हातोटी, अनेक

लहानमोठ्या विषयांतील पारंगतता, विस्तार करूनहि चटकदारपणांत कमीपणा न होऊं देण्याची दक्षता इत्यादि गुणांच्या योगाने 'माझें रामायण' रसपरिप्लुत झालें आहे. नाना, अण्णा व विनायकराव या भिन्न स्वभावाच्या त्रिवर्ग कुटुंबांचा अनेक आपत्ति आल्या असतांहि आजन्म अखंड स्नेह, याच्या इतका दुसरा उदात्त भाग या कादंबरींत नाही. संकटांत एकमेकांस उपयोगी पडणारे स्नेही सत्यसृष्टींत आजकाल कोठे आढळतील काय ? पण पुरुषांचें राहो; ताई, वहिनी यांच्यासारख्या स्त्रिया- आपआपल्या पतींना अनुरूप ज्यांची वागणूक आहे अशा, निर्मत्सर उदार अंतःकरणाच्या, आढळणें पुरुषांपेक्षाहि दुर्घट आहे. आई मेल्यानंतर उघड्या पडलेल्या अर्भकांना "मायेच्या पदराखाली" घेणाऱ्या वहिनीबाई ह्या खरोखर भूदेवीच होत. असें उदाहरण आमच्या समाजापुढे मांडल्याबद्दल श्री. तुळजापूरकर यांचें अभिनंदन करणें अवश्य आहे. सर्वांमध्ये मला ग्रंथकर्त्याचें हेंच चित्र अत्यंत हृदयस्पर्शी व अनुपम वाटलें. ऊपेवर अब्रू जाण्याचे अनेक प्रसंग आले, त्यांतून ती पार पडली हें खरें; पण स्त्रिया ह्या संकटानुकूल असतात हा सिद्धांत ग्रंथकारांस मान्य आहे कीं नाही सांगतां येत नाही. कादंबरीला प्रारंभ तर फारच बहारीच्या पात्रांनी केला आहे. त्या व्यंग्यार्थी अथवा द्व्यर्थी पत्रांमुळे एकंदर ग्रंथाविषयीच जिज्ञासा उत्पन्न होते आणि वाचक कथानकांत एकदम बुडी मारतो. अण्णांच्या वडलांच्या अचानक भेटीसारखे कांही प्रसंग तर लेखकाचें चातुर्य सिद्ध करतात. अण्णा, नाना, विनायकराव यांच्यांतील वादविवाद म्हणजे बौद्धिक कसरतच होय. सरकीचें दूध देऊन व इतर उपायांनी बालविधवेच्या स्तनांत दूध उत्पन्न करण्याची चर्चा ह्याच नमुन्याची आहे. "माझ्या रामायणांत" काय आहे असा प्रश्न विचारण्यापेक्षा काय नाही हा प्रश्न विचारणें अधिक सोयीचें होईल 'अंगुलीनिर्देशां" त बहुतेक विषयांचा उल्लेख केला आहे; त्यावरून टीकाविषयक बाबींच्या अफाटपणाविषयी कल्पना करतां येईल. व्यवहारांत अहर्निश येणाऱ्या बाबींवर टीका करण्याचा मुख्य उद्देश सिद्धीस जावा म्हणून अनुरूप असे प्रसंग निर्माण करावे लागले, पण इतकें असूनहि गोष्टीचा धागा एकसंध असाच राहिला आहे. नाही म्हणावयाला अन्नपूर्णामाई ऊर्फ अनसूयाबाई यांचें उपाख्यान चिकटवल्यासारखा थोडा भास होतो. तथापि हा डागहि बेमालूम साधला आहे यांत शंका नाही. 'विशी एकोणिशी' ही व्हावयाचीच.

इतर अनेक बाबींप्रमाणे स्त्रियांचा स्वभावहि या कादंबरींत मार्मिकपणाने वर्णिला आहे. 'अशा ज्या बायका असतात त्यांचा मूर्खपणाहि तेवढयापुरताच असतो' (पा ५१). अगदीं खरें. मूर्खपणाला मूर्खपणानेच मर्यादा येते ही गोष्ट फार थोड्यांना कळते. तसेंच सुनेला आपल्या अगोदर मूल झालेलें दुष्ट स्वभावाच्या बायकोस सहन होणार नाही हें खरें; पण अशी बायको पातिव्रत्यविषयक आचरणांत वाईट असलीच पाहिजे असा नियम नाही. 'मिरीं नासलीं तरी जोंधळ्याला हार जाणार नाहींत !' प्रकृतिधर्मामुळे स्त्रियांचा विषय नाजूक होऊन बसला आहे,

पण हेडमास्तरीणबाईने म्हटल्याप्रमाणे असल्या गोष्टी आमच्याकडेच नाजूक वाटतात आणि पाश्चात्य देशांत तशा मानीत नाहीत असें नाही. एका साहेब कलेक्टरने मला सांगितलें की, इंग्लंडमध्ये मी माझ्यापेक्षा कमी दरजाच्या स्त्रीसमवेत नाटकाला गेलों तर तो टीकेचा विषय झाल्याशिवाय राहणार नाही; पण आमचे लोक आमच्या मुलींची टवाळी करतात, ख्रिस्ती अगर पारशी मुलींच्या वाटेस ते सहसा जात नाहीत ( ५० ), यांतलें इंगित काय असावें बरें ? सहवास कमी ह्याशिवाय दुसरें उत्तर देतां येईल काय ! देशी न्यायाधीश, मग ते हायकोर्टातला कां असेनात, आपल्या शहाणपणाचें प्रदर्शन देशी वकिलांपुढे करतात, त्याप्रमाणे युरोपियनांच्या पुढे करीत नाहीत ( पा. ५४४ ) याचें कारण तज्जातीयांच्या हातीं राजसत्ता असणें हें होय. आमचा मनुष्य कितीहि मोठा अधिकारी असला तरी त्याच्या विरुद्ध निनांवी अर्ज होत नाहीत असें नाही, परंतु तो युरोपिअन अधिकारी कितीहि हलक्या दरजाचा असला तरी त्याच्यावर अर्ज करण्यास कोणी धजावत नाही असा अनुभव आहे. आमच्या लोकांचा हा भ्याडपणाच म्हटला पाहिजे. एका अर्थी श्री. तुळजापूरकरांवरहि हा आरोप करतां येईल. त्यांनी सबजज्यांची बरीच टर उडविली आहे. ती अयोग्य आहे असें मी ध्वनितहि करीत नाही, परंतु हायकोर्टातील न्यायमूर्तीकडे त्यांचें लक्ष गेलें नाही. एका मुख्य न्यायाधीशाचा तर त्यांना सहज उपहास करतां आला असता. असो. स्टँपाकरता अडून बसणारा सबजज्ज हा सबजज्ज नसून कारकूनच समजला पाहिजे. इकडे श्री. तुळजापूरकरांना तर सरकारी नोकर हे शत्रूच्या गोटांतील हेर व्हावयास पाहिजेत ! असा काळ येण्यास अजून अवधि आहे.

" माझें रामायण " वाचतांना करमणूक होतेच, पण शिवाय नाना प्रकारची माहिती मिळून ज्ञानांतहि भर पडते. हिंदुस्थानांत आगगाडी प्रथम सुरू कधी झाली ह्या माहितीबरोबर मद्रास इलाख्यांत विटाळशांकरता गांवाबाहेर मुद्दाम बांधलेल्या विटाळशीशाळांची व राधावल्लभी संप्रदायांतले पुरुष विटाळसे बसतात ह्याहि चालीची माहिती वाचकास मिळते. वाचक मात्र ह्या सर्व माहितीचा भोक्ता पाहिजे. तसेंच श्री तुळजापूरकर वाचकांस पक्का रंग कसा करावा हें शिकवतात, त्याबरोबर भाकरीच्या पिठाच्या रसदेची ऐतिहासिक माहितीहि पुरवतात. राज्यघटना, फलज्योतिष, धर्म, रंगभूमि, वाङ्मय इत्यादि गंभीर विषयांवर भारदस्त चर्चा करण्यांत ग्रंथकाराचें कौशल्य जसें प्रत्ययास येतें तसें विनोदात्मक कोट्या करण्यांतहि त्यांचें पटुत्व दृग्गोचर होतें. झाडाचा पाला, मनांतल्या मनांत रडणें, साध्य हातीं येण्यास साधु बनावें लागतें हीं उपरिनिर्दिष्ट गुणाचीं उदाहरणें होत. मराठी वाङ्मय व मासिकें यांच्यावर त्यांनी एक व्याख्यानच झोडलें आहे. तेव्हा त्यांच्या कादंबरींत मराठी भाषेच्या अभ्यासकाला लंका, डहाळीण, कोचड, तारतळ्या, वेंघळी, कानपिचक्या इत्यादि नवे जुने शब्द हातीं लागल्यास त्यांत आश्चर्य नाही.

प्रस्तुत कादंबरींत जीं अनेक प्रचलित विषयांसंबंधी मतें प्रदर्शित केलीं आहेत

त्यांचा परामर्श घेणें योग्य होणार नाही. हीं मतें ग्रंथकाराचीं स्वतःचीं असतात हें जरी खरें असलें तरी तसे अभिप्रायलेखकास म्हणतां येणार नाही. उ. फलज्योतिषावरील अभिप्राय हा नानांचाच खरा. कायदेशीर भाषेंत त्याची जबाबदारी श्री. तुळजापूरकरांवर टाकतां येणार नाही. तथापि विद्वान् ग्रंथकार पक्षपाताच्या आरोपास पात्र आहेत यांत शंका नाही. ह्या वादविवादांत शास्त्रीबोवांना गप्प बसवून जित मया म्हणून नानांची पाठ थोपटण्यांत आली आहे. तुळजापूरकरांनी कितीहि रेवडी उडवली तरी ग्रहांचा परिणाम मनुष्यावर होतो खास. परंतु मोठी अडचण ही की हा परिणाम मापांत बसवतां येत नाही. समाजांत एका माणसाच्या कृतीचा परिणाम दुसऱ्यावर होतोच पण तो तरी कोठे निश्चित करतां येतो ? म्हणून फलज्योतिष हें मोठें अनिश्चित स्वरूपाचें शास्त्र आहे. त्याच्या नादीं कोणी लागूं नये; तरुणांनी तर त्याचा विचारहि करूं नये. असें असून मीं वकिलीचा अभ्यास केला तर अथवा धंदा सुरू केला तर मला त्यांत यश येईल का, असें आपली पत्रिका दाखवून विचारणारे तरुण मुलगे मला थोडेथोडके आढळले नाहीत. तरुणांनी प्रयत्नवादी असावें; आपल्या पराक्रमावर भिस्त ठेवावी; ग्रहांच्या अनुकूलतेचा विचार करूं नये. आकाशांतील ग्रहांप्रमाणे पृथ्वीवरील ग्रहहि अनुकूल अथवा प्रतिकूल होऊं शकतात हें विसरतां कामा नये. आकाशांतील प्रतिकूल ग्रह अनुकूल करून घेणें अशक्य आहे, परंतु भूग्रहांचें आनुकूल्य संपादणें आपल्या हातचें आहे. या बाबतींत रा. तुळजापूरकरांनी तरुणांच्या डोळ्यांत चांगलेंच अंजन घातलें यांत संशय नाही. मुंबईच्या सॉलिसिटरांवरील रोष अनाठायीं आहे असें कोण म्हणेल ? त्यांना दारूच्या गुत्यांच्या पंक्तीला दत्तोपंत तुळजापूरकरांनी बसविलें तें योग्यच आहे; पण माझ्या मतें सॉलिसीटरांच्या ऐवजी येथून तेथून सर्व कोर्टेंच, दारूचे गुत्ते व संस्थानिक एवढ्यांना त्यांनी ‘ लेखणीच्या पहिल्या फटकाऱ्यासरशी ’ नाहीसे करून टाकावयास पाहिजे होतें. ह्या कोर्टांच्या पायीं आमच्या लोकांचें कोट–अकल्याण झालें आहे. सॉलिसीटरांप्रमाणे डॉक्तरांचाहि परामर्श ह्या कादंबरींत घेतला आहे त्यांत यत्किंचितहि अतिशयोक्ति नाही असें मला वाटतें. ह्या घमेंडखोर, माणुसकी नसलेल्या व बेताची अक्कल असलेल्या लुटारू डॉक्तरांच्या शिवाय मरण आलेलें बरें असे उद्गार काढण्याचे प्रसंग अनेकांवर येतात. एकंदरींत निरनिराळ्या व्यवसायांतल्या माणसांना आपलें वर्तन निरखून पहाण्यास ह्या कादंबरीनें लावलें हा फायदा कांही कमी नाही. समाजांतील दोष घालविण्याचा हा उत्कृष्ट मार्ग आहे. ह्या दृष्टीने ‘ माझें रामायण ’ अत्यंत परिणामकारक झालें आहे ह्यांत शंका नाही. ह्याबद्दल श्री. तुळजापूरकरांचें मी अभिनंदन करतों, आणि हें आल्हादजनक परीक्षण संपवितों.

ना. गो. चापेकर

---

# आयुर्वेदसंहितांमधील शारीरसूत्रें

लेखांक २ रा

( लेखकः—मल्हार विनायक आपटे )

## चिकित्साव्यवहारांतील अनुभव.

देहाबाहेरील सृष्टिव्यापार आणि देहव्यापार यांचें अवलोकन करून उपमेनें कफ-वात-पित्तांचें सूत्र पूर्वाचार्यांनी बसविलेलें होतें, तेंच रसरक्तविषयक अनुभवामध्ये गोवून घेऊन सुश्रुतांनी किती कुशलतेने वाढवून घेतलें हें मागील लेखांकांत पाहिलें. आता सुश्रुतांनी चिकित्साव्यवहारांतील आपल्या विशेष अनुभवावरून शारीरविषयक ज्ञानांत कोणती महत्त्वाची भर घातली हें प्रस्तुत लेखांत पहावयाचें आहे. शरीराचें पोषण अन्नाने होतें हा सामान्य अनुभव आहे. परंतु वैद्यकाचा त्यांतल्या त्यांत बारकाईचा विचार असा की हें अन्न पचनीं पडून त्यांतून जो ' रस ' उत्पन्न होतो त्यानेच खरोखरी देहांत भर पडते किंवा देहाची झीज भरून निघते. अन्नाचा जो भाग रसांत रूपांतर पावूं शकत नाही तो पोषणाच्या दृष्टीने निरुपयोगी होय. म्हणून अवैद्य अन्नमय प्राण म्हणेल तर वैद्य रसमय प्राण म्हणेल असा दोहोंत भेद पडतो. शरीराचा कोणताही व्यापार यथायोग्य रीतीने चालणें ही गोष्ट रस यथायोग्य आणि भरपूर उत्पन्न होण्यावर अवलंबून आहे हा एक अनुभव आणि शरीरव्यापार हे वात-पित्त-कफाचे व्यापार होत हा पूर्वकल्प यांचा मेळ घालण्याकरता सुश्रुतांनी वातादिक त्रिदोष रसांसह रक्तांत असतात असें प्रतिपादन केलें, आणि शेवटीं रक्त हेंच शरीराचा जीव कीं प्राण असें म्हटलें हें पूर्वी दाखविलेंच आहे.

**पूर्वीचा अनुबंध.**

शरीराचे व्यापार कोणत्याही रीतीने बिघडोत, ते जोंवर वातादिकांनीच चालतात हा आपला पूर्वकल्प कायम आहे तोंवर वातादिकांतच विकार झाला आहे हें अनुमान ओघानेच निघतें. एकाद्या ठिकाणची हालचाल बंद पडली की तो वाताचा विकार ठरतो; संज्ञालोप झाला तरी वाताचा विकार ठरतो; आग, जळजळ झाली की पित्ताचा विकार ठरतो आणि जडपणा, थंडपणा आला की कफाचा विकार ठरतो. हें वर्णन करण्यामध्ये शरीरांच्या अवयवांच्या ज्ञानाची मुळीच अपेक्षा नसते आणि औषधी क्रियेचेंच क्षेत्र घेतलें तर त्याची जरूरहि नसते. उलट, औषधी क्रियेच्या प्रयोगावरून अशा अवयवांचें ज्ञान होणें हेंहि शक्य नसतें. समजा आपणांला पडसें आलें, डोकें जड झालें, नाक वाहूं लागलें इत्यादि विकारांवरून कफविकार झाला आहे असें आपण म्हणूं. आता यावर उपाय म्हणून आपण नाकतोंड शेकून काढलें. गवती चहाचा काढा घेतला आणि पांघरुणें घेऊन निजून राहिलों. चार घटकांनी आपल्या अंगातून बराच घाम निघून गेला, लघ्वी झाली, नाकांतील स्राव पातळ झाला, अंग हलकें वाटलें. तर केवळ एवढ्याच अनुभवावरून आपणांला काय कळेल ? उबेचा परिणाम नाकांतील अमूक एका अवयवावर झाला, पोटांत गेलेलें पाणी अमूक एका वाटेने मूत्राशयांत उतरलें असा शरीररचनेचा जो तपशील तो एवढ्यावरून कळणार नाही. परंतु पूर्वकल्पाला अनुसरून ही चिकित्सा कफ जिंकणारी आहे असें मात्र खात्रीने म्हणता येईल आणि या ज्ञानाचा उपयोग असा प्रसंग पुनः उद्भवला असतां खात्रीने करतां येईल.

**विकृतिवर्णनाचा संकेत अवयवनिरपेक्ष**

येथे कोणी शंका घेतील की कफाचा उल्लेख येथे केल्याने जर आपणांला कांही अधिक ज्ञान लाभत नाही तर त्याचा शास्त्राला उपयोग तरी काय ? त्याचें उत्तर असें आहे की केवळ अनुभव एकावर एक रचणें हेंच शास्त्राचें कर्तव्य आहे असें नाही तर ते अनुभव पुनः प्रसंग पडेल तेव्हा मनश्चक्षूपुढे उभे करतां यावे याकरता सुटसुटीतपणें जपून ठेवण्याची व्यवस्था करणें हेंच एक कर्तव्य आहे. परिभाषा, संकेत वगैरे सर्व गोष्टी याचकरता लागत असतात. कफविकार असें उच्चारल्याबरोबर पुष्कळशा अनुभवाच्या गोष्टी एकदम डोळ्यापुढे उभ्या राहतात आणि अमुक चिकित्सेने कफ जिंकतां येतो म्हणण्याने पुनः त्या विकृति नाहीशा होतात असा अर्थ प्रकट होतो. जें वर्णन करावयास पाचपंचवीस शब्दही पुरले नसते तें वर्णन एका शब्दाने भागलें हा शास्त्रीय दृष्ट्या मोठाच फायदा आहे.

संकेताचा शास्त्रास उपयोग; त्याचें उदाहरण.

आता दुसरें एक उदाहरण घेऊं या. समजा एका मुलाला झटके येऊं लागले, मुठी वळूं लागल्या, पाय वेळोंवेळीं आपटूं लागले, डोकें फिरूं लागलें आणि हनुवटीचें हाड घट्ट बसलें. हीं लक्षणें पाहिल्याबरोबर मुलाला वातव्याधि झाला आहे असें आपण म्हणूं, कारण हालचाल वायूची आहे हा आपला पूर्वकल्प आहे. आता अनुभवाने आपणास ही गोष्ट कळून चुकली असेल की एखाद्या ब्राह्मीसारख्या औषधाने या व्याधीचा उपशम होतो तर हें औषध वातशामक आहे असें वर्णन सहजच येतें तें करतां यावयास शरीरांतील मांस, शिरा, धमनी वगैरे कोणत्याही अवयवाच्या ज्ञानाची अपेक्षा नसते. किंबहुना या अवयवांचें जरी ओतप्रोत ज्ञान असलें तरी ब्राह्मीचा उपयोग अमुक व्याधीवर होतो ही गोष्ट ब्राह्मीचा प्रयोग रोग्यावर केल्याशिवाय कदापि समजणार नाही. एकूण आयुर्वेदसंहितामध्ये अमुक रोग वाताचे किंवा अमुक औषध वात जिंकणारें आहे असें म्हटलें आहे एवढ्यावरून शरीरांतील अमुक अवयवांत बिघाड आहे असा त्यांचा अभिप्राय आहे असें कदापि सिद्ध होणार नाही. ही गोष्ट येथे मुद्दाम सांगण्याचें कारण असें की अमुक व्याधि या वातव्याधि होत असें सुश्रुतांत म्हटलें आहे; आणि वातव्याधि म्हणजे नर्व्हचे रोग, म्हणून वात म्हणजे नर्व्हस् फोर्स आणि वातवाहिनी म्हणजे नर्व्ह वगैरे विचारसरणी कांही जणांनी स्वीकारली आहे ती सर्वथैव चुकीची आहे हें नीट लक्ष्यांत यावें.

याबाबत आणखी एक उदाहरण

सुश्रुत काय किंवा चरक काय दोघांनी ही वातव्याधींची चिकित्सा औषधांनीच करावयास सांगितली आहे. अर्थात् पुष्कळशा पित्त-कफांच्या व्याधींवरहि औषधी उपाय सांगितले आहेतच. यासंबंधी ग्रंथकारांची साहजिक कल्पना अशी की अन्नाप्रमाणे पोटांत दिलेलें औषधसुद्धा रसाच्या मार्गानेच हरएक ज्ञानकर्मेंद्रियास पोंचतें. ही कल्पना जितकी सहज सुचणारी तितकी ती यथार्थहि आहे. आता ज्याला केवळ व्याधि आणि त्यावर औषधी उपाय यांशींच कर्तव्य असेल झाला हा मार्ग प्रत्यक्ष पाहण्याची किंवा माहीत असण्याची अवश्यकता आहे असें नाही. तथापि त्याविषयी त्याच्या मनांत जिज्ञासा साहजिक उत्पन्न होईल आणि ती तृप्त करून घेण्यासारखी कोणतीहि संधि तो वाया जाऊं देणार नाही एवढें खास. एकूण प्रस्तुत संशोधनविषय हा ठरतो की अन्नापासून उत्पन्न होणारा, सर्व ज्ञानकर्मेंद्रियांना आपआपल्या कामीं समर्थ करणारा, आणि म्हणूनच वात-पित्त-कफाचें वाहन असलेला, तसेंच प्रसंगविशेषी औषधांनाहि त्या इंद्रियाप्रत पोंचविणारा 'रस' कोणत्या मार्गांनी शरीरांत पसरतो ?

रसवह मार्गाविषयी जिज्ञासा

चरकसंहितेच्या सूत्रस्थानाच्या अखेरीस २८ व्या अध्यायांत आहाररसाची देहधातूमध्ये परिणति आणि देहधातूंची आरोग्यावह अभिवृद्धि यांचें अतिशय मार्मिक विवेचन केलेलें आहे. या अध्यायाच्या पहिल्याच वाक्यांत असें म्हटलें आहे कीः—

विविधं अशितपीतलीढखादितं ... ... ... .... अनुपहतसर्वधातूष्ममारुतस्रोतः केवलं शरीरं उपचयबलवर्णसुखायुषा योजयति, शरीरधातून् ऊर्जयति ... ... ॥

अन्नरसाने शरीराचें पोषण यथायोग्य होतें. पण केव्हा ? सर्व शरीरधातूंमध्ये रस घेणें आणि मल उत्पन्न करणें या कामीं उपयोगी पडणारा जो धातूष्मा तो आणि रस सर्वत्र पोचविण्याचे जे मार्ग आहेत ते ( मारुतस्रोत = वायूचे मार्ग ), जर ठीक असतील तर. या ठिकाणीं जी रसवह मार्गांची अपेक्षा प्रकट केली आहे तीच शेवटच्या म्हणजे तिसाव्या अध्यायांत पुरी करून दाखविली आहे, ती अशी :—

अर्थे दश महामूलाः समासक्ता महाफलाः
महच्चार्थश्च हृदयं पर्यायैरुच्यते बुधैः ॥ ३ ॥
तेन मूलेन महता महामूला मता दश ।
ओजोवहाः शरीरेऽस्मिन् विधम्यन्ते समन्ततः ॥ ८ ॥
यत्सारमादौ गर्भस्य यत्तद्गर्भरसाद्रसः ।
संवर्तमानं हृदयं समाविशति तत्पुरा ॥ १० ॥
यस्य नाशात्तु नाशोऽस्ति धारि यद् हृदयाश्रितम् ।
यः शरीररसः स्नेहः प्राणा यत्र प्रतिष्ठिताः ॥ ११ ॥
तत्फला बहुधा वा ताः फलन्तीति महाफलाः ॥
ध्मानात् धमन्यः स्रवणात् स्रोतांसि सरणात् सिराः ॥ १२ ॥

" सर्व इंद्रियांत अधिक महत्त्वाचें इंद्रिय म्हणजे हृदय. शरीरांत हृदयाविना कांहीच अर्थ नाही. म्हणून त्यालाच ' महत् ' आणि ' अर्थ ' अशीं नावें दिलीं आहेत. त्या हृदयापासून दहा वाहिन्या निघतात, आणि त्यांतून धसक्या धसक्याने ओज वहात असतें. शरीर उत्पन्न होतें तें या ओजांतूनच गर्भामधला रस म्हणजेच हें ओज होय. हृदय उत्पन्न झाल्यापासून त्यांमध्ये हेंच रसरूप ओज प्रवेश करितें. या ओजाचा नाश म्हणजे सर्व शरीराचाच नाश होय. हें हृदयाच्या आसऱ्याने यथायोग्य चाललें असलें तरच शरीरधारणा शक्य. सर्व शरीरांतला रस म्हणजेच हें ओज होय, हे ओज आहे तोंच सर्व शरीरावयव एकजुटीने राहतात, जणूं सर्व प्राण यांतच साठविलेले आहेत. हें ओज वाहिन्यांतून वाहतें. या वाहिन्यांचा विस्तार फार मोठा होतो म्हणून त्यांना 'महाफला' म्हणतात. त्यांत धसका असतो म्हणून ' धमन्या ', त्यांतून रस स्रवतो म्हणून ' स्रोतस् ' आणि सरकतो म्हणून ' सिरा ' अशीं नांवें पडलीं आहेत.

रसवाहक मार्गांचें वर्णन

तस्योपघातान् मूर्च्छायं भेदान् मरणमृच्छति ।
यद्धि तत्स्पर्शविज्ञानं धारि तत्तत्र संश्रितम् ॥ ६ ॥
तत्परस्यौजसः स्थानं तत्र चैतन्यसंग्रहः ॥
हृदयं महदर्थश्च तस्मादुक्तं चिकित्सकैः ॥ ७ ॥

" त्याला ( हृदयाला ) धक्का बसला म्हणजे मूर्च्छा येते आणि तें भोसकलें गेलें तर मरण ओढवतें. स्पर्शज्ञान ज्यामुळे धारण होतें तेंही त्याच्याच आश्रयाने राहतें. सर्वश्रेष्ठ ओज म्हणून जें कांही आहे तें त्यांतच असतें आणि सर्व चेतनाहि त्यांतच साठविलेल्या असतात. " असेंहि तेथेच वर्णिलें आहे. सर्व ज्ञानेंद्रियें रसाधीन असतात हा पूर्व अनुभव आणि आघाताने मूर्च्छा येते म्हणजे संज्ञा व चेतना नाश पावतात हा येथे सांगितलेला अनुभव यांत कांहीच विसंगति नाही; किंबहुना हे दोनही अनुभव पूर्णपणे एकमेकास पोषक आहेत असें दिसून येतें. संज्ञाचेतनांचें स्थान म्हटलें की मेंदूचें चित्र डोळ्यापुढे उभें राहावें असा आधु-

रसस्थान हृदय

निक सांप्रदाय आहे खरा; परंतु जुने ग्रंथ लावतांना आपणाला कोणताहि सांप्रदाय गृहीत धरतां याव-याचा नाही. तो वर्णित अनुभवाच्या क्षेत्रावरून सिद्ध करावयास पाहिजे. एवंच हृदय म्हणजे मेंदू ही जी कल्पना अलीकडे निघू पहात आहे ती केवळ भ्रममूलक आहे.

पूर्वाचार्यांची ही उक्ति ध्यानांत ठेऊन आता सुश्रुतसंहितेच्या सूत्रस्थानांतील शोणितवर्णन वाचावें म्हणजे तें या वर्णनाचाच अनुवाद आहे असें दिसून येईल:—

सुश्रुतकृत अनुवाद

... ... आहारस्य सम्यक् परिणतस्य यस्तेजोभूतः सारः स रस इति उच्यते। तस्य च हृदयं स्थानं, स हृदयाच्चतुर्विंशतिं धमनीः अनुप्रविश्य कृत्स्नं शरीरं तर्पयति धारयति यापयति च अदृष्टहेतुकेन कर्मणा ... ...तस्मिन् रसे जिज्ञासा। किमयं सौम्यः तैजसः इति। अत्र उच्यते स खलु द्रवानुसारी स्नेहनजीवनतर्पणधारणादिभिर्विशेषैः सौम्य इति अवगम्यते ॥ ३ ॥

चरकांत रसवाहिन्यांना निरनिराळीं नांवें दिलेलीं आहेत परंतु सुश्रुतांत धमनी हें नांव निश्चित करून वापरलें आहे. सुश्रुतांत रसाला अगोदर तैजस म्हणून नंतर तो सौम्य आहे की तैजस आहे असा प्रश्न उपस्थित केला आहे आणि लगेच तो सौम्य आहे असा अभिप्राय दिला आहे. सर्व शरीरांतील इंद्रियांना सामर्थ्य देणारा या अर्थाने जरी त्याला एकदा तैजस म्हटलें तरी त्याचे येथ जे विशेष गुण सांगितले त्यावरून तो सौम्य आहे असें कळून येतें, असा खुलासा ग्रंथकारांनी केलेला आहे.

रस सौम्य आहे.

जुन्या शास्त्रकारांच्या वर्णनरीति कमींत कमी तीन दृष्टीस पडतात त्या अशा (१) तैजस, सौम्य. (२) वातात्मक, पित्तात्मक, कफात्मक किंवा वातकारक इ० आणि (३) पार्थिव, आप्य, तैजस, वायवीय, आकाशीय. कोणताहि पदार्थ घेतला तरी त्यामध्ये अनेक गुण दृष्टीस पडतात. अशा वीस गुणांचा संकेत संहिताग्रंथांत सांपडतो (सु० सू० ४६।५१३) (च० शा० ६।१०). कोणत्याही पदार्थाचें यथार्थ ज्ञान म्हटलें म्हणजे त्याच्या साक्षात् परिचयानेच मिळावयाचें. हें ज्ञान पुनः आपल्या उप-योगी पडावयास पाहिजे असेल तर तें स्मृतींत साठवून ठेवावें लागतें, आणि प्रसंगविशेषीं दुसऱ्यास समजावून द्यावें लागतें. असें करतांना शब्दार्थासंबंधी कांही संकेत करून आपणास त्याचें वर्णन करावें लागतें.

वर्णनाच्या तीन रीति.

हें वर्णन करतांना वर्ण्य पदार्थ आपल्या एकेका ज्ञानेंद्रियाला कसा प्रतीत होतो हें सांगावें लागतें यालाच त्या पदार्थाचें गुणवर्णन म्हणतात. हें वर्णन जितकें यथार्थ करूं जावें तितकें तें विस्तृत होणार हें उघडच आहे. पुष्कळ प्रसंगीं इतक्या विस्ताराची जरूरच असते असें नाही. कांही विशेषगुणांवर किंवा गुणसमुदायावर नजर राखावयाची असते म्हणून या सर्व गुणसमुदायाचे वर्ग पाडून त्यांना पार्थिव, आप्य इत्यादि सांकेतिक नांवें देऊन वर्णन करण्याची रीत आहे. याहीपेक्षा थोडक्यांत वर्णन पाहिजे असेल तर तें आग्नेय आणि सौम्य असे वर्ग पाडून करण्याची रीत आहे. अर्थात् ज्या मानाने वर्णन अधिक आटो-पशीर करीत जावें त्या मानाने त्या वर्णनांत कांही गुण गौण मानण्याची पाळी येणार हें ठरलेंच. आता एक प्रसंगीं गौण मानलेला गुण दुसऱ्या प्रसंगीं प्रमुख असण्याचा संभव आहे. तशीच गोष्ट प्रस्तुत उदा-हरणांत घडलेली आहे.

प्रसंगानुरोधाने वर्णनांत भेद.

## रक्तविज्ञान

वरीलप्रमाणे वर्णन केल्यावर ग्रंथकार सांगतात की हा रस यकृतांत गेल्यावर त्याला रक्तत्व प्राप्त

होतें. या रक्तापासूनच स्त्रियांचें आर्तव किंवा रजस् उत्पन्न होतें.

द्विवर्गवर्णन. **आर्तवं शोणितं आग्नेयं अग्निषोमीयत्वात् गर्भस्य ॥ ७ ॥**

आग्नेय आणि सौमीय या दोन वर्गांत वर्णन बसविण्याचा संकेत केला तर आर्तव शोणित आग्नेय होय; कारण तें रक्त म्हणजे रंगलेलें आहे आणि अर्थात् रेतस् हें बिनरंगी किंवा पांढरें आहे म्हणून तें सौम्य होय.

**पांचभौतिकं तु अपरे जीवरक्तमाहुः आचार्याः ॥ ८ ॥**

परंतु दुसरे आचार्य सर्व शरीरांतल्या जीवरक्ताचें वर्णन पांचभौतिकरीत्या करतात.

**विस्रता द्रवता रागः स्पंदनं लघुता तथा ॥**
**भूम्यादीनां गुणा ह्येते दृश्यंते चात्र शोणिते ॥ ९ ॥**

आंबुस वास हा पार्थिव गुण, द्रवत्व हा आप्य गुण, रंग हा तेजोगुण, स्पंदन म्ह० धसका हा वायुगुण, लघुता म्ह० चपलता हा वायुगुण किंवा व्यापित्व हा आकाशीय गुण, असे पांचभौतिक गुण या शोणितांत दिसतात. या ठिकाणीं विस्रता आणि द्रवता दोन्हींचा एकत्र समावेश कफगुण या सदरांत करून स्पंदन आणि लघुत्व हे वायुगुण घेतले तर या रक्ताचें वर्णन कफपित्तवायुगुणात्मक असेंही करतां येईल. ही गोष्ट ग्रंथांत जरी स्पष्ट लिहिलेली नसली तरी ती अगदी सहज कळून येण्याजोगी आहे. कफ, वात, पित्त आणि रस हे रक्तांत समाविष्ट असून सर्व मिळून एकाच प्रणालींतून वाहतात हा भावार्थ या ठिकाणीं आरशासारखा स्वच्छ दिसण्याजोगा आहे; पाहणाराची दृष्टि मात्र कलुषित असतां कामा नये. रक्ताच्या या वर्णनांत स्पंदन हा गुण आलेला आहे यावरून हें वर्णन हृदयांतून बहिर्मुख वाहणाऱ्या रक्ताला अनुलक्षून लिहिलेलें असून त्यांतील धसका किंवा धमन या वायुगुणाची स्पष्ट जाणीव ठेवलेली दिसत आहे.

पांचभौतिक वर्णन.

त्रिदोषात्मक वर्णन.

यानंतर ग्रंथकारांनी सप्तधातूंची निर्मिति वर्णन केली असून पुढे दुष्ट शोणिताचें वर्णन केलें आहे. त्यांत त्यांनी कफ, वात, पित्त यांच्या दृष्टीने रक्ताला अनुक्रमें कावेसारखा अरुण आणि निळा असे रंग येतात असें म्हटलें आहे. हे रंग केव्हा पहावयास सापडतात? असें दुष्ट रक्त शरीराबाहेर काढण्याचा प्रसंग येतो तेव्हा, हें त्याचें सरळ उत्तर आहे; आणि हाच विषय ग्रंथकारांनी यापुढे वर्णिला आहे. रक्तवाहिन्यांपैकी एक प्रकारच्या वाहिन्या स्पंदनयुक्त रक्त हृदयांतून बाहेर वाहून नेतात त्यांचा उल्लेख धमन्या म्हणून सगोदर येऊन गेलेलाच आहे. आता दुसऱ्या कांही रक्तवाहिन्या अशा असतात की त्या कातडीवर उठून दिसतात, आणि त्यामध्ये जरी रक्तच वहात असलें तरी त्या रक्ताला धसका नसतो; आणि म्हणून त्यांना ' सिरा ' हें नांव निश्चित केलें. त्यांतील रक्त धमन्यांतून वाहणाऱ्या रक्तापेक्षा काळसर असतें; आणि प्रसंगविशेषीं विकार उत्पन्न झाले असतां त्यांच्या रंगांत आणि त्यांतील रक्ताच्या रंगांत फरक दिसून येतात. याच वाहिन्यांतून रक्त काढून घेण्याची वहिवाट पाश्चात्य पौर्वात्य दोनही देशांत पूर्वी फार जारीने चालू होती; आणि हल्ली ती बरीच कमी झाली असली तरी रक्तवाहिनीच उघडून रक्त काढणें प्राप्त वाटेल तेव्हा याच वाहिन्या उघडाव्या लागतात; इतर वाहिन्या म्हणजे धमन्या उघडणें निश्चितपणें घातक ठरलेलें आहे. या वाहिन्या उघडण्याचा जो विधि म्हणजे जें काम त्यास सिराव्यधविधि असें म्हटलें आहे. ' सिराव्यधः चिकित्सार्धम् ' सिराव्यध म्हणजे अर्धी चिकित्सा होय, असें सुश्रुतांत म्हटलें आहे. असो, येथें एवढी गोष्ट स्पष्ट होत आहे की धमन्या आणि सिरा हीं दोन नांवें विशेष प्रकारच्या रक्तवाहिन्यांना नेमून दिलेलीं आहेत

दुष्ट शोणित आणि तें बाहेर काढण्याचे मार्ग.

धमनी आणि सिरा यांना निश्चित पारिभाषिक अर्थ.

त्यांत संदिग्धपणा किंवा विकल्प राहूं दिलेला नाही. शस्त्र चालविणाऱ्या चिकित्सकाला असें करणें अत्यंत अवश्य होतें हें वेगळें सांगण्याची जरूरी नाही. शारीरस्थानांत सिराव्यधाला वेगळा अध्याय दिलेला असूनही सूत्रस्थानांतील शोणितवर्णनांत त्याचा उल्लेख करण्याचें कारण वर दर्शविलेंच आहे. हा उल्लेख करून पुढे ग्रंथकारांनी या बाबतींत वाजवीपेक्षा अधिक रक्त शरीरांतून काढलें गेलें तर काय अपकार होतात तें सांगितलें आहे:

रक्तनाशाचे परिणाम.

**शिरोऽभितापम्, आंध्यम्, अधिमंथतिमिरप्रादुर्भावम्, धातुक्षयम्, आक्षेपकम्, पक्षाघातम्, एकांगविकारम्, तृष्णादाहौ, हिक्काम्, कासम्, श्वासम्, पांडुरोगम् मरणं च ...।**

( अधिमंथ = घुसळल्याप्रमाणे डोळ्यांत वेदना. तिमिर = अंधारी. ) रक्तातिस्रावाने जर असले विकार होतात तर संज्ञा आणि चेतना उत्पन्न करण्याचें सामर्थ्य रक्तांत आहे असे कां म्हणूं नये ? निदान असें म्हणण्यास कांही प्रत्यवाय असल्याचा उल्लेख सुश्रुतांत नाही. एवंच सुश्रुतांत केलेली विधानें त्यांनी घेतलेल्या अनुभवांशीं पूर्णपणें सुसंगत आहेत. त्यांचा जो अर्थ करावयाचा तो त्यांच्या अनुभवक्षेत्रावरूनच केला पाहिजे. तसें न केल्यास विसंगति पदोपदीं येणार हें तर ठरलेलेंच आहे.

सूत्रस्थानाच्या २६ व्या अध्यायांत वेगवेगळ्या अवयवांत शल्य रुतलें तर काय होतें त्याचें वर्णन आहे तेथे धमनीमध्ये शल्य गेलें तर होणारीं लक्षणें दिलीं आहेत तीं अशीं:— ... ... ... सफेनं रक्तमीरयत् अनिलः सशब्दः निर्गच्छति, अंगमर्दः पिपासा हृल्लासश्च; ... ... ... धमनी व हृदय यांचा वर केलेला अर्थ आणि त्यांच्या कार्यासंबंधी वर केलेलें दिग्दर्शन या सर्वांशीं सर्वस्वी जुळतें असेंच हें निदान आहे.

धमनीवाटे रक्तप्रवाह.

शरीरस्थानाच्या ६ व्या अध्यायांत मर्मांचें मार्मिक वर्णन आहे त्यामध्ये मांडीच्या मूलभागीं मध्यावर 'लोहिताक्ष' नांवाचें एक मर्म सांगितलें आहे. त्या ठिकाणीं वेध झाला असतां 'लोहितक्षयात् पक्षाघातः', रक्तनाश अतिशय झाल्यामुळे पक्षाघात होतो असें सांगितलें आहे. अशा प्रसंगीं पुष्कळसें रक्त वाहतें तें समक्ष दृष्टीस पडतें आणि पक्षाघात होतो हेंहि उघड दिसतें. या दोही गोष्टींचा संबंध 'रक्तनाशाने पक्षाघात होतो' असा कार्यकारणरूपाने ग्रंथकाराने व्यक्त केलेला आहे. आधुनिक वाचकांना हा संबंध खपणार नाही हें कबूल आहे, कारण रक्तनाश न होतां नुसत्या तेथील नर्व्हमध्ये खंड पाडल्याने हा विकार होतो असा अनुभव त्यांना अगाऊ माहीत झालेला असून नर्व्हने चेतना उत्पन्न होते हा संकेत त्यांच्या अंगवळणीं पडला आहे. परंतु एवढ्याकरिता हा संकेत त्यांना सुश्रुतावर लादतां कामा नये. सुश्रुतांनी जेवढा अनुभव वर्णन केला आहे तेवढ्याशीं जुळेल असाच त्यांतील संकेत आहे. योग्य शास्त्ररचनेचें श्रेय ग्रंथकाराच्या पदरांत टाकण्यास एवढी गोष्ट पुरेशी आहे. त्याकरता आपण पूर्वापारविपर्यास करावयास नको.

रक्तनाशाने पक्षाघात

## शरीरसंशोधन

शारीरशास्त्राची रचना करणाऱ्या शास्त्रकाराला मुख्यतः दोन कामें करावयाचीं असतात. ( १ ) शरीराचें यथासांग वर्णन. हें एकदा संकलित दृष्टीने, एकदा अवयवशः आणि नंतर पुनः या अवयवांचे गट पाडून व्यूहशः असें अनेक प्रकारें करावयाचें असतें. कारण एकंदर वैद्यकाच्या मोठ्या व्यवहारांत आपणास शरीराचा अनेक प्रकारें विचार कर्तव्य असतो. याकरता शरीरांतले बारकांत बारीक दिसतील तितके अवयव पाडून त्यांचा परिचय करून घेणें अवश्य असतें. शोधकाची साधनसामग्री व अवलोकनास मिळणाऱ्या संधींची मर्यादा यांवर असलें संशोधन बऱ्याच अंशीं अवलंबून असतें. ( २ ) दुसरें काम याहून बरेंच अवघड असतें. तें असें कीं शरीराची छाननी करून जे अवयव आपल्या दृष्टीस पडतील ते परस्परांवर

शरीरसंशोधन दोन प्रकारचें

कितपत आणि कोणत्या रीतीनें अवलंबून आहेत ? या गोष्टीचा तपास लावणें. या कामाला शरीराच्या अवयवांचें प्रतिविशिष्ट ज्ञान तर लागतेंच पण केवळ तेवढ्यावरच भागत नाही. निरनिराळ्या परिस्थितीमध्ये या अवयवांत कांही बदल होत असला तर तो जाणण्याचीं साधनें लागतात आणि तशी अनुकूलता नसली तर सहजगत्या शरीराशीं चिकित्सादि व्यवहार करतांना जो अनुभव येईल त्यावरून ज्ञात अवयवांच्या परस्परसंबंधाबद्दल अनुमानें काढावीं लागतात.

संशोधनाची आकांक्षा अमर्याद, संपादणी समर्याद

वर सांगितलेल्या दोनहि क्षेत्रांमध्ये सुश्रुताची साधनसंपत्ति मर्यादितच होती आणि ती अर्थात् केव्हांहि वाढत्या जिज्ञासेला पुरी पडावयाची नाहीं. हें विसरतां कामा नये. या मर्यादा नक्की कोणत्या होत्या तें पुढील लेखांकांत पाहूं. तूर्त येथे या मर्यादेमध्ये वागत असतांनाच रुधिराभिसरणाचा शोध लावल्याचें बहुतेक श्रेय सुश्रुतांनी कसें संपादन केलें आहे तेवढें पाहूं.

रुधिराभिसरणाचा पुरता उलगडा होण्याला तीन गोष्टींचें ज्ञान अवश्यक आहे. ( १ ) हृदयांत स्पंदनाचा आरंभ होतो आणि स्पंदनानेंच रुधिराला गति मिळते. हृदयाचें स्पंदन आणि तदनुरोधानें धमन्यांचें स्पंदन हीं केवळ अवलोकनाने ( साधनाभावीं ) कळून येतात. त्यांचा उल्लेख ग्रंथांत आहे.

रुधिराभिसरणाचा शोध, मुख्य मुद्दे.

( २ ) धमन्यामधून रक्त वाहतें. त्या रक्तांत पोषक रस असतो. तो त्यांच्या वाटें सर्व अवयवांना पोचतो. याही गोष्टीचा उल्लेख ग्रंथांत आहे. ( ३ ) पोषक रस कमी झालेला आणि मलांची भरती झालेली असें रक्त शिरांमधून परत अवयवांकडून हृदयांत येतें. या गोष्टीचा साक्षात् सर्वशः उल्लेख ग्रंथांत नाही. परंतु यातली एकेक गोष्ट एकाद्या ठिकाणीं अशी सांगितलेली आढळते. मलिन रक्त सिरांमधून काढावयास सांगितलें आहे, शिवाय धमनीगत दोष असला तरी तो सिरेवाटें रक्तस्रावणाने निघून जातो असें प्रतिपादिलें आहे. त्यावरून धमनीतून पुढे गेलेलें रक्त शिरांमध्ये जाते ही जाणीव स्पष्ट होते. आवळणी घालून शीर फुगवून घ्यावी असें शिराव्यध सांगतांना म्हटलें आहे त्यावरून शिरांतील रक्तप्रवाह बोटाकडून खांद्याकडे किंवा मांडीकडे असतो असा अभिप्राय व्यक्त होतो. शिरा हृदयास मिळतात असा उल्लेख मात्र नाही. धमन्यांतून रस वाहतो असें ठिकठिकाणीं सांगितलें असून असा उल्लेख सिरांसंबंधी कोठेही केलेला नाही. अवयवाकडून रक्ताचा निकाल करणारे पाट म्हणजे ' सिरा ' असें पुढे शारीराच्या ७ व्या अध्यायांत म्हटलें आहे ( जलहारिणीभिः ). धमनीसिरांमधील भेद इतका स्पष्टपणें चरकसंहितेंत आढळत नाही.

इतर मुद्दे.

जवळ जवळ वरील मुद्याइतकाच महत्त्वाचा मुद्दा म्हणजे फुप्फुसगत वाहिनींव्यूहासंबंधी होय. याचा उल्लेख दोनहि संहितेंत नाही. याखेरीज अभिसरणविषयक अशा किरकोळ गोष्टी पुष्कळ आहेत की त्यांचा उल्लेख या संहिताग्रंथांत सापडत नाही. उदाहरणार्थ ज्या अंत्य शाखांतून रस बाहेर झिरपतो त्या वाहिन्या, आतड्यापासून हृदयापर्यंत अन्नरस पोचविणारे मार्ग, मूत्रविवेचक पिंडांशीं रक्तवाहिनीसंबंध इत्यादि.

शास्त्र नेहमीच अपूर्ण असावयाचें.

शास्त्र हें ऐतें रचलेलें तयार असें कोठेहि मिळत नाही, तें ज्ञानाचा कण कण वेचून रचावयाचें असतें. या दृष्टीने पाहतां कोणतेंहि शास्त्र केव्हांहि पुरें होत नाही तें सदासर्वदा वर्धमान असेंच असावयाचें, निदान तें तसेंच ठेवावयास पाहिजे. तें पूर्ण असल्याची भावना उत्पन्न झाली की उतरती कळा सुरू झाली असें निश्चित समजावें. चरकांमधील शारीर घेऊन त्यापुढे सुश्रुतांनी दोन पावलें टाकून दाखविलीं हें रुधिराभिसरणाच्या बाबतींत येथे विशद करून दाखविलें आहे. स्वतः सुश्रुतकारांच्या शास्त्रालासुद्धा वर्धनाची अपेक्षा आहे अशी पूर्ण जाणीव त्यांनी स्वतः उत्तम प्रकारें कशी प्रकट केली आहे हें पुढे यथाप्रसंग दाखवून देऊं. [ अपूर्ण. ]

# अभिप्राय

**नलोपाख्यानकर्ता रघुनाथपंडित चंद्रावरकर शिवाजीचा प्रधान.**
श्री. अ. का. प्रियोळकर यांनी विविधज्ञानविस्तारांत मार्च-एप्रिल-मेच्या त्रिजोड अंकांत रघुनाथपंडितावर एक सविस्तर निबंध लिहिला होता. तोच त्यांनी चर्चेकरिता पुस्तकरूपाने केवळ मित्रमंडळींत वाटण्याकरिता पुनर्मुद्रित केला आहे. या निबंधांत त्यांनी नलोपाख्यानकर्ता रघुनाथपंडित हा प्रख्यात कवि शिवाजीमहाराजांच्या अष्टप्रधानांपैकी एक होता हें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे, व तो यशस्वी झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाही. कै. परशुरामपंत तात्या गोडबोले, कै. ओक, कै. विनायक लक्ष्मण भावे वगैरे विद्वानांनी आनंदतनय अरणिकर व रघुनाथपंडित, हे व्याही व्याही असून शहाजीशिवाजीचे समकालीन होते असें म्हटलें आहे. शहाजीबरोबर तंजावरप्रांतीं कांही महाराष्ट्रीय कुटुंबें रहावयास गेलीं त्यांपैकी हे कवि होते.

कांही वर्षांपूर्वी कै. घनश्याम सांब मळकर्णेकर यांनी रघुनाथपंडित तंजावराकडील देशस्थ ब्राह्मण नसून ते कारवार जिल्ह्यांतील कुमठा व होनावर यांमध्ये असलेल्या चंदावर गांवांत रहाणारे सारस्वत ब्राह्मण असावेत असें विधान केलें होतें. या विधानाचा अनुवाद श्री. आजगांवकर व श्री. ऋग्वेदी यांनी केला. हें विधान कारवारामध्ये सापडलेल्या नलोपाख्यानाच्या एका हस्तलिखित प्रतीवरून केलें गेलें. या प्रतींत अगदी शेवटचा श्लोक पुढीलप्रमाणे आहे.

> नळातें देऊनी वर पियुषपानीहि गगनीं
> निघाले; त्यामागें नळसहकरी राजगमनी ॥
> स्वराज्यीं सर्वांतें द्विजऋषिजनांतें सुखि करी ।
> कथा ऐसी **चंद्रावरकर रघूनाथचि करी** ॥ १ ॥

या श्लोकाचा चवथा चरण व काव्यांतील कोकणीसारखे भासणारे कांही शब्द यावरून वरील अनुमान काढण्यास हरकत नाही असें कै. मळेकर व त्यांच्या अनुयायांना वाटलें हे दोन्हीहि आधार कसे पोकळ आहेत हें रा. प्रियोळकर यांनी आपल्या निबंधांत ऐतिहासिक पुराव्यानिशीं सिद्ध केलें आहे. शिवाय निबंधाच्या उत्तरार्धांत रघुनाथपंडित हा शिवछत्रपतींच्या अष्टप्रधांपैकीं पंडितरायपद मंडित करीत होता ही नवीन माहिती ऐतिहासिक पुरावे देऊन दिली आहे. हा पुरावा त्यांनी ‘ सभासदाची बखर ’ ‘ पंडितराव यांची बखर ’ ‘ ग्रँट डफ् ’ राधामाधवविलासचंपू’ची प्रस्तावना वगैरे ग्रंथांतून गोळा केला आहे व तो विश्वासनीय मानण्यास हरकत दिसत नाही. हा निबंध लिहून रा. प्रियोळकर यांनी महाराष्ट्रीय वाङ्मयसंशोधनांत चांगली भर घातली आहे व वाङ्मयभक्तांना ऋणी करून ठेविलें आहे यांत संशय नाही.

# मराठी भाषेस भासणारी शास्त्रीय ग्रंथांची आवश्यकता

[ ले. डॉ. ग. मा. कुरुलकर ]

**सारांशः**-- शास्त्रीय ग्रंथांची वाण कशी भासते-मराठी भाषेचा प्रांतविस्तार-मराठी भाषेची लोकसंख्या-मराठी भाषेची सध्याची किंमत- मराठी भाषेचा आधुनिक इतिहास व सध्याची स्थिति-मराठी भाषेंत शास्त्रीय ग्रंथ उत्पन्न झाले नाहीत त्याचीं कारणें--शास्त्र म्हणजे काय-पूर्णत्वप्राप्ति-शास्त्रांची वाढ-शास्त्रांची उभारणी-शास्त्रवृद्धीस अडचण-शास्त्रांचे दोन प्रकार-शास्त्रांचा शाखाविस्तार-शास्त्रांचा एकमेकांशीं संबंध-तत्संबंधि चित्र-शास्त्रानुरूप उद्योगधंद्याची राष्ट्रास आवश्यकता-उद्योगधंदे व शास्त्रें यांची सापेक्ष योग्यता-शास्त्रांमुळे उद्योगधंदे सुधारतात-आधुनिक क्रांतिकारक शोध-यशस्वी व्यक्तींची गुरुकिल्ली व या व्यक्तींवर अवलंबून असणाऱ्या राष्ट्राची उन्नति-प्राण्याच्या तीन प्रकारच्या बुद्धि-व्यवहारप्रधान व भावनाप्रधान बुद्धीपेक्षा शास्त्रीय ज्ञानप्रधान बुद्धीचें महत्त्व-ज्ञानप्रधान शास्त्रीय अभिरुचि उत्पन्न करणें हें जीवनास आवश्यक आहे-या प्रयत्नांत येणाऱ्या अडचणी, जनतेचा तटस्थपणा घालविणें, दारिद्र्याकडे दुर्लक्ष करून धैर्य, दीर्घोद्योग व चिकाटी धरणें व लिपीची शास्त्रीयता राखून छापण्याचे दृष्टीनें सुधारणा करणें-अ.ीच कोटि लोकांचें जीवन व संस्कृति कायम राखण्यास शास्त्रीय ग्रंथांची आवश्यकता-ग्रंथांची यादी.

परवा माझ्या ओळखीच्या एका मराठी भाषा बोलणाऱ्या माणसाच्या कारखान्यांत गेलों होतों. त्या कारखानदाराचा त्या वेळेस एक वाफेचें पाणी बनविणारें यंत्र तयार करण्याचा प्रयत्न चालू होता. हा कारखानदार शोधक बुद्धीचा उद्यमशील आहे. परंतु तें यंत्र बनविण्याच्या कामांत त्याला मनस्वी अडचणी येत आहेत. त्या अडचणी त्याने मला सांगितल्या. परंतु ज्या पदार्थविज्ञानाच्या तत्त्वावर हें पाणी बनविण्याचें यंत्र उभारलें आहे, त्या तत्त्वाच्या बाबतींत अनभिज्ञ असल्याकारणाने, त्याला बऱ्याच गोष्टींचा उलगडा होईना. हा कारखानदार मराठीच जाणणारा आहे. इंग्रजी त्यास येत नाही. अशा वेळीं माझ्या मनांत विचार आला की, खरोखर दारिद्र्यांतून स्वतःच्या उद्योगाने वर डोकें काढणाऱ्या माणसास, केवळ त्याच्या मातृभाषेंत त्याच्या उद्योगधंद्यास आवश्यक असें ज्ञान नसल्यामुळे, किती त्रास होत आहे! अशा त्रासांतून सुद्धा इतर इंग्रजी ग्रंथ जाणणाऱ्या लोकांच्या साहाय्याने त्याने यंत्र बनविण्याची कंबर तर बांधलीच आहे! पण हेंच ज्ञान त्याला स्वतःला अविच्छिन्न रीतीने स्वतःच्या भाषेंत मिळतें तर किती बरें झालें असतें.

"वऱ्हाड, महाराष्ट्र, कोंकण सर्व घेऊन मराठी बोलणाऱ्यांची शिरोगणती दोन कोटि सहासष्ट लक्ष, सत्तर हजारांवर होते." (रा. कुलकर्णीकृत भाषाशास्त्र व मराठी भाषा)

इतक्या मोठ्या विस्ताराच्या भाषेची स्थिति मात्र समाधानकारक नाही. मराठी

भाषेंतील ग्रंथ जर उद्या यक्षिणीच्या कांडीने नष्ट झाले तर, कांही फार नुकसान होणार नाही. नाही म्हटल्यास, कांही कवींना व तत्त्ववेत्त्यांना व कादंबरीप्रेमी माणसांना दुःख वाटेल. परंतु आमच्या दैनिक व्यवहारांमध्ये, मराठी भाषेंतील नष्ट झालेल्या ग्रंथांची कांही उणीव भासणार नाही. कारण आमचे जे कांही परावलंबित व्यवहार चालू आहेत ते मराठी भाषेंतील ग्रंथांवर अवलंबून नाहीतच. परवा जर्मन भाषेमध्ये "ग्रुंड्रिस् डेर् विसेनशाफ्टलिशेन डेर् आनाटोमी" हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. तो ग्रंथ "लॅन्सेट्" नांवाच्या इंग्रजी वर्तमानपत्राच्या कर्त्याकडे परीक्षणार्थ आला. त्याच्या परीक्षणांत त्याने असें म्हटलें आहे की, या ग्रंथाचें इंग्रजी भाषांतर झालेंच पाहिजे. लागलीच एक दोन वर्षांत त्याचें इंग्रजी भाषांतर प्रसिद्धहि झालें. आपल्या स्वतःच्या वाङ्मयांत इतर भाषेंतील उत्तम ग्रंथांची भाषांतर करून भर टाकणें, ही गोष्ट स्वतःची भाषा बोलणाऱ्या लोकांच्या सामाजिक कल्याणाची आहे. भाषा स्वयंसिद्ध व सर्व प्रकारच्या ग्रंथांनी समृद्ध असेल, तर त्यांचा उपयोग होऊन जीवनकलहांत सुलभता येते.

मराठी भाषेचा खरा विकास होण्यास पन्नास वर्षांपूर्वी सुरवात झाली. त्या वेळीं मधुमक्षिका, अरबी भाषेंतील गोष्टी इत्यादि अत्यंत स्थूल अशा ग्रंथरचनेस सुरवात झाली होती. आता ती भाषा ललितवाङ्मयांत थोडीबहुत स्वतंत्र रीतीने वावरूं शकते. कवि, शाहीर, लोकांची उत्पत्ति बरीच होऊं लागली आहे. त्यांत प्रतिभाशाली कवि थोडे आहेत. नाटकांमध्येहि सात आठशें नाटकें व प्रहसनें झालीं आहेत. राजकीय व सामाजिक नेत्यांनी, राजकीय व सामाजिक विषयांची भर घातली आहे. परंतु शास्त्रीय वाङ्मयाकडे पाहिल्यास फारच निराशा होते. वैद्यकीसारख्या उपयुक्त विषयांवर सर्व तऱ्हेचीं शास्त्रीय व अशास्त्रीय पुस्तकें मिळून तीनशें सव्वातीनशें पुस्तकें आहेत. बाकीच्या शास्त्रीय विषयांवर नानातऱ्हेच्या चोपड्या व ग्रंथ मिळून पांचशें संख्या होईल न होईल इतकेंच. या ग्रंथांमध्ये प्रतिभाशाली असे ग्रंथ फारच थोडे आहेत. मराठी भाषेंत शास्त्रीय ग्रंथ कां प्रसिद्ध झाले नाहीत, याचीं कारणें इतिहासप्रसिद्ध आहेत, व आपल्या सर्वांच्या परिचयाचीं आहेत. कांहीका असेना, आम्हांला सध्याची परिस्थिति कशी बदलावी हें पहावयाचें आहे. मातृभाषेच्या स्वतंत्र व विस्तीर्ण छायेखाली होणारी अबाधित व तेजस्वी अशी वाढ आमची झाली नाही हें खास. आमचा एखादा गांववाला किंवा नातेवाईक एडिसन्सारखा जगाला उपयोगी पडला आहे, असा कोणत्याहि मराठी भाषा बोलणाऱ्या माणसाला गर्व वाटत नाही. खरें पाहिलें तर, आम्हांला इंग्रजी भाषेविषयी द्वेष का वाटतो! परंतु ती भाषा आम्हांस आमची भाषा म्हणून स्वीकारणें इष्ट व व्यवहार्य नाही म्हणूनच आम्ही इतका अट्टाहास करतों. स्वतंत्रतेच्या अमदानींत केवळ कुतूहल म्हणून शिकली जाणारी इंग्रजी भाषा, आम्हांस सध्या व्यवहारास आवश्यक म्हणून शिकावी लागत आहे; व आमची मराठी भाषा स्वयंसिद्ध होऊन व्यवहारांत मार्गदर्शक होईपर्यंत शिकावी लागणार

आहे. मातृभाषा सुटत नाही, इंग्रजी शिकल्याशिवाय गत्यंतर नाही, अशा वेळेस मराठीमध्ये शास्त्रीय ग्रंथरचना करण्याची प्रवृत्ति कशी होणार? शास्त्रीय ग्रंथ खपत नसतात म्हणून त्यांच्या किंमती ज्यास्त ठेवाव्या लागतात. परवा भारतीय ज्योतिः-शास्त्रावर रा. दसरी यांनी लिहिलेल्या १२४ पानांच्या पुस्तकाची किंमत पांच रुपये आहे. अगोदरच सर्वसाधारण शिक्षण कमी; त्यांत स्वतंत्र उद्योगशीलता आणखी कमी, व ज्ञानार्जनाकडे प्रवृत्ति त्याहूनहि कमी; मग एखाद्या विशिष्ट ग्रंथाचा खप व्हावा कसा? अशी परिस्थिति पाहून, कित्येक ग्रंथकार नाउमेद होतात. तेव्हा सर्वसाधारण जनतेमध्ये शिक्षणप्रसार ज्यास्त होऊन, लोकांची प्रवृत्ति शास्त्रीय ज्ञानाचा व्यवहाराकडे ज्यास्त ज्यास्त उपयोग करण्याकडे व्हावयास पाहिजे.

ज्या शास्त्रीय ज्ञानासंबंधाने ग्रंथरचना मराठी भाषेंत नाही, असें वर म्हटलें आहे, तें शास्त्रीय ज्ञान म्हणजे काय व आतां पुढे होणाऱ्या शास्त्रीय ग्रंथांच्या विषयांची व्याप्ति काय आहे हें आपणांस पहावयास पाहिजे. शास्त्रीय ज्ञान म्हणजे एखाद्या गोष्टीचें आपणांस होऊं शकणारें संपूर्ण ज्ञान. सृष्टींतील घडून येणारी गोष्ट व घडामोड यांचा तर्कबुद्धीने आपण एकमेकांशीं संबंध जुळवूं लागलों की आपणांस शास्त्रीयता येते. त्यापासून निष्कर्ष निघतात. हे निष्कर्ष प्रामाणिक व सत्यबुद्धीस अनुसरून असतात. हे निष्कर्ष म्हणजे शास्त्रीय ज्ञान होय. असल्या प्रकारच्या सजातीय निष्कर्षांचें एके ठिकाणीं ग्रथन केलें की, त्यांमधून शास्त्रोत्पत्ति होते. असल्या शास्त्रांमध्ये संपूर्णता असावी. त्या त्या विषयांसंबंधी सर्व ज्ञान त्यांमध्ये असावें. तें ज्ञान दुर्बोध व संशयास्पद असूं नये. ज्या मूलतत्त्वास अनुसरून, सृष्टींतील गोष्टींचें निरीक्षण करून निष्कर्ष काढलेले असतात, तीं तत्त्वें सरळ व अबाधित असावींत. ज्ञानाची रचना पद्धतशीर असावी. ही रचना निरनिराळ्या शास्त्रांस वेगवेगळी असूं शकेल. जी पद्धत एकदा स्वीकारली ती शेवटपर्यंत कायम असावी. शास्त्र म्हणजे एकसारख्या पद्धतींवर रचिलेल्या सजातीय व सुबोध ज्ञानाची इमारत होय. शास्त्राचें ध्येय हें सृष्टींतील घडामोडी मनाच्या दरवाजापाशीं नेऊन ठेवणें हें असतें. त्यांवर उभारलेल्या कल्पना, निष्कर्ष, सिद्धांत, पद्धति व रचनावैशिष्ट्य हे आपल्या मनाचे व्यापार असून त्यांचा निसर्गाशीं कांहीच संबंध नसतो. आमचे निष्कर्ष व सिद्धांत यांचा निसर्गाशीं समरसतेचा संबंध जुळणें यांस शास्त्रीय सत्य असें म्हणतात. अशा प्रकारचें शास्त्रीय सत्य म्हणजेच तेवढें सत्य असा माझा म्हणण्याचा उद्देश नाही. परंतु शास्त्र हें सत्याचें परीक्षण करण्यास समर्थ असावें हें मात्र खरें.

पूर्णत्वास पोहोंचण्याचा मोक्षकाल मानवजातीस लाभूं शकणार नाही. पूर्णत्व हें क्षितिजाप्रमाणे दूर दूर पळत असतें. परंतु नवीन नवीन शोधांनी आपलें ज्ञानभाण्डार वृद्धिंगत होत असतें; व पूर्णत्वप्राप्तीची आशा ही शास्त्रीय शोध लावणारी चिच्छक्ति मात्र होते.

शास्त्राची वाढ म्हणजे मनुष्यजातीची वाढ नव्हे. मनुष्यजात ही उत्तरोत्तर

एकावर एक थर रचिले जाऊन वृद्धिंगत होत आली आहे. तशी शास्त्रांची वृद्धि नाही. सध्याचे काळीं प्रचलित असलेलें शास्त्र, पुढे कदाचित् एकदम निकालांत निघेल, व अशाच तऱ्हेचें जुनें एखादें शास्त्र उपयोगी म्हणून पुनः त्याचें पुनरुज्जीवन केलें जाईल.

श्रमविभागाच्या तत्त्वांवर शास्त्राची उभारणी आपोआप होते. आपल्या मानवांच्या आकुंचित बुद्धिमत्तेमुळे, निरनिराळ्या शास्त्रज्ञांनी अभ्यासिलेल्या शास्त्रसमुद्राच्या स्वतंत्र शाखा बनतात.

शास्त्राची वाढ, मनुष्यजातीच्या उपजत दर्शनीयाकांक्षेच्या विकृतीने द्रवळी जाते. सत्यान्वेषणबुद्धि कमी होते. अनुकरणशीलता वाढते. व या अनुकरणाच्या कैफांत आपण सत्य विसरतों. तेव्हा होतकरू तरुण शास्त्रज्ञांनी, देखाव्याकडे व अनुकरणाकडे लक्ष न पुरवितां, अन्तःकरणांतील सत्यानुगामी सूचनेनुरूप वागावयास पाहिजे.

एकंदरींत शास्त्रें दोन प्रकारचीं असतात. एक प्रत्यक्ष गोष्टींचा संबंध जुळवून त्यापासून सिद्धांताची आकृति बनवितें व दुसरें गृहीत धरलेल्या सिद्धांतावरून एखाद्या गोष्टीविषयी निष्कर्ष काढतें. पहिल्या प्रकारच्या शास्त्रांचा विस्तार खूप आहे. एकास सिद्धांतदर्शक व दुसऱ्यास सिद्धांतानुसारी असें म्हणतात. दुसऱ्या शास्त्रांत, गणित व तत्त्वज्ञान यांचा समावेश होतो. व त्यामध्ये पाया कल्पनेवर रचिलेला असतो. पहिल्याची पद्धति व्यतिरेक आहे. व दुसऱ्याची अन्वय आहे. व्यतिरेक-शास्त्रांचें ज्ञान यांस खरें ज्ञान व अन्वयज्ञानास अपेक्षणीय ज्ञान असें म्हटल्यास वावगें होणार नाही. व्यतिरेकाशिवाय अन्वयज्ञान मिळूं शकत नाही. मूळ व्यतिरेक व मग अन्वय.

या प्रकारच्या शास्त्रांकडे मानवजातीची प्रवृत्ति कशी होत गेली, या संबंधींचा शाखाविस्तार विचार करण्याजोगा आहे. हा शाखाविस्तार फ्रान्सिस बेकन् नामक आंग्लपंडिताच्या मताप्रमाणे दिलेला आहे. त्यावरून असें दिसतें की, मनाच्या मुख्य तीन कार्यशक्ति आहेत. एक कल्पना करण्याची, दुसरी स्मरणशक्ति व तिसरी शोधकशक्ति. या तिघांचा एकमेकांशीं जरी संबंध नेहेमी असतो, तरी प्रामुख्येंकरून त्या त्या शक्तीपासून इतर शक्तींची थोडी मदत घेऊन निरनिराळे विषय उत्पन्न होतात.[१]

पुढील वर्गीकरणावरून आपणांस कदाचित् असें वाटेल की शास्त्रांचा एकमेकांशीं संबंध नाही, परंतु हें वर्गीकरण कृत्रिम आहे. भिन्न शास्त्रोत्पत्तीच्या विविध कल्पना, या एकमेकांशीं निगडित झालेल्या असतात. उदाहरणार्थ जीवनशास्त्र व मानसशास्त्र. या दोहोंचा एकमेकांशीं अत्यंत संबंध आहे. एका शास्त्राच्या रचनेचा व कल्पनापद्धतीचा किंवा परिणामाचा दुसऱ्या शास्त्रांवर ठसा उमटतोच. तत्त्वज्ञान या शास्त्रापोटीं

१ पान १५२ पहा.

बहुतेक सर्व शास्त्रें येतात. गणित मात्र सर्व शास्त्रांच्या आधारावर अवलंबून असतें. सर्व शास्त्रांचा असा एकमेकांशीं निगडित संबंध असल्यामुळे, शास्त्राभ्यास करतांना आपल्यास इष्ट असलेल्या मर्यादेचा प्रांत आंखून घेणें इष्ट असतें. असलीं सर्व वैयक्तिक शास्त्रें, अध्ययनाच्या विश्वविद्यालयामध्ये शिकविलीं जावींत. सर्व प्रकारच्या शास्त्रांच्या ज्ञानाचें केन्द्रीकरण करून, त्यांचा अभ्यास करण्यास सुलभता उत्पन्न करणें हें विश्वविद्यालयाचें ध्येय असावें.




या सर्व शास्त्रांचें ज्ञान एकमेकांस देण्याकडे भाषेचा उपयोग होत असतो. या निसर्गशास्त्रीय सिद्धांतास अनुसरून आपल्या उद्योगधंद्याची वृद्धि होत असते. एका विशिष्ट धंद्यास नेहमी एकाहून अधिक अशा शास्त्रांच्या मूलभूत व विशिष्ट अशा ज्ञानाची आवश्यकता असते. उद्योगधंदे यशस्वी होण्यास या शास्त्रांचें समाजास संपूर्ण ज्ञान पाहिजे. ज्ञानाच्या अभावीं अपयश आल्याशिवाय राहणार नाही. उद्योगधंद्याचे

शास्त्रांत ज्ञानप्रधान शास्त्राचें योग्य मिश्रण बनलेलें असतें. व त्या मिश्रणाचा उपयोग होऊन तयार झालेला माल लोकांच्या पूर्ण विश्वासास पात्र कसा होईल याविषयी प्रयत्न केला जात असतो. उत्पन्न झालेल्या कोणत्याहि मालांत यत्किंचित्‌हि फरक असतां उपयोगी नाही. लहान मुलाने जरी तो माल विकत नेला तरी त्यांत तो फसतां उपयोगी नाही. शिवाय अशा प्रकारचा सर्वोत्कृष्ट माल सर्व लोकांस विकत घेतां येईल इतका स्वस्त असावा. शिवाय माल तयार करण्यास शक्य तितका कमी खर्च यावा. अशी उद्योगधंद्याची स्थिति प्राप्त होण्यास कसब लागतें. यासंबंधी अमेरिकन लोकांची फारच प्रगति झाली आहे. व या सर्व युक्तींचें नवीन शास्त्र बनत चाललें आहे. त्या शास्त्राचा सध्याच्या पुढारलेल्या काळांत उपयोग करून घेतला पाहिजे.

अशीं धंदेवाईक जीं शास्त्रें आहेत त्यांचें वर्गीकरण निराळ्या तत्त्वांवर केलें पाहिजे. प्रत्येक राष्ट्रास पुढारलेल्या युगांतील लागणाऱ्या आवश्यक वस्तु स्वतंत्र रीतीने बनविण्याइतकें ज्ञान पाहिजे. व राष्ट्रांतील लोकांची मनःस्थिति अशी असावी की, बिकट कालीं त्यांना ज्या वस्तूंकरिता परराष्ट्रांवर अवलंबून रहावें लागणार, त्या वस्तू शोधकतेने स्वतःच बनवितां याव्यात. या दुसऱ्या वर्गांतील जिन्नस आम्हीं इतर राष्ट्रांकडून विकत घेतले तरी चिंता नाही. परंतु जीवनाला आवश्यक असे धंदे मात्र दुसऱ्याच्या ताब्यांत असूं नयेत.

ज्ञानप्रधान शास्त्रांचा उगम मनुष्यप्राण्याने आपापल्या धंद्यांत ज्यास्त ज्यास्त यशस्वी होण्यासाठी निसर्गाचे नियम जाणण्याचे प्रयत्नांमध्ये झाला आहे. उद्योगधंद्यांकरिताच शास्त्रें शिकावयाचीं असें मात्र नाही. कारण असें आकुंचित ध्येय पुढे ठेवल्यास खरी प्रगति होणार नाही. शिवाय ज्याप्रमाणे प्रकाशाच्या उपयोगापेक्षा त्याचें दर्शन हें सुंदर असतें, त्याप्रमाणे निसर्गांतील गोष्टींचें उपयुक्ततेपुरतेंच ज्ञान मिळविण्यापेक्षा, केवळ जिज्ञासाप्रेरित होऊन ज्ञान मिळविणें हें उदात्त व सुंदर होय. दोनहि प्रकारांनी निसर्गाकडे पाहणारे शास्त्रज्ञ पाहिजेत.

शास्त्रांचें जिज्ञासेने अध्ययन करणाऱ्यांच्या जुन्या व नवीन शोधांचा नवीन उपयोग करून, त्याच्या साहाय्याने उद्योगधंदे प्रगतिशील बनतात. खरें पाहूं गेलें तर उद्योगधंद्याच्या वा आपल्या सभोंवारच्या वस्तूंकडे पाहून लक्ष्य वेधल्यामुळे शास्त्रांची उत्पत्ति झाली. शास्त्रांच्या उत्पत्तीमुळे उद्योगधंद्यांस नवीन वळण मिळालें. रसायनशास्त्राच्या उत्पत्तीच्या अगोदर, मदिरा गाळणें, रंग तयार करणें या कला होत्या. परंतु रसायनशास्त्राच्या वाढीमुळे या धंद्यांत विलक्षण वाढ व अचूकपणा आला आहे. धातू शोधणें, पोलाद बनविणें, दगडी कोळशाचें पृथक्करण करून निरनिराळे पदार्थ काढणें इत्यादि धंदे फारच जोराने चालू लागले आहेत. पदार्थविज्ञानाच्या व्यवहार्य ज्ञानापासून, तारायंत्र, ध्वनिग्राहक तारायंत्र, बिनतारी संदेशवाहक, विद्युत्प्रेरक, गतिकें, विमानें इत्यादि उद्योग झाले. भूगर्भशास्त्रांपासून दगडी कोळसे व धातू यांचा शोध घेतां येऊं लागला. समुद्रविज्ञानापासून मासे वगैरेविषयी ज्ञान मिळूं लागलें. व वायु-

शास्त्रामुळे लोकांचा जीव, हवामानांतील फेरबदल सांगतां आल्यामुळे, बचावतां येऊं लागला.

गेल्या शतकामध्ये कांही शोधांमुळे एकदम विलक्षण शास्त्रीय क्रांति घडून आली आहे. आगगाड्या, आगबोटी, विद्युत्संदेशवाहक, ध्वनिवाहक, आगकाड्या, वाफेचे दिवे, विजेचे दिवे, प्रकाशलेखन, ध्वनिलेखन, क्ष किरणें, प्रकाशपृथक्करण, गुंगीचीं औषधें व जंतुमारक औषधें, या नवीन युगांतील गोष्टींनी आपल्या जीवनांत क्रांति घडवून आणली आहे. याच्या पूर्वी सात महत्त्वाच्या शोधांनी क्रांति घडवून आणली होती. त्या गोष्टी म्हणजे दुर्बीण, छापखाना, होकायंत्र, गणितसंख्या, लिपि, वाफ व वायुभारदर्शक या होत.

कोणत्याहि राष्ट्रांस त्यांतील व्यक्तींच्या योग्यतेबरहुकूम किंमत मिळत असते. त्यांतील व्यक्ति जर ज्ञाननिष्ट असतील, तर त्यांच्या ज्ञानाचा उपयोग होऊन, राष्ट्राची अभिवृद्धि होते. कार्ल पिअरसन् याने आपला अनुभव देतांना असें म्हटलें आहे की, " मी आज सोळा वर्षें स्थापत्यशास्त्र शिकवीत आहें. जे माझे विद्यार्थी घोकंपट्टी करून व व्यवहारानुरूप गोष्टी व मुद्दे यांजकडे केवळ लक्ष पुरवितात ते कधीहि पुढे आले नाहीत. परंतु जे विद्यार्थी पद्धत, प्रमाण वगैरे तर्कशक्तीवर लक्ष पुरवितात, व स्वतःच्या निरीक्षणशक्तीच्या वृद्धीकरिता इतर ह्या शास्त्रांचा अभ्यास केला आहे, तेच पुढे आलेले दिसून येतात. कारण त्यांच्यामध्ये शोधकबुद्धि व परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यांवर तोड काढण्याची शक्ति वृद्धिंगत झालेली असते." असल्या लोकांना कोणत्याहि आपत्तीमध्ये बुद्धीचा उपयोग करणें याची शिस्त लागलेली असते. खरें पाहूं गेलें तर शिक्षणाची फलश्रुति, तरळ डोक्याच्या लोकोत्पत्तीमध्ये व्हावी. समयसूचकता व हरकामीपणा ही स्वभावाची जोडगोळी सुशिक्षितांमध्ये असावी. शिवाय समाजामध्ये शास्त्रीय दृष्टीची वाण असूं नये. शास्त्रीय मनुष्य हा ज्ञानाचा भक्त असतो. शास्त्रीय मनुष्य व कवि यांचें क्षेत्र भिन्न असलें तरी, दोघेहि सृष्टीच्या नियमांचा व्यवहारांत उपयोग करून घेण्याकडे लक्ष पुरवीत नसून सभोंवारच्या गोष्टींमधून सत्यसंशोधनाचें कार्य करीत असतात. शास्त्रीय मनुष्य हा निसर्गाच्या सुगमतेकडे व नियमांकडे लक्ष पुरवीत असतो. निसर्गाच्या शक्तीवर मजा मारण्यापेक्षा निसर्गाचें ज्ञान मिळविण्याकडे त्याचें लक्ष असतें.

प्राण्याच्या तीन प्रकारच्या बुद्धि असतातः व्यवहारी, भावनाप्रधान व ज्ञानप्रधान. या तिघांचीं स्थानें हस्त, हृदय, मस्तक हीं होत. तीनही आपापल्या परीने उपयुक्त व आदरणीय आहेत; विशेषतः तीनही ज्या वेळेस एकमेकांशीं सहकारिता करतात. त्या वेळेस त्यांची उपयुक्तता वाढते. परंतु हें सहकार्य घडून येणें इतकें अशक्य आहे की एका कोणात्या तरी गुणाची बेसुमार वाढ झालेली असते. ज्ञानप्रधान शास्त्रीय दृष्टीचें उदाहरण उपनिषदांमध्ये दिलेलें आहे. श्वेतकेतु हा २४ वर्षें एका गुरूपाशीं शिकला. परंतु ही ज्ञानप्रधान शास्त्रीय दृष्टि त्याची न झाल्याकारणाने त्यास

आपल्या पित्याच्या प्रश्नाचें उत्तर देतां येईना. "उत तमादेशमप्राक्ष्यो येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातमिति कथं नु भगवः स आदेश इति." "ज्याच्या योगानें अश्रुत श्रुत होतें, ज्याची कल्पना नसते त्याची कल्पना येते, व जें आपल्याला अवगत नसतें तें अवगत होतें, त्याची चौकशी केली आहेस काय. मातीच्या भांड्यावरून सर्व मृत्तिकेचे गुण कळतात. लोखंडाच्या गोळ्यावरून लोखंडाचे गुणधर्म कळतात, व नखकर्तनीवरून ज्या काश्याची ती बनविली असते त्याची कल्पना येते. भांडें, गोळा व नखकर्तनी हीं नांवें, विकृति, असून, त्यांचीं मूलतत्त्वें एकच आहेत." त्यावर मुलगा उत्तर करतो. "हें बोवा, आमच्या गुरुजींनी शिकविलें नाही. त्यांना याचें ज्ञान आहे किंवा नाही हें मला माहीत नाही. तुम्ही मला शिकवा." मग त्याच्या पित्यानें स्वप्नाचें, उंबराचें व पाण्यांत मीठ टाकून त्याच्या निरीक्षणावरून निष्कर्ष काढावयाचे कसे तें शिकविलें. गुरूच्या घरीं ही ज्ञानप्रधान शास्त्रीय दृष्टि त्याला मिळाली नाही म्हणून श्वेतकेतु उद्दाम झाला होता. परंतु खरी शास्त्रीय दृष्टि मिळाल्यानंतर त्याचें समाधान होऊन, स्वभावांत फरक पडला.

व्यवहारी व भावना प्रधान बुद्धींना उपजत अस्तित्व असल्यामुळे त्यांच्या लाभार्थ फारसे परिश्रम करावे लागत नाहीत. शास्त्रीय दृष्टिच मिळणें कठीण आहे. व ती नसेल तर तिजवर अवलंबून असणारी व्यवहारी दृष्टि लंगडी पडते. व भावनाप्रधानता वाढते. या तिघांचा सत्त्व, रज, तम यांच्यासारखा संबंध आहे. ज्ञानप्रधान दृष्टि सत्त्वगुणी, व्यवहारी रजोगुणी, भावनाप्रधान तमोगुणी आहे. सत्त्वरजाचा पूर्ण मिलाफ हा लोकोत्तर कार्यें करीत असतो. परंतु आमची सत्त्वरजोबुद्धि शिथिल होऊन भावनाप्रधान तमोगुणाचें साम्राज्य चालू आहे. विश्वव्यापी जीवनकलहांत दया व माया याला थारा नसल्यामुळे जो जगण्याचा प्रयत्न करील तेवढाच जगेल, इतर मरतील असा नियम आहे. महाराष्ट्र ज्या हिंदुस्थानाचा भाग आहे, तो देश सध्या केवळ भावनाप्रधान असल्यामुळें, जीवनकलहाच्या न्यायानें त्यांतील आम्हीं प्रयत्न न केल्यास पृथ्वीच्या पाठीवरून नाहीसे होणार आहोंत.

या अफाट देशांतील निरनिराळ्या सजातीय समाजांनी एकसमयावच्छेदेंकरून प्रयत्नास सुरवात करावी. निरनिराळ्या प्रमुख भाषांतून अशा तऱ्हेच्या लोकांस शास्त्रीय दृष्टि देण्याचें ध्येय पुढे ठेऊन प्रयत्न सुरू करावेत. हिंदुस्थानांतील दुसऱ्या नंबरच्या आमच्या मराठी भाषेंतूनहि तसे प्रयत्न सुरू झाले पाहिजेत. शास्त्रीय व उद्योगधंद्यांचीं मासिक पुस्तकें लोकप्रिय होऊन, त्यांचा खप वाढविला पाहिजे. व या सर्व मासिकांच्या ध्येयामध्ये एकात्मता असावी. भिन्न भिन्न विषयांचीं मासिकें व पुस्तकें यांनी आपापल्या विषयाबाबत हळूहळू जनतेची शास्त्रीय दृष्टि बनविली पाहिजे. केवळ सत्यान्वेषणाचे मिषाखाली, लोकांच्या चटोर बुद्धीस अनुसरणारे विषय लिहून, जनतेच्या बुद्धीचें मातेरें होतें. कोणत्याहि शास्त्रीय मासिकाचें ध्येय सहेतुक असावें. व त्या त्या मासिकाने आपापल्या मर्यादेंत बीजात्मक असणाऱ्या ज्ञानदृष्टीस खत घालून

वाढीस लावावें. शास्त्रीय दृष्टीची अभिरुचि उत्पन्न करणें हें जीवनास आवश्यक आहे.

या वरील स्तुत्य कृत्यांत येणाऱ्या अडचणी मोठ्या आहेत. पहिली जनतेची शास्त्रीय कल नसल्यामुळे असणारी तटस्थता. ही अडचण वारंवार प्रयत्न केल्यावर नष्ट होणार आहे. दुसरी दारिद्र्याची. उदयोन्मुख राष्ट्रांस लोकोत्तर प्रयत्न करावा लागत असतो. पैशाचे अभावीं सर्व बेत फसतात हें खरें, परंतु आपण निराश होतां कामा नये. प्रयत्न चिकाटीचा व ध्येयानुसारी आहे असें जनतेस वाटल्याबरोबर द्रव्याचा पाऊस पडेल. जर्मनींत कौंट झेपेलिनचा पूर्वेतिहास हेंच सांगतो. दीर्घोद्योग व धैर्य हीं आमच्या स्वाधीन आहेत. त्यांचा पूर्ण उपयोग करून घ्यावयास कांही दुसऱ्यांच्या तोंडाकडे पहावयास नको. महायुद्धानंतरचा शत्रुसैन्याने आक्रमिलेला जर्मनी, व आताचा पुनः जगाच्या स्पर्धाक्षेत्रांत पाऊल ठेवूं पाहणारा जर्मनी, या दोहोंमधील इतिहास धैर्य, ध्येयनिष्ठता व दीर्घोद्योग एवढ्याच सुवर्णाक्षरांनी लिहिला आहे. तिसरी अडचण आनुषंगिक आहे. ती म्हणजे मराठी छापणें ज्यास्त सुलभ नाही हें होय. मराठीचे खिळे जुळविण्यांत फार वेळ जातो. खिळ्यांची संख्या बेसुमार आहे. व त्यामुळे मराठीमध्ये ग्रंथ छापण्याचें काम फारच खर्चाचें आहे. हा लिपीचा दोष आहे. छापण्यांत आढळून येणारे बालबोध लिपीचे दोष, लिपीच्या इतर गुणांच्या मानाने कांहीच नाहीत. भाषेंतील उच्चारांची विविधता दाखविण्यास जवळ भरपूर वर्णसामुग्री असावी लागते. जितके उच्चार तितकीं प्रतीकें असावींत. असा कोणताहि उच्चार असूं नये की तो कोणत्याना कोणत्या तरी खुणेने दाखविला जात नाही. आमच्या भाषेंत जे दोष नाहीत ते इंग्रजी भाषेंत कितीतरी आहेत. एका उच्चाराकरता तीन तीन प्रतीकें आहेत. शिवाय घ्, फ्, थ्, श् या वर्णांत अपूर्णता दिसून येते, कारण त्यांना तयार करण्याचे कामीं 'एच्' या वर्णाचें साहाय्य घ्यावें लागतें. उच्चारांची व वर्णांची संमतिच नसते. कांही वर्ण उच्चारले जात नाहीत. असा रोमन लिपि व इंग्रजी भाषा या बाबत विसंगतपणा आहे. प्रो. मॅक्स मुल्लर यांनी आमच्या व रोमन लिपीचा तुलनात्मक विचार करून आमची लिपि ज्यास्त शास्त्रीय आहे असें म्हटलें आहे. रोमन लिपीचे अभिमानी आम्हीं रोमन लिपि स्वीकारावी असें म्हणतात. परंतु शास्त्रीय लिपि ही कांही अशास्त्रीय लिपींपेक्षा अवजड असते, हें लक्ष्यांत ठेऊन आपली लिपि आपण सोडूं नये. परंतु तिची शास्त्रीयता कायम ठेऊन तिच्यांत छापण्याचे दृष्टीने सुधारणा घडवून आणावी.

एकंदरीत पाहिल्यास शास्त्रीय ग्रंथांस मराठी भाषेंत आणल्याशिवाय, अडीच कोटि लोकांमध्ये सध्या अनिर्वाह असलेली शास्त्रीय दृष्टि येणार नाही. भाषेमध्ये सदासर्वदा आवश्यक असणारे ग्रंथ असल्याशिवाय, ती भाषा जिवंत राहणार नाही. व शास्त्रीयता व व्यवहारी उद्योगधंदे यांशिवाय मानवी जीवनास व संस्कृतिजीवनास दुसरें आवश्यक असें काय आहे?

---

# अभिप्राय

**मोहित्यांची मंजुळा**—(लेखक—रामतनय, प्रकाशक—सी. वा. फडणीस, बी. ए., आर्यसंस्कृति-मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें. किंमत २ रुपये.)

ही एक सामाजिक कादंबरी असून हिच्यांत खेड्यांतील सर्व प्रकारच्या चवळवळींचीं वस्तुस्थितिनिदर्शक चित्रें सुबोध रीतीने, तशींच हृदयंगम अशीं रंगविलेलीं दिसतील. आतापर्यंतचे बहुतेक कादंबरीकार शहरांतील साधारण मध्यम स्थितीच्या किंवा त्याहून वरच्या दर्जाच्या समाजाची राहाणी वर्णन करीत आलेले आहेत. त्यामुळे केवळ नगरवासी पांढरपेशांचा जीवनक्रम, त्यांचीं सुखदु:खें व त्यांचे विचार यांसंबंधीच माहिती वाचकांस होत असे. याचें बहुंशीं कारण, कादंबरी लिहिण्यालायक सुशिक्षित माणसाला खेड्यांतील परिस्थिति कळलेली नसते व ती कळून घेऊन तो आपला कादंबरीविषय करण्याचीहि त्याला इच्छा होत नाही. मग खेड्यांत समाजनिरीक्षणासाठी मुद्दाम जाऊन राहण्याची कल्पना मनांत येणें फार दूर राहिलें! आधुनिक लेखकांच्या ठिकाणीं या कारणाने बहुजनसमाजाविषयींचें गाढ अज्ञान दृष्टीस पडतें व त्याचा ठसा सर्व वाङ्मयावरहि उठलेला दिसतो. असो.

प्रस्तुत कादंबरीकाराने अनेक वर्षे खेड्यांतील परिस्थितीचें प्रत्यक्ष सूक्ष्म निरीक्षण केलें असल्याने, ती या ३८६ पृष्ठांच्या कादंबरींत हुबेहूब वर्णन करण्याचें मोठमोठ्या नांवाजलेल्या लेखकांनाहि न साधणारें अवघड काम सफाईने उरकलें आहे. मागच्या ५।७ वर्षांपूर्वी जिने सातारा, सोलापूर, ठाणें वगैरे मराठी जिल्ह्यांतून मोठा धुमाकूळ माजवून खेड्यांतील ब्राह्मणवर्गाला सळो कीं पळो करून सोडिलें होतें, व जिची झळ पुण्यासारख्या शहरालाहि लागल्याशिवाय राहिली नाही, त्या सत्यशोधकी चळवळीच्या भोंवती या कादंबरींतील कथासूत्र गुंडाळलेलें असून, ही समाजविघातक चळवळ किंवा अर्धवट, अडाणी आणि अत्यंत बेजबाबदार अशा ब्राह्मणेतरांचें बंड आमूलाग्र समजून घेण्यास त्याचा चांगला उपयोग होईल, यांत शंका नाहीं. केवळ द्वेषावर उभारलेली कोणतीहि चळवळ कशी फार काळ टिकत नाही तर उलट 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' याप्रमाणे तिचा दुष्ट परिणाम समाजाला फार भोवतो याचें सत्य आणि सर्वानुभूत उदाहरण या पुस्तकांत आढळेल व तें समाजहितचिंतकांस फार उपयुक्त होईल. आता प्रत्यक्ष कथाविषय आणि त्यांतील पात्रें यांकडे वळूं.

कथेंतील प्रमुख नायिका मंजुळा. ही मोहिते या उच्च घरंदाज कुलांतील असून स्नेहपूर संस्थानांतील एक वरिष्ठ अधिकारी बॅ. मामासाहेब यांच्याजवळ भवानीपुरास तिचें इंग्रजी पांच यत्तांपर्यंत शिक्षण झालें होतें. यशवंतराव आणि विसाजीराव हे दोघे अंडर-ग्रॅज्युएट तरुणहि तिच्या वेळीं मामासाहेबांच्या घरीं शिकण्यास असत. यशवंतराव समतोल विचाराचा, विवेकी व सुशील असून विसाजीराव बराच उथळ, अविचारी, पण निष्कपटी असे. वडील वारल्यामुळे मंजुळा घरीं खडकपुरास आईकडे आली व तेव्हापासून तिच्यावर संकटपरंपरा ओढवत गेली. तिचें लग्न विसाजीरावाशीं

व्हावें असा मामासाहेबांचा हेतु व त्यास या दोघांची पूर्ण अनुकूलता, एवढेंच नव्हे तर वचनबद्धता. पण पुढे विसाजीराव सत्यशोधकी चळवळींत आणि एका अनौरस सुंदर तरुणीच्या पाशांत सांपडून त्यांचें मंजुळेकडील लक्ष कमी झालें. वडिलांच्या कर्जबाजारीपणामुळे मंजुळेच्या आईला तिचें लग्न तिच्या मनाविरुद्ध मानाजीराव पाटील या सत्यशोधकी चळवळींत शिरलेल्या एका श्रीमंत बिजवराशीं लावावें लागलें; पण लग्नांत बराच गोंधळ उडून वरातीच्या प्रसंगीं नवरदेव बरेच दुखावले व लगेच वारले. यानंतर विधवा मंजुळेने समाजकार्यास सर्वस्वी वाहून घेऊन एक नमुनेदार वसाहत केली व आपलें आयुष्य समाजसेवेंत व सदाचारांत ती घालवूं लागली. विसाजीरावास सत्यशोधक समाजाचा वीट येऊन त्याचें लक्ष पुन्हा मंजुळेकडे आदराने वळलें. तथापि मंजुळा विधवा व संन्यस्तवृत्तीची तेव्हा ती दुष्प्राप्य असें समजून त्यानेहि समाजसेवेंतच आयुष्य कंठण्याचें ठरविलें. पण नंतर एका वारकरी साधूने पुनर्विवाहाविषयी तिचें मन वळविलें व तिलाहि लग्न केल्याने जास्त समाजकार्य करितां येईल असें आढळून आलें; तेव्हा मंजुळा–विसाजीराव यांचें लग्न लागलें. या आनंदाच्या प्रसंगीं, वारकरी संप्रदायांत कांहीं फरक करून अभिनव-पताका-पंथ या नांवाचा आधुनिक परिस्थितीला तोंड देण्यासाठी स्त्रीपुरुषांचा समाजसेवेचा नवा पंथ निघाला. अस्पृश्यतानिवारण, बालविवाहनिर्बंध, पुनर्विवाहोत्तेजन, शिक्षणप्रसार, मद्यपानबंदी, खादी-चरखा वगैरे सामाजिक सुधारणांचा कार्यक्रम या नवसंप्रदायाने चालवयाचा असे. पंथांतील प्रत्येक स्त्रीजवळ स्वसंरक्षणार्थ एक सुरी असावी असें मंजुळेच्या अनुभविक सूचनेवरून ठरविण्यांत आलें. याप्रमाणे ग्रामसंघटनेला धरून लिहिलेल्या या कादंबरीचा शेवट दाखविला आहे.

कादंबरींतील सैतानपात्र (व्हिलन) पट्टेराव नांवाचा एक रक्षापुत्र आहे. त्याचा डोळा मंजुळेवर शेवटपर्यंत होता व आपली कामना सिद्धीस नेण्यासाठी त्याने तिच्यावर अनेक संकटें आणलीं. सत्यशोधकांचा हा तमासगीर होता. याने मानाजीरावाशीं संगनमत करून विसापूरसारख्या सुंदर व सुखी गांवाचा नास करून सोडला. मानाजीराव हा दोन नंबरचा सैतान. त्याचा शेवट फार करुणास्पद झाला. या दोन सैतानांची हस्तक पट्टेरावाची आई–वेश्यावजा रखेली. टपालांतून पत्रें फोडून दुसरीं बनावट त्या जागीं घालणें; पठाणांचा धाक घालणें: पैशाची लालूच दाखविणें; आगी लावणें; मोटारींतून पळविणें वगैरे छळणुकीचे प्रकार या सैतानांनी केलेले दिसतात. ते बहुतेक वाचकांच्या सरावाचे असतील. तथापि ते योग्य वेळीं व योग्य स्थळीं पुढे आणण्यांत कादंबरीकाराची कुशलता दिसून येते.

खेडेगांवचें सुंदर वर्णन करण्यांत लेखक हातखंडा दिसतो. प्रकरण ३ रें ते ५ वें यांत विसापुर गांवची रचना, रहाणी, व त्यांतील प्रमुख व्यक्ति यांची जी माहिती करून दिली आहे तीवरून वरील विधानाची सत्यता पटेल. तसेंच सत्यशोधकांचे चाळे, निवडणुकीच्या वेळीं करण्यांत येत असलेली लबाडी, कांही भोळ्या

प्रागतिक पक्षाचा या समाजाकडे असणारा ओढा, सर्वस्वार्थीपणा वगैरे गोष्टी लेखकाने प्रसंगानुसार मोठया खुबीने वर्णन केल्या आहेत. त्यावरून त्याचा खेड्यांशीं केवढा परिचय आहे व त्याचें निरीक्षण किती बारीक आहे याची कल्पना येईल.

वारकरीपंथाला सद्यःस्थित्यनुरूप जें वळण दिलें आहे तसेंच वळण खेड्यांतील पांढरपेशा तरुणांना सदाशिवराव या बी. एजी. झालेल्या सुशिक्षित व श्रीमान् तरुणाने घालून देऊन, लोकांना विनाकारण गुंडांपासून जो त्रास होतो त्याला आळा घातला. सुशिक्षित ब्राह्मण तरुणांनीं सदाशिवरावाचें उदाहरण घेण्यासारखें आहे. सारांश, खेडीं कशीं सुधरावींत याविषयी थोडेफार योग्य दिग्दर्शन कादंबरीकाराने करून दिलें आहे.

आता या कादंबरींत परीक्षकाला जे कांही दोष वरवर दिसतील त्यांकडे वळूं. प्रथम नायिका मंजुळाच घेऊं. तिचें वय १६ वर्षांचें व शिक्षण इंग्रजी ५ वी पर्यंत. असें असतांना ती स्त्रियांच्या बाबतींत आधुनिक सुधारक दुर्लक्ष करित असतात असा दोष देते. तिचे असे विचार ऐकून त्रिंबाजीरावहि चकित होतो. पुढे दोन वर्षांतच ती एक वसाहत स्थापन करून ती आदर्शभूत करून दाखविते. इतक्या लहान वयांत प्रौढ अनुभवशीर माणसांनाहि न होणारें कार्य ती करिते हें वाचकांस अस्वाभाविक वाटणार आहे. असाच अस्वाभाविक बदल खेड्यांत वाढलेल्या म्हताऱ्या — पुनर्विवाहाला अनुकूल—शंभुराव मान्यामध्ये आढळतो. वारकरी संप्रदायांत धर्मानंदासारखे गुरु असतील तर समाजहितेच्छूंना समाधानच वाटेल; पण वस्तुस्थिति निराळी आहे. सुभान्याची बायको इतकीं वर्षें पातिव्रत्यधर्माने पवित्र कशी राहूं शकते याचेंहि आश्चर्य वाटेल. असो, हे पात्रांमधील दोष झाले. आता ग्रंथाच्या भाषेकडे कांही पाहूं. भाषा सारखी सोपी व चटकदार आहे यांत शंका नाहीं; वर्णनशैलीहि चांगली आहे. दोषच जर पहावयास लागलों तर अगदींच नाहींत असे नाहीं. उदाहरणार्थ पुढील शब्दप्रयोग पहा :— 'कित्येक ठिकाणीं धप्पकन तव्यावर भाकरी टाकल्याचा आवाज ऐकूं येत होता.' (पा. ५३); [शास्त्रीबुवांनीं] 'घरीं येऊन पगडी खुंटीवर ठेविली' (पा. ४२); हे शास्त्री खेड्यांतील व बाळबोध वळणाचे गरीब जोशी असल्याने ते पगडी वापरीतसें वाटत नाही. 'आयत्या पिठावर रांगोळी ओढणारेच होते' (पा. ३६). 'कित्येक बायका झुणका-भाकरी कल्यानतर हातांत तांब्या घेऊन कोठेंतरी पडक्या जागीं बहिर्दिशेस जाऊं लागल्या होत्या' (पा. ५३) हें वर्णन वस्तुस्थितिनिदर्शक असलें तरी देणें योग्य होणार नाही; कारण कांही अशा वस्तुस्थिति झाकूनच ठेवाव्या लागतात. कांही ठिकाणच्या गोष्टी आगेमागे झाल्या आहेत. प्रकरण १३ यांतलि प्रारंभींचा भाग ७ व्या प्रकरणानंतर व ११ व्याच्या आधी खुलासेवार यावयास पाहिजे होता. कारण त्या जागीं ओझरते उल्लेख फक्त न कळत आलेले आहेत. असो. यांसारखे दोष असले तरी ते किरकोळच मानावे लागतील. एकंदरीत ही कादंबरी आधुनिक वाङ्मयांत अव्वल दर्जाची ठरण्यास हरकत नाही. चिं. ग. कर्वे

# ‘ ग्रंथिक कीं ग्रांथिक ? ’



लेखकः—विष्णु हरि निजसुरे.

ग्रंथांतील भाषा इत्यादि अर्थी ‘ ग्रांथिक ’ हा शब्द अपाणिनीय म्हणून अशुद्ध व त्याज्य व ‘ ग्रंथिक ’ हा पाणिनीय म्हणून ‘ ग्रांथिक ’च्या जागीं बसविविण्यास योग्य असें रा. पावशांचें म्हणणें आहे. प्रथम ‘ ग्रंथिक ’ शब्दाचा विचार करूं. हा शब्द गांठेंपिंपळमूळ ह्या अर्थी अमरकोशकाराने दिला आहे. त्यावरील टीकेंत भानुजी दिक्षित त्याची व्युत्पत्ति ‘ ग्रंथेः प्रतिकृतिः ’ ( गांठीसारखें ) अशी देऊन ‘ इवे प्रतिकृतौ ’ हें पाणिनिसूत्र देतात. क्षीरस्वामीहि हीच व्युत्पत्ति देतात. ग्रंथशब्दापासून ते हा शब्द व्युत्पादित नाहीत. दीक्षित, या शब्दाच्या अर्थाबद्दल ‘ ग्रंथिकं पिप्पलीमूले गुग्गुलुग्रन्थिपर्णयोः । करीरे पुंसि दैवज्ञे सहदेवाख्यपाण्डवे ॥ असा विश्व-( मेदिनी )कोशाचा आधार देतात. या अर्थांपैकी ग्रंथ म्हणजे पुस्तक याचा संबंध फक्त दैवज्ञ म्ह० ज्योतिषी याच्याशीं जोडतां येईल. पण ग्रंथिक म्ह० ग्रंथवान् असा मत्वर्थीय प्रत्ययोत्पन्न अर्थ आपल्यांच्या कोशांतहि दिलेला नाही. तेव्हा रा० पावशांनी ‘ अत इनि ठनौ ’ या पाणिनिसूत्राप्रमाणे व्युत्पादिलेला व ग्रंथशब्दापासून झालेला ग्रंथिक शब्दच संस्कृतांत रूढ नाही. जो आहे तो ग्रंथि म्ह० गांठ यापासून ‘ कन् ’ प्रत्यय लागून झालेला आहे. पण चर्चेकरिता ‘ ग्रंथ ’पासूनहि ग्रंथिक म्ह० ‘ ग्रंथः अस्याः अस्ति’ असा मत्वर्थीयार्थी शब्द करितां येईल ही गोष्ट कबूल करूं. पण तो ‘ ग्रंथांत उपयोगांत आणण्याची भाषा ’ ‘ किंवा ग्रंथांत साजणारी भाषा ’ अशा अर्थी उपयोगांत कसा आणतां येईल ? आणला तर त्याचें अर्थदृष्ट्या पाणिनीयत्व जाईल. शिवाय तें जर मराठींतहि कट्टरपणें पाळावयाचें म्हटलें तर त्याचें ‘ग्रंथिकी’ किंवा ‘ग्रंथिका’ असें जें कांही स्त्रीलिंगी रूप होईल तेंच वापरलें पाहिजे. पण रा० पावशे ग्रंथिक येवढ्यावर खूष. असो.

वास्तविक ‘ ग्रांथिक ’ म्ह० जिच्याजवळ म्ह० जिच्यांत ( पुष्कळ ) ग्रंथ आहेत असा या शब्दाचा मत्वर्थीय अर्थ नाही व ‘मत्वर्थीयाखेरीज ठक्, ठञ् इ० इक आदेश घेणारे प्रत्यय ज्या शब्दांस लागतात त्यांच्या वर्गांतहि ग्रंथ शब्द सांपडत नाही. मग याला तोड काय ? अगदी सोपी. संस्कृतच्या मर्यादा आपण पाळावयाच्या म्हणजे मराठीचा स्वतन्त्रपणें शब्द बनविण्याचा अधिकार गमवावयाचा कीं काय ? नाही. ‘ ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरचि होइजे ’ या ज्ञानेश्वरींतील न्यायाप्रमाणे जे संस्कृत तत्सम शब्द मराठींत रुळले आहेत त्यांना मराठी समजून मराठी-

प्रमाणे व्युत्पत्ति लावा. संस्कृतांत विशिष्ट अर्थी ग्रंथ शब्दास इक लागत नाही तर मराठींत तो ठराव शब्दास लावून 'ठराविक' करतात तसा ग्रंथ शब्दास लावा व वृद्धि करून ग्रांथिक रूप करा.

'ठराविकांत' वृद्धि नाही. ग्रांथिकांत ती आहे. तात्पर्य, शब्द संस्कृतांतलाच व प्रत्ययहि संस्कृतांतलाच पण त्याचा जोड मात्र मराठी. इक प्रत्यय 'पोएटिक' सारख्या शब्दांत इंग्रजींतहि (लॅटिनच्या द्वारें?) गेलेला आहे. मग त्याच्याकडून निवळ मराठींत कां काम करून घेऊं नये? तात्पर्य, पाणिनीच्या नांवाला भलत्याच ठिकाणीं बिचकण्याचें काय कारण!

शिवाय पाणिनि हा भाषेचे वैदिक व लौकिक असे भेद करतो. ('यथोक्तं लोकवेदयोः) त्यामुळे ग्रंथांतील भाषा या अर्थी एखादा शब्द संस्कृतांत रूढ नाही. मराठींत वैदिक व लौकिक असे भाषेचे भेद नसून ग्रंथांतील व बोलण्यांतील भाषा असे भेद आहेत. तेव्हा 'ग्रंथांतील' ह्या अर्थी मराठी लेखकांनीच ग्रांथिक शब्द बनविला. संस्कृतांतील 'तद्धित' 'कृदन्त' व उणादि प्रकरणांत गुण, वृद्धि वगैरे बाबतींत इतका लहरीपणा आहे की (पाणिनीने गुण, वृद्धि, वगैरे करणारे प्रत्यय ही व्यवस्था मागाहून लाविली) तसा लहरीपणा चालवून आपलें काम यथायोग्य चालविणारे सुंदर शब्द मराठीच्या टांकसाळेंत बनविण्यास बिलकूल कचरण्याचें कारण नाही.

संस्कृत शब्दांसारखे दिसणारे परंतु मराठींत तत्सम म्हणून रूढ झालेले किंवा मराठी लेखकांनी संस्कृतच्या धर्तीवर बनविलेल्या शब्दांच्या बाबतींत संस्कृताच्या अतिरिक्त अभिमानाने वेळीं अवेळीं अपाणिनीयत्वाचें भूत उठविणारांची कृति गैर कशी आहे हें दाखविण्याकरिता शास्त्रिपरंपरेंतच रूढ असलेली एक मनोरंजक व बोधक आख्यायिका आम्हीं पुढे दिली आहे. एकदां भोजराजाच्या दरबारांतील पण्डितांना महाभारतांतील अपाणिनीय प्रयोगांचा (ते आर्ष असल्यामुळे मान्य केले पाहिजेत हें विसरून) त्रास दुःसह होऊन त्यांनी भोजाच्या संमतीने सर्व महाभारत पाणिनीला धरून दुरुस्त करण्याचा खटाटोप सुरू केला असतां एक पोपट येऊन लेखकांच्या लेखण्यांवर आपल्या चोचीने प्रहार करून व 'अष्ट' 'अष्ट' असें बोलून पण्डितांच्या कार्यांत व्यत्यय आणूं लागला. आठ एक दिवस असें चालल्यावर त्यांनी ही गोष्ट राजाच्या कानांवर घातली. त्याने कालिदासास हें कोडें उलगडण्यास सांगितलें. तेव्हा कालिदासाने 'अष्ट' 'अष्ट' शब्दांवरून असा उलगडा केला की तो पोपट म्हणजे शुकरूपी शुकाचार्य असून त्याच्या कृतीचा अर्थ असा की व्यासांस चूक ठरविणारांनी, पाणिनीखेरीज इन्द्र, चन्द्र वगैरे दुसरे वैयाकरण होते त्यांचींहि व्याकरणें पाणिनीच्या व्याकरणाबरोबर जमेस धरून आठ व्याकरणांना अनुसरून व्यासांनी महाभारतांतील व्याकरणप्रयोग केले आहेत, ही गोष्ट लक्षांत घेतली नाही. हा उलगडा ऐकून तें काम बंद करण्यांत आलें. आख्यायिका कालिदासाच्या मोठेपणासाठीं रचिली असली तरी भाषाशुद्धीविषयीचा तिचा कटाक्ष उघड आहे. तात्पर्य,

निबळ मराठीविषयक बाबींत पाणिनीचा फाजील अभिमान धरावयाचें कारण नाही॰

या उपरहि पाणिनीयत्वाचा आग्रहच असेल तर ग्रांथिक शब्दास पुढे सांगितल्याप्रमाणे शुद्ध ठरवावा. 'परिगणनस्य प्रायिकत्वात्' म्ह. अमुक नियम अमुक शब्दांस लागतो किंवा अमके शब्द अमुक नियमांच्या कक्षेंत येतात असें जें परिगणन म्हणजे गणती केलेली असते ती 'प्रायिक' म्ह. अपुरी किंवा बहुतेक ( इं. approximate ) म्ह. जवळजवळ असते. हें संस्कृत वैयाकरणांचें एक प्रसिद्ध वचन आहे. त्याचा आधार ग्रांथिक शब्दास द्यावा, किंवा पाणिनि कित्येक गण 'आकृतिगण' म्ह. नमुनेवजा असे देतो. तशा एखाद्या गणांत ग्रंथ शब्द माना. व वसंत, संवत्सर इत्यादि शब्दांपासून जसे वासंतिक, सांवत्सरिक असे शब्द बनतात तसा ग्रंथपासून ग्रांथिक असा अतिदेश करा. पण त्याला आता इतक्या उशिरा अशुद्ध मानूं नका.

---

**नवयुगधर्ममाला**— ( नमुना अंक. संपादक, सदाशिव कृष्ण फडके, पनवेल, किं. १ रु. ) हा नमुना अंक आमच्याकडे अभिप्रायास येऊन बरेच दिवस झाले. अभिप्राय देण्यास विलंब लागला ह्याबद्दल दिलगीरी वाटते.

आपले विचार दुसऱ्यांस ग्रहण करण्यास लावावयाचे असेल तर उत्तम भाषाशैली पाहिजे. भाषा हें एक शस्त्र आहे. ह्या शस्त्राने दुसऱ्यांच्या मतांचा संहार करून आपल्या मतांची प्राणप्रतिष्ठा करतां येते. अशा कर्तबगारीचें श्री. फडके यांचें शस्त्र आहे. त्यांच्या मताप्रमाणे सनातन धर्म विशद करून सांगण्याचा अधिकार त्यांस पोचतो हें ह्या नमुना अंकांतील प्रतिपादनावरून कोणासहि कबूल करावें लागेल. आता रा. फडके ह्यांना कोनाकोपऱ्यांत राहूं न देण्याची जबाबदारी महाराष्ट्रावर आहे; म्हणून नवयुगधर्ममालेस महाराष्ट्रांत भरपूर आश्रय मिळेल अशी आम्ही आशा करतों.

ना. गो. चापेकर

**अहिल्योद्धार**—( ले.—प्रो. ना. के. बेहरे, एम्. ए., बी. एस्सी. किं. कापडी रु. १-२-०; कागदी १४ आणे. ) प्रो. बेहरे हे नव्या युगांतील सुधारक आहेत. तेव्हा जुन्या भांड्यांत नवें दूध ओतून पौराणिक नाटकांप्रमाणे पौराणिक कादंबऱ्या लिहिण्याचा त्यांनी पायंडा पाडला हें युक्तच आहे. गौतमाला राजा बनवून त्याच्याकडून त्यांनी सांख्यशास्त्रावर एक अप्रतिम ग्रंथहि लिहून घेतला व त्याचा शिष्य जो कपिलमुनि त्यास कमलेबरोबर लग्न लावून सोडून दिलें.

असो. कादंबरी वाचनीय झाली आहे. भाषा सोज्वल आहे. कादंबरींत अर्वाचीन राजकारण प्रतिबिंबित झालें आहे. उत्कृष्ट विचारहि इतस्ततः विखुरलेले आहेत. "मोठेपणा वैभवांत नसून त्यागांत आहे. श्रीमंती उपभोगांत नसून दानांत आहे व ऐश्वर्य बडेजावांत नसून परोपकारांत आहे." असले विचार बहुमोल होत. पश्चात्तापाने कोणत्याहि पापाचें क्षालन होतें हें ह्या कादंबरीचें सार आहे तें निरपवाद आहे.

ना. गो. चापेकर

# शंका, चर्चा, इत्यादि

धोंडभट्टी— म्ह. स्नान, संध्या वगैरे ब्राह्मणाचीं नित्यकर्मे न करतां कोरडेंच भस्म वगैरे फासून याज्ञिक करणें. वृद्धांच्या तोंडून ऐकिलेल्या पुढील श्लोकांत एका 'धोंडभट्टाची' समयसूचकता वर्णिली आहे.

'येतो हा धोंडभट्टी द्विज करुनि सदा तीर्थ घाया पदांचें,
जाणोनी स्वामि त्याचा मसलत करि भंगावया तेज त्याचें
राहावें येथ आतां, उशिर नच मुळीं भोजना मी न सोडीं,
'राहूं' ऐसें भिडेनें म्हणतच उठतां जानवीं सर्व तोडी.

आणखी एक ऐकीव कोटिबाज श्लोक.

राजा बोले 'तुझ्या कां नसति कच कराग्रीं?' वदे विप्र 'घेतां—
घेतां दानें गळाले,' 'मजसि नसति कां!' 'भूपते, तींच देतां.'
'राहो तें, या जनांच्या नसतिहि वद कां?' चिंतुनी विप्र बोले,
देतां घेतां बघोनि सतत करकरां चोळितां ते जळाले.

पुढील ऐकीव श्लोकांत एक प्रसिद्ध गोष्ट थोडक्यांत दिली आहे.

समीप बैसे अति याच रागें, भूपाळ बोले कविलागिं सांगें,
किती असें अंतर तूंत आणी, खरांत, बोले कवि अर्धपाणि.

**आगरवाडी**:— शेतीवाडी शब्दाप्रमाणे हा शब्द कोकणांत रूढ आहे. आगर म्हणजे म्ह. खाण (सं. आकर), जसें मिठागर; परंतु आगर शब्द कोकणांत नारळीपोफळींच्या बागांस लावतात. हा 'आगर' शब्द 'अग्रहार' ह्या संस्कृत शब्दापासून आलेला दिसतो. अग्रहार म्ह. गुरुकुलादावृत्तब्रह्मचारिणे देयं क्षेत्रादि, म्ह. गुरुघराहून परत आलेल्या ब्रह्मचाऱ्यास देण्यास योग्य असें शेत वगैरे (आपटे यांचे कोशांत अवतरलेलें 'तर्कवाचस्पत्यम्'). 'वाटिका' पासून वाडगें व वाडी.

**हिरामण**:— हें नांव सोनारांत आहे; तें 'हिरण्मय' या सं. शब्दापासून ण् म् चा व्यत्यास, यलोप व र चा रा होऊन झालें. 'सोन्याचा बनलेला' अशा अर्थाचें नांव सोनारांना नाही घावयाचें तर कोणाला?

**थरुं व आवसा**:— हे शब्द शिष्ट संस्कृतांतून विकृत होऊन कोकणांत रोजच्या व्यवहारांत आहेत, थरुं म्ह. कोयत्याची मूठ. आवसा म्ह. प्लेगमधील झोपडें. पहिला 'त्सरु' म्ह. तरवारीची मूठ व दुसरा 'आवास' म्ह. वसतिस्थान यापासून झाले आहेत.

'खड्ग क्षितिवरि पाडी द्रोण च्छेदूनिया नव त्सरुस- मोरो०
'आवासवृक्षोन्मुखबर्हिणानि- रघु० सर्ग २

**संकासूरः**— शिमग्यांत कोकणांत संकासुराचें सोंग आणतात. सोंग घेणारा एक काळ्या रंगाचा संच ( suit ) घालतो व तोंड झाकण्यास कापडाचाच नाकडोळे ओठ वगैरे शिवलेला कपाळावरून वरती निमूळता होणारा सुमार हातभर उंच टोप घालतो. कमरेला बारीक घंटा व पायांत चाळ बांधतो. त्याच्या हातांत एक तोबा असतो. त्याने पोरांस मारावयास येऊन तो त्यांस भेडसावतो. बागुलबुवाचे ऐवजी लहान मुलांस संकासुराची म्ह. वेद चोरून नेणाऱ्या ह्या 'शंखासुरा' चीच भीति आया मुलांस घालतात.

**थेरीणः**— शिमग्यांतील तमाशांत नाचणाऱ्या पोऱ्यास कोकणांत थेरीण म्हणतात. नाचतांना थेरें म्ह. हावभाव करणारी ती थेरीण.

**सालाः**— 'श्यालः' बायकोचा भाऊ यापासून. खेड्यांतून अजून चांगल्या अर्थाने रूढ आहे. पण पुष्कळ वेळां त्याचें शिवींतच रूपांतर होतें. मूळ शब्द श्यालः किंवा श्यालकः हा रूढ करणें जरूर आहे; कारण हल्ली मेहुणा शब्दास दोन अगदी भिन्न नातीं दाखवावीं लागतात व घोटाळा होतो.

विष्णु हरी निजसुरे

---

# अभिप्राय

**मानवी संस्कृतीचा इतिहास** ( लेखक–रा. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए., किंमत ६ आणे, पृष्ठसंख्या ९८. )

सांप्रतचें युग हें ज्ञानाचें युग आहे. सर्व प्रकारचें ज्ञान – शास्त्रीय, राजकीय, भौगोलिक, ऐतिहासिक, तात्त्विक, वाङ्मयिक, अशा अनेक प्रकारचें – ज्ञान अत्यंत मोठया प्रमाणावर वृद्धि पावत आहे व त्याची माहिती लोकांना देण्यासाठी ग्रंथ-निष्पत्तिहि बऱ्याच मोठया प्रमाणावर होत आहे. तथापि मनुष्याच्या कर्तव्याचा व्याप, जीवनार्थ कलह व त्यामुळे होणारा फुरसदीच्या काळाचा संकोच, हेहि तशाच प्रमाणानें वाढत आहेत; व त्यामुळे वाढत्या ज्ञानाचा व पसरणाऱ्या ज्ञानसामुग्रीचा लाभ घेणें हें अधिकाधिक कठिण होत चाललें आहे. अशा स्थितींत मोठमोठया विषयांवर लहान लहान ग्रंथ तयार झाल्यास त्या त्या विषयांत बुद्धीचा प्रवेश होण्यास सुलभ जाईल. त्यांतहि मराठी भाषेंतील ग्रंथसंख्या अल्प असल्याने दरेक विषयावरील माहिती संकलित करण्याचे प्रयत्न अधिक हितावह होतील. याच हेतूने बडोदें येथील सन १९२१ सालच्या साहित्य-संमेलनांत "विविधज्ञानमाला" काढण्याबद्दलचा ठराव आणला गेला होता. व तेथें तो मंजूरहि झाला होता. त्याप्रमाणे अगदी ताबडतोब जरी तशा प्रकारच्या एक अथवा अनेक माला निघाल्या नाहीत, तरी अलीकडे नुकत्याच निघणाऱ्या दोन माला त्या स्वरूपाच्याच होत. पैकी एक श्री. य. रा. दाते यांनी काढलेली होय व दुसरी नागपूरचे प्रो. बनहट्टी यांची "नवभारतग्रंथमाला" ही होय. पण हे दोनहि प्रयत्न वाङ्मयाच्या आस्थेने विद्वान लेखकांनी स्वतःच्या जबाबदारीवर सुरू केले आहेत. त्यांना सरकारी आश्रय मुळीच नाही. सांप्रतचें श्री. कर्वे यांचें पुस्तक हें मात्र सरकारने नेमलेल्या ऐतिहासिक व भौगोलिक पुस्तक-समितीच्या देखरेखीखालीं प्रसिद्ध झालें आहे. सरकारने अशा प्रयत्नांना उत्तेजन देण्यासाठी सुरू केलेला हा उपक्रम अभिनंदनीय असून त्या उपक्रमांतील प्रस्तुत ग्रंथहि चांगला उतरला आहे.

क्राउन अष्टपत्री सांच्याच्या ९८ पानांत मानवोत्पत्तीपासून आजतागायतच्या काळाचें केलेलें परीक्षण हें स्वभावतःच विहंग-परीक्षण नव्हे; कारण पक्ष्यांच्या गतीच्या वेगाला सांप्रतच्या श्नायडर कप रेसेसमधील विमानांच्या ताशीं चारशें मैलाच्या गतीने फार मागे टाकले असल्यामुळे–हें विमानपरीक्षणच होय. लेखकाने पहिल्याप्रथम संस्कृति म्हणजे काय याचें व्यावहारिक लक्षण देऊन नंतर सजीव सृष्टीच्या उत्पत्तीपासून मानवी समाज सांप्रतच्या अवस्थेला येऊन पोचेपर्यंतच्या काळाचें विवेचन पहिल्या सहा प्रकरणांत केलें आहे. सातव्या व आठव्या प्रकरणांमध्ये शास्त्रीय संशोधन व

औद्योगिक प्रगतीचा विचार करून नवव्यांत राजकीय क्रान्त्यांचा उल्लेख केला आहे. यानंतरच्या दहाव्या प्रकरणांत नवविचारप्रवर्तक युगाचें लक्षण देऊन अकराव्यांत जागतिक शांतता व आंतरराष्ट्रीय वृत्तीची वाढ दर्शविली आहे. अखेरच्या उपसंहार-प्रकरणांत मानवी संस्कृतीचें भवितव्य अंदाजण्याचा प्रयत्न केला आहे. येणेंप्रमाणे पुस्तकांतील विवेचनाचें सार आहे.

पुस्तकाच्या अल्पमर्यादेंत वर उल्लेखिलेल्या प्रकरणांतून अर्थातच मुख्य गोष्टींचाच उल्लेख करणें स्वाभाविक आहे व तितकाच तो लेखकाने केला आहे. यामुळे पुस्तकांत प्रमाणबद्धता साधली आहे. या पुस्तकाने वाचकांची जिज्ञासा अधिक वाढविली आहे. लेखकाने आपल्या खुलाशांत सांगितल्याप्रमाणे "या विषयास वाहिलेला मोठा ग्रंथ तयार होणें आवश्यक आहे." तो लवकर निघेल असें आश्वासन लेखकाने दिलें आहे, तें त्यांच्याकडून लवकर पुरें केलें जावें अशी या पुस्तकाच्या वाचनाने इच्छा होते.

पुस्तकांतील प्रतिपादनासंबंधाने पाहतां प्रथमतः असें म्हणावें लागतें की "मानवी संस्कृतीचा इतिहास" हें नांव कांहीं अंशीं भ्रामक झालें आहे. त्यापेक्षा "मानवी समाजाचा इतिहास" हें नांव अधिक अन्वर्थक झालें असतें. कारण "संस्कृति" शब्दाचें शास्त्रीय लक्षण पुस्तकांत कोठेंहि दिलेलें नाहीं; अगर त्या लक्षणाच्या अनुरोधाने मानवसमाजाचें परीक्षणहि केलें गेलें नाही. "संस्कृति म्हणजेच अर्थ, धर्म, आचार, विचार, नीति, बुद्धि इत्यादि सर्व बाबतींत सुधारणा किंवा प्रगति" अशा प्रकारच्या संस्कृतीच्या वर्णनास शास्त्रीय लक्षण कोणीहि म्हणणार नाही; व एकंदर पुस्तकांतहि संस्कृतीची शास्त्रीय चर्चा कोठेंहि केलेली नाहीं. आरंभापासून मानवसमाज कोणकोणत्या अवस्थांतून गेला त्याचें वर्णन फक्त यांत दिलें आहे. त्यामुळे पुस्तकाच्या नांवावरून विवेचनाविषयीं वाचकांच्या मनांत जी अपेक्षा उत्पन्न होते, ती वाचनानंतर निष्फळ होते. यास्तव या विषयावर सदरहू लेखक जो मोठा ग्रंथ लिहिणार आहेत, त्यांत वर सुचविलेली सुधारणा त्यांनी अवश्य करावी; अथवा H. G. Wells या सुप्रसिद्ध लेखकाच्या Outlines of History या इंग्रजी ग्रंथाच्या धर्तीवर सांप्रतच्या पुस्तकाची वाढविलेली आवृत्ति काढावयाची असेल तर त्या पुस्तकाच्या नांवाप्रमाणेच सांप्रतच्या लेखकाने आपल्या पुस्तकाचें नांवहि बदलावें.

प्रकरण दहामधील "विश्वबंधुत्वाची वाढ सांप्रतच्या युगांत होत आहे," हें लेखकाचें म्हणणें बहुतेकांना अमान्य होईल असें आम्हांस वाटतें. हल्ली दरेक देशाची आपल्या स्वतःच्या पोळीवर तूप ओढण्याची स्वार्थी प्रवृत्ति पाहिली, लीग ऑफ नेशन्समध्ये आरमार-नियंत्रणाचे कोरडे ठराव पास करीत असतांनाच इतर राष्ट्रांना नामशेष करण्यासाठी विध्वंसक सामुग्रीची सर्व देशांनी चालविलेली वाढ पाहिली, काळ्यागोऱ्यांमधील चढता द्वेषाचा पारा पाहिला, म्हणजे विश्वबंधुत्व कोठे लपलें आहे, तें शोधून काढणें फार कठीण जाईल. यामुळे लेखकाने या प्रकरणीं दिलेला

अभिप्राय चिन्त्य आहे, असेंच म्हणावें लागतें, मात्र याव्यतिरिक्त इतरत्र स्वतःच्या अभिप्रायांचें प्रदर्शन लेखकाने फारसें केलेलें नसल्यामुळे बाकीच्या विवेचनाविषयी द्विधा मत होण्याचा प्रसंग फारसा येत नाही.

किरकोळ बाबतींसंबंधाने एकदोन उल्लेख पुरे होतील. सुमेरियन् लोक लेखकाच्या मतें कोणत्या मानववंशांतील होते, हें लेखकाने दिलें नाही. "हे लोक सेमेटिक् मात्र नव्हते," इतका नकारात्मक अभिप्राय दिला आहे, तो मात्र बरोबर आहे. पण याच्याच वरच्या ओळींत "बाबिलोनियन लोकांना सुमेरियन्, अक्काडियन् म्हणण्यांत येतें," असें विधान केलें आहे, तें मात्र अगदी चुकीचें आहे. इतिहासाप्रमाणे व लेखकाच्या मताप्रमाणेहि सुमेरी राष्ट्र प्रथमचें असून बाबिलोनची स्थापना त्यानंतर २॥-३ हजार वर्षांनी सेमेटिक् वंशांतील लोकांनी केली आहे, तेव्हा सुमेरियन् व बाबिलोनियन् यांच्यांत कालभेद व वंशभेद असतां बाबिलोनियन् लोकांना सुमेरियन् म्हणण्यांत येतें, हें विधान विपर्यस्त होय. फार तर कालदृष्ट्या आधी असलेल्या सुमेरी लोकांना नंतरच्या बाबिलोनी लोकांनी जिंकल्यामुळे पहिल्या सुमेरी लोकांना स्थूल अर्थाने नंतरच्या बाबिलोनी लोकांच्या नांवाने उल्लेखिण्यांत येतें, असें म्हणतां येईल! तेव्हा लेखकाने केलेलें विधान उलटें झालें आहे, असें म्हणावें लागतें. पृष्ठ ४० वर "प्रयोग करा" "प्रयोग करा" असें वारंवार बजाविण्याचें कर्तृत्व रॉजर बेकन यांजकडे लेखकाने दिलें आहे; पण वस्तुतः 'Father of Experimental Philosophy' अथवा "प्रायोगिक तत्त्वज्ञानाचा जनक" ही पदवी प्राप्त झालेल्या फ्रान्सिस बेकन् यांजकडे हें कर्तृत्व दिलें गेलें आहे. अशा प्रकारचे थोडे उल्लेख सोडले तर लेखकाचीं इतर विधानें निरपवाद आहेत.

पुस्तकाची भाषा सुबोध व शुद्ध आहे आणि विवेचन सरळ व सुसंगत आहे. एकंदरींत पुस्तक वाचनीय असून आम्हीं आरंभीं म्हटल्याप्रमाणे अतिविस्तृत विषयाचा थोडक्यांत परिचय करून देण्याचें कार्य या पुस्तकाने चांगलें केलें आहे.

द. ना. आपटे

---

# मराठी भाषेची जुनाट परंपरा

संस्कृत, पाली, प्राकृत व अपभ्रंश या भाषांचें क्रमाक्रमानें रूपांतर होऊन मूळ मराठी भाषा अस्तित्वांत आली यासंबंधीं सर्व भाषाशास्त्रकोविदांचें एकमत आहे. मराठी भाषेंतील वाक्प्रचार, प्रयोग, विशिष्ट शब्द वगैरे बाबतींचा सूक्ष्म विचार केला तर सर्व बाबतींत संस्कृत भाषेची पूर्ण छाप मराठीवर असल्याचें निदर्शनास येतें, व ही गोष्ट किरकोळ बाबतींत सुद्धा आढळते. यासंबंधी सोदाहरण स्पष्टीकरण या लेखांत करण्यांत येईल. या लेखांत नमुन्यादाखल जीं उदाहरणें देण्यांत येतील त्यांस खाली दिलेला लेख आधारभूत आहे. [1]

1 Age of Pāṇini and Sanskrit as a Spoken Language by K. B. Pathak, B. A., Ph. D., Annnals of the B. O. R. Institute, Poona, Vol. XI-Part I.

डॉ. का. बा. पाठक यांनीं पातंजल महाभाष्यांतील उदाहरणें देऊन पतंजलीच्या काळीं संस्कृत ही बोलण्याची भाषा होती असें सिद्ध केलें आहे. त्या उदाहरणांतून खालील उदाहरणें घेतलीं आहेत.

### ( १ ) किं जातम् ।

एवं हि दृश्यते लोके अनिर्ज्ञातेर्थे गुणसंदेहे च नपुंसकलिङ्गं प्रयुज्यते । किं जातमित्युच्यते । द्वयं चैव हि जायते । स्त्री वा पुमान्वा ।

महाभाष्य. १-९-३९

एखादी स्त्री प्रसूत झाल्यावर तिचे नातलग "काय झालें" असा नपुंसकलिंगी प्रयोग करून मुलासंबंधी चौकशी करितात. अपत्य, मुलगा किंवा मुलगी यांपैकी कांहीतरी असतें; या ठिकाणीं अनिर्ज्ञात अर्थ असल्यामुळे लोकांत नपुंसकलिंग योजण्याचा प्रघात आहे असें पतंजलि म्हणतो. मराठी भाषेंतहि "काय झालें" असेंच म्हणण्याचा प्रघात आहे. यावरून पतंजलीच्या काळापासून ही परंपरा चालत आली आहे ही गोष्ट निर्विवाद सिद्ध होते.

### ( २ ) विभक्ता भ्रातरः ।

सामान्यभूतकालार्थक कृदन्तें संस्कृतांत क्त (त) व क्तवतु (तवत्) हे दोन प्रत्यय धातूला लागून होतात; पैकी क्तवतु प्रत्यय कर्तरि होतो व क्त प्रत्यय नेहमी कर्मणि होतो. तथापि पाणिनीनें दिलेल्या कांहीं धातूंच्या बाबतींत क्त प्रत्यय कर्तरि होतो. या धातूंच्या यादींत विभज् व पा हे धातु पाणिनीनें दिले नाहीत. तरी सुद्धा पतंजलीच्या काळीं "विभक्ता भ्रातरः । पीता गावः ।" असे कर्तरि प्रयोग व्यवहारांत लोक करीत असत. हे प्रयोग व्याकरणनियमाविरुद्ध होते तरी पतंजलीनें त्यांचें समर्थन केलें आहे:—

अकारो मत्वर्थीयः । विभक्तमेषामस्ति विभक्ताः । पीतमेषामस्ति पीता इति । अथवा उत्तरपदलोपोऽत्र द्रष्टव्यः । विभक्तधना विभक्ताः । पीतोदकाः पीता इति ।

महाभाष्य ३-४-६७

सांप्रत कालींहि 'विभक्त' या भूतकृदन्ताचा कर्तरि अर्थच व्यवहारांत रूढ आहे. विभक्ता भ्रातरः = भाऊ विभक्त झाले, असेंच म्हणण्याचा परिपाठ आहे; "विभक्त केले गेले" असें कोणी म्हणत नाही.

## ( ३ ) षष्टिका. ( साटेर )

साटेर म्हणून एक भाताचा प्रकार आहे. हें भात लावल्यापासून साठ दिवसांत तयार होतें. पांचव्या शतकांत होऊन गेलेला बौद्ध व्याकरणकार चंद्र या भाताचा उल्लेख करितो;

षष्टिर्दिनानि पाकपरिमाणमेषामिति षष्टिकाः शालयः, रूढित्वान्न मुद्गादिष्वतिप्रसंगः ।
चंद्रवृत्ति. ४-१-१०४

काशिकावृत्तींतहि याचा उल्लेख आहेः—

षष्टिरात्रेण पच्यन्ते षष्टिकाः । संज्ञैषा धान्यविशेषस्य । तेन मुद्गादिष्वतिप्रसंगो न भवति । ( बनारस प्रत भाग २ पृ० २४)

काशिकावृत्ति ही पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील सातव्या शतकांतील टीका आहे.

## ( ४ ) गोगोष्ठम्, तिलतैलम्

गोष्ठम्—याचा अर्थ गाई बांधण्याची जागा. (गावः तिष्ठन्ति अत्र ). रूढीने गोष्ठ याचा यौगिक अर्थ नष्ट होऊन, गोष्ठ म्हणजे पशूंचें निवासस्थान असा झाला. यामुळे गोगोष्ठम् (गाईचा गोठा), महिषीगोष्ठम् (म्हशीचा गोठा) हे शब्द सशास्त्र ठरले.

तैलम्—याचा अर्थ तिळापासून काढलेला स्नेह; हा योगिक अर्थ रूढीने लुप्त होऊन तैल म्हणजे कोणत्याहि वस्तूपासून काढलेला स्नेह इतकाच अर्थ राहिलाः तिलतैलम्, सर्षपतैलम् ही शब्दयोजना सशास्त्र ठरली. पतंजलीचें समर्थन खाली देतोंः—

तैलशब्दश्च प्रत्ययो वक्तव्यः । इंगुदीतैलम्, सर्षपतैलम् । प्रकृत्यन्तरं तैलशब्दो विकारे वर्तते । एवं च कृत्वा तिलतैलमपि सिद्धं भवति ।

वरील उदाहरणें लक्षांत घेतलीं म्हणजे बारीकसारीक गोष्टींचा सुद्धा पतंजलीने व्याकरणदृष्टया किती चिकित्सक बुद्धीने विचार केला आहे हें समजून येतें. वरील चारी बाबती मराठींत सुद्धा तशाच आहेत हें कौतुकास्पद वाटल्यावरून हा लेख लिहिला आहे. पातंजलमहाभाष्यांत प्राकृताचाहि उल्लेख आहे. यामुळे मराठी भाषेस पोषक असें बरेंच विवरण त्यांत सापडेल.

प्र. धों. कानिटकर

———

# कोल्हापूर प्रांतात स्त्रीपुरुषांच्या तोंडीं असलेल्या म्हणी।



१०० सात घुगरणी अन् भोपळा अळवणी.
१०१ इकडे आड, तिकडे विहीर.
१०२ पहाऱ्याला संत्री आणि राज्याला मंत्री.
१०३ मुलाला माय, कुटुंबाला गाय.
१०४ शेजेवरची घालवायची; बाजाराची पालवायची.
१०५ वाटी[1] तो बोटें चाटी.
१०६ लागल्या उत्तरा तर भात खाईना कुतरा; न लागल्या उत्तरा तर भात मिळेना पितरां.
१०७ लागल्या मघा तर सांदिकोंदीं हगा; न लागल्या मघा तर ढगाकड बघा.
१०८ दुकाळांत[2] खाल्लें आणि भांडणांत काढलें.
१०९ आली तार; झाला ठार.[3]
११० मिळाली पदवी; बनला ऐदी.
१११ पावण्याचे पावणे, कोंडिबाचे म्हेवणे.
११२ आऊचा काऊ; तो माझा मावसभाऊ.
११३ आंब्याला मोहोर अन् कावळ्याला मुखरोग.
११४ वड पिकला, कावळ्याला मुखरोग झाला.
११५ चुकला घाव ऐरणीवर.
११६ बिबि आये उमरी तो मिया चले कबरीं.
११७ जन्म दैवाधीन, चारित्र्य स्वाधीन.
११८ कीर्दीला मेळ, हातांत केळ.
११९ दशशंखी राख फुंकी.[4]
१२० न मिळे भीक; तर कांही तरी शीक.
१२१ सुकृताच्या पोटीं; जन्म घेई प्रीति.
१२२ धरशील धीर; तर बनशील वीर.
१२६ संशय फिटेना; देव भेटेना.
१२४ मनीं नसे भाव; देवा मला पाव.

---

१ वाटतो—देतो. २ दुष्काळांत. ३ तारायंत्र नुकतेंच झालें त्या वेळीं प्रचलित असलेली म्हण. कारण त्या काळीं तार यावयाची ती बहुधा मृत्युसंबंधाचीच असावयाची.
४ सामुद्रिक शास्त्रांत दहाहि बोटांवर शंख असलेला दरिद्री असतो असें आहे.

१२५ ये ग साळू; दोघी लोळूं.
१२६ सदा पीक; सदा भीक.
१२७ सदा मरे; त्यास कोण रडे.
१२८ भुकी राखी चौथा कोन.
१२९ जावई म्हाला; वाफा शिपला.
१३० घरांत नाही दाणा आणि मला पाटील म्हणा.
१३१ घराला नाही कौल; रिकामा डौल.
१३२ नाकांत नाही कांटा; रिकामा ताठा.
१३३ सात रुपयांचें पातळ नेसायचं, अर्ध्या हळकुंडाने पिवळें व्हायचें.
१३४ खायचं खाऊन नकटीची आण वहायची.[५]
१३५ कानावर पगडी; घरीं रांड उघडी.
१३६ मिळाली[६] चेड धर मांडवाची मेढ.
१३७ बोलेल तो करील काय; गर्जेल तो पडेल काय.
१३८ करून करून भागली; देवपूजेला लागली.
१४९ व्याजाला सवकली; ऐनाला मुकली.
१४० कावळा कारभारी; गू दरबारीं.
१४१ नशीब तिळाएवढें; हाव डोंगराएवढी.
१४२ अळणी खातोय आणि फोडणी मागतोय.
१४३ कोणी घालीना भीक; तर पंतोजीपणा शीक.
१४४ घरांत नाही मिठाचा खडा अन् बाहेर दाखवतो पठाणी जोडा.
१४५ मुंगीला मिळाला गहू; कुठे ठेवूं कुठे न ठेवूं.
१४६ काडीनं जोडावं; लाखानं मोडावं.
१४७ पावसाने येतीं शेतें; दैवाने पिकतीं भातें.
१४८ चिंब[७] फोल शेतचें अन् नकटें फेपटें पोटचें.
१४९ गोरा गोमटा; कपाळकरंटा.

**के. श्रा. कुळकर्णी**

---

५ उपयोग करून घेऊन नाही असें स्पष्ट सांगणें.
६ मुलगी; रत्नागिरी जिल्ह्यांत रूढ.
७ पोचट धान्य.

# स्त्रियांच्या म्हणी

( मागील अंकावरून पुढे चालू )

( २५८ ) अंगावर पडलें ऊन, दादल्या घेतो बायकोचे गुण.

( २५९ ) देणं ना घेणं, दोन्ही सांज येणं.

( २६० ) देव नाही देव्हारीं, धुपाटणेवाला उडया मारी.

( २६१ ) नाकांत नाही कांटा, रिकामा ताठा.

( २६२ ) नाकापेक्षा मोती जड, सासूपेक्षा सून अवजड.

( २६३ ) संसार केला नारीं, नवरा पडला ऋणाच्या भरीं.

( २६४ ) शपथ केली वहायला, भाकरी केली खायला.

( २६५ ) धर्मादारी आणि मारामारी.

( २६६ ) साव दिला चोराला, न्याय नाही गांवाला.

( २६७ ) ज्याचा गांव त्याला नाही हगायला ठाव.

( २६८ ) अंथरायला गरम, पांघरायला नरम मग निजणाऱ्याला कां वाटावी शरम.

( २६९ ) खाली मुंडी, पाताळ धुंडी.

( २७० ) तोंडाला जाळ अन् पोटाला काळ.

( २७१ ) ज्याच्या पदरीं पाप त्याला मुली होती अपाप ( आपोआप ).

( २७२ ) आला गेला संन्याशाला सुळीं दिला.

( २७३ ) शिव भेटे, संशय फिटे.

( २७४ ) सोनसाळी, मंगळ जाळी.

( २७५ ) आईची माया अन् पोर जाईल वाया.

नीलकंठ शंकर नवरे, सोलापूर.

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें

## डिबेंचर कर्जाची योजना

**विनंतिः--**

भा. इ. सं. मंडळ ही संस्था शके १८३२ सालीं कै. राजवाडे प्रभृतींनी स्थापना केली, तेव्हांपासून आज वीस वर्षें हिचें काम सारखें वाढत आहे; आणि त्याची माहितीहि सर्वत्र लोकांस बरीच झालेली आहे. आज मंडळाच्या मालकीची इमारत सुमारे पन्नास हजारांची आहे. शिवाय अमोलिक असा चित्रवस्तुसंग्रह, बहुमोल असा कागदपोथ्यादिकांचा संग्रह वगैरे आहे. खेरीज छापील विकाऊ शिलकी ग्रंथांची किंमत अजमासे पन्नास हजार होईल. मंडळाचे सभासद वार्षिक व तहाहयात मिळून सुमारे ६०० च्यावर आहेत. वार्षिक वर्गणी व ग्रंथविक्रीचें उत्पन्न सुमारे पांच हजार आहे. खर्च अर्थात् त्या बेतानेच ठेविला आहे.

सांप्रत इमारत वगैरे कामांसाठी मंडळास सुमारे **पंधरा हजार कर्ज** आहे.

देणगी किंवा वर्गणी देणें हा जसा मंडळाच्या अत्यंत उपयुक्त व सर्वस्तुत कार्यास साहाय्य देण्याचा एक प्रशस्त मार्ग आहे तसाच दुसरा मार्ग हलक्या व्याजाने आणि शक्य तर लांब मुदतीने मंडळास कर्जाऊ रक्कम देणें हाहि एक आहे. मंडळाने याप्रमाणे सुमारे १५ पंधरा हजार कर्ज आजवर व्याजमुद्दलसुद्धा फेडलें आहे, आणि तितकेंच अद्यापि शिल्लक आहे. यास्तव मंडळाच्या साधारण सभेंत ता. १६ जून १९२३ रोजीं एकमताने पुढे दिलेली कर्जरोख्याची योजना ( **डिबेंचर योजना** ) मंजूर झाली आहे. या योजनेप्रमाणे घेतलेल्या कर्जाचा तक्ता नमुन्यासाठी सोबत जोडला आहे. जरी सर्वांत लहान रकमेचा कर्जरोखा दहा रुपयांचा मिळूं शकतो तरी मोठी मिळाली तर मंडळास तितकें सोईस्कर जाईल.

यास्तव विनंति की, आपण हस्तें परहस्तें मंडळास रक्कम कर्जाऊ मिळवून द्यावी. **जरा हलके व्याज व लांब मुदत** अशी सवलत मंडळास या योजनेने मिळते. परंतु देणारास सवलती देऊनहि, बोजा वाटत नाही.

मंडळाचें काम विद्वानांचें असून त्यास वास्तविक राजाश्रय पाहिजे. पण सांप्रतची परिस्थिति आपण यथार्थपणें जाणतां. त्यामुळे ही विनंति करून आपणां-कडून या कर्जयोजनेस साहाय्य मिळवणें अशी इच्छा आहे.

डिबेंचर रोख्यावर कारभारी मंडळातर्फे **चार** गृहस्थ सह्या करून देतील.

---

# स्त्रियांचीं गाणीं

( संग्राहक :– महादेव विनायक डोंगरे )

## एकादशीचें गाणें

[ ह्यांत एकादशीच्या उपवासाच्या नांवावर नेहमीपेक्षा दुप्पट खाणाऱ्या सासूची विडंबना केली आहे. ]

कडकडीत निर्जला । एकादशी आज मला ॥ ध्रु० ॥
आणी लौकर शाबूदाणे । सुंठसाखर कालीव म्हणे ।
ऊन ऊन खिचडी करी । घाली दाणे कुटुनी त्यांत ।
कडकडीत निर्जला । एकादशी आज मला ॥१॥
कीस रताळ्याच्या फोडी । तळी काप भजी करी ।
आणखी आवळयाची वडी । भारी पित्त चढलें मला । कड० ॥२॥
शिंगाड्याच्या दशम्या करी । बटाट्याची भाजी करी ।
थालीपीठ तव्यावरी । लावी बहुत वेळ झाला ॥ कड० ॥३॥
वरीयाचा साखरभात । बदामाचे कांप त्यांत ।
साखर केशर बासुंदींत । वेलदोडे थंडाईला । कड० ॥४॥
फडक्यावरचें काढी दही । बासुंदीला साखर नाहीं ।
ताकपीठ खातां बाई । आजवरी जन्म गला । कड० ॥५॥
खारकांची करी खीर । दोन कुटुचे लाडू कर ।
पेढे बर्फी पाव शेर । हलवाई देउन गेला । कड० ॥६॥
सासूबाई गळुनी जाती । केंव्हा पारणें सुटेल म्हणती ।
तिथीमध्यें थोर तिथी । लागो पुण्य याचें मला । कड० ॥७॥
अजुनी घेतला नाही चहा । भाळीं तिडीक उठली पहा ।
आळशामध्यें आळशी महा । सून गांठ पडली मला । कड० ॥८॥
द्वादशीचा दिवस आला । ब्राह्मण बसले भोजनाला ।
जिलब्या लाडूंचा बेत केला । उभी कमला वाढायला । कड० ॥९॥

## भोंडल्याचीं गाणीं

४

एक लिंबू झेलूं बाई । दोन लिंबू झेलूं । दोन लिंबू झेलूं बाई । तीन लिंबू झेलूं ।
तीन लिंबू झेलूं बाई । चार लिंबू झेलूं । चार लिंबू झेलूं बाई । पांच लिंबू झेलूं ।
पांचा लिंबांचा पानोठा । माळ घाली हनुमंता ।

हनुमंताची निळी घोडी । येतां जातां कमळें तोडी ।
कमळापाठिमागे लागली राणी । अग अग राणी इथे कुठे पाणी ।
पाणी नव्हे यमुना जमुना[1] । यमुना[2]-जमुनाची बारीक वाळू ।
तेथे खेळे चिल्हारी बाळू । चिल्हारी बाळाला भूक लागली ।
सोन्याच्या शिंपीने दूध पाजीलं । पाटाच्या[3] घडीवर निजवलं ।
निज रे निज रे चिल्हारी बाळा । मी तर जातें सोनार बाळा ।
सोनारदादा सोनारबाई । गौरीचें मोती झालेच नाही ।
गौरीच्या घरीं तांब्याच्या चुली । मखमल घातला मांडव पुरी ।
उष्ट्या पत्रावळी चिंचेखालीं । शेणगोळे बाभळीखालीं ।

पाठभेदः– १ जल्मन् नारी २ जल्मन् नारीची (नदीचें नांव?). ३ चंदनाच्या पाटावर.

५

आडबाई आडवणी । आडाचं पाणी खारवणी । आडांत होता गणोबा ।
आमचा गणोबा सत्तेचा । पाऊस पडला मोत्यांचा ॥

६

नणंदा भावजया । दोघीजणी । शिंक्यावरचं लोणी । खाल्लं कोणी ।
मी कांही खालं नाही । एकच बोट चाटून पाहिलं ।
आता माझा दादा । येईल ग । येईल ग । दादाच्या मांडीवर । बसेन ग । बसेन ग ।
वहिनीच्या चहाड्या । सांगेन ग । सांगेन ग । दादा तुझी बायको । चोरटी । चोरटी ।
असूं दे माझी चोरटी । घरादाराची लक्ष्मी ॥

## ७ माहेरचें मूळ

सोन्याचा डेरा बाई । मोत्याची रवी । तिथें आमच्या जाऊबाई ताक करीत होत्या ।
जाऊबाई जाऊबाई । मला मूळ आलें । मला काय पुसतेस । बरीच दिसतेस ।
पूस जा आपल्या नणंदेला ।
चांदीची चूल बाई । सोन्याचा खेळ । तिथें आमच्या वन्सं खेळत होत्या ।
वन्सं वन्सं मला मूळ आलें । मला काय पुसतेस । बरीच दिसतेस ।
पूस जा आपल्या दीराला ।
चांदीची दौत बाई । सोन्याची लेखणी । तिथें आमचे भावजी लिहीत होते ।
भावजी भावजी मला मूळ आलें । मला काय पुसतेस । बरीच दिसतेस ।
पूस जा आपल्या सासऱ्याला ।
सोन्याचा तांब्या बाई । चांदीचं ताम्हन । तिथें आमचे मामंजी संध्या करीत होते ।
मामंजी मामंजी मला मूळ आलें । मला काय पुसतेस । बरीच दिसतेस ।
पूस जा आपल्या सासूला ।
सोन्याचा करंडा बाई । चांदीची फणी । तिथें आमच्या सासूबाई वेणी घालीत होत्या ।

सासूबाई सासूबाई मला मूळ आलें । मला काय पुसतेस । बरीच दिसतेस ।
पूस जा आपल्या नवऱ्याला ।
परांच्या गाद्या बाई । गझनीच्या गिरद्या । तिथें आमचे पतीराज निजले होते ।
पती पती मला मूळ आलें । आणा फणी घाला वेणी । जाऊं द्या राणी माहेरी ॥

× × ×

'साहित्य-पत्रिके'च्या वर्ष २ अंक १ मध्ये 'कोंकणी गाणीं' यांतील भोंडल्याचीं गाणीं गाणें २ ह्याच्या शेवटीं पुढील ओळी अधिक पाहिजेत :—

झाड झपका फूल टपका । तें बाई फूल तोडीलं । बहिणा माथां खोवीलं ।
बहिणा तुझा भांग । मोतियाचा चांद ॥

# मुलींचीं गाणीं

## १ डेरा

पांचहि फडांचा नाग ग । एका आवडामध्यें ।
संखिणी डंकिणी बाळ ग । एका सायरामध्यें ।
चिमणाबाई ओढीते डेरा ग । पदर वाऱ्यानें गेला ।
नारायणराव राखीती ढोरें ग । दह्या भरीला वाडा ॥

## २ नखोल्या

नखोल्या बाई नखोल्या । चंदनाच्या टिकल्या ॥ एक टिकली सांडली । गंगेत जाऊन बुडाली ॥
गंगेला आला लोंढा । भिजला माझा गोंडा । गोंड्याच्या पदरीं काडी । भिजली माझी साडी ॥
साडीच्या पदरीं रुपाया । भाऊ माझा शिपाया ॥ शिपायानें केली चोरी । गळ्यांत बांधली दोरी ॥

## ३ कांकणें

सोनार दादा सोनार बाई । गौरीचीं कांकणें घडलीं का नाहीं ।
घडलीं चाळणें ठेवली खुंटी । गौर म्हणते आण ग लेकी ।
आता कशीं आणूं बाई शंकर आले । सोळा श्रृंगार मला पावले ॥

## ४ भावजयीचा सूड

आला नागपंचमी सण । आई मी नाग पूजाया जाईन ।
आई मला नेसाया दे ग कांहीं । आणा माळीयाची शिडी ।
काढा पाटावाची घडी । मला नको पाटावाची घडी ।
मला हवी वहिनीची चुनडी । वहिनीची चुनडी नेसली ।
वहिनीची चुनडी भिजली । अडकी खडकी वाळवली ।
पाटावाची घडी केली । ही घे वहिनी आपली चुनडी ।
वहिनीने चुनडी झुगारिली । पलंगीं जाऊन निजली ।
पती आला समजायाला । चल चल गिरिजे न्हायाला ।

री नाही येत न्हायाला । तुमची बहीण न्हायली ।
माझी चुनडी भिजली । भिजली तर भिजूं दे ।
मी देइन चुनडीला रंग । तुम्ही घाल तो कशाचा ।
मी देइन डाळिंबी रंगाचा । मला नको डाळिंबी रंगाचा ।
मला हवा बालेच्या रक्ताचा ।
चांगली जेवायाला घाल ग आई । परतूनि मजला येणें नाही ।
असं काय ग म्हणतेस । बाळाबाईसंगे देईल तुझे भाई ।
भाई नव्हे ते वैरी । त्यांच्या कमरेला सुरी ।
चांगली वेणी घाल ग आई ! परतूनि येणें नाही ।
असं काय ग म्हणतेस । बाळाबाईसंगे येईल तुझे भाई ।
भाई नव्हे ते वैरी । त्यांच्या कमरेला सुरी ।
अंबिकेच्या पायां पड ग बाई । पायां पडायला ओणवली ।
कमरे जो घाव घातला । चुनडीला रंग दिला ।
वहिनीना आनंद झाला ॥

## ५ झिम्मा

झिम् पोरी झिम् । कपाळाचं भिंग ।
भिंग गेलं फुटून । पोरी आल्या उठून ।
आंब्याची टाहाळी । टप् टप् गळे । टप् टप् गळे ।
कोंकणचा राजा बाई । झिम्मा खेळे झिम्मा खेळे ॥

## ६ पिंगा

पिंगाबाई पिंगा । चवळीच्या शेंगा ।
चवळीच्या शेंगेला । दाणाच नाही । बाई दाणाच नाही ।
मामाच्या मुलीला । नाकच नाही । बाई नाकच नाही ।
माझा पिंगा । गेला दूरी । आणल्या तूरी ।
पगडा फू । बाई पगडा फू ।
माझा पिंगा । जातो विहीरी । आणतो दोरी ।
पगडा फू । बाई पगडा फू ॥

## ७ दंडफुगडी

दंडफुगडी दंडाची । दंडावरन जाईन ग ।
पांच पान खाईन ग । दिवाळीला बोली केली । दसऱ्याला येईन ग ॥

## ८ दंडफुगडी

दंडफुगडी दंडाची । बाईल माझ्या दीराची । अरसा दीर नट्टूका खोबऱ्याचा कट्टूका ।
खोबरं झालं गोड गोड । मांडीला आला फोड फोड । फोड कांहीं फुटेना । कमळी कांहीं उठेना ।
कमळे कमळे दिवा लाव । दिवा गेला वाऱ्यानी । कमळीला नेली चोरांनीं ।

बाजेवाली कपली । सासूबाईंनी देखली । मामंजींनी ठोकली ॥

## ९ दोडका

ईस बाई ईस । दोडका कीस ।

दोडक्याची फोड । लागली गोड ।

आणिक दे बाई । आणिक दे ॥

( हें गाणें कंबरेवर हात ठेवून एक एक पाय पुढे नाचवीत म्हणतात )

## १० आगोटा

आगोटा पागोटा । घाली शिंगोटा । सीता बोलते ।

लाल बागेंत जाईन म्हणते । साडी नेसेन म्हणते । सीता बोलते॥

## ११

काटवट काना । चौघीजणी सुना । पाणी कांहो ग्याना । काटवट काना ।

## १२

शाळुंकी शालकी । तुझी माझी पालखी । तुमची माझी पालखी ।

पगडा फू बाई । बाई पगडा फू ॥

## १३

गेले होते बाई । आणल्या गाई । पगडा फू । बाई पगडा फू ॥

## १४

गरे घ्या गरे । पोटाला बरे । न खाई त्याची । म्हातारी मरे ॥

## १५

आगोटा पागोटा । घाली शिंगोटा ।

सिता बोलते । पाळणा हलवते । आगोटा पागोटा ॥

# शब्दसंग्रह

## रहाट

साहित्य-पत्रिकेच्या वर्ष २ अंक ३ मध्ये रहाटाचे शब्द आहेत. त्यांत पुढील भर घालणें अवश्य आहे. हे शब्द कोंकणांत प्रचारांत आहेतः—

रवे– चाकाचे आरे.

खापेंकट– माळेला पोहऱ्या बांधतांना दोन लाकडाच्या पट्ट्या बांधाव्या लागतात त्या.

तुंबजोड– दांत असलेलीं चाकें. एक उभें व एक आडवें.

कनेकठ– तुंबजोड व रहाट यांना जोडणारें लाकूड.

चाकी– तुंबजोडावर बसविलेलें एक लहान चांक. यांतच रवे अडकवलेले असतात. पोहऱ्या किंवा मडकें यांचीच माळ असते.

महादेव विनायक डोंगरे

# लावण्या

१

गुरुकुलपविज्ञान कैशे पोकळ भाषणें घे सोधुनि पहा नाहींतर केवळ पाषाण शिव तो महादेव कैलासी पूजा त्याची जाण अंत करण वैकुंठ ऐका विष्णुपुजा जाण चरण ते पाताळीं वामन पुजेवरती ध्यान बुध्य तो भर्मा सप्तालोकी पुज्यस्थान चित्ती तो नारायण क्षिरसागरीं रत्नखाण इंद्र तो भर्मेरा वस्तु निर्माण निर्गुण असा शोध कर मनाला शाहीर गावना भेदावाचून कराल गाण तर केवळ आहे वाण। त्रिकुटामधीं श्रीहट विष्णु गुणवान त्रिकुटामधीं ब्रह्म ललाटी चंद्रसूर्य पान नारायण गुरु इंकरी उदराचे ठाण सर्वांने ते चैताने नेत्रे आदि ते पान डोळ जोती महालिंग अश्विन देव मान सत्रायी पड पड जिभाना कळा खेळ जाण ॥ १ ॥ सहस्रदलामधे तेच आडसष्ठ त्रेत जाण त्यावरती गुरूचा पहारा वरती करी गुरू ठाण आवठकर नाम त्याच्यावर सोमशब्द जाण वोठ पीठ त्यामधे तिसरा डोळा निर्माण दशीदोराची अन्त ते पहा मेरू शिखर तीन रात्रीचा सहस्रावा हिसा तीच गुरू खूण ॥ २ ॥ निरहंकारापासून अहंकार ऐका सुज्ञान धुम् धुम् कार होता नव्हता प्रथम दिनमान श्रीहटामधे तिसरा डोळा आवोठ पीठ दोन तिथे सत्रावी सुंदर ऊनमणी उभी गुण-खाण रंगरूपरेखा दाखवा गाव नाखून ॥ ३ ॥

\+ \+ \+ \+

२

आले सदाशिव शंभो त्याशी करतो बोलण पारपतीनी तवा मळीचा वन्याव लागन अमृत शिंपून केला साजिवन ऐका गावन नेऊन गणाला दरवाजावरती ठेवला राखण आली सांबाची सोरी येऊद केले दारुण चक्रबाण मारला गणाचा शिर दिला उडवून ह्या गणाचा शिर उडाला कैलास गमान कुठें गणाचा शिर पंडिता पडले जाऊन आगड धुम् आगड धुम् वाजे चौघडा नाचे संधान करतो वैऱ्यावर हल्ला डफावर तुरा लावून ॥ १ ॥ याद बोल बम्र्याशी शिवाशी लावले लग्न कशी बम्र्यांनी मुंज लावली गणपतीवांचून आज पुरुसुमी आधे नवमीला आज नारायण बापू कुशावा करी कव्हाना लडबड अज्ञान चतुऱ्याचा वधे करावो धवशे वस्तान हली गांव रहिवाशी गावा औवं-ध्यात ठिकाण ॥ २ ॥

धवशा

१

आला कृष्णाचा भिरका मूर्खा हुशार होइ कंबर बांध वज्रपाथानीं व्हइल जमानी उचल जरीचा जरिवंद तरस लांडगी सभा मांडली खोकड बैसले पद गाया काय माकड ताल तोडी डोंगरी मोर नाचे ययायया खप्रामधीं गाढव धमकली रंभे-

ची चव घेउनिया आडांतले राहणारे म्हणुन मी आलों समिंदर पाहुनिया पंढरपुरचे चोट खवूट असे ते एक निर्फळ वाया पाटिलकीचा कनिया सांगतो इडका इडोळीचा बांद भरली घागर - झाली उताणी तुझ्यापुढें ठेवली नांद आला किरिष्णाचा भिरका मूर्खा हुशार होइ कंबर बांध ( १ )

शनेश्वराचा पुत्र आकाशीं वनवानर पैदा झाला घरोघरीं देवंगना भोगितो एकच धिंगा माजवला. सांग कितिक कितिक येउजना जोत अग्नींचा हिलाल परकशला माया मौना विष्णु नटला नाद जोडण्याचा उठला असा एखादा घट्ट करावा बिन-सूदरी नसता सांद आला किरिष्णाचा भिरका मूर्खा हुशार होइ कंबर बांध ( २ )

तेहतीस कोटी देव जमून यानीं वज्रघट बनावला वज्रघट डोक्यावर झुकत मौना चालले पाण्याला वज्रघट बुडविला नाद उमटला वनवानर आडवा गेला तूं अग्नीचा हिलाल कसा भोग सामवलं मजला वनवानर धरुनशानी समुद्रापोटीं बंद केला सांग कितिक कितिक येऊजना धडाके उडतिल पाण्याचे बुंध आला किरिष्णाचा भिरका मूर्खा हुशार होइ कंबर बांध. ( ३ )

कुळखेतरावर भिम जाळाया वनवानर आणला होता कसा कोणी बाहेर काढला वज्रघटाची सुद नसता सांग वज्रघटाची लांबी रुंदी तसूतसूची करगणता कोंडु मायाजी धोंडु सायाजी कवळ्या सुरावर सुर ओढता बाळगोपाळ सुर ओढितो आलगोजी लावून चाल धवशा आळीचा शिरीं आखाडा तिथे कवींचा कटिबंद आला किरिष्णाचा भिरका मूर्खा होइ हुशार कंबर बांध ( ४ )

\+ + + +

२

एकाचा दोन करशील पचू लक्षानें निघूऱ्याचा जनम गेला कोदाण्डकरतांनें मुलुख दुनानी तुला पुसतों पहा राव सोधून तुझ्या देहेमध्यें कुठे जळती आगीनें( १ )

असा एक मी तुला पुसतों धर याचा ध्यान आकाशावरतीं कोण बसला बरमा होऊन हातीं घेऊन पुसतां पाहतो घटका सोधून पहिल्या घटकेमधीं केली सृष्टि उत्पन्न दुसऱ्या घटकेमधीं केले मनुक्षजन्म ( २ )

असा एक मी तुला पुसतों पहा राव सोधून रामसोमीनीं बाण मारिला पाताळ फोडून पाताळामधीं घंटाळ वाजे सृष्टिवजन घंटाळाच्या नादावर कोण ऋषि बसला तप धरून सांगा ऋषींची नांव सभेमधें राहील मान मुलुख दुनानी तुला पुसतों पहा राव सोधून ( ३ )

मुलुख दुनानी नव्ह पुकाजी जीवायेनी जाण आसकीच्या धन्याला दिला जानव पाहून कवी जानकोजी कवन करितो वस्ती राजुरांत त्याचे चेले विठू लाडू माहित सगळीक त्याच्या डफावर तुरा निशाणी चौमुलखी डंक ( ४ )

---

ना. गो. चापेकर

# अभिप्राय

**श्री ऋद्धिपूरवर्णनः**—( संपादकः—श्री. यशवंत खुशाल देशपांडे, एम्. ए. एल्‌एल्. बी. यवतमाळ, १९२९, पृ. ४४+१४०, आवृत्ति १ ली, किंमत १॥ रु.)

शक १२८५ च्या सुमारास लिहिलेला म्हणजे बहुतांशीं ज्ञानेश्वरीशीं समकालीन असा मराठी ओंवीबद्ध ग्रंथ या नात्याने 'ऋद्धिपूरवर्णन' ह्या ग्रंथाची भाषिक सामाजिक म्हणजे ऐतिहासिक महती फारच मोठी आहे. महानुभावीय मराठी वाङ्मयांतील सातीग्रंथ या नांवाने विख्यात असलेल्या समकांतील अनुक्रमाने सातवा परंतु विषयमाहात्म्याने पहिला असा हा ग्रंथ त्या पंथाचे दृष्टीनेहि अत्यंत महत्त्वाचा आहे. असा ग्रंथ संपादून प्रसिद्ध करण्याचा मान श्री. यशवंतराव देशपांडे यांनी आपल्या अविरत परिश्रमांनी व साक्षेपी अभ्यासाचे बळावर मिळविला हें त्यांना भूषणास्पद आहे. 'प्राचीन मराठी वाङ्मय' ह्या ग्रंथमालेंतील हा ग्रंथ पहिला असून, शारदाश्रममालेचा क्रमांक दुसरा आहे. त्यावरून अशा तऱ्हेचे आणखी ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा श्री. देशपांडे यांचा इरादा स्पष्ट दिसतो. त्याबद्दल ते अर्थातच अभिनंदनास पात्र आहेत.

ऋद्धिपूरवर्णनासारखे प्राचीन ग्रंथ म्हणजे ते प्रसिद्ध करणाऱ्याच्या अभ्यासी आणि चिकित्सक वृत्तीचें प्रत्यंतरच होय. अशा ग्रंथांवर अभिप्राय देतांना त्यांतील मतें, प्रतिपाद्य विषय, शैली इत्यादि अंतर्गुणांबद्दल बरें वाईट मत प्रदर्शित करून त्याचा तादृश फायदा नसतो. एक तर अशा ग्रंथांचे लेखक अशा प्रतिपादनांचा परिणाम होऊन ग्रंथांत सुधारणा करण्याच्या किंवा गौरवाबद्दल धन्यता मानून उत्तेजन पावण्याच्या स्थितीच्या पलीकडे असतात. यामुळे अशा ग्रंथांचा पुनरुद्धार करून छापण्यामध्ये दिसून येणाऱ्या अभिरुचीबद्दल दोन शब्द लिहिणेंच काय तें शक्य होतें. त्यादृष्टीने पाहिलें असतां महानुभावीय वाङ्मयांत श्रेष्ठत्व पावलेला हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत श्री. देशपांडे यांनी महानुभावीय पंथ आणि प्राचीन मराठी वाङ्मयेतिहासाचे जिज्ञासू अभ्यासक यांवर फार मोठे उपकार करून ठेविले आहेत असेंच म्हणावें लागेल. उपयुक्त नानाविध शाखांचे भोक्ते म्हणून कांही महानुभावीय महंत, श्री. केळकर, कोल्हटकर, भिडे, अणे, पंगू इत्यादिकांचे अभिप्राय ग्रंथाबरोबरच देऊन श्री. देशपांडे यांनी इतरांचीं तोंडें सहजच बंद केलीं आहेत.

ग्रंथांतील अंतर्गुणांबद्दल संपादक जबाबदार नसले तथापि त्याच्या संपादनाविषयीची सर्व प्रकारची जोखीमदारी संपादकांनीच घ्यावी लागते. मूळग्रंथाचें प्रतिलेखन, योग्य अर्थबोधक शुद्धलेखन, दुर्ज्ञेय शब्दांचें स्पष्टीकरण, कित्येक कल्पनांचें विशदीकरण वगैरे यथायोग्य देण्यामध्ये संपादकाचें कौशल्य दिसून येतें. त्या दृष्टीने

श्री. देशपांडे यांनी विशेष खटपट केल्याचें दिसून येतें. श्री. राजवाडे यांच्या कट्टर आणि श्री. भिडे यांच्या साम्यरक्षक अशा उभयविध पद्धतींच्या मिश्रणाने श्री. देशपांडे यांनी प्रतिलेखन केलें आहे तें अनेकांना निरपवाद वाटेल. महाराष्ट्रांतील विद्वान् तज्ज्ञांकडून त्यांनी विधायक टीका मागविली आहे. जोंपर्यंत मूळ प्रति फारशा मिळत नाहीत ही वस्तुस्थिति आहे आणि अनेक ग्रंथ उपलब्ध झाल्यानंतर येणारा तेरावे शकशतकांतील भाषाप्रयोगांबद्दल अधिक निश्चितपणा आला नाही तोंपर्यंत एखाद-दुसरा मतभेद किंवा पर्याय केवळ तर्काने सुचविण्यापलीकडे कोणालाहि कांहीं करितां येईल असें वाटत नाही. तथापि शास्त्राची वाढ होण्याच्या दृष्टीने संपादकाने जो दिलदारपणा व उघडें मन ठेवावयास पाहिजे तें श्री. देशपांडे यांनी ठेविलें आहे हें पाहून बरें वाटतें.

मूळ ग्रंथांतील विषयांत प्रवेश करून देण्यासाठी संपादकाने विस्तृत प्रस्तावना अभ्यासाने लिहिली असतां वाचकांना होणारी मदत यांतील प्रस्तावनेवरून चांगलीच होते. प्रस्तावनेमध्ये ग्रंथांतील विषयांचा परामर्ष घेतला आहे एवढेंच नव्हे तर ग्रंथाच्या समजुतीकरिता आवांतर लागणारी माहितीहि श्री. देशपांडे यांनी साक्षेपाने पुरविली आहे. महानुभावीय टीपग्रंथ व महापुरुषांचीं चारित्रें हीं नवीन अभ्यासकांना कांहींशीं उपकारकच वाटतील. परंतु त्याच भरांत ऋद्धिपूरवर्णन या प्रबंधाची काव्य या दृष्टीने केलेली चिकित्सा विशेषशी अप्रासंगिक वाटली नाही तथापि मराठी वाङ्मयाचें विहंगमदृष्टया परीक्षण केवळ निरर्थक वाटल्यास तो वाचकाचा दोष आहे असें म्हणतां येणार नाहीं.

मूळ ग्रंथ जसाचा तसा छापण्यांत जो कांहीं मतलब असतो तो टीपग्रंथाबद्दल तितका कटाक्ष ठेवण्यांत असतोच असें वाटत नाही. त्यांतून टीपग्रंथांतील दुर्बोध यांतील स्थळें तशींच राहिली असतां वाचकवर्ग घोटाळ्यांत पडतो असें आम्हांस वाटतें. टीपग्रंथांत प्रश्नचिन्हें कोठेच नाहीत यामुळे सर्व ग्रंथाचा योग्य अर्थ लागला असावा असें दिसून एक प्रकारचें समाधान वाटतें. परंतु तेंच समाधान सामान्य वाचकाच्या वाट्यास येण्याचे दृष्टीने शब्दार्थ देण्याचे बाबतींत वगैरे थोड्याखर्चांत आणखी सोय करतां आली असती असें वाटतें. टीपांत न आलेले शब्द तेवढेच परिशिष्टांत एकपानी कोशांत दिले आहेत. त्या ऐवजी सर्वच शब्द विल्हेवारीने दिले असते तर हळूहळू प्राचीन मराठीचा कोश फारतर दहा बारा पृष्ठांत झाला असता. मध्येच एखादा भाग काढून वाचूं इच्छिणाऱ्या वाचकाचें साहाय्य करण्याइतका उपयुक्त कोश अशा पुस्तकांना अवश्य असणें जरूर आहे.

पुस्तकांतील विषय बहुतांशीं वर्णनपर आहेत. अर्थात् तत्कालीन कित्येक गोष्टीं-बद्दल विश्वसनीय माहिती सदर पुस्तकांत सांपडण्यासारखी आहे. विशेषतः भोजन, पक्वान्नवर्णनावरील ५०५–५४३ ह्या ओव्या साहजीकच मनोरंजक वाटतील. पक्वान्नांची वाढ इतिहासकालांत कसकशी झाली ह्याचा विचार करणारांस सहाशें वर्षां-

ण्या पूर्वी महाराष्ट्रांतील पक्वान्नांचीं वर्णनें वाचून उपयुक्त माहिती मिळेल. रव्याची खीर, कनकवर्णाचे मांडयांचे वेठ, पोळी ( पुरणपोळी तर नव्हे ! ), वाफा वर जात आहेत व मोगऱ्यांच्या गुच्छाप्रमाणेच ज्याचें दर्शन आणि सुवासहि मनोहारी आहे असें राजान्न उर्फ भाताची मूद, शिखरणींचे वडे, धिरडीं, उंबर, पुऱ्या, नाखिवा, माळती, सळिव इत्यादि गव्हल्यांचे प्रकार, वालाचे पदार्थ, कोसिंबिरी, भजीं ( रूप-सस्नेह भर्जिकें ), कानवले, भाकरी, दहिदूध, ताक यांची समृद्धि व त्यानंतरचें सुप्रसन्न मनाने तांबूलभक्षण हीं तत्कालीन समाजांतील आचारपद्धतीवर प्रकाश पाडणारीं साधनें पाहून, वाचून, समजून घेतल्याशिवाय आमच्याने तरी पुढे जाववलें नाही. ' वैदर्भी रीतीचें काव्य ' ह्या शीर्षकांत ( परि. २० ) श्री. यशवंतरावांनीच स्थल-व्यक्ति वर्णनाचीं सुंदर उदाहरणें एकत्र ग्रथित करून दिलीं आहेत तीं तरी वाचकांनी अवश्य पहावीं. राजमठांतील श्री. गोविंदप्रभूचें छायाचित्र आणि ऋद्धिपूर येथे मशीद होण्याच्या पूर्वीचा तेथील स्थलांचा नकाशा दिल्यामुळे या ग्रंथाच्या समजुतीला अवश्यक अशीं दोन शास्त्रीय साधनें प्राप्त झालीं आहेत. वाङ्मयेतिहासांत लक्ष घालणाऱ्या सज्जनांना या पुस्तकाचा संग्रह अवश्य केला पाहिजे अशी या ग्रंथाची लायकी आहे हें सांगण्याला अधिक पुराव्याची जरूरी आहे असें आम्हांस वाटत नाही.

दि. वि. काळे.

---

**महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?** ( ले. श्री. एकनाथ यादव निफाडकर, किं. २ रु. ) श्री. निफाडकर यांनी ही ३०० पृष्ठांची कादंबरी अगदी ताज्या राजकारणावर लिहिली आहे. महात्मा गांधींना पकडून येरवड्याच्या तुरुंगांत नेऊन ठेवलें हा ह्या कादंबरीचा शेवट आहे. गांधी हे साधु आहेत, शत्रूंनाहि मित्र बनविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आहे, त्यांच्या अलौकिक वृत्तीमुळे मोठमोठे पैकेवाले आपखुषीने कफल्लक बनतात, परमेश्वराची कोणतीहि माया गांधींना मोहित करूं शकत नाही इतकें निर्विकारित्व त्यांच्या ठिकाणीं आहे, ह्या त्यांच्या साधुत्वामुळेच त्यांचें राजकारण दणदणित झालें, हें ह्या कादंबरींत उत्कृष्ट रीतीने वर्णिलें आहे. राजकारणविषयक कित्येक विधानें मार्मिक आहेत. समाजांतील स्त्रीविषयक अनीतीची घाण कादंबरीकारांनी गटारांतून उपसून रस्त्यावर टाकिली आहे तेथून ती अजिबात नाहीशी करणें हें आता लोकांचें काम आहे. ह्या कादंबरींत अस्पृश्यांचा उद्धार झालेला आढळतो तर बहुपत्नीकत्वाच्या चालीचेंहि पुनर्जीवन केलेलें वाचावयास मिळतें. प्रौढ स्त्रीपुरुषांनी ही कादंबरी वाचण्यासारखी आहे. एकंदरीत काव्य आणि मुत्सद्दीपणा ह्यांचा संयोग इतक्या सुबक रीतीने झालेला पाहिल्यावर मुत्सद्याच्या अगोदर सर्व जगभर कवींनी फिरूं नये असें कोण म्हणूं शकेल !

---

# शुद्धिभ्रमखंडननिरास

( ले. गो. कृ. मोडक )

तं सन्तः श्रोतुमर्हन्ति सदसद्व्यक्तिहेतवः ।
हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा ॥ १ ॥ ' कालिदास'

**प्रास्ताविक**—दुसऱ्या वर्षाच्या तिसऱ्या अंकामध्ये मराठींतील शुद्धिभ्रम हें शीर्षक देऊन मीं एक लेख लिहिला होता. यांत संस्कृतावरून मराठींत आलेल्या शब्दरूपांविषयी व कांही अवांतर शब्दविशेष व शब्दप्रयोग यांविषयीं चर्चा केली होती. त्या चर्चेत मराठींतील कांही रूपांपैकी कोणतीं शब्दांचीं व शब्दप्रयोगांचीं रूपें ग्राह्य व कोणतीं अग्राह्य हें दाखविलें होते. अर्थात् हीं सर्व रूपें विद्यमान मराठींतून घेतलीं होतीं. एतद्विषयक माझी विचारसरणी आपणास पसंत असल्याचेंहि कांही विद्वानांनी मला सांगितलें होतें. परंतु अण्णा मोडक म्हणतात त्याप्रमाणें माझ्या या चर्चेच्या खणखणाटाने म्यां मोडकानें रा. विष्णुपंत निजसुरे यांची **चातुर्मासांतील** झोप मोडली, असें माझ्या लेखाच्या खंडनपर (?) लिहिलेल्या वर्ष ३ अंक १ मधील रा. निजसुऱ्यांच्या लेखावरून मला समजून आलें. तेव्हा मीं आपला लेख व तत्खंडन-पर लेख असे दोन्ही वाचून पाहिले. पण त्यांत मला माझ्या मुद्यांपैकीं एकहि मुद्दा खंडित झालेला आढळला नाही. मात्र 'मोडकांचे मुद्दे मीं (२५ पैकीं १६) बहुतेक (!) खंडित केले' अशी दर्पोक्ति खंडनपर मानलेल्या लेखांत मला आढळली. खंडना-भासालाच लेखकानें तत्वतः खंडन असें मानिलें. हा परिणाम त्यांच्या व माझ्या दृष्टींतील भेदामुळे उत्पन्न झाला आहे. माझें म्हणणें कसें बरावर आहे, याचें विवेचन खालील अनुवाकांत ठिकठिकाणीं मीं केलें आहे. असें करितांना मातृभाषेची सेवा करणें व तदर्थ प्रयत्नामध्ये वाचकांपुढे भाषाशास्त्राचीं तत्त्वें जातां जातां मांडणें याहि गोष्टी जातां जातां साधल्या आहेत.

## खंडनाचें आभासत्व

१ (क) **मोडककृत विधान**—अधःपात या शब्दामध्ये विसर्ग आहे. याचे धर्तीवर अंधकार, धिक्कार व हाहाकार या शब्दांत सादृश्यभ्रमाने विसर्ग घालून अंधः-कार, धिःक्कार, हाहाःकार अशीं रूपें झालीं आहेत.

(ख) **निजसुरेकृत खंडनाभास**—वरील तीन शब्दांत आलेला विसर्ग, जोर किंवा दाटपणा दर्शविण्याकरिता आला आहे. शिवाय हा विसर्ग क-च्या पूर्वीच्या जिह्वामूलीयाचें रूपांतर आहे.

(ग) **मोडककृत आभासनिरास**—विसर्गानें जोर येतो हें खरें असल्यास धक्का, ठोसा, घाव, प्रहार इत्यादि शब्दांत विसर्ग आला पाहिजे. पण तसा तो येत

नाही. ताक पातळ असल्यास त्यास ताक म्हणावें, पण त्यांत दाटपणा आल्यास त्यास कोणी ताक म्हणत नाहीं. ककारद्वययुक्त धिक्कार हें रूप जोरदार कीं धिःकार हें जोरदार, याचा वाचकांनीच विचार करावा. जिह्वामूलीयाचा विसर्ग होईल, पण जिह्वामूलीय तरी मुळांत पाहिजे, तो येथें नाही. करितां त्याचे स्थानीं विसर्ग आला आहे, हें म्हणणें शशशृंगाची खुंटी बनविली असें म्हणण्याइतपतच उचित आहे.

२ (क) **विधान**—जन्मापासून मरणापर्यंतचा इतिहास एतदर्थीं संस्कृतांत चरित शब्द वापरतात; जसें उत्तररामचरित, दशकुमारचरित इत्यादि. याचें स्थानीं संस्कृत शब्द म्हणजे त्यांत जोडाक्षर असलेंच पाहिजे, अशी अर्धवट कल्पना जमेस धरून, मराठीमध्ये चरित्र शब्द वापरितात. पण सोपा शब्द टाकून चरित्र हा कठिनोच्चार शब्द वापरूं नये. मराठी भाषेचें वळण जोडाक्षरें टाकण्याकडे खचित आहे. सप्तन्–सात, अष्टन्–आठ, चक्र–चाक, पत्रक–पातें इत्यादि उदाहरणें हेंच दाखवितात.

(ख) **खंडनाभास**—संस्कृतामध्ये चरित्र हा शब्द चरित या अर्थीं कोशकार व आपटे हे देतात; व चरित या शब्दाच्या अर्थीं चरित्र हा शब्द कार्यकारणभावलक्षणेने योजिला जाणें शक्य, अतएव योग्य, आहे.

(ग) **आभासनिरास**– चरित्र हा शब्द चरित या अर्थीं योजण्यास लक्षणेचा अवलंब करावा हें योग्य नाही. लक्षणेचा आश्रय हा अनिर्वाह-पक्ष आहे. मुख्यार्थानेच यावच्छक्य शब्दयोजना करावी. चरित हा शब्द विवक्षितार्थ मुख्यार्थाने व्यक्त करण्यास विद्यमान असतां, तो टाकून चरित्र आदरूं नये. अन्नशुद्धि हा शब्दहि तूप हा अर्थ व्यक्त करूं शकतो. पण विशिष्ट परिस्थितीच्या अभावीं तो आपण वापरीत नाहीं. कारण तूप हा त्याचा अर्थ केवळ लाक्षणिक आहे.

३ (क) **विधान**—पुम् + लिंग यांचा संधि होतांना म् चा अनुस्वार करावा किंवा त्या अनुस्वाराचाहि पुढे अनुनासिक ल् करावा. सारांश म् आणि ल् मिळून होणाऱ्या संयुक्तरूपामध्ये अनुस्वार व ल् हे तरी दिसतील, किंवा अनुनासिक ल् व साधा ल् असे तरी दिसतील. तिसरा प्रकार शक्य नाहीं. करिता प्रस्तुत ठिकाणीं पुंलिंग किंवा पुँल्लिंग अशीं रूपें सिद्ध होतात. अर्थात् अनुस्वार व त्याचेपुढें दोन लकार,–एतद्विशिष्ट म्हणजे पुंल्लिंग असें रूप लिहूं नये.

(ख) **खंडनाभास**—य् व र् किंवा ल् यांच्यापूर्वी अनुस्वाराचे विकल्पाने अनुनासिक य् व र् किंवा ल् होतात; व अनुस्वार आणि अनुनासिक यांचा भेद स्पष्ट भासणारा नाही. करिता पुंल्लिंग हें रूप योग्य मानावें.

(ग) **आभासनिरास**—अनुस्वार हा वर्ण आहे, तर अनुनासिक हा केवळ धर्म आहे. अनुस्वार नाम आहे, तर अनुनासिक विशेषण आहे; तेव्हा वस्तूचा व धर्माचा घोटाळा संभाव्य नसल्यामुळे अनुस्वार व अनुनासिक यांचा घोटाळा झाला हें म्हणणें योग्य नाही. मात्र अनुस्वार हा वर्ण जसा विशिष्ट चिन्हाने दर्शवितात,

तसाच एखादा उभयधर्मी वर्ण अनुनासिक म्हणून सांगावयाचा असल्यास त्याचें अनुनासिकत्व ज्या चिन्हाने दर्शवितात त्यास अनुनासिक चिन्ह म्हणतात. या दोन चिन्हांचा घोटाळा होऊन पुंल्लिंग हें रूप प्रवृत्त झालें असें म्हणतां येईल; पण घोटाळ्यामुळे अर्थात् अज्ञानामुळे तें उत्पन्न झालें यावरूनच तें त्याज्य ठरतें. घोटाळ्यामुळे उत्पन्न झाल्याने कोणतीच वस्तू ग्राह्य ठरत नाही; निदान व्याकरणांत तरी नाहीच. सारांश प्रस्तुत रूप अज्ञानाने उत्पन्न झालें असें म्हणणें म्हणजेच त्याचें सदोषत्व कबूल करणें आहे.

खंडनकार म्हणतात ल् चे पूर्वी अनुस्वार व अनुनासिक यांतील भेद स्पष्ट प्रतीत होत नाही. होणार कसा? एक वस्तू व दुसरा धर्म. ल्-चे पूर्वी एका रूपांत अनुस्वार आहे तर दुसऱ्यांत अनुनासिक ल् आहे; तेव्हा भेद पाहणें तो अनुस्वार व अनुनासिक ल् यामध्ये पाहिला पाहिजे. यांतील भेद मराठी लेखकांस कळत नाही, इतके खंडनकारांच्या मतें ते मूर्ख आहेत काय? स्वतः खंडनकार मात्र वस्तू व धर्म यांतील भेद जाणतां दिसत नाहीत. अमुक मनुष्य स्वदेशीव्रतामुळे साखर खात नाही, त्यास गूळ वाढा, असें कोणी म्हणेल; पण खंडनकार म्हणणार त्यास साखर न वाढितां नुसते तांबडे वाढा. अहो खंडनकार, तांबडे हा धर्म आहे. गूळ या वस्तूचे ऐवजी नुसता धर्म कसा वाढणार? तद्धर्मविशिष्ट एखादा पदार्थ सांगा म्हणजे तो वाढतां येईल. कोशांत तांबडें विशेषण अतएव धर्म आहे. त्याचा गूळ इत्यादि अर्थ दिलेला नाही. हीच स्थिति अनुनासिक शब्दाची. अनुस्वारापासून वेळेस भेद कळणार नाही तो अनुनासिक ल्-चा. नुसत्या अनुनासिकाने कोणत्याहि वर्णाचें ग्रहण संभवत नाही. दोन चिन्हांमधील भेद प्रतीत होत नाही,असाहि खंडनकारांचा अभिप्राय संभाव्य मानितां येत नाही. कारण हा भेद लहान मूलहि सांगू शकेल. केवळ बिंदु आणि अर्धचंद्र व बिंदु यांतील भेद कधीच दृष्टिआड होणारा नाही. सारांश वर्णदृष्ट्या पाहिल्यास एका बाजूस अनुस्वार व दुसऱ्या बाजूस अनुनासिक ल्, यांतील भेद लक्ष्यांत सहज येण्यासारखा आहे. चिन्हदृष्ट्याहि विचार केल्यास हाच प्रकार. करिता प्रस्तुत पुंल्लिंग हें रूप सिद्ध होण्यास पुरेसा घोटाळा कोठेच आढळत नाही. तेव्हा हें रूप केवळ अज्ञानजन्य आहे. अशा स्थितींत तें त्याज्य आहे हें ओघानेच प्राप्त होतें. अनुस्वारापुढे र्-चा अनुनासिक रँ होतो हें म्हणणें म्हणजे वंध्यापुत्राने चोरी केली या म्हणण्याप्रमाणे सर्वथा असमंजस आहे. व्याकरणसृष्टींत मूळ अनुनासिक र्-चाच पत्ता नाही; तर त्याची वैकल्पिक प्राप्ति कोठून संभवणार?

४ (क) **विधान**—लाजहोम याचें रूपांतर लज्जाहोम आचरटपणामुळे आलें आहे.

(ख) खंडनाभास—या रूपांतराच्या मुळाशीं विनोदाचीच इच्छा प्रभावी दिसते. येथे निर्णय करणें रसिकपणाचें काम आहे.

( ग ) आभासनिरास-लज्जेचा होम करणें ही कल्पना रसिकपणाची नाही, व्याकरणांत तर तशी खास नाही. पत्नीला नुसती हांक मारावयाची झाली तरी ती हांक अखूड मारावी असेंच व्याकरण सांगतें. हे स्त्रि असें म्हणावें, स्त्री असा लांबलचक हेल काढूं नये. वधु, पुनर्भु यांचे संबंधानेहि व्याकरणाचें असेंच धोरण आहे. तेव्हा लज्जाहोम असें लज्जेचा नायनाट दर्शविणारें रूप वैयाकरणांस कधीच अभिमत होणार नाही; मग या रूपांत ज्याला रसिकपणा आढळेल त्याने तें खुशाल रसानुकूल म्हणूनच प्रवृत्त झालें आहे असें मानावें. पण तें भाषाशास्त्रास संमत नाही हें विसरूं नये.

५ ( क ) **विधान**—निद्रिस्त, द्रुष्ट व संपुष्ट हीं रूपें पूर्वोक्तानुसार म्हणजे संस्कृत शब्द जोडाक्षरप्रचुर असावा या कल्पनेने, क्रमाने निद्रित, दुष्ट व संपुट या शब्दांचीं भ्रांतिमूलक रूपांतरें आहेत. करिता त्यांचे ठिकाणीं मूळ संस्कृत शब्दच योजावे. कारण तेच सुलभोच्चार आहेत.

( ख ) **खंडनाभास**—निद्रिस्त या शब्दांत र् चा उच्चार झाल्यावर, दंत्य सकार उच्चारला जातो. या व इतर स्वाभाविक उच्चार करण्याच्या प्रवृत्तीस अनुसरून स्वरोच्चारशास्त्राप्रमाणे प्रस्तुत अपभ्रंश बनले आहेत. करिता ते रक्षणीय आहेत.

( ग ) **आभासनिरास**—निद्रिस्त या शब्दांत स्-चा उच्चार र्-च्या पुढे कीं इ-चे पुढे होतो, हें इंग्रजी पहिल्या इयत्तेंतील आपल्या नांवाचें इंग्रजींत स्पेलिंग करणारा मुलगाहि सांगूं शकेल. स् चा उच्चार इ-कारानंतर होतो हें स्पष्ट आहे. तो र्-च्या पुढे कसा होतो, हें केवळ खंडनकारच जाणोत! प्रस्तुत शब्दांत घुसणारे स्, र्, ष् हे समर्थनीय मानल्यास खंडनकारांच्या अभिनव स्वरोच्चारशास्त्राप्रमाणे मुद्रित, गलित, परिमित यांचे ठिकाणीं क्रमाने मुद्रिस्त, गलिस्त व परिमिस्त हीं रूपें आदरावीं लागतील. तसेंच पुष्ट, तुष्ट यांचे ठिकाणीं प्रुष्ट व त्रुष्ट अशीं रूपें व मितकूट, चिरगूट या ठिकाणीं मितकुष्ट व चिरंगुष्ट अशीं रूपें प्राप्त होतील. हीं विद्वानांस रुचतील काय?

६ ( क ) **विधान**—शतकृत्य हा शब्द शतक्रतु या शब्दापासून साधला आहे. याचे अर्थाच्या मुळाशीं असलेली कृत्याची थोरवी ही कल्पना मनास त्वरित पटत असून, शतक्रतु या मराठीस अपरिचित असलेल्या शब्दांत ती आढळत नाही, पण मराठी रूपांत आढळते. 'शंभरांमध्ये श्रेष्ठ कृत्य' असा अर्थ येथे विवक्षित आहे.

( ख ) **खंडनाभास**—क्रतु याचा उच्चार चुकीने कृत्य असा होऊं लागला. यामुळेच शतकृत्य हें रूप मराठींत साधलें आहे.

---

# अभिप्राय

**रघुनाथपंडितकृत नलदमयंती - स्वयंवराख्यानः**—( संपादक प्रो. श्री. रा. पारसनीस, एम्. ए., सांगली ). जुनीं मराठी काव्यें कोणत्या तरी परीक्षेला नेमिलीं ह्मणून त्यांच्या नुसत्या आवृत्त्या काढल्याने त्यांच्या अभ्यासास कांहींचीहि मदत होत नाही. अशा काव्यांच्या आवृत्त्या त्यांतील पाठभेद व अर्थचिकित्सेसह, योग्य त्या तज्ज्ञांकडूनच काढविणें आता आवश्यक झालें आहे. मराठीमध्ये साधारणतः कोणत्याहि काव्याची आधारभूत आवृत्ति ( authorised Editon ) मिळत नाही. ज्या काव्याच्या नवीन आवृत्त्या निघतात त्या इतक्या घिसाडघाईने, निष्काळजीपणाने व आत्मप्रौढीने काढल्या जातात की, त्या वापरणारा विद्यार्थी व सामान्य वाचक त्यांतील पाठांचे अर्थ लावतां लावतां मेटाकुटीस येतो, व शेवटीं त्यास इष्टार्थाची निष्पत्ति होत नाही ती नाहीच. शिवाय कठीण स्थलांवर अशा टीपा दिलेल्या असतात की, वाचक जास्तच बुचकळ्यांत पडावा. किंवा पुष्कळ स्थळीं त्यास अर्थाच्या ऐवजी प्रश्नचिन्हेंच दृष्टीस पडावीं. प्रस्तुत नलदमयंती—स्वयंवराख्यानाचें विधिलिखित असेंच असल्यामुळे खालील दोन शब्द लिहिणें आम्हांस भाग पडत आहे.

हें सुंदर काव्य मराठी वाचकांना संपूर्ण रीत्या सादर करण्याचा हा पहिलाच प्रयत्न करण्याबद्दल प्रो. पारसनीसांचे आभार मानले पाहिजेत. पण त्यांनी हाच प्रयत्न विशेष कसोशीने केला असता तर हेच आभार द्विगुणित झाले असते. फार काय पण प्रतींच्या बाबतींतहि इंदूरच्या श्री. सरवट्यांनी काढलेली या काव्याची प्रत श्री. पारसनिसांच्या गावींही नाही याचें आश्चर्य वाटतें. असो. श्री. पारसनिसांनी आपल्या पुस्तकांस २४ पानांचा उपोद्घात जोडला आहे. त्यांत कवीचें चरित्र, २ पाठचिकित्सा, ३ काव्यसमीक्षा, असे तीन विषय आले आहेत. रघुनाथपंडिताच्या चरित्राबद्दल व व्यक्तिमत्वाबद्दल हल्ली वि. विस्तारांतून ऊहापोह चालू आहे. त्यामुळे रा. पारसनिसांनी दिलेली रघुनाथपंडिताची माहिती जरी निर्माल्यवत् झाली असली तरी आतापर्यंत कविचरित्रांत किंवा सारस्वतांत दिलेली पंडितांची माहिती एकत्र करण्याचें श्रेय त्यांना लाभलें आहे. मात्र ही आवृत्ति काढतांना रा. प्रियोळकरांच्या लेखाचा फायदा घेतां आला नाही येवढ्यानेच प्रो. पारसनिसांनी स्वतःस दुर्दैवी समजण्याचें कारण नाही. कारण या प्रतींत असे कांहीं मुद्दे आहेत की त्यांमुळे वाचकांना स्वतःस कायमचेच दुर्दैवी बनावें लागलें आहे. रघुनाथपंडित मूळचा मलबार किनाऱ्यावरील तंजावरचा कीं कारोमांडेल किनाऱ्यावरील तंजावरचा हा मुद्दा अजून वादग्रस्त आहे. त्याचप्रमाणे तो कोंकणातला किंवा महाराष्ट्रांतला अगर तो ब्राह्मण कीं कायस्थ याबद्दलहि ऐकमत्य झालेलें नाही. म्हणून पारसनिसांच्या उपोद्घातांतील पहिल्या भागाबद्दल आजच निश्चित मत देणें दूरापास्त आहे. मात्र बाधक पुरावा जोपर्यंत

उपलब्ध होत नाही तोपर्यंत प्रचलित सिद्धांत खरा मानण्यास काय हरकत आहे ? हें द्विवार उच्चारलेलें तत्त्व पारसनिसांप्रमाणे सत्य सत्य त्रिवाचा मानण्यास आम्ही तयार नाही. कारण प्रचलित सिद्धांतास बळकटी आणणारा पुरावा देण्याची जबाबदारी सिद्धांत-प्रतिपादकावर पडते. यापुढें आख्यानपर वाङ्मयाचा थोडासा इतिहास देण्याचा प्रयत्न प्रोफेसर मजकुरांनी केला आहे. पण एकनाथापासून पुढचाच काल त्यांनी दृष्टीच्या टप्प्यांत धरला आहे. ज्ञानेश्वरीपूर्वकालीन महानुभावी वाङ्मयांत असे प्रयत्न झालेले आहेत याची साक्ष नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवर देऊं शकेल.

पाठचिकित्सा करतांना मूळ ग्रंथाची लोकसंख्याच ठरवून काम भागत नाही. काव्यांतील पाठभेदांचीहि चर्चा व्हावी लागते. तशी चर्चा या प्रतींत कोठेहि झालेली नाही यामुळे मोठें वैगुण्य प्राप्त झालें आहे. मूळहि काळजीपूर्वक छापण्याची खबरदारी घेतली नाही. उदा. श्लो. १०७ येथे 'पाषाणरूप' याबद्दल "पाशानरूप" असा पाठ कित्येक घेतात. श्लोक १२३ 'मुख' याबद्दल 'सुख' हा पाठ घेऊन नवनीतकारांनी चार अर्थ दिले आहेत. काव्याची श्लोकसंख्या ठरवितांना श्री. पारसनिसांनी चार अलब्ध प्रतींतून चाळून त्यांच्या एकवाक्यतेने १९८ श्लोक, तीन्हींच्या एकवाक्यतेने ४३, व दोहोंच्या एकवाक्यतेने १२ अशी एकंदर २५३ श्लोकसंख्या ठरविली आहे. ही पद्धति ऐतिहासिक म्हणतां येणार नाही, तथापि रघुनाथपंडितांचीच हस्तलिखित प्रत मिळाल्याशिवाय अशाच तऱ्हेच्या प्रतींवर तहान भागवून घेणें भाग आहे. परिशिष्टांत दिलेल्या प्रक्षिप्त भागाबद्दल श्री. पारसनिसांचें व आमचें ऐकमत्य होईल असें वाटतें पण आजच त्याबद्दल निश्चित असें आम्ही कांही सांगत नाही.

काव्यसमीक्षा करतांना प्रो. पारसनिसांनी नैषधकाव्य व नलोपाख्यान यांतील सादृश्य सप्रमाण सिद्ध केलें आहे, पण प्रस्तुत काव्यांतील काव्यगुणांचें सविस्तर दिग्दर्शन येथे करणें त्यांना अशक्य कां वाटलें कळत नाही. आम्हांस तरी अशा दिग्दर्शनास हेंच स्थल योग्य वाटतें. काव्याचा मुख्य रस कोणता, त्याचे ठळक गुण कोणते, इत्यादि उपयुक्त विवेचनाबरोबरच रघुनाथपंडितांचें संस्कृत काव्याचें ऋण व असल्यास त्यांचें कल्पनास्वातंत्र्य किंवा प्रतिभा आजमावणें जरूर होतें. बहुतेक मराठी कवि पुष्कळशा कल्पना संस्कृत कवीपासून घेतात त्यामुळे त्यांची स्वतःची प्रतिभा किती हें समजणें कठीण होतें, व यामुळेच त्यांना 'भाषांतरे' हें नांव पडलें आहे. त्यांच्या काव्यांतून त्यांच्या स्वतंत्र प्रतिभेची माणिकमोतीं हुडकून काढून त्यांच्यावरील हा आरोप घालविणें हें काव्यसमीक्षण म्हणविणाऱ्याचें कर्तव्य होऊन बसतें.

नलोपाख्यानांतील प्रसंगवर्णनाबद्दल दुमत होण्याचें कारण नाही, पण यांतील भाषेबद्दल यापेक्षा थोडे विस्तरशः विवेचन यावयास पाहिजे होतें. फार्सी शब्दांबरोबरच या काव्यांत 'मात' यासारखें कानडीहि शब्द आहेत. कांही शब्दांची व्युत्पत्ति येणें जरूर होतें. म्हणी व त्या काळचे लोकप्रवादहि यावयास पाहिजे होते. व्याकरणाच्या बाबतींतहि यापेक्षा थोडी जास्त अपेक्षा होती. अलंकारांचें विवेचन करतांना

रघुनाथपंडितास 'स्वभावोक्ति', श्लेष व अतिशयोक्ति किती प्रिय होते व त्यांत तो कसा कुशल आहे याचें सामग्र्याने वर्णन करून मराठी कवितेंतील या अलंकारांच्या स्थानाचें महत्त्व सांगणें अवश्य होतें. विद्यार्थ्यांची दृष्टि फाकण्यास मराठी काव्यें तत्त्वनिकषावर घासून दाखविलीं पाहिजेत. मग त्या मानाने त्यांचें कमी अधिक महत्त्व ठरेल तें ठरेल.

यापुढील प्रो. पारसनिसांच्या प्रतीचा भाग म्हणजे त्यांच्या टीपा व यावर मोठ्या कष्टाने असें म्हणावें लागतें की हें काम अगदी गचाळ झालें आहे. टीपांचा सरस निरसपणा सुलभ शब्दांचे अर्थ दिल्यानें ठरत नाही, तर विद्यार्थ्यांस व सामान्य वाचकांस दुर्बोध अशा स्थलांच्या स्पष्टीकरणावरूनच ठरत असतो. कित्येक ठिकाणीं प्रोफेसर मजकूर साधे व सरळ अर्थ सोडून मुद्दाम आडमार्गांत शिरलेले दिसतात, व मध्येच कोठल्या तरी पेंचांत सापडतात. आपण काय म्हणत आहों हें त्यांचें त्यांनाच कळत नाही. अशीं कांही उदाहरणें खाली देत आहों:—

श्लोक ४९—'आतां सोडवि मज रघुनाथा' येथे "नलाला रघुनाथ म्हणून संबोधण्याचें कारण काय" असें पारसनीस विचारतात. 'रघुनाथा' असें श्रीरामाला अनुलक्षून म्हटले आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली नाही. कवि आपलें तरी नांव कशास घालील? कवीचें श्रीराम हें कुलदैवत होतें. ही गोष्ट डोळ्याआड करून कसें चालेल?

श्लोक ५१—"माय माझी बैसेल शोकशाले" या ठिकाणीं शाळा या शब्दाचा दुसरा अर्थ 'बुंधा' असा घेऊन 'माझी आई शोकरूपी झाडाच्या बुंध्याखाली बसेल' असा अर्थ करणें रसहानिकारक आहे. कवीला श्लेष प्रिय आहे म्हणून टीकाकाराने आपल्या बुद्धीचे तारे तोडूं नयेत.

श्लोक ७१—या श्लोकाच्या अर्थाची पारसनिसांनी गंमतच उडविली आहे. 'तजवीज' या शब्दाने त्यांची दिशाभूल झाली आहे. "वीज अचंचळ म्हणजे स्थिर व शीतळ म्हणजे थंड कधी तरी झाली आहे काय? ती धरण्यास जशी उपाययोजना (तजवीज) करावी लागते तशी दमयंती वरण्यास करावी लागेल हें तुला कसें समजत नाही" असा अर्थ पारसनीस देतात. वीज धरण्यास काय उपाययोजना करावी लागते कळत नाही. वीज स्थिर करणें किंवा थंड होणें जसें अशक्य तशी दमयंती मिळणें अशक्य असें कां हंसाला म्हणावयाचें आहे? पारसनिसांच्या वरील अतर्क्य कोटिक्रमाने इष्टार्थाच्या उलट अर्थ निष्पन्न होत आहे. दमयंती ही वीज आहे पण ती वीज नेहमीच्या विजेसारखी चंचल व प्रखर नसून अचंचल व शीतल आहे. नेहमीच्या विजेचे दुर्गुण या दमयंतीरूपी विजेंत नसून तिचे कांतिमत्त्वादि गुण मात्र येथे आले आहेत असें म्हणण्याचा कवीचा भाव आहे व हा अर्थ पुढील ओळींशींहि चांगला जुळतो, कारण अचंचलत्व व शीतलत्व असल्याशिवाय डोळ्यांना सुख कसें होणार? 'तजवीज' हा शब्द केवळ 'वोज' या शब्दाशीं अनुप्रास साधण्यासाठीं योजला आहे. त्याच्या नित्याच्या अर्थानें भांबावण्याचें कारण नाहीं.

श्लोक ७१–नूतननीरजनूत इ० "(ती) नूतननीरजनूतमुखी पुरुहूत वधूसि सखी (आहे असें) निरखीं" असा अन्वय घेतल्यानें अर्थ चांगला जुळतो. 'निरखीं' हें द्वितीय पुरुषीं आज्ञार्थाचें रूप घेऊन नलाला संबोधून घेतलें तरी चालेल. पण पारसनिसांचें येथे भाष्य आहेच. "आपल्यापेक्षा अत्यंत वरचढ असलेल्या गोष्टीकडे पाहण्याचा धीरसुद्धा होत नाहीं. परंतु दमयंती आत्मविश्वासानें इंद्राच्या पत्नीकडे पहात होती म्हणजे तिच्यापेक्षां जास्त नसली तरी तिच्याइतकी तरी मी सुंदर आहें असा तिला आत्मप्रत्यय होता" इतक्या तर्कशास्त्राची येथे मुळींच जरूर नाही.

श्लोक ७१–आधींच नैषधकथा नवनीत भेला इ० याचा अर्थ देताना पारसनीस म्हणतातः–सूर्यप्रकाशांत लोणी विरघळूं लागलें म्हणजे आपण जसें तोंडांत घालतो तसें हंसाच्या आगमनानें नवनीताप्रमाणें प्रिय असणारी नैषधकथा ऐकण्याविषयीं ती सादर उत्सुक झाली." पण सूर्यप्रकाशांत धरून का आपण लोण्याचा गोळा तोंडांत टाकतों? श्लोकांतील लोण्याच्या गोळ्याची स्थिति पारसनिसांना कळलेली नाही. तो गोळा जिभेवर आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. नैषधकथारूपी लोण्याचा गोळा दमयंतीच्या जिभेवर होता म्हणजे नलकथा तिच्या जिभेवर होती, ती हंसागमनाने ओठावर आली व पुढे ती भाषणरूपानें बाहेर आली असा स्पष्ट अर्थ असतांना "ती भाषण ऐकण्याविषयीं सादर उत्सुक झाली" असा अर्थ पारसनीस आणतात कोठला? "किंवा" स्वीकारितां वचन तें मग आदरीतें" या पंक्तीचाच ते वरील अर्थ करीत असतील. पण ११८ श्लोकापासून दमयंतीच बोलत आहे मग ऐकण्याबद्दल उत्सुक होण्याचा प्रश्नच रहात नाही. यावरून या पंक्तीचा अर्थ त्यांस कळला नाही हें स्पष्ट आहे.

श्लोक १२३ या श्लोकांत 'मुख' याबद्दल 'सुख' असा पाठ घेऊन नवनीतकारांनी अर्थ चार दिलेले सर्वविश्रुत आहेत. मला 'मुख' हाच पाठ मान्य आहे. "मुख काळें करणें" यामध्ये दोन अर्थांची निष्पत्ति होते. लेखणीचेंहि लिहितांना मुख काळें होतें. व मुख काळें करणें= काळोखी फासणें असाही अर्थ आहे. हा दमयंतीकडे लागतो. "देवनळही जोंवरि लेखीं काळें मुख करूनि होय (तोंवरि) स्वकरिं धराया (योग्य आहे असें) मज लाज जाया (मला निर्लज्जता प्राप्त होण्याला) चतुरा मी सांगेन काय? हें जाण." किंवा "जोंवरि लेखीं मुख काळें करूनि लाज जाया होय (तोंवरि) मी देवनळही स्वकरीं धरा या (असें) सांगेन काय? चतुरा हें जाण" असे दोन अन्वय होऊं शकतील. येथे याप्रमाणे बरा अर्थ लागूं शकतो.

श्लोक १५० या श्लोकाच्या दोन ओळींबद्दल प्रो. पारसनिसांनी टीपांत प्रश्नचिन्ह घातलें आहे. दमयंतीच्या मनांत नल वास करीत होता. त्यामुळें मदनास आपलें स्थान नलानें घेतले याचा हेवा वाटून त्याने आपल्या सैनिकांना ती गोष्ट सांगितली व ते (सैनिक) जमले व त्यांनीच दमयंतीला दुखविली अशी कवीनें कल्पना केलेली दिसते. असा अर्थ पारसनिसांनीं सुचवून ठेवण्यास हरकत नव्हती.

## अभिप्राय

श्लोक १५६–या श्लोकांतील 'वैजयंती' या शब्दाच्या अर्थाबद्दल प्रो. पारसनिसांची कींव करावीसें वाटतें. "स्यात्प्रासादो वैजयंतः" एवढें देखील त्यास समजलें नाही हें आमचें दुर्दैव होय. हें समजलें असतें तर १५६, १५९ एकत्र घ्यावे असें ते म्हणाले नसते.

श्लोक १६५ या श्लोकाच्या अर्थाबद्दल 'केसरी'नें टीका केलीच आहे. 'हळूं जाहल्या' याचा अर्थ पारसनिसांना कळला नाहीं हें खचित. ताजवा हातांत धरल्यानंतर जड वस्तू खाली राहून हलकी वस्तू वर जाते ही साधी गोष्ट समजण्यास फारसें डोक खाजविण्याचें कारण नाहीं.

वरील ८।९ स्थलें नलदमयंतीस्वयंवरांत कठीण वाटणारीं अशीं आहेत. यांनांच विशेषतः टीपांची जरूरी लागते. पण यासंबंधींच अर्थाचा अनर्थ कसा झाला आहे हें समजल्यावर प्रस्तुत प्रतीबद्दल वाचकांचें मत आमच्याप्रमाणेंच होईल अशी आशा आहे. याशिवाय पंचू=बहादर असाही अर्थ सुचवावयास हरकत नव्हती. साई=झाडी असा अर्थ सांपडत नाही. तो केवळ अनुमानधक्क्यानेच दिलासा दिसतो. ग्रंथावर टीपा देतांना कोश पाहावा लागतो. 'साई' याचा हा अर्थ घेतल्यावर 'दुपाराची साई" या सामराजाच्या ओळीचा अर्थ श्री. पारसनीस कसा करतील ? 'सौरस' याचा अर्थही रसपूर्ण, रसभरित असा होईल असें वाटत नाही. कोशांत तरी तो निघत नाही. सौरस=गोडी असा अर्थ निघतो. शिवाय तें विशेषण नाही हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अशी अनवधानाचीं उदाहरणे आणखी देतां येतील. एकंदरींत पाहतां साध्या शब्दांचे अर्थ मुद्दाम माथीं मारणें व अवघड ठिकाणीं मूकवृत्ति स्वीकारणें किंवा भरमसाट कांहीतरी आनवश्यक सांगणें या टीकाकारांच्या नेहमीच्याच धोरणाचाच अवलंब प्रो. पारसनिसांनी केला आहे. शेवटच्या परिशिष्टाचें काम बरें झालें आहे पण याबद्दलहि 'लोकशिक्षण'कारांचेंच म्हणणें आम्हांस मान्य आहे. निरनिराळ्या श्लोकांत अमुक अमुक अलंकार होतात व तेच कां होतात यानें विवेचन विद्यार्थ्यांसाठी देणें आवश्यक होतें.

अभिप्राय फार लांबला. पुस्तकाच्या केवळ चुक्या काढण्याचा हेतू नाही. पण प्रो. पारसनिसासारख्यांकडून आम्ही जितकी अपेक्षा करतों तितकी खरी न ठरल्यामुळे तत्त्वाकरिता थोडें वटु लिहिणें भाग पडलें. यांत वैयक्तिक द्वेषाचा भाग बिलकुल नाही हें सूज्ञ वाचक जाणतील, व हेंच आम्हांस शेवटीं सांगावयाचें आहे.

द. सी. पंगु

---

## शुद्धलेखनमण्डळाचा वृत्तांत.

### १६ वें म. साहित्यसंमेलन, हैद्राबाद.

गोवें येथे भरलेल्या १५ व्या संमेलनांत मंजूर झालेल्या ९ व्या ठरावाप्रमाणे व्यवस्था करण्यासाठी मागील वर्षीचीच समिति चालू ठेवण्यांत आली.

**मंडळाचे सदस्य.**

| | |
|---|---|
| श्री. ना. गो. चापेकर ( अध्यक्ष ) | श्री. न. चिं. केळकर |
| श्री. चिं. वि. वैद्य | श्री. ब. ग. खापर्डे |
| श्री. ना. दा. बनहट्टी | श्री. रा. दा. देसाई |

श्री. कृ. पां. कुलकर्णी.

गोवें येथील संमेलनांत ठरल्याप्रमाणे शुद्धलेखनमंडळाचे निर्णय महाराष्ट्रांतील लेखक, वर्तमानपत्रें व मासिकें ह्यांचे संपादक ह्यांकडे संमतिसाठी रवाना केले. त्याचप्रमाणे मुंबईइलाखाशाळाखातें व मध्यप्रांतशाळाखातें व कांही संस्थानांतील शिक्षणाधिकारी ह्यांच्याकडे अंमलबजावणीसाठीं नियम पाठविले. अद्याप कोणाकडूनहि उत्तरें आलीं नाहीत.

त्यांच्याकडे पुन्हा विचारणा केली आहे. सर्वांच्या माहितीसाठी मंडळाचे निर्णय साहित्यपत्रिका, लोकशिक्षण, मराठीशिक्षक ह्यांमध्ये छापिले.

लिहिण्यास आनंद वाटतो की, ह्या निर्णयाप्रमाणे लेखन करण्याचें कांही विद्वानांनी कबूल करून संमति दाखल आपल्या सह्याहि दिल्या आहेत. मुसलमानी मुलुखांतील "मुशाफरी" व "साहित्यसोपान" हीं दोन पुस्तकें व पुण्याच्या मुलींच्या हायस्कुलांतील मासिक हीं सर्व शुद्धमंडळाच्या निर्णयांना अनुसरूनच छापिलीं आहेत. सोलापूर येथील हरीभाई देवकरण हायस्कुलामध्येहि ह्या निर्णयाप्रमाणे विद्यार्थ्यांकडून लेखन करवून घेण्याचा स्तुत्य प्रयत्न चालू आहे. ज्ञानप्रकाश, केसरी, नवाकाळ ह्या तीन प्रमुख वर्तमानपत्रांच्या चालकांनीहि मंडळाचे निर्णय एकसमयावच्छेदेंकरून अमलांत आणण्याचें कबूल केलें आहे. ह्या सर्वांचें मंडळ फार आभारी आहे. नवभारत ग्रंथमालेंतील पुस्तकें ह्या नवीन पद्धतीने छापण्याचें चालकांनी अभिवचन दिलें आहे.

पुण्यांतील कांही प्राथमिक शाळांतील शिक्षक व विद्यार्थी ह्यांना ही नवीन पद्धति समजावून देण्यांत आली. कांही शिक्षकसंमेलनांतहि निर्णयाचा पुरस्कार करण्यासाठी मंडळाचे निर्णय मोफत वाटण्यांत आले. जे ग्रंथकार नव्या निर्णयास अनुसरून आपले ग्रंथ छापण्यास तयार होते त्यांचीं हस्तलिखितें व कच्चीं मुद्रितें तपासून दिलीं.

# कै॰ अच्युतराव कोल्हटकरांची वाङ्मयसेवा



( लेखकः—रामचन्द्र विनायक पटवर्धन. )

महाराष्ट्र-वाग्देवीच्या भाण्डारांतील एक अमूल्य रत्न हरपल्याचें आतापर्यंत बहुतेक वाचकांस माहित झालेंच आहे. हें रत्न म्हणजे सुप्रसिद्ध "संदेशकार" अच्युत बळवंत कोल्हटकर हे होत. ह्यांचें देहावसान मुंबईत गेल्या जून महिन्याच्या १६ तारखेस झालें. कोल्हटकर घराण्यावर वाग्विलासिनीचा वरदहस्त कित्येक पिढ्यांचा आहे. अच्युतरावांचे पूर्वज महादेवशास्त्री कोल्हटकर ह्यांचें वक्तृत्व अलौकिक होतें. आणि प्रख्यात नाट्याचार्य श्रीपाद कृष्ण हे तर सर्वविश्रुतच आहेत. अच्युतरावांचे चुलते बळवंतराव,—ह्यांनीच अच्युतरावांना लहानाचे मोठे केलें—हेहि कवि होतें. त्यांचीं भक्तिरसपूर्ण पद्यें अच्युतराव विद्यार्थीदशेंत दररोज स्नानानंतर मोठ्या भाविकपणें वाचीत असत. अच्युतरावांचें नांव माहीत नाहीं असा महाराष्ट्रीय वाचक शोधूं गेल्यासहि सापडणार नाहीं. रसना आणि लेखणी हीं दोन्हीं अस्त्रें सारख्याच कुशलतेने चालविण्याचें कौशल्य फारच थोड्या साहित्यभक्तांच्या वाट्यांस येतें. महाराष्ट्र—साहित्य—सागर जरी अतिशय विस्तीर्ण असला तरी त्यांतहि अशीं रत्नें अगदी थोडी आहेत. अच्युतरावांचें बालपण बहुतेक पुण्यांतच गेलें. त्यांचें शिक्षणहि पुण्यांतच डेक्कन कॉलेजमध्ये झालें. कॉलेजांत बी. ए. च्या वर्गांत जाईपर्यंत अच्युतरावांच्या पोषाखाची पद्धति अगदीच गबाळी असे. ही गबाळी पद्धति ज्याने पाहिली असेल त्याला ही गबाळग्रंथी मूर्ति पुढील आयुष्यामध्ये वृत्तपत्र लेखनाने सर्वांस चकित करील, आणि वृत्तलेखनकलेंत क्रान्ति घडवून आणील हें स्वप्न सुद्धा पडलें नसेल. अग्नि जसा धूमाच्छादित असतो, मूळ तसा नसतो तसा अच्युतरावांचा कॉलेजक्रमहि तडफदार नव्हता. "मुलाचे पाय पाळण्यांत दिसतातच." अशा भ्रामक कल्पनेने चरित्रनायकाच्या बालपणच्या आख्यायिका चरित्रलेखक एकाच धर्तीवर मनसोक्त रंगवीत असतात; आणि अशा वाल्मीक-कोकिलांचें कूजितहि एकाच सुरावर चालत असतें. कोणी आजारी पडल्यावर त्याच्या परिचयाचे सर्व लोक एकदम वैद्य बनून आजार अमुकच कारणाने झाला असें सांगत सुटतात. लाभहानिचा प्रकार घडून गेल्यावर मग प्रत्येकजण त्याचा ग्रहयोग वर्तवितो; त्याच रीतीने चरित्रनायकाचें बालपण जरी विस्मृतीच्या पटलाने आच्छादित झालें असलें तरी लेखक नाउमेद न होतां बालपणच्या आख्यायिका तपशिलवार सांगून मोकळे होतात. मनुष्याच्या आयुष्यक्रमावर अन्तरंगांतील स्वभावसिद्ध गुण-दोषांचा जसा परिणाम होतो तसाच परिस्थितीनेहि त्याच्या जीवनक्रमांतच नव्हे तर स्वभावांतहि पालट पडतो. ह्या नियमास अनुसरूनच अच्युतरावांच्या सार्वजनिक वर्तनपद्धतींत स्पष्टपणें निदर्शनास येणारीं ठळक परिवर्तनें झालीं. त्यांत इतर गुण—दोष जरी प्रामुख्याने दिसून आले असले तरी त्यांचा थट्टेखोर स्वभाव आणि आनंदीवृत्ति ही मात्र अगदी कायम राहिली. तसेच महत्त्वाकाङ्क्षा आणि दृढनिश्चय हेहि सद्गुण अढळ राहिले. अच्युतराव कॉलेजांत असे

स्वतंत्रवृत्तीचे असत तसेच त्यांचे अगदी जिव्हाळयाचे सहाध्यायी देखील पूर्णपणे स्वतंत्रवृत्तीचेच होते; त्यामुळे भावि आयुष्यक्रमांत त्यांच्यांत मतभेद उत्पन्न झाला तरीहि परस्परांचें मित्रप्रेम अगदी अबाधित सोज्वळ राहिलें. अच्युतराव आणि त्यांचे मित्रद्वय ह्यांनी वाङ्मयसेवेची दीक्षा बी. ए. होण्यापूर्वीच घेतली. पहिला धडा म्हणून "सायणभाष्य-प्रदीपिका" ह्या नांवाचें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें, आणि वेदांची सेवा करण्याचा संकल्प केला. बी. ए. पास झाल्यावर अच्युतराव आपल्या पूर्वोक्त मित्रांसह कायद्यांच्या अभ्यासासाठी मुंबईस जाऊन राहिले. त्यावेळीं लोकमान्य टिळकांवर "ताईमहाराज" प्रकरणाची तरवार लटकत होती. शिवरामपंत परांजपे यांचें "काळ" पत्र जोमाने चालू होतें; आणि राजकारणांत महाराष्ट्र अग्रेसर होता. टिळकांच्या धैर्याची खरी कसोटी "ताई-महाराज" प्रकरणांतच झाली. तें प्रकरण म्हणजे त्यांच्या शुभ्र धवल चारित्र्यावर काळेकुट्ट डाग पाडण्याचा एक व्यूह होता अशा आणीबाणीच्या प्रसंगीं केसरीचें आणि केसरीकारांचें शुद्ध वर्तन पाहून अच्युतरावांचें अन्तःकरण टिळकांविषयींच्या निःसीम भक्तीनें रंगून गेलें. "केसरी" आणि "काळ" ह्या पत्रांनें त्यांना जणों वेडच लागलें. अशाच एका प्रसंगी त्यावेळेस त्यांच्या स्वभावांतील लहरी, विचित्रपणा अनुभवास आला. परंतु त्यांच्या अभ्यासक्रमावर त्याचा कांहीं परिणाम घडला नाही. पुढे सन १९०५ सालीं ते एल्एल्. बी. पास झाले, आणि धंदा शिकण्यासाठी म्हणून त्यांचे वडील वामनराव ह्यांच्या सल्ल्याने हुशंगाबादेस गेले. तो काळ ऐन धामधुमीचा होता; बंगालच्या फाळणीनें सर्व देश विव्हल झाला होता; आणि बहिष्काराच्या तेजाने हादरून गेला होता. हुशंगाबादेहून अच्युतराव १९०५ मध्ये नागपुरास आले. अच्युतरावांचे वडील वामनराव हे टिळकांचे अत्यंत विरोधी, आणि टिळकांच्या अडवणुकीच्या मार्गाचेहि कट्टे प्रतिस्पर्धी होते. अशा वातावरणांत सन १९०७ सालची राष्ट्रसभा नागपुरास भरावयाची असें ठरलें; तेव्हा टिळकांच्या धोरणाला विरोध करणारें असें देशसेवक पत्र नागपुरास निघत होतें. त्याचें संपादकत्व १९०६ च्या अखेरीस अच्युतरावांनी आपल्याकडे घेतलें. पण वामनरावांस ही कल्पनाहि झाली नाही की देशसेवक पत्र आणि अच्युतराव हे दोघेहि केसरीच्या धोरणाचाच पुरस्कार करतील; परतु गोष्टी वामनरावांच्या अपेक्षेच्या विरुद्ध घडून आल्या. अच्युतरावांनी देशसेवकाच्या द्वारा टिळकांच्या राजकारणाचा आणि "बहिष्कारयोगाचा" मध्यप्रांतांत मोठ्या धडाडीने प्रसार केला. देशसेवकांतील लेखांवर टिळकांच्या धोरणाचाच केवळ नव्हे, तर टिळकांच्या भाषाशैलीचा ठसा स्पष्टपणे दृग्गोचर होऊं लागला. निळकंठराव उधोजी, डॉ. मुंजे, धुंडिराजपंत ठेंगडी, डॉ. चोळकर ह्यांनी सर्व मध्यप्रांतांत दौरा काढून स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार, आणि राष्ट्रीय शिक्षण ह्या चतुःसूत्रीला जेथे जेथे विरोध दृष्टीस पडे तेथे जनतेला जागृत करण्याचें अवर्णनीय कार्य पार पाडलें. खुद्द नागपुरांत अच्युतरावांनी सभेंतून आपल्या पित्याचाहि मुलाजा न ठेवता त्यांच्या समक्ष त्यांच्या चुकीच्या मतांची हजेरी घेण्यास यत्किंचित्‌हि कमी केलें नाही. "बापासि बाप न म्हणे" ही उक्ति अच्युतरावांच्या बाबतींत तरी यथार्थ परंतु यथोचितच ठरली. सर्व नागपूर शहर खडबडून जागें झालें. त्यावेळची देशसेव-

# पितृसंस्कृति*

लेखकः — ना. गो. चापेकर

आपल्या समाजांत श्राद्धाचें महत्त्व अग्निहोत्राच्या खालोखाल मानलें जात असे. सध्या तर अग्निहोत्र मागे पडून श्राद्ध मात्र राहिलें आहे. निरनिराळ्या परंपरेचे समाज एकत्र होऊन सध्याचा हिंदुसमाज बनला आहे ह्या सिद्धांताला पोषक असा हा पितृसमाजाचा इतिहास आहे.

देव, पितर आणि मनुष्य हे निरनिराळे समाज होते असे अनेक उल्लेख वैदिक वाङ्मयांत आढळतात. उ. "देवा मनुष्याः **पितरः** (श. ब्रा. ३-६-२-२५); "यां मेधां देवगणाः **पितरश्चोपा**सते (मेधाजनन संस्कार); "स्वाहाकारैः स्वधाभिश्च पूजाभिरपि च द्विजान्। दैवतानि **पितॄंश्चैव** सततं पार्थ सेवसे ॥ हे कुंतीपुत्रा, स्वाहाकार, स्वधाकार आणि आदरसत्कार ह्यांच्या योगाने तूं अनुक्रमें देव, पितर आणि द्विज ह्यांचें नित्यसेवन करीत असतोस (म. भा. ३।३०।११); "नैतां विदुः **पितरो** नोत देवाः' (अथर्ववेद ११।५६।४); "देवा मनुष्या असुराः **पितर** ऋषयः" (अथर्ववेद १०।१०।२६). यं देवाः **पितरो** मनुष्या उपजीवंति सर्वदा (अ. १०।६।३२); "कामो जज्ञे प्रथमो नैनं देवा आपुः **पितरो** न मर्त्याः" (अ. ९।२।१९); "गंधर्वाः **पितरो** देवा असुरा रक्षांसीत्येके चत्वारो वर्णाः" (निरुक्त). "द्वे सृतीऽअशृणवं **पितॄणामहं** देवानामुत मर्त्यानाम्" (यजुर्वेदसंहिता १९।४७); "ब्रह्मचारिणं **पितरो** देवजनाः पृथग् देवा अनुसंयन्ति सर्वे" पितर, देवजन, आणि देव हे पृथक्पणें ब्रह्मचाऱ्याच्याबरोबर जातात. (अथर्व ११।५।२); "त्रेधा भागो निहितो यः पुरा वो देवानां **पितॄणां** मर्त्यानाम्" (अथर्व ११।१।५०.)

असे असंख्य उल्लेख सापडतील. पितरांचा समाज स्वतंत्र होता हें सिद्ध करण्यास वरील उतारे पुरेसे आहेत, तथापि आणखी एक अवतरण देतों. "चाकृप्रे तेन ऋषयो मनुष्या यज्ञे जाते **पितरो** नः पुराणे" पुरातनकाळीं यज्ञ झाल्यावर त्याच्या योगानें ऋषि, मनुष्य व पितर उत्पन्न झाले. (ऋ. १०।१३०।६). पुरुषसूक्तांत ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य ह्यांची उत्पत्ति दिली आहे त्याच नमुन्याची ही ऋषि मनुष्य व पितर ह्यांची उत्पत्ति दिसते. ह्यावरून मनुष्य व पितर हे मुळापासून निरनिराळे आहेत हेंच सिद्ध होतें. निरनिराळी प्रजा निर्माण करतांना ब्रह्मदेवानें पितर निर्माण केले. "भवन्तः पितरः सन्तु सर्वेषां गृहमेधिनाम्" असें वराहपुराणांत वर्णन आहे (अ. ३४). ही उत्पत्तिकल्पना मेलेल्या माणसांच्या संबंधानें संभवनीय दिसत नाही.

ब्रह्मदेवाच्या शरीरांतून देव, असुर, पितर आणि मनुष्य असे निर्माण झाल्याची कथा ब्रह्माण्डमहापुराणांत आहे. "ततो देवासुरपितॄन् मनुष्यांश्च चतुष्टयम्." ह्यावरून देवासुरांबरोबर पितर उत्पन्न झाले हें उघड होतें. "पितरोह्यभवंस्तस्या मध्ये राज्यह्नोः पृथक्" (अ ८) रात्र आणि दिवस ह्यांच्या संधिकालांत पितरांची उत्पत्ति झाली. ब्रह्मपुराणांत त्रेता आणि द्वापर यांच्या संधिकालांत पितरांची उत्पत्ति झाल्याचें ब्रह्मपुराणांतील वचन पुढे उद्धृत केलें आहे त्याची येथे आठवण होईल. पितर हे प्रजापतीचे पुत्र होत. "प्रजापतिसुता ह्येते." असले उल्लेख मेलेल्या माणसांना लागू पडत नाहीत हें

---

* हा निबंध लिहिण्याच्या कामीं श्रीमंत बाळासाहेब पंत यांच्या संग्रहांतील पुराणांचा व पंडित सातवळेकर यांच्या 'यम व पितर' ह्या पुस्तकांत ज्या वैदिक वचनांचें संकलन केलें आहे त्यांचा फार उपयोग झाला याबद्दल मी दोघांचा आभारी आहें.

सांगावयास नकोच. ऋतवः पितरो देवा इत्येषा वैदिकी स्मृतिः असें ब्रम्हाण्डपुराणांत वचन आहे ( अ. १३ ) ह्यावरून ऋतु बदलतांना पितृपूजा करण्याचा प्रघात असावा असें वाटतें.

पितर स्वतः हवन करीत. "सरस्वतीं पितरो हवंते" ( अ. १८।१।४२ ) अशा वचनांवरूनहि पितर ह्या शब्दानें जिवंत समाजच समजला पाहिजे.

ह्या समाजाचें मुख्य धार्मिक कृत्य म्हणजे पितृपूजा, पितृश्राद्ध अथवा पितृसेवा हेंच होय. आपण विद्यमान कालीं मृत पितरांचेंच श्राद्ध करतों, पण फार प्राचीनकाळीं जिवंत पितरांचें श्राद्ध करण्याचा प्रघात होता. पितरांचें पूजन करणें हें मुख्य कर्म. मृत पितरांच्या स्थानीं सध्या करतात त्याप्रमाणे ब्राह्मणांची योजना करीत आणि जीवत्पितराला प्रत्यक्ष पितृस्थानीं बसवीत.

पितृपूजा

'म्रियमाणे तु पितरि पूर्वेषामेव निर्वपेत् । विप्रवद्वापि तं श्राद्धे स्वकं पितरमाशयेत्' ( मनु ३।२२० ). पिता जिवंत असूनहि मुलानें श्राद्ध करण्याची चाल होती ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. ह्यावरून पितृपूजा हाच ह्या समाजाचा मुख्य धर्म होता असें दिसतें. पितृयज्ञ म्हणजेच पितृपूजा. ह्या जीवच्छ्राद्धाचा उल्लेख मनूनंतर कोणत्याहि स्मृतिकारांनीं केलेला नसावा. मात्र ब्रह्मपुराणांतलें एक वचन मनूला पोषक आहे. तें असें:– "न निर्वेप्यो भवेत्पिंडः पितॄणां यस्तु जीवति । इष्टेनान्नेन भक्ष्येण भोजयेत्तं यथाविधि" ( अ. ११२ ). त्याच्यापुढें बाप जिवंत असून आजा, पणजा मयत असतील तर श्राद्ध कसें करावें ह्या प्रश्नास दिलेलें उत्तर "यस्मै दद्यात् पिता श्राद्धं तस्मै दद्यात् सुतः स्वयम्" असें आहे. बाप मृत असून आजा जिवंत असेल तर "पितुःपिण्डं प्रदद्याच्च भोजयेच्च पितामहम्." नियम असा कीं, "मृतेषु पिण्डं दातव्यम् जीवन्तंचापि भोजयेत्." हा आचार अवश्य पाळावा; "आचारमाचरेद्यस्तु पितृमेधाश्रितं नरः । आयुषा धनपुत्रैश्च वर्धत्याशु न संशयः" असेंहि हे पुराणकार सांगतात. मेलेल्यांना तशींच जिवंत असणारांना पितर ही संज्ञा होती असें ऋग्वेदावरून दिसतें. "ये चेह पितरो ये च नेह यांश्च विद्म यांश्च न प्रविद्म" ( १०।१५।१३ ) जे पितर येथें आहेत, जे येथें नाहींत, जे आम्हांला ठाऊक आहेत, ज्यांची आम्हांला माहिती नाहीं वगैरे... नववधूनें प्रथमच गार्हपत्य अग्नीची उपासना करतांना पितरांना नमस्कार करावा अशा अर्थाचा अथर्ववेदांत मन्त्र आहे तो असा "यदा गार्हपत्यमसपर्यैत् पूर्वमग्निं वधूरियम् । अधा सरस्वत्यै नारि पितृभ्यश्च नमस्कुरु" ( १४।२।२० )

द्विजातींपैकीं कांहीजण पितृपूजा करीत असावे. ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ अशी पंचविध उपासना होती. ह्यापैकीं निरनिराळ्या समाजाची निरनिराळी उपासना होती असें वराहपुराणावरून दिसतें. "केचित् यजन्ति यज्ञं वै ब्रह्मयज्ञं द्विजातयः । केचित् यजन्ति सुभगे देवयज्ञं हुताशने । केचिच्च भूतयज्ञेन वर्तयन्ति सुमध्यमे । केचिन्मनुष्ययज्ञेन पूजयन्ति गृहाश्रमे । पितृयज्ञं च भो देवि शृणु वक्ष्यामि निश्चयम्" ( अ. १९० ). ब्रह्मपुराणांत पूर्वी मेरु पर्वतावर त्रेता आणि द्वापर या युगांच्या संधिकालांत 'दिव्यमानुष' पितर रहात होते अशी कथा आढळते. "त्रेताद्वापरयोः संधौ पितरो दिव्यमानुषाः । पुरा मेरुगिरेः पृष्ठे विश्वेदेवैः सह स्थिताः" ( अ. ११० ). ब्रह्मदेवानें सृष्टीच्या प्रारंभीं पितृगण निर्माण केले असें सांगून त्यांच्याकरतां श्राद्धतर्पणाचीहि योजना केली असें ब्र. वैवर्त पुराणांत वचन आहे. "आहारं संसृजे तेषां श्राद्धतर्पणपूर्वकम् । स्नानं तर्पणपर्यंतं श्राद्धान्तं देवपूजनम्" (अ. ४१). ह्या वचनानें श्राद्ध व तर्पण करणें हाच पितरांचा धर्म होता ह्या म्हणण्यास पुष्टि मिळते. हें श्राद्ध नित्य करावयाचें होतें हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. नित्य श्राद्ध न केल्यास दोष सांगितला आहे. "नित्यं न कुर्याद्यो विप्रस्त्रिसंध्यं श्राद्धतर्पणम् ......" ज्या समाजांत अग्नीची नित्य उपासना विहित म्हणून समजली गेली, त्याच समाजांत नित्यश्राद्धाची कल्पना उद्भूत होणें अस्वाभाविक दिसतें.

पितरांचें श्राद्ध नित्य करावें असें मनुस्मृतींत वचन आहे. "पयोमूलफलैर्वापि पितृभ्यस्तृप्तिमाहरन् । कुर्यादहरहःश्राद्धमन्नाद्येनोदकेन वा ॥" ( ३।८२ )

यज्ञ न करणारे अथवा अग्नीची उपासना न करणारे पितर होते. त्यांना अग्निष्वात्त ही संज्ञा होती. ह्यावरून वैदिक धर्माहून पितरांचा धर्म निराळा होता असेंच म्हणावें लागतें. विष्णुपुराणांत (अ. ११) "अग्निष्वात्ता बर्हिषदोऽनग्नयः साग्नयश्च ये" म्हणजे अग्निष्वात्त हे अनग्नि असून बर्हिषद हे साग्नि होते असें म्हटलें आहे.

श्राद्ध करणें हाच धर्म असल्यामुळे सर्व कार्यांची प्राप्ती श्राद्धाने होते असा समज असणें स्वाभाविक आहे. नित्य, नैमित्तिक, काम्य, पार्वण हे श्राद्धाचे प्रकार सर्वांना माहीत आहेतच. पण गोष्ठश्राद्ध आणि अश्वश्राद्ध हीं बऱ्याचजणांना अज्ञात असतील. "गोभ्यश्च क्रियते श्राद्धं तद्गोष्ठश्राद्धमुच्यते" गाईच्या प्राप्तीकरतां करावयाचें श्राद्ध तें गोष्ठश्राद्ध होय. तसेंच "शरीरोपचये श्राद्धमश्ववृद्ध्यर्थमेवच" ( भविष्य पु. अ. १८३ ). ह्याखेरीज परदेशीं जातांना श्राद्ध करावयास सांगितलें आहेच. ह्याला यात्राश्राद्ध म्हणतात. हें तुपाने करावयाचें असतें. स्वतःच्या शुद्धीसाठीं करावयाच्या श्राद्धास शुद्धिश्राद्ध म्हणतात. प्रत्येक कर्माचें श्राद्ध हें एक अंगच होतें. अशा श्राद्धाला कर्मांगश्राद्ध म्हणतात. "निषेककाले सोमे च सीमन्तोन्नयने तथा । ज्ञेयं पुंसवने श्राद्धं कर्माङ्गं वृद्धिवत् कृतम्" असें पारस्कर सांगतो. ह्यावरून गर्भादान, सोमयाग, सीमंतोन्नयन, पुंसवन वगैरे संस्कार व यज्ञ हीं करण्याच्या पूर्वी श्राद्ध करणें हा विधि आहे हें उघड दिसतें. पितृपूजेशिवाय कोणतेंहि कर्म होऊं नये असा कटाक्ष पितृपूजकांचा असणें स्वाभाविक आहे.

ऋषींपासून पितरांची उत्पत्ति झाली असें आपणास मनुस्मृतीवरून समजतें. "ऋषिभ्यः पितरो जाताः पितृभ्यो देवमानवाः देवेभ्यस्तु जगत्सर्वम्" ( ३।२०१ ). हा ह्या लोकांच्या आगमनाचा क्रम तर नसेल ना ? पितरांना "पूर्वदेवताः" असें म्हटलें आहे तें योग्यच होय.

**पितृ व पितृगण**

अग्निष्वात्त व बर्हिषद असे पितरांत दोन भेद होते. "पितरो द्विविधाः बर्हिषदः अग्निष्वात्ताश्च" ( सायणभाष्य ). ये वै यज्वानस्ते पितरो बर्हिषदः तानेव तद्यजति। पितॄनग्निष्वात्तान् यजति । ये वैऽयज्वानो गृहमेधिनः । ते पितरोऽग्निष्वात्ताः ॥ ( तै. ब्रा. १।६।९।६ ). अग्निष्वात्त हे मरीचीचे मुलगे असून देवांचे पितर आहेत व बर्हिषद हे अत्रिपुत्र असून दैत्य, दानव, यक्ष, गंधर्व, उरग, सुवर्ण व किंनर यांचे पितर आहेत असें मनु म्हणतो ( ३।९५, ९६ ). कव्य, अंगिर आणि ऋक्वन् हे पितृगण अथर्ववेदांत निर्दिष्ट केले आहेत (१८।१।४७). सोमसद, अग्निष्वात्त, बर्हिषद, सोमप, आज्यप, सुकाली, अग्निदग्ध, अनग्निदग्ध, वगैरे पितृगणांचा निर्देश मनूने केला आहे ( ३।१९५ ते १९९ ). प्रथम पितृगण विधात्याने निर्माण केले अशी कथा ब्र. वैवर्तपुराणांत ( अ. ४१ ) आहे. "सृष्टेरादौ पितृगणान् ससर्ज जगतां विधिः । दृष्ट्वा सप्तपितृगणान् सिद्धिरूपान् मनोहरान् । आहारं ( स्वधां ) संसृजे तेषां श्राद्धतर्पणपूर्वकम्." नवग्व, अथर्वा, भृगु, आङ्गिरस, हे आमचे पितर आहेत असें अथर्ववेदांतील सूक्तकार एका ठिकाणीं म्हणतो (१८।१।५८). पृथ्वीवरील, द्युलोकचे व अंतरिक्षांतील असे तीन प्रकारचे पितर असलेले आढळतात. "स्वधा पितृभ्यः पृथिविषद्भ्यः" ( अथर्व १८।४।७८ ) "स्वधा पितृभ्यो दिविषद्भ्यः" ( अथर्व १८।४।८० ) "स्वधा पितृभ्यो अन्तरिक्षसद्भ्यः" (अथर्व १८।४।७९). ब्रह्माण्ड महापुराणांत सौम्य, बर्हिषद, अग्निष्वात्त आणि काव्य ह्या सर्वांना पितर म्हणतात असें वर्णन आहे. "सौम्या बर्हिषदश्चैव अग्निष्वात्ताश्च ते त्रिधा काव्याश्चैव तु ये प्रोक्ताः पितरः सर्व एव ते" ( अ. २३ )

पुरूरव, आर्द्रव व धूरिलोचन हे पितरांचे देव. ह्यांनाच विश्वेदेव म्हणतात. हे देव वैदिक देवांहून निराळे दिसतात. श्राद्ध सदैव करावयाचें असते. तेव्हां निरनिराळ्या प्रसंगाने पुरूरव, आर्द्रव व

धूरिलोचन ह्यांचे देवतांचें आव्हान व पूजन होतें, वैदिक देवांचें नाही. ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. मातली, यम, आणि बृहस्पति हे पितृसमाजाचे नेते देव होत.

पितरांचे देव

"मातली यमः बृहस्पतिश्च पितॄणां नेतारो देवाः" असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. यम हा पितरांचा राजा असून तो दक्षिणदिशानिवासी आहे. देवांप्रमाणे पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे त्याचें वसतिस्थान नाही. देव उत्तरेकडे बघतात तर पितर दक्षिणेकडे बघतात (दक्षिणा दिक् पितॄणाम्). वैदिक विश्वेदेव आणि पैत्रिक विश्वेदेव निरनिराळे आहेत. "क्रतुर्दक्षो वसुः सत्यः कालकामौ धूरिलोचनौ पुरूरवार्द्रवाश्चैव विश्वेदेवाः प्रकीर्तिताः" (लिखितस्मृति). क्रतु, दक्ष, वसु, सत्य, काल, काम, धूरिलोचन, पुरूरव व आर्द्रव ह्यांना विश्वेदेव ही संज्ञा आहे.

दक्षाची मुलगी विश्वा नांवाची होती तिला जे दहा पुत्र झाले त्यांना विश्वेदेव म्हणूं लागले. त्यांच्या तपश्चर्येने प्रसन्न होऊन पितर आणि ब्रह्मदेव यांनी त्यांना श्राद्धामध्ये तुम्हाला पितरांबरोबर भाग मिळेल, तुमचें पूजनअर्चन होईल असा वर दिला. म्हणून ह्या देवांची वरणी श्राद्धांत लागली अशी कथा ब्रम्हाण्डमहापुराणाच्या उपोद्घातांत आली आहे (अ. १२). ह्या विश्वेदेवांना यज्ञांत भाग नव्हता. हे यज्ञ करणारेहि नसावेत. "जे सोमपान करीत नाहीत, ज्यांना यज्ञभाग मिळत नाही अशा विश्वेदेवांना विकिरान्न मी देतों अशा अर्थाचा एक मन्त्र श्राद्धांत म्हणत असतात. उ. "असोमपाश्च ये देवा यज्ञभागविवर्जिताः । तेषामन्नं प्रदास्यामि विकिरं वैश्वदेविकम्" (गोभिल).

देवकर्मे स्वाहाकाराने होतें तर पितृकार्य स्वधाकाराने करावें लागतें. एकच समाज असता तर हा भेद होण्याचें कारण नव्हतें. "स्वधाकारोहि पितॄणाम्" अशी श्रुति आहे (तै. ब्रा. १-६-९-५).

स्वधा

"स्वधाकारः परा ह्याशीः सर्वेषु पितृकर्मसु" (मनु ३।५२). स्वधा शब्दाचा मूळ अर्थ काय होता हें निश्चित करणें कठीण आहे, पण "पितॄणामन्नं स्वधाः" स्वधा हें पितरांचें अन्न होतें असें समजतात. "तिलमिश्राः स्वधावती धानाः ते अनुकिरोमि" (अथर्व वेद १८।४।४३). भाष्यकारांनी स्वधावती म्हणजे अन्नवती एवढाच अर्थ दिला आहे, पण कोणतें अन्न तें कोणीच सांगितलें नाही. हे स्वधे, ये असें पितरांनी तिला आव्हान केलें (तां पितर उपाव्हयन्त स्वध एहीति ८।१३।५). असा एक मंत्र अथर्ववेदांत आहे. तसेंच "तां स्वधां पितर उपजीवन्ति" (८।१३।८) ह्या वचनावरून स्वधा हें उपजीविकेचें साधन असावें असें दिसतें. मग स्वाहासुद्धा अन्न होतें कीं काय हा प्रश्न उद्भवतो. अथवा स्वाहा व स्वधा हे अन्नवाचक शब्द असावे. अन्नाला पितरांच्या भाषेत स्वधा हा शब्द होता व देवांच्या भाषेत स्वाहा हा होता. "स्वाहा शस्ता देवदाने पितृदाने स्वधा वरा" ह्या वचनावरून स्वधा आणि स्वाहा हे धान्याचे प्रकार असावे असा तर्क करण्यास हरकत नाही. पितरांना स्वधायी हें विशेषण यजुर्वेदांत एका ठिकाणीं (अ. १९।३६) लावलेलें आहे. "पितृभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः" स्वधेची इच्छा करणारे ते स्वधायी. "अक्षन् पितरोऽमीमदंत" हे पितरहो स्वधा भक्षण करा आणि आनंदित व्हा. पितरांची उपासना स्वधेनेच करावयाची असते. "उपासते पितरः स्वधाभिः" (अ. १८।४।३६)

पितृयजनाने सद्गति मिळते असें अत्रिस्मृतींत सांगितलें आहे. "पितृकार्ये प्रसक्ता ये ते यांति परमां गतिं."

सद्गति

पितृकार्यानेच परमा गति अथवा मोक्ष मिळतो. मात्र मोक्ष शब्दाने वेदांत्यांचा मोक्ष म्हणजे जन्ममृत्यूपासून सुटका असा अर्थ घ्यावयाचा नाही. कारण "वीरं मे दत्त पितरः" मला वीरपुत्र द्या अशी प्रार्थना श्राद्ध करणारा करीत असतो. आपणांस उत्तम पुत्र असावा ही ह्या समाजाची मोठी इच्छा असे. "पितरः सर्ववीरं रयिं नियच्छत्" (अ. १८।४।४०). याज्ञवल्क्यस्मृतीमध्ये श्राद्धकर्त्याला पितर आयुष्य, प्रजा, धन, विद्या, राज्य, स्वर्ग व मोक्ष प्राप्त करून देतात असें सांगितलें आहे. (१०।२७०) देवयान आणि पितृयाण हे दोन स्वतंत्र मार्ग आहेत ह्यावरून हि देवसमाजाहूनपितृ-

समाजाचें भिन्नत्व प्रतीत होण्यासारखें आहे. "द्विविधोहि मार्गः देवयानः पितृयाण इति देवलोकप्राप्ति-साधनभूतो देवयानः पितृलोकप्रापकः इतरः". पितृयजनाने पितृलोकच साध्य व्हावयाचा; देवलोक साध्य होणार नाही अशीच समजूत होती.

पितरांचा राजा यम. इन्द्र नव्हे. "यमः पितृणामधिपतिः" ( अथर्व ५।२४।१४ ); "तस्या यमोराजा वत्स आसीत्" ( अथर्व ८।१३।५ ). "स यत् पितॄननुव्यचलद्यमोराजा भूत्वाऽनुव्यचलत् स्वधाकारं अन्नादं कृत्वा" ( अथर्व १५।१४।१३ )

पितरांचा राजा

मनुष्यांचा राजा मनु, देवांचा इन्द्र व पितरांचा यम. मर्त्यांत प्रथम मेला तो यम असेंहि अथर्ववेदांत वर्णन आहे. "यो ममार प्रथमो मर्त्यानां यः प्रेयाय प्रथमो लोकमेतत् । वैवस्वतं सङ्गमनं जनानां यमं राजानं हविषा सपर्यत्" ( १८।३।१३ )

"यमश्रेष्ठान् पितॄन्" असा शब्दप्रयोग वारंवार केलेला आढळतो. त्याचा अर्थ यम हा पितरांचा राजा असाच आहे.

हिरण्यकेशी शाखेच्या वैश्वदेवांत काकबलि टाकतांना पुढील श्लोक म्हणतातः—

"यमोऽसि यमदूतोऽसि वायसोऽसि नमोऽस्तुते
सप्तजन्मकृतं पापं बलिं भक्षतु वायसः"

म्हणजे कावळयाला यमदूत मानतात. पिंडाला कावळा शिवला कां पाहिजे तें ह्यावरून समजण्यासारखें आहे.

द्युलोकाचे तीन विभाग केले आहेत. "तिस्रोद्यावःसवितुर्द्वा उपस्थां एका यमस्य भुवने विराषाट्" ( ऋ. १।३५।६ ). दोन भाग सूर्याच्या जवळ असून तिसरा यमाचें भुवन होय. अथर्ववेदांत पितरांचें स्थान अधिक निश्चित केलें आहे. "उदन्वती द्यौरवमा पीलुमतीति मध्यमा । तृतीयाह प्रद्यौरिति यस्यां पितर आसते" ( १८।२।४८ ). पाणी असलेला द्युभाग अगदी खालचा; ज्या भागांत ग्रहनक्षत्रें आहेत तो मधला; तिसरा प्रद्यौ म्हणून जो भाग आहे त्याच्यांत पितर असतात. अर्थात् हा भाग ग्रहांच्या पलीकडला आहे. पितृसमाजाचें पृथ्वीवरील स्थान ह्या वाक्यांवरून समजण्यास कांहीच मदत होत नाही. नवखंड पृथ्वीच्या नकाशांत मानसोत्तर पर्वताच्या वर देवांच्या दक्षिणेस पितरांचें स्थान दाखविलें आहे.

पितरांचें स्थान

देव, मनुष्य आणि पितर ह्यांचीं धर्मकृत्यें करण्याची वेळहि निरनिराळी होती. 'देवकार्याणि पूर्वाण्हे मनुष्याणां तु मध्यमे । पितृणामपराण्हे तु कार्याण्येतानि यत्नतः ॥' देव समाजांतील लोक आपलीं कर्मे सकाळीं उरकीत, मनुष्य समाजांत त्यांचीं धार्मिक कृत्यें मध्याण्हीला होत आळशी लोकांप्रमाणे पितर आपलीं कर्मे अपराण्हकाळीं करीत. पहाटेस उठून आपलीं कर्मे आटोपणारा देवसमाज सर्वांहून श्रेष्ठ ठरला तर त्यांत आश्चर्य नाही. शातातपाच्या मताने सूर्य मंदत्व पावतो असा जो दिवसाचा आठवा भाग तो पितरांचा काल होय; दिवसस्याष्टमेभागे मन्दीभवति भास्करः । स कालः कुतपोज्ञेयः पितृणां दत्तमक्षयम् । संध्याकाळच्या सुमारास मात्र श्राद्ध करण्याविषयीं निषेध आहे. " उपसन्ध्यं न कुर्वीत पितृपूजां कथञ्चन. " ब्रह्मदेवानेच हे काल देवपितरांना नेमून दिले असें भविष्यपुराण सांगतें 'देवेभ्यो ब्रह्मणा दत्तः पूर्वाण्हस्तिथिभिः सह । पितृभ्योऽपराण्हस्तु पार्वणं तु परं विना' प्रत्येक समाजाचे शास्त्रनियम निराळे होते असें ह्यावरून अनुमित होतें.

धर्मकृत्यांचा काल

देवसमाज आपलें उपरणें डाव्या खांद्यावरून घेई, तर पितरांची चाल उजव्या खांद्यावरून

उपरणें घेण्याची होती, समोर उपरणें सोडण्याचा रिवाज मनुष्यांचा होता असें सव्य, अपसव्य व नीवीति ह्यांवरून अनुमान करतां येतें. अंगावर उपरणें धारण करण्याच्या ह्या तीन

प्राचीनावीति तऱ्हा आजहि प्रचलित आहेत. टिळक देवांतील, व गोखले मनुष्यांतील असेंहि विनोदाने म्हणतां येईल.

सव्य, नीवीति व प्राचीनावीति हे शब्द उपरण्यासंबंधाने अथवा यज्ञोपवीतासंबंधाने वापरीत हें जरी संशयातीत नसलें तरी उपरणें किंवा जानवें वापरण्याची पद्धति निराळी होती ही गोष्ट विशेष महत्त्वाची मानली पाहिजे.

दुसरा मोठा भेद सांगावयाचा म्हणजे पितरांच्या आहुतीला कव्य हा स्वतंत्र शब्द आहे. देवांचें हव्य तर पितरांचें कव्य. देवांच्या अग्नीला हव्यवाहन हा शब्द तर पितरांच्या अग्नीला कव्यवाहन ही संज्ञा आहे. कव्य हा कोणत्या धातूपासून शब्द निघाला आहे हें सांगणें कठीण

कव्य आहे. हु धातूपासून जसे हवन, आहुति, हव्य इ. शब्द बनले आहेत तसे कु धातूपासून बनलेले दिसत नाहीत. तसेंच कु ह्या धातूचा अर्थ ओरडणें-रडणें असा आहे, तो मृतासंबंधाने युक्त असला तरी हवनकर्मनिदर्शक दिसत नाही. एखाद्याच्या घरीं हव्यकव्य होतें असें आपण म्हणतों तेव्हा त्याच्याकडे देवकृत्य व पितृकृत्य हीं दोन होतात असें समजतों. तात्पर्य हव्य व कव्य हीं एक नव्हेत.

श्राद्धांत मुलीच्या मुलाचें महत्त्व फार आहे. त्याला श्राद्धप्रसंगीं भोजन घातलेंच पाहिजे. "व्रतस्थमपि दौहित्रं श्राद्धे यत्नेन भोजयेत्" (मनू अ. ३). नातवाबरोबर जावयाला सुद्धा जेवावयाला घालावा अशी मनूची आज्ञा आहे. "दौहित्रं विट्पतिं बन्धुमृत्विग्याज्यांश्च

दौहित्र भोजयेत्" विट्पति म्हणजे जावई. श्राद्धकर्मांत दौहित्रावर पावित्र्याचा शिक्का मारला आहे. "त्रीणि श्राद्धे पवित्राणि दौहित्रं कुतपस्तिलाः" (शातातप व वसिष्ठस्मृति.) ह्या वचनावरून मुलगी आणि मुलीचा नवरा व मुलगा ह्यांना पितृसमाजांत विशेष मान होता हें उघड आहे.

बसावयास ऋषींना मृगचर्म तर पितरांना कुश नांवाच्या गवताचें आसन देतात. "येऽस्माकं पितरस्तेषां बर्हिरसि" (अ. १८।४।६८) आमच्या पितरांचें आसन बर्हि आहे.

पितरांचें आसन कुश गवताला बर्हि ही संज्ञा आहे. तसेंच लोकरीचें वस्त्र पितरांना प्रशस्त मानलें आहे. देवांना कापसाचें वस्त्र चालतें.

अक्रोधनाः शौचपराः सततं ब्रह्मचारिणः न्यस्तशस्त्रा महाभागाः पितरः पूर्वदेवताः असें मनूने पितरांचें वर्णन केलें आहे. न रागावणारे, स्वच्छतेविषयीं दक्ष असणारे, शस्त्रसंन्यास ज्यांनी केला आहे असे आणि नेहमी ब्रह्मचर्याने राहणारे, हें पितरांचें वर्णन देवांच्या वर्णनाहून

पितरांचा स्वभाव निराळें आहे. न्यस्तशस्त्र हें विशेषण विचार करण्यासारखें आहे. देवांना हें केव्हाहि कोणी लावलेलें नाही. शस्त्रसंन्यासाची कल्पना किती प्राचीन आहे व तिचा उद्भव ह्या देशांत झाला हें वाचून कोणालाहि अभिमानच वाटेल. ह्याप्रमाणे मनूने वर्णन केलेल्या स्वभावाच्या लोकांत एकोपा असणें स्वाभाविक आहे. म्हणून यजुर्वेदांत पितरांना समानः व समनसः असें म्हटलें आहे. "ये समानाः समनसः पितरो यमराज्ये..." (अनु. १९।४५). समान ह्या विशेषणावरून पितृसमाजांत उच्चनीच भाव नव्हता हें व्यक्त होतें.

पितरांना ब्रह्मचारी म्हटलें आहे ह्याचा अर्थ काय? ते विवाह करीत नव्हते कीं काय? पितरांपासून पुत्र लाभ होतो असें वर्णन आहे. "वीरं मे दत्त पितरः" मला पितरहो वीर पुत्र द्या अशी

श्राद्धांत आपण प्रार्थना करीत असतों. "ये पितरो वधूदर्शा इमं वहतुमागमन्। ते अस्यै वध्वै संपत्न्यै प्रजावच्छर्म यच्छतु" (अथर्व १४।२।७३) वधूला पहाण्याकरता लग्नाला आलेले पितर वधूवरांना प्रजा-सुख देवोत. पितर गर्भधारणा करतात असा ऋग् मंत्र आहे. "नृचक्षसः पितरो गर्भमादधुः" (ऋ. ९।८३।३) मनुष्यांना पाहणारे पितर गर्भ धारण करते झाले. ऋ. १०।५६।६ मध्यें पितरांनी पृथ्वीवरील लोकांत आपली प्रजा उत्पन्न करून तिच्यांत पितरांचें तेज स्थापन केलें व प्रजातंतू वाढविला असें वर्णन केलेलें आढळतें "स्वां प्रजां पितरः पित्र्यं सह आवरेष्ववदधुस्तन्तुं आततम्" ह्या वरून संततिजनन आणि पितर ह्यांचा परस्पर संबंध असावा असें वाटूं लागतें. म्हणून सततं ब्रह्मचारिणः ह्याचा अर्थ नेहमी वेदाध्ययन करणारे असाच करणें उचित होईल. पितरांना "सुप्रजामः" व "सुवीराः" हीं विशेषणें लावलीं आहेत (अथर्व १८।४।६३). ह्यावरून वरील प्रमाणे अर्थ करणेंच भाग पडतें. ह्या शिवाय ऋतज्ञ–सत्य जाणणारे व अवृक म्हणजे हिंसा न करणारे अशा वर्णनाने अथर्ववेदांत पितरांना गौरविलें आहे. "असुं य ईयुरवृका ऋतज्ञास्तेनोऽवन्तु पितरो हवेषु" (१८।१।४४). ऋग्वेदांत (१०।१५४।४) तपस्वी व सत्याने वाढणारे असे पितरांचें वर्णन केलें आहे. पितर मोठे योगी होते "पितॄणांहि बलं योगो योगात्सोमः प्रवर्तते (ब्र. पु. उ. ९).

पितरांचा असा स्वभाव असल्यामुळे मनुष्यांत त्यांचा कोणी निंदक नव्हता. "न किरेषां निन्दिता मर्त्येषु ये अस्माकं पितरो गोषुयोधाः" (ऋ. ३।३९।४). गोषुयोधाः म्हणजे इन्द्रियांबरोबर लढणारे. इन्द्रियांवर जय मिळवणारे. पितरांचें माणसांशीं सख्य होतें; परंतु "देवशत्रवः" ह्या शब्दप्रयोगा-वरून युद्धाची खुमखुम असणाऱ्या देवांशीं त्यांचीं कांही काल भांडणें असावीं. मत्स्यपुराणांत (अ १६) लवकर प्रसन्न होणारे असें पितरांचें वर्णन आहे. "शीघ्रप्रसादास्त्वक्रोधा निःशङ्काः स्थिरसौहृदाः। शांतात्मानः शौचपराः सततं प्रियवादिनः" ह्यावरून पितर सात्त्विक स्वभावाचे असल्याचें सिद्ध होतें. शांत स्वभावाच्या माणसाला घाई रुचत नाही. ह्याप्रमाणे "अत्वरा" हा पितरांचा गुण वर्णिला आहे. "त्रीणि चात्र प्रशंसन्ति शौचमक्रोधमत्वराम्" (मनु. अ. ३). नृचक्षसः पितरो गर्भमादधुः ह्या वर उद्धृत केलेल्या वचनावरून पितरांनी मनुष्यांच्या स्त्रियांबरोबर विवाह केले असें मानण्यास काय हरकत आहे?

पितृवाचक तत शब्द आहे. "एतत् ते तत (पितृ) स्वधा" "एतत् ते ततामह स्वधा" ततामह म्हणजे पितामह. ऐतरेय आरण्यकांत तत शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे ती अशी. "एतां वाव प्रजापतिः प्रथमां वाचं व्याहरत् एकाक्षरं द्व्यक्षरां ततेति तातेति। तदेवैतत् अन्यगोष्ठी ततवत्या वाचा प्रतिपद्यते" (१।३।३)

पितरांमध्ये कांही लोक प्रेतें जाळीत, कांही अन्य रीतीने त्यांचा निकाल करीत. म्हणून पितरांना अग्निष्वात्त अथवा अग्निदग्ध आणि अनग्निष्वात्त किंवा अनग्निदग्ध हीं विशेषणें लावलेलीं आहेत. "ये अग्निदग्धा ये अनग्निदग्धा मध्ये दिवः स्वधया मादयंते" (ऋ. १०।१५।१४). हाच यजुर्वेदांत मन्त्र आहे तो असा:—"ये अग्निष्वात्ता (अग्नीने खाललेले) ये अनग्निष्वात्ता मध्ये दिवः स्वधया मादयंते" (अनु. १९।६०). "यानग्निरेव दहन्त्स्वदयति ते पितरो अग्निष्वात्ताः" अशी शतपथ ब्राह्मणांत अग्निष्वात्त शब्दाची व्याख्या केली आहे (२।६।१।७). पितरांत प्रेत पुरण्याचीहि चाल असावी असें "पार्थिवे रजस्यानिषत्ताः" (मातीमध्ये राहिलेले) या वचनावरून म्हणतां येईल. "इदं पितृभ्यो नमो अस्त्वद्य ये पूर्वासो य अपरास ईयुः। ये पार्थिवे रजस्यानिषत्ता ये वा नूनं सुवृजनासु विक्षु" (ऋ. १०।१५।२)

पितरांना सोन्याचें चलन वापरण्याचें माहीत नसावें. त्यांना रुपेंच आवडे. " सुवर्णं देवेभ्यः रजतं पितृभ्यः" ह्या प्रयोगावरून वरील अनुमान काढतां येतें. " तथार्घ्यपिण्डभोज्या-

पितरांचें चलन

दौ पितॄणां राजतं मतम् ". ते रूप्याचीं भांडीं वापरीत. उ. " सर्वेषां राजतं पात्रमथवा रजतान्वितं । दत्तं स्वधा पुरोधाय पितॄन्प्रीणाति सर्वदा " ( मत्स्य-पुराण अ. १६ ).

सोम्यासः हें विशेषण पितरांना वारंवार लावण्यांत आलें आहे. ह्यावरून पितर सोमपानाचे भोक्ते होते असें दिसतें. सोम्यासः ह्याचा अर्थ सोम संपादन करणारे असाहि केला आहे. ( निरुक्त ).

पितरांची बसण्याची तऱ्हा विलक्षण होती. ते उजवा गुडघा जमिनीवर टेकून बसत. " आच्या जानु दक्षिणतो निषद्येमं यज्ञमभिगृणीत विश्वे " [ ऋ. १०।१५।६ ]. उजवा गुडघा टेकण्याविषयी शतपथ ब्राह्मणांत स्पष्ट उल्लेख आहे. " अथैनं पितरः प्राचीनावीतिनः सव्यं जान्वाच्योपासीदंस्तान-ब्रवीत् " [ २।४।२।२ ].

पितरांना मांसाशन वर्ज नसावें. कारण त्यांना मांस देण्याविषयी वचनें आढळतात. " वह वपां जातवेदः पितृभ्यो " [ यजुर्वेद अनु. ३५।२० ] " अपूपवान् मांसवाँश्चरुरेह सीदतु " [ अथर्व १८।४।२० ]. मांसयुक्त चरु एक वेळ समजण्यासारखा आहे; पण वपाहि पितरांना चालत असे कीं काय ? आणखी पहा " यं ते मन्थं यमोदनं यन्मांसं निपृणामि ते । ते ते संतु स्वधावन्तो मधुमन्तो घृतश्चुतः " [ अथर्व १८।४।४२ ] मी तुला लोणी, भात, मांस देतों तें सर्व स्वधायुक्त, मधुयुक्त व घृतयुक्त होवो.

कोणत्या मांसानें पितामह तृप्त होतात तें अग्निपुराणांत सांगितलें आहे. " मात्स्यहारिण कौरभ्रशाकुनच्छागपार्षतैः । ऐण रौरव वाराह शशैर्मांसैर्यथाक्रमम् । मासवृद्ध्याऽभितृप्यन्ति दत्तैरेव पिता महाः ॥ [ अध्याय १६३ ] मासे, हरिण, पक्षी, बोकड, डुकर, ससा वगैरेचें मांस पितरांना आवडे.

## जागतिक पितृपूजन

प्राचीनकाळीं सर्व जगतांत पितपूजा प्रचलित होती. ख्रिस्ती व मुसलमानी धर्मांनी पितृपूजनाला चाट दिला. रोम, इजिप्त, चीन, जपान, ग्रीस इत्यादि सर्व देशांतील लोक पितृपूजक होते. पितृभक्ति हा पितरांच्या उपासनेचा पाया होय. म्हणून चीन व जपान ह्या देशांत पितृभक्ति हा मुख्य सदाचार समजतात. पितृभक्तींत वडील भावाविषयींच्या आदराचाहि समावेश होतो. जिवंतपणीं प्रेमानें व भक्तीने वडील माणसांची सेवा करणें आणि मरणोत्तर दुःख प्रदर्शित करणें हें चिनी लोक आपलें कर्तव्य समजत. ह्या कल्पनेपासूनच मनुष्य मेल्यावर स्त्रियांनी ऊर बडविणें व सुतक धरणें ह्या चालींचा उद्भव झाला आहे. सध्याच्या गुजराथी लोकांच्या बायकांप्रमाणें चिनी बायका ऊर बडवीत. सर्व आप्त तीन दिवस सुतक धरीत. सुतकांत चैनीच्या पदार्थांचें सेवन करीत नसत. चिनांत पूर्वीं वर्षांच्या सातव्या महिन्याचा पंधरावा दिवस हा पितरांच्या श्राद्धाकरतां राखून ठेवलेला असे. तथापि दर महिन्याला श्राद्ध करण्याचा प्रघात होताच. for ancestors' worship the Emperor had seven shrines with its altars representing various forefathers and a t all of these sacrifice was offered every month.

राजाहून कमी दरजाच्या लोकांच्या वेदी ( shrines ) कमी असत. कांहींच्या तीन कांहींची एक. श्राद्धाच्या अगोदर तीन दिवस निर्दोष आचरण ठेवण्याविषयी दक्षता बाळगण्यांत येई. ( other officials had three Shrins for 3 days before sacrificing to ancestors; strict vigil and purification was maintained ). आपल्याप्रमाणेच श्राद्धाच्या कामीं वित्तशाठ्य करूं नये असा चिनी धर्मग्रंथांचा कटाक्ष होता.

ह्यावरून धर्माचा ऐतिहासिक रीत्या विचार करणें किती अवश्य आहे हें दिसून येतें. कारण श्राद्धाच्या आदल्या दिवशीं ब्रह्मचर्य पाळण्याची अनुज्ञा आपल्याहि शास्त्रांत आहे.

ह्याप्रमाणे निरनिराळीं वचनें संकलित करून ही पितृसंस्कृतीची गोधडी बनविली आहे. ही अक्षय्य राहील अथवा लवकरच फाटून जाईल तें सांगवत नाही. तथापि ह्या दृष्टीने विचार करण्यासारखा आहे हें मात्र निश्चित.

## अग्नीचीं नांवें

वैदिक धर्मांत अग्नीचें महत्त्व फार; पण म्हणून अग्नीला पुष्कळ नांवें असलीं पाहिजेत असें मानण्यास योग्य कारण दिसत नाही. तथापि अग्नीला निरनिराळीं अनेक नांवें आहेत ही गोष्ट मात्र खरी. हीं नांवें ज्या श्लोकांत संकलित केलीं आहेत ते श्लोक वाचकांना त्यावर विचार करतां यावा म्हणून येथे देतों.

लौकिके **पावको** वह्निः प्रथमः परिकीर्तितः अग्निस्तु **मारुतो** नाम गर्भाधाने प्रकीर्तितः पुंसवे **पवमानस्तु शोभनः** शुभकर्मसु सीमन्ते **मंगलो** नाम **प्रबलो** जातकर्मणि **पार्थिवो** नामकरणे प्राशनेऽन्नस्य **वै शुचिः सभ्य**नामा तु चूडायां व्रतादेशे **समुद्भवः** गोदाने **सूर्य**नामा स्याद्विवाहे **योजकः**स्मृतः आवसथ्ये **द्विजो** ज्ञेयो वैश्वदेवे तु **रुक्मकः** प्रायश्चित्ते **विट**श्चैव पाकयज्ञेषु **पावकः** देवानां **हव्यवाहश्च** पितॄणां **कव्यवाहनः** शांतिके **वरदः** प्रोक्तः पौष्टिके **बलवर्धनः** पूर्णाहुत्यां **मृडो** नाम **क्रोधोऽग्नि**श्चाभिचारिके वश्यार्थे **कामदो** नाम वनदाहे तु **दूषकः** कुक्षौ तु **जाठरो** नाम **क्रव्यादो** मृतदाहने **वह्नि**नामा लक्षहोमे कोटिहोमे **हुताशनः** वृषोत्सर्गेऽध्व**रो** नाम शुचये ( ? ) **ब्राह्मणः**स्मृतः समुद्रे **वाडवो**ह्यग्निः क्षये **संवर्तक**स्तथा **ब्रह्मा** वै गार्हपत्यश्च **ईश्वरो** दक्षिणस्तथा **विष्णु**राहवनीयः स्यादग्निहोत्रे त्रयोऽग्नयः ज्ञात्वैवमग्निनामानि गृह्यकर्म समारभेत्

वरील श्लोकांत ( १ ) पावक, ( २ ) मारुत, ( ३ ) पवमान, ( ४ ) शोभन, ( ५ ) मंगल, ( ६ ) प्रबल, ( ७ ) पार्थिव, ( ८ ) शुचि, ( ९ ) सभ्य, ( १० ) समुद्भव, ( ११ ) सूर्य, ( १२ ) योजक, ( १३ ) द्विज, ( १४ ) रुक्मक, ( १५ ) विट, ( १६ ) पावक, ( १७ ) हव्यवाहन, ( १८ ) कव्यवाहन, ( १९ ) वरद. ( २० ) बलवर्धन, ( २१ ) मृड, ( २२ ) क्रोध, ( २३ ) कामद, ( २४ ) दूषक (२५) जाठर, ( २६ ) क्रव्याद, ( २७ ) वह्नि, (२८) हुताशन, (२९) अध्वर, ( ३० ) ब्राह्मण, ( ३१ ) वाडव, ( ३२ ) संवर्तक, ( ३३ ) ब्रह्मा, ( ३४ ) ईश्वर, ( ३५ ) विष्णु.

हीं पस्तीस नांवें अग्नीचीं कां पडावीं ह्याचा विचार करणें संशोधनाच्या दृष्टीने अवश्य आहे, हीं सर्व स्मार्त वाङ्मयांतील अग्नीचीं नांवें झालीं. ह्याशिवाय वैदिक वाङ्मयांत अग्नीला अनेक नांवें दिलेलीं आढळतात. उ. १ नपात्क = नपात्को वै नाम एषोऽग्निर्यत् पुनश्चितिः तै. सं. ५।४।१०.

एकदा चयन केल्यावर पुनः चयन केलें तर त्या अग्नीला नपात्क म्हणतात. २ अर्क = अर्कोऽग्निः तै. सं. ५।५।६. अश्वमेधांतील मुख्य अग्नीला अर्क ही संज्ञा आहे. ३ नाक = दिवि नाको नामाग्निः तै. सं. आणखी पांच नांवें तै. संहितेंत सांगितलीं आहेत तीं १ उदधि, २ दुघ्र, ३ गह्य, ४ किंशिल, ५ वन्य. पंच वा एतेऽग्नयो यच्चितय उदधिरेव नाम प्रथमो दुघ्रः। द्वितीयो गह्यस्तृतीयःकिंशिलश्चतुर्थो वन्यःपञ्चमः तै. सं. ५।५।९. अदिति हें एक अग्नीला दुसरें वैदिक नांव आहे. "अग्निरप्यदितिरुच्यते" ( निरुक्त ). आणखीहि वेदांत अग्नीचीं नांवें आहेत. कोणी एकत्र केल्यास चांगलें होईल.

महाभारतांत वेगळींच नांवें आहेत. उ.

| | |
|---|---|
| शंयु = अश्वमेध यज्ञांत ह्या अग्नीला प्रथम पशु अर्पण करतात. | विश्वजित् = बृहस्पतिपुत्र |
| भरद्वाज = यज्ञांत ह्या अग्नीचें आव्याने प्रथम पूजन केलें जातें. | विश्वभुक् = यज्ञसंबंधी अग्नि |
| | उदान } ऊर्ध्वभाक् } = उदरांतील |
| भरत = पौर्णमास यागांतील एका अग्नीचें नांव | स्विष्टकृत् = गृह्य |
| पावक } महान् } = भरताचा पुत्र | क्रुद्ध } मन्यु } = मनुष्यांतील |
| वीर = भरद्वाज पुत्र | काम = अति सुंदर अग्नि |
| निश्चवन = वाणींची अभिमानी देवता | उवथ्य = मोक्ष देणारा |
| विपाप = निश्चवन पुत्र | |

आणखी अग्नि येणेंप्रमाणेः— शिव, प्राजापत्य, मनु, आवसथ्य, बल, विष्णु, वैश्वदेव, स्तुभ, वैश्वानर, कपिल, अकल्मष, अग्रणी, गृहपति वगैरे.

मत्स्यपुराणांत ( अ. ५१ ) मंथनाने उत्पन्न होणाऱ्या अग्नीला पवमान, वैद्युत अग्नीला पावकात्मज आणि सूर्याच्या ठिकाणीं व्यक्त होणाऱ्या अग्नीला शुचि अशा संज्ञा असून हे सर्व स्थावर अग्नि होत असें वर्णन आहे. "यश्चासौ तपते सूर्ये शुचिरग्निरसौ स्मृतः" असें कूर्मपुराणांत सांगितलें आहे. तसेंच ब्रह्मदेवाचा पुत्र हव्यवाह हा देवांचा अग्नि असून पावकात्मज सहरक्ष हा सुरांचा अग्नि आहे असें म्हटलें आहे. "देवानां हव्यवाहोग्निः प्रथमो ब्रह्मणः सुतः। सहरक्षः सुराणां तु त्रयाणां ते त्रयोग्नयः" ह्यामध्ये सुर आणि देव ह्यांची भिन्नता मानली आहे व त्या दोघांचे दोन निरनिराळे अग्नि सांगितले आहेत ही गोष्ट मनन करण्यासारखी आहे. तिसरा अग्नि कोणाचा हें मात्र सांगितलें नाही. ह्यानंतर अथर्व अग्नीला दक्षिणाग्नि म्हटलें आहे. "योऽथर्वा लौकिकोह्यग्निर्दक्षिणाग्निः स उच्यते." ह्या पुराणांत अग्नींचीं नांवें अधिक सापडतात तीं अशीं: संशत्य, अस्त, धिष्णु, वासव, कृशानु, शतधामा, हव्यसूद, सुधामा, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, बर्हिष, प्रचेता, सेतु, योग, आयु, अद्भुत, संवर्तक वगैरे.

मत्स्यपुराणांत सहरक्ष हा सुराग्नि म्हणून वर्णन केल्याचा वर उल्लेख आहे. पण ब्रह्मपुराणांत तो असुरांचा अग्नि व कव्यवाहन हा पितरांचा अग्नि असें म्हटलें आहे. "देवानां हव्यवाहोग्निः पितॄणां कव्यवाहनः सहरक्षोऽसुराणांतु त्रयाणांतु त्रयोग्नयः" (अ. १२). ह्या पुराणांत एकंदर चत्वारिंशत् अग्नि आहेत असें सांगून त्यांचीं नांवें दिलीं आहेत. विष्णुपुराणांत ४९ अग्नि असल्याचें लिहिलें आहे. पावक, पवमान व शुचि हे मुख्य तीन. ह्यांना प्रत्येकीं १५ पुत्र मिळून ४५ आणि पावक, पवमान व शुचि ह्यांचा पिता जो ब्रह्मपुत्र अग्नि तो. असे एकंदर ४९. ब्रह्मदेवाच्या मुखांतून अग्नि उत्पन्न झाला अशी श्रुति आहे. उ. "मुखादग्निरजायत."

वेदामध्ये अद्भुत संज्ञक अग्नीचा महिमा वर्णन केला आहे असें महाभारतांत म्हटलें आहे वनपर्व (अ. २२२). यजुर्वेदांत वाजजित् हें अग्नीचें नांव आलें आहे. "अग्ने वाजजित् वाजन्त्वा सरिष्यंतं वाजजितं संमार्ज्मि" (यजुर्वेदअनु. २।७). वाजजित् म्हणजे अन्नाला जिंकणारा. गंधर्व ज्या अग्नींत हवन करीत त्याला आयु ही संज्ञा होती. "गंधर्वैरायुराहुतः" ( ब्रम्हाण्ड पु. अ. १३ ) असुरांचा अग्नि जो सहरक्ष तो वडवाग्नीचा पुत्र होता असेंहि ह्याच पुराणांत म्हटलें आहे. तें असुर हे समुद्रकिनाऱ्यावर राहणारे होते हें ध्यानांत आणतां योग्यच आहे. निरनिराळ्या समाजांनी आपआपल्या अग्नींचीं नांवें निरनिराळीं ठेवलीं होतीं असें ह्यावरून उघड होतें. हव्यवाहन हा देवांचा अग्नि तसा कव्यवाहन हा पितरांचा अग्नि.

घरें जाळणारा अग्नि क्षाम नांवाचा असून प्रेताग्नीला क्रव्याद म्हणतात. ह्यावरून निरनिराळीं कार्यें करणाऱ्या अग्नींना स्वतंत्र नांवें देण्यांत आलीं असें दिसतें. गंधर्वहि अग्नुपासक होते हें त्यांच्या अग्नीच्या नांवावरून दिसतें.

# वात्स्यायनकालीन आदर्शभूत गृहिणी

लेखक—प्र. धों. कानिटकर

इसवी सनाच्या सहाव्या शतकाच्या सुमारास वात्स्यायनाने कामशास्त्रावर सूत्रमय ग्रंथ ग्रथित केला. त्यांतील वर्ण्यविषय स्त्रीपुरुषसंबंध ( शास्त्रसंमत व शास्त्रविरुद्ध ) असल्यामुळे वैवाहिक स्त्रीपुरुषसंबंधास विशेष महत्त्व देऊन, त्याचा वात्स्यायनाने सर्व बाजूंनी विचार केला आहे. पाणिग्रहणानंतर पत्नीने पतीला देववत् मानून शक्य तितका प्रपंचाचा भार आपल्या अंगावर घ्यावा व संसार टापटिपीने करावा असें वात्स्यायनाचें मत आहे. आदा पाहून खर्च करणें, अवास्तव खर्च न करणें, क्षुल्लक वस्तूचासुद्धा उपयोग करणें ( उदाहरणार्थ, कोंडा, कोळसे, फाटके कपडे ), संसारांत लागणाऱ्या वस्तु शक्य तितक्या घरीं तयार करणें, जरुरीच्या वस्तूंचा योग्य कालीं संग्रह करून ठेवणें व प्रसंग पाहून क्रयविक्रय करून द्रव्यार्जन करणें हीं टापटिपीच्या संसाराचीं मूलभूत तत्त्वें आहेत. या तत्त्वांप्रमाणे पत्नीने वागणूक करावी असें वात्स्यायनाचें मत आहे. पुरुष जरी पैसा मिळविणारा असला तरी 'व्यये चैनां नियोजयेत्' या मनुवचनाप्रमाणे पैशाचा विनियोग पत्नीच्या हातून व्हावा. पत्नी नुसती गृहकृत्यांत दक्ष असून उपयोगी नाही. पतीची मर्जी नेहमी सुप्रसन्न असावी व आपल्यावर त्याने सदैव प्रेम करावें असें पत्नीचें ध्येय पाहिजे. 'धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि ।' ही प्रतिज्ञा पतीकडून सदैव पाळली जाईल असें आदर्शभूत वर्तन पत्नीने ठेवलें पाहिजे. गृहिणी ही ' गृहिणी सचिवः सखी मिथः प्रियशिष्या ललिते कलाविधौ । ' या कालिदासोक्तीप्रमाणें सर्वथैव असली पाहिजे.

सासुसासरे, दीरनणंदा, पतीचे मित्र नोकरचाकर वगैरे भिन्न दर्जाचीं माणसें हरघडी सहवासांत येतात; त्यांच्याबरोबर ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे पत्नीची वर्तणूक असली पाहिजे. पति घरीं असतांना वागण्याची पद्धत व कामानिमित्त पति बाहेरगांवीं गेला असतांना वागण्याची पद्धत यांतहि फरक आहे. या सर्व गोष्टींचा विचार करून वात्स्यायनाने ' भार्याधिकारिक ' नांवाचें एक अधिकरण रचिलें आहे व त्यांत पत्नीच्या वागणुकीचे नियम तत्कालीन सामाजिक रूढ चालीप्रमाणे ग्रथित केले आहेत. सांप्रतच्या " समान हक्कांच्या " दृष्टीने ते कदाचित स्त्रीच्या वैयक्तिक स्वातंत्र्यास विघातक भासतील; परंतु ते नियम आज कोणी पाळावे असें सांगण्याचा हेतु नसल्यामुळें या आक्षेपाचा विचार करण्याचें कारण रहात नाही.

" वात्स्यायनाचीं कामसूत्रें " म्हणजे श्रृंगारसुखाच्या साधनांची सांगोपांग

चिकित्सा करणार ग्रंथ अशी कांही सोवळ्या विद्वानांची केवळ समजूत "नांवावरून" झालेली असते; परंतु या जगांत सर्वथैव वाईट अशी कोणतीच गोष्ट नसते हें तत्त्व पटवून देण्याकरितां धर्मप्रणीत वैवाहिक संबंधाविषयींची सूत्रें भाषांतरासह या लेखांत देण्याचें योजिलें आहे. सूत्रांचें भाषांतर टीकानुरोधानें शक्य तितकें शब्दशः दिलें आहे. तथापि कांही प्रमाद असल्यास सूज्ञ वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. कामसूत्रें ग्रथित करण्याचा हेतु व फलनिष्पत्ति सूत्रकाराच्या शब्दांतचा पुढें देतों:—

तदेतद् ब्रह्मचर्येण परेण च समाधिना ।
विहितं लोकयात्रायै न रागार्थोऽस्य संविधिः ॥ १ ॥
रक्षन् धर्मार्थकामानां स्थितिं स्वां लोकवर्तिनीम् ।
अस्य शास्त्रस्य तत्त्वज्ञो भवत्येव जितेन्द्रियः ॥२॥

कामसूत्रांचा हेतु व फलश्रुति पाहिली असतां, "काम"रूपी पुरुषार्थ धर्मास बाध न येतां कसा संपादन करितां येईल याची दिशा सूत्रकारानें दाखविल्याचें दिसून येईल. आता प्रस्तुत विषयाकडे वळूं.

## सूत्रांतर्गत विषयानुक्रमणिका.

पत्नीचें पतीशीं वर्तन कसें असावें:—१, १०–१७, १९-२१, २४, २५.
कुटुंब चिंता:– २, २६–२८, ३२–३४.
घर कसें असावें:— ३,४.
बागेची व्यवस्था:—६, ७, ८.
स्वयंपाक घर:— १८.
वर्ज्य गोष्टी:–९, २२, २३, २९.
इतर कुटुंबीय माणसांशीं वागणूक. ५, ३५,
स्वतःची ( पत्नीची ) वागणूक. ३०, ३१.
पति प्रवासस्थ असतांना वागण्याचे नियम ३६–४१.

## भार्याधिकारिकं नाम चतुर्थमधिकरणम् ।

### अध्याय १

विवाहोत्तर पत्नीनें पतिगृहीं कशा रीतीनें आचरण करावें तें या प्रकरणांत सांगितलें आहे म्हणून यास "भार्याधिकारिक" असें म्हटलें आहे. (भार्या अधिकारिणी यस्मिन्नस्तीति भार्याधिकारिकम् । असा खुलासा टीकाकारानें केला आहे.)

आता क्रमानें वात्सायनाचीं सूत्रें देऊन टीकानुरोधानें त्यांचा अर्थ देतों. मूळ ग्रंथांत सूत्रांना अंकानुक्रम दिला नाहीं, तथापि सोईकरितां तो खालीं दिला आहे.)

भार्यैकचारिणी गूढविश्रम्भा देववत्पतिमानुकूल्येन वर्तेत ॥ १ ॥

अर्थ:— 'भर्ता तु देवता स्त्रीणाम् ' । या स्मृतिवाक्याच्या आधारें हें सूत्र

ग्रथित केलें आहे. अत्यंत विश्वासुक व पतिव्रता भार्येने पतीला देववत् मानून त्याच्या मनोदयाप्रमाणे वर्तन करावें.

तन्मतेन कुटुम्बचिन्तामात्मनि संनिवेशयेत् ॥ २ ॥

अर्थः—पतीच्या संमतीने गृहव्यवस्थेची जबाबदारी पत्नीने आपल्या अंगावर घ्यावी.

वेश्म च शुचि सुसंमृष्टस्थानं विरचितविविधकुसुमं
श्लक्ष्णभूमितलं हृद्यदर्शनं त्रिषवणाचरितबलिकर्म
पूजितदेवायतनं कुर्यात् ॥ ३ ॥

अर्थः— ( घर कसें असावें तें या सूत्रांत सांगितलें आहे. ) पवित्र, स्वच्छ सारविलेलें, विविध फुलांनी ठिकठिकाणी शोभायमान केलेलें, ज्यांतील भुया मऊ व तुळतुळीत आहेत असें, पाहिल्याबरोबर मनाला आनंद देणारें, ज्यांत त्रिकाल बलिकर्म करण्यांत येतें असें, ज्यांतील देवगृहांतील देवांची नित्य पूजा होते. अशा प्रकारची घराची व्यवस्था ठेवण्यांत यावी.

न ह्यतोऽन्यद्गृहस्थानां चित्तग्राहकमस्तीति गोनर्दीयः ॥ ४ ॥

अर्थः—वर वर्णन केलेल्या व्यतिरिक्त दुसरें कोणतेंहि घर गृहस्थांच्या चित्ताला आल्हाद देणारें नसतें असें गोनर्दीयाचें मत आहे.

गुरुषु भृत्यवर्गेषु नायकभगिनीषु तत्पतिषुच
यथार्हं प्रतिपत्तिः ॥ ५ ॥

अर्थः—गुरुजन ( सासुसासरा वगैरे ), नणंदा व त्यांचे पति आणि नोकरचाकर यांचा मान ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे ठेवावा.

परिपूतेषु च हरितशाकवप्रानिक्षुस्तम्बाञ्जीरकसर्षपा-
जमोदशतपुष्पातमालगुल्मांश्च कारयेत् ॥ ६ ॥

अर्थः— ( तिसऱ्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणे ) पवित्र अशा त्या घरांत ( मागील, पुढील व भोंवतालच्या मोकळ्या जागेंत ) पुढे सांगितल्याप्रमाणे व्यवस्था करवून ( चाकरांकडून ) घ्यावी; हरित म्हणजे कोथिंबिर, अलें व शाक म्हणजे पालकादि भाजांचे वाफे करवावे; उसाचे वाफे करवावे; जिरें, मोहऱ्या, अजमोदा (ओवा) यांचे वाफे करवावे; तसेंच शतपुष्पा आणि तमाल या वृक्षांचे ताटवे करवावे.

टीकाकार "शाकं पालङ्क्यादि च" असा शाक शब्दाचा खुलासा करतो. दिल्लीस "पालक" नांवाची एक पालेभाजी मिळते. जिच्याची लागवडहि काश्मिराकडे होते. यावरून वात्स्यायन काश्मिराकडे रहाणारा असावा. २८ व्या सूत्रांत 'पालंकी'चा उल्लेख आहे.

कुब्जकामलकमल्लिकाजातीकुरण्टकनवमालिकातगरनंद्यावर्त-
जपागुल्मानन्यांश्च बहुपुष्पान् बालकोशीरकपातालिकांश्च
वृक्षवाटिकायां च स्थण्डिलानि मनोज्ञानि कारयेत् ॥ ७ ॥

अर्थः—तसेंच निरनिराळ्या फुलझाडांचे व लतांचे ताटवे, वाळा, उशीर यांचे वाफे, व वृक्षवाटिकांत मनोहर आकृतींची स्थंडिलें करवावी. यांत उल्लेखिलेले वृक्ष ( फुलझाडें ) पुढीलप्रमाणे आहेत .... ( १ ) कुब्जक, ( २ ) आमलक ( ३ ) मल्लिका ( ४ ) जाती ( जाई ) ( ५ ) कुरणुक ( ६ ) नवमालिका ( ७ ) तगर ( ८ ) नंद्यावर्त ( ९ ) जपा.

मध्ये कूपं वापीं दीर्घिकां वा खानयेत् ॥ ८ ॥

अर्थ—बागेमध्ये जागा असेल त्या मानाने कुवा, वापी किंवा दीर्घिका खणवून घ्यावी. ( वापी म्हणजे पायऱ्या असलेली समभूज चौरस विहीर; दीर्घिका म्हणजे लांबट चौकोनी पायऱ्याची विहीर. )

भिक्षुकीश्रमणाकुलटाकुहकेक्षणिकामूलकारिभीर्नसंसृज्येत ॥९॥

अर्थः—भिकारीण, बौद्धधर्मीय संन्यासिनी, स्वैरिणी, लबाड स्त्री, दैवज्ञा, चेटकी इतक्या प्रकारच्या स्त्रियांशीं संबंध ठेऊं नये. ( ईक्षणिका = Fortune teller )

भोजने च रुचितमिदमस्मै द्वेष्यमिदं पथ्यमिदमपथ्यमिदमिति च विन्द्यात् ॥ १० ॥

अर्थः—भोजनांत अमुक पदार्थ पतिला आवडतो, अमुक अवडत नाही, अमुक पथ्यकर किंवा अपथ्यकर आहे यांचे ज्ञान स्त्रियेला असावें.

स्वरं बहिरुपश्रुत्य भवनमागच्छतः किं कृत्यमिति ब्रुवती सज्जा भवनमध्ये तिष्ठेत् ॥ ११ ॥

अर्थः—पति घराकडे येत असतांना बाहेरच त्याचा शब्द ऐकून काय काम करावयाचें आहे असें म्हणत कामाकरता तयार होऊन अंगणांत वाट पहात उभें रहावें.

परिचारिकामपनुद्य स्वयं पादौ प्रक्षालयेत् ॥ १२ ॥

अर्थः—पति बाहेरून आल्यावर दासी पाय धुण्याकरितां पुढे झाली असली तरी तिला बाजूस सारून स्वतः पतीचें पादप्रक्षालन करावें.

नायकस्य च न विमुक्तभूषणं विजने संदर्शने तिष्ठेत् ॥ १३ ॥

अर्थः—अंगावरील अलंकार काढलेल्या स्थितींत पत्नीने पतीसमोर कधीहि जाऊं नये.

अतिव्ययमसद्व्ययं वा कुर्वाणं रहसि बोधयेत् ॥ १४ ॥

अर्थः—नवरा उधळेपणाने किंवा वाईट कामांत खर्च करीत असेल तर पत्नीने त्याची कानउघाडणी एकांतांत करावी. ( उघड निषेध केल्यास अवमान होऊन पति लज्जित होईल. )

आवाहे विवाहे यज्ञे गमनं सखीभिः सह गोष्ठीं
देवताभिगमनमित्यनुज्ञाता कुर्यात् ॥ १५ ॥

अर्थः— वरगृहीं, कन्यागृहीं, यज्ञाच्या ठिकाणी, मैत्रिणीबरोबर वनभोजनास किंवा देवदर्शनाकरिता स्त्रियांनी पतीच्या आज्ञेने गमन करावें. ( आवाहे वरगृहे । विवाहे कन्यागृहे । असे अर्थ टीकाकार देतो. परंतु दोन्ही शब्दांत फरक आहे असें

दिसत नाही. आवाह शब्द कोशांत सापडत नाही. विवाह=कन्यागृह हा अर्थ कोशांत सांपडत नाही ).

सर्वक्रीडासु च तदानुलोम्येन प्रवृत्तिः ॥ १६ ॥

अर्थ—सर्व प्रकारच्या लोकांत रूढ असलेल्या क्रीडांमध्ये भर्त्याच्या संमतीने पत्नीने भाग घ्यावा.

पश्चात् संवेशनं पूर्वमुत्थानमनवबोधनं च सुप्तस्य ॥ १७ ॥

अर्थ—भर्ता निद्रिस्त झाल्यावर पत्नीने शयन करावें; तो उठण्याच्या पूर्वी उठावें व दिवसा पतीचा निद्राभंग करूं नये.

महानसं च सुगुप्तं स्याद्दर्शनीयं च ॥ १८ ॥

अर्थ—स्वयंपाकघर एका बाजूला व प्रकाशयुक्त असावें.

नायकापचारेषु किंचित्कलुषता नात्यर्थं निर्वदेत् ॥ १९ ॥

अर्थ—पतीच्या हातून अपराध घडल्यास किंचित राग धरावा; पुन्हा असें करूं नये असें त्यास सांगावें. परंतु फारसा वादविवाद त्या बाबतींत करूं नये. (या सूत्रांत 'अपचार' याचा अर्थ 'परस्त्रीविषयक आसक्ति' असा घ्यावयाचा आहे).

साधिक्षेपवचनं त्वेनं मित्रजनमध्यस्थमेकाकिनं वाप्युपालभेत ।
नच मूलकारिका स्यात् ॥ २० ॥

अर्थ—भर्ता मित्रांबरोबर बसला असतांना किंवा एकटा असतांना त्यास उद्देशून निंदागर्भभाषण करावें. (परस्त्रीविषयक नाद सुटावा म्हणून.) परंतु चेटुक, ताईत, दोरे असले वशीकरणाचे प्रकार करूं नयेत.

नह्यतोऽन्यदप्रत्ययकारणमस्तीति गोनर्दीयः ॥ २१ ॥

अर्थ—भर्त्याचा पत्नीच्या ठिकाणीं अविश्वास उत्पन्न होण्यास या शिवाय (चेटुक वगैरे प्रकार) दुसरें कारण नसतें असें गोनर्दीय याचें मत आहे.

दुर्व्याहृतं दुर्निरीक्षितमन्यतो मंत्रणं द्वारदेशावस्थानं निरीक्षणं
वा निष्कुटेषु मंत्रणं विविक्तेषु चिरमवस्थानमिति वर्जयेत् ॥ २२ ॥

अर्थ—पुढे दिलेल्या गोष्टी पत्नीने वर्ज कराव्या; (१) अपशब्द बोलणें (२) रागाने पहाणें (३) दुसरीकडे पाहून नवऱ्याबरोबर बोलणें, (४) दरवाज्यांत उभे राहून बाहेर पाहणें (५) घराच्या मागे आडबाजूला उभे राहून एखाद्या स्त्रीशीं भाषण करणें (६) घरांतील ओसाड जागेंत बराच वेळ राहणें. (नवऱ्याशीं बोलतांना नवऱ्याकडे तोंड करून बोलावें) (वरील १।२।३ या गोष्टी वैराग्यजनक आहेत; (४) यांतील दोन्ही गोष्टी अयत्नसाध्यसूचक आहेत; (५।६) या दोन्ही गोष्टी नवऱ्याच्या मनांत अप्रेम उत्पन्न करणाऱ्या आहेत. सबब या सर्व वर्ज कराव्या. )

स्वेददन्तपङ्कदुर्गन्धांश्च बुध्येतेति विरागकारणम् ॥ २३ ॥

अर्थ—घामटपणा भर्त्याच्या मनांत वैराग्य उत्पन्न करणारा असल्यामुळे घाम

स्वच्छ पुसावा, दांत स्वच्छ घासावे व कोणत्याहि प्रकारें शरीर मलीन न राहील अशी दक्षता बाळगावी.

बहुभूषणं विविधकुसुमानुलेपनं विविधअंगरागसमुज्ज्वलं वास इत्याभिगामिको वेषः। प्रतनुश्लक्ष्णाल्पदुकूलता परिमितमाभरणं सुगन्धिता नात्युल्बणमनुलेपनम्। तथा शुक्लान्यन्यानि पुष्पाणीति वैहारिको वेषः ॥ २४ ॥

[शरीर प्रसाधनाचे दोन प्रकार वरील सूत्रांत वर्णन केले आहेत. वस्त्र, अलंकार, पुष्पें व अंगाराग हीं शरीरप्रसाधनाचीं चार साधनें आहेत. पतिसन्मुखजातांना व यात्रा क्रीडाविहार करतांना वस्त्रालंकार एकच प्रकारचे नसावेत. पतिसन्मुख जातांना स्त्रीचा वेष मनोहारि असावा; इतर प्रसंगीं सभ्यतेस अनुरूप असा विनीत वेष असावा.]

अर्थ——पतिसन्मुख जातांना मौल्यवान वस्त्रें, पुष्कळ अलंकार, चित्रविचित्र सुवासिक फुलें व सुगंधि उटणीं स्त्रीने धारण करावीं. (वस्त्र तांबड्या रंगाचें असावें; कारण; 'रक्तवाससा प्रसाधिता मनोहरा' असें टीकाकार म्हणतो.) यात्रा, क्रीडा वगैरे प्रसंगीं मध्यम प्रतीचे, बेताचे कपडे, बेतशीर अलंकार (कानांत व गळ्यांत), तुरळक उटणीं व पांढरीं फुलें स्त्रीने धारण करावीं.

नायकस्य व्रतमुपवासं च स्वयमपि करणेनानुवर्तेत।
वारितायां च नाहमत्र निर्बन्धनीयेति तद्वचसो निवर्तनम् ॥ २५ ॥

अर्थ——पति जे व्रतनियम करीत असेल त्याचें अनुकरण भार्येने करावें. जर तिला पतीने प्रतिबंध केला तर "या बाबतींत मी आपलें म्हणणें ऐकणार नाही मला उगीच प्रतिबंध करूं नये" असें तिने त्यास सांगावे.

मृद्विदलकाष्ठचर्मलोहभाण्डानां च काले समर्घग्रहणम् ॥ २६ ॥

अर्थः—मातीचीं भांडीं, सुपें, टोपलीं (विदल), पाट, खाट वगैरे लाकडाचे पदार्थ, चामड्याचीं भांडीं (बुधले, लहान शिशा) व लोखंड, तांबे वगैरे धातूचीं भांडीं यांचा संग्रह योग्य कालांत करावा म्हणजे त्या त्या वस्तु सवंग (समर्घ) मिळतात.

तथा लवणस्नेहयोश्च गन्धद्रव्यकटुकभाण्डौषधानां च
दुर्लभानां भवनेषु प्रच्छन्नं निधानम् ॥ २७ ॥

अर्थः—तसेंच मीठ, तेल, तूप, गन्धद्रव्यें (कचोरा) कटुक ? मसाल्याचें सामान (भाण्ड), किरकोळ औषधें (जीं विशिष्ट वेळींच मिळतात) यांचा संग्रह करून घरांत अशा ठिकाणीं ठेवावीं की, तीं नीट रहातील व त्यांचा नाश होणार नाही.

मूलकालुकपालङ्की दमनकाम्रातकैर्वारुकत्रपुसवार्ताककूष्माण्डालाबुसूरणशुकनासास्वयंगुप्तातिलपर्णिकाग्निमंथलशुनपलाण्डुप्रभृतीनां सर्वौषधीनां च बीजग्रहणं काले वापश्च ॥ २८ ॥

अर्थः—पुढें दिलेल्या फळझाडांचे व इतर औषधींचें बी संग्रहित करून योग्य काळीं त्यांची लागवड करावी; मूलक = मुळे, अलुक, पालंकी = एक प्रकारची पालेभाजी, दमनक = (दवणा ?) आम्रातक = अंबाडी, ऐर्वारुक = काकडी, तपुस = त्रवस

वार्ताक = ( egg-plant ? ), कूष्माण्ड = कोहाळा, अलाबु = दुध्या भोपळा, सुरण, शुकनासा, स्वयंगुप्ता, तिलपर्णिका, अग्निमंथ, लसूण, तांबडा कांदा, वगैरे.

स्वस्य च सारस्य परेभ्यो नाख्यानं भर्तृमंत्रितस्य च ॥ २९ ॥

अर्थः--आपल्या पतीजवळ असलेल्या द्रव्याची दुसऱ्यास माहिती देऊं नये.(धनायुषी गुप्ततमे कार्ये । असें वचन आहे ). भर्त्याकडून कळलेली गोष्ट दुसऱ्यास सांगू नये.

समानाश्च स्त्रियः कौशलेनोज्ज्वलतया पाकेन मानेन
तथोपचारैरतिशयीत ॥ ३० ॥

अर्थः--कौशल्य, नीटनेटकेपणा, पाकप्रावीण्य, स्वाभिमान, पतिसेवा इत्यादि बाबतींत बरोबरीच्या स्त्रियांपेक्षा आपलें आधिक्य दाखवावें.

सांवत्सरिकमायं संख्याय तदनुरूपं व्ययं कुर्यात् ॥३१॥

अर्थः--वार्षिक उत्पन्न किती येईल त्याची गणती करून त्या मानाने खर्च करीत जावा.

भोजनावशिष्टाद्गोरसात्घृतकरणम् तथा तैलगुडयोः । कर्पासस्य च सूतकर्तनम् सूत्रस्ह वानम् । शिक्यरज्जुपाशवल्कलसंग्रहणम् । कुट्टनकंडनावेक्षणम् । आचाममण्ड-तुषकणकुटयंगाराणामुपयोजनम् । भृत्यवेतनभरणज्ञानम् । कृषिपशुपालनचिन्तावाहन-विधानयोगाः । मेषकुक्कुटलावकशुकसारिकापरभृतमयूरवानरमृगाणामवेक्षणम् दैवसिका-यव्ययपिण्डीकरणमिति च विद्यात् ॥३२॥

[ गृहीणीला प्रपंचांतील कोणत्या गोष्टींचें ज्ञान अवश्यक आहे तें या सूत्रांत विस्ताराने सांगितलें आहे.

अर्थः--खालील गोष्टींचें ज्ञान गृहिणीस असावें. ( १ ) सर्व मनुष्यांची भोजनें होऊन जो अवशिष्ट गोरस राहील त्यापासून लोणी काढून तूप करणें; ( २ ) मोहरीचें तेल काढणें; ( ३ ) ऊस गाळून गूळ तयार करणें; (४) कापसाचें सूत कातणें व त्यापासून वस्त्रें तयार करणें; ( ५ ) शिंकीं, दोऱ्या, दावी, वल्कलें यांचा संग्रह करणें; ( ६ ) धान्याला घाव घालणें व तांदुळ कांडणें; ( ७ ) कांजी, मंड, कोंडा, कण्या, कूट व कोळसे यांचा उपयोग करणें; ( ८ ) चाकरांच्या वेतनासंबंधीं माहिती; ( ९ ) शेतकी, पशुपालन व वाहनें ( मेणा, पालखी वगैरे ) यांचें ज्ञान; ( १० ) मेंढा, कोंबडा, लावा, पोपट, सारिका, कोकिळ, मोर, वानर हरिण इत्यादिकांची परीक्षा; ( ११ ) दररोजचा जमाखर्च लिहिण्याची माहिती.

तज्जघन्यानांच जीर्णवाससां संचयस्तैर्विविधरागैः शुद्धैर्वा कृतकर्मणां परिचार-काणामनुग्रहो मानार्थेषुच दानमन्यत्र वोपयोगः ॥ ३३ ॥

अर्थ---भर्त्याचे जुने कपडे साठवून ठेवावेत; ते स्वच्छ धुवून किंवा त्यांस रंग देऊन नोकरचाकरांनी एखादे चांगलें काम केल्यास त्यांस ते बक्षीस द्यावेत; किंवा भिकारी लोकांना दान द्यावेत किंवा त्यांचा उपयोग वाती करण्याकडे करावा ( अन्यत्र वेति दीपवर्त्यादिषु ).

सुराकुम्भीनामासवकुम्भीनां च स्थापनं तदुपयोगः
क्रयविक्रयावायव्ययावेक्षणम् ॥ ३४ ॥

अर्थ---सुरा व आसवें यांचे कुंभ व्यवस्थेने ठेवावे; प्रसंग विशेषीं त्यांचा घरांत उपयोग करावा; स्वस्ताई व महागाई असेल त्या मानाने त्यांचा क्रयविक्रय करावा. या व्यवहारांत नफातोटा काय होतो तेंहि पहात जावें.

नायकमित्राणांच स्रगनुलेपनताम्बूलदानैः पूजनं न्यायतः। श्वश्रूश्वशुरपरिचर्या तत्पारतंत्र्यमनुत्तरवादिता परिमिताप्रचण्डालापकरणमनुच्चैर्हासः। तत्प्रियाप्रियेषु स्वप्रियाप्रियेष्विव वृत्तिः। भोगेष्वनुत्सेकः। परिजने दाक्षिण्यम्। नायकस्या निवेद्य न कस्मैचिद्दानम् स्वकर्मसु भृत्यजननियमनमुत्सवेषु चास्य पूजनमित्येकचारिणीवृत्तम् ॥ ३५ ॥

अर्थ---उचित प्रसंगीं गंध, फुलांच्या माळा, तांबूल देऊन भर्त्याच्या मित्रांचा त्यांचे गुण, जात, वय, याकडे लक्ष देऊन आदर सत्कार करावा. सासूसासऱ्याची सेवा करावी; त्यांच्या तंत्राने वागावें; ते बोलल्यास उलट उत्तर देऊं नये; बोलणें थोडकें व हळू असावें; मोठ्याने हसूं नये. भर्त्याला ज्या गोष्टी आवडतात व ज्या आवडत नाहीत त्याच गोष्टी बद्दल आपली आवडनावड असावी. सुखोपभोग मिळत असले तरी अंगीं नम्रता असावी. नोकरचाकरांविषयी आदरभाव ठेवावा. नवऱ्याला न सांगतां कोणास कांहीहि देऊं नये. ज्या नोकराचें जें काम आहे तेंच त्याच्याकडून करवून घ्यावें; सणवाराला नोकरांना खायलाप्यायला देऊन त्यांचा सन्मान करावा. याप्रमाणे एकचारिणीची वागण्याची पद्धत असावी.

भर्ता सन्निध असतांना पत्नीने कसें वागावें ते नियम वर सांगितले आहेत. भर्ता प्रवासास गेला असतांना पत्नीने कसें वागावें तें खाली सांगतो.

प्रवासे मंगलमात्राभरणा देवतोपवासपरा वार्तायां
स्थिता गृहानवेक्षेत ॥ ३६

अर्थः--- भर्ता घर सोडून बाहेरगांवीं गेल्यावर पत्नीने मंगलसूत्राव्यतिरिक्त अलंकार धारण करूं नये. देवाची भक्ती करण्यांत वेळ घालवावा; भर्त्याची वार्ता काय येते तिकडे लक्ष ठेवावें व प्रपंचाची काळजी घ्यावी.

शय्या च गुरुजनमूले। तदभिमता कार्यनिष्पत्तिः।
नायकाभिमतानां चार्थानामर्जने प्रतिसंस्कारे च यत्नः ॥३७॥

अर्थः- सासूच्या शेजारीं निजत जावें. सासूसासरा सांगेल त्या प्रमाणे काम करावें. भर्त्याला ज्या गोष्टी अभिमत असतील त्या मिळविण्याचा प्रयत्न करावा.

नित्यनैमित्तिकेषु कर्मसूचितो व्ययः। तदारब्धानां च
कर्मणां समापने मतिः ॥

अर्थः- नित्यनैमित्तिक कर्मांत कर्माच्या महत्वाप्रमाणे खर्च करावा. भर्त्याने ज्या कामांचा आरंभ केला असेल तीं कामें पुरीं करून घेण्याकडे लक्ष ठेवावें.

ज्ञातिकुलस्यानभिगमनमन्यत्र व्यसनोत्सवाभ्याम् । तत्रापि
नायकपरिजनाधिष्ठिताया नातिकालमवस्थानमपरिवर्तित-
प्रवासवेषता च ॥ ३९ ॥

**अर्थः**– अडचणीच्या वेळीं किंवा एखाद्या समारंभाच्या वेळीं मात्र पत्नीने माहेरीं जावें; इतर वेळीं जाऊं नये. माहेरीसुद्धा प्रवासवेषच असावा व पतीच्या परिजनाबरोबर जावे व फार काळ राहूं नये.

गुरुजनानुज्ञानानां करणं उपवासानाम् । परिचारकैः
शुचिभिराज्ञाधिष्ठितैरनुमतेन क्रयविक्रयकर्मणा
सारस्यापूरणं तनूकरणं च शक्त्या व्ययानाम् ॥४०॥

**अर्थः**– सासुसासरे सांगतील तेच उपासतापास करावे. त्यांच्याच अनुमताने विश्वासुक व आज्ञाधारक सेवकाकडून मालाची खरेदी विक्री करवून भांडवल वाढवावें. प्रसंगविशेषीं जास्त खर्च करणें जरूर असल्यास भांडवलापैकीहि खर्च करावा.

आगते च प्रकृतिस्थाया एव प्रथमतो दर्शनं
दैवतपूजमुपहाराणां चाहरणमिति प्रवासचर्या ॥ ४१॥

**अर्थः**– पति प्रवासाहून परत आल्यावर प्रथमतः प्रोषित भर्तृकेच्या वेषांतच पतीचें दर्शन घ्यावें व नंतर देवतांची पूजा करून तन्निमित्त दान वगैरे द्यावें (नवस केले असतील ते फेडावेत). याप्रमाणे भर्ता प्रवासास गेला असतांना पत्नीने वर्तणुक ठेवावी.

सद्वृत्तमनुवर्तेत नायकस्य हितैषिणी ।
कुलयोषा × × × × × × वाप्येकचारिणी ॥
धर्ममर्थं तथा कामं लभन्ते स्थानमेव च ।
निःसपत्नं च भर्तारं नार्यः सद्वृतमाश्रितः ॥४२॥

**अर्थः**– आपल्या भर्त्याचें कल्याण व्हावें या इच्छेने एकचारिणी कुलवधूने सद्वर्तन ठेवल्याने स्त्रियांना धर्म, अर्थ, काम मोक्ष या चारी पुरुषार्थांचा लाभ होऊन निःसपत्न (एकच बायको करून तिच्यावर पूर्ण करणारा) पति प्राप्त होतो.

टीपः— पहिल्या सूत्रांत 'एकचारिणी' असा शब्द आहे. कोशकार "एकचारिणी = पतिव्रता" असा अर्थ देतात. परंतु 'एकचारिणी = जिला सवत नाही म्हणजे जी नवऱ्याची एकटीच विवाहित स्त्री आहे' असा अर्थ सूत्रकाराला अभिप्रेत आहे. कारण दुसऱ्याव प्रकरणांत 'सैव (एकचारिणी) सपत्नीभिर्युज्यते तदा कथं वर्तितव्यम्' असें प्रारंभीं टीककार म्हणतो. शिवाय पहिल्या सूत्राच्या प्रारंभीं टीकाकार म्हणतोः- भार्याच द्विविधा एकचारिणी सपत्निका च । तत्र प्राधान्येन एकचारिणी वृत्तमुच्यते' ॥

# अभिप्राय

**राज्यनीतिशास्त्राचीं मूलतत्त्वें** (लेखक, भा. त्रिं. काळे, बी. ए. एफ्. आर. ई. एस्., श्रीसयाजी साहित्यमाला, किंमत २-१-०)

हें पुस्तक प्रसिद्ध इंग्रजी शासनशास्त्रवेत्ते यांच्या ग्रंथांच्या आधाराने लिहिलेलें आहे. त्यामुळे त्यांत हिंदुस्थानांतील राजनीतिशास्त्रविषयक प्रमेयांचा विचार केला नाही हें ग्रंथकर्त्याने प्रस्तावनेंतच कबूल केलें आहे. हें एक न्यूनत्व सोडून दिल्यास हें पुस्तक तत्त्वविवेचनाच्या दृष्टीने फारच उपयुक्त झालेलें आहे. आधुनिक जगांतील बहुतेक महत्त्वाचीं उदाहरणें यांत उद्धृत केलीं आहेत व मूलतत्त्वांचा परिपोष केला आहे. या शास्त्रावर आजपर्यंत फार थोडे ग्रंथ निर्माण झाले आहेत या दृष्टीने या पुस्तकाचें अधिकच महत्त्व आहे.

राज्यघटनेच्या मुळाविषयींच्या भ्रामक कल्पनांचें ग्रंथकाराने चांगल्या रीतीने खंडन केलें आहे; विशेषतः "बळी तो कान पिळी" हें तत्त्व अगदीं निराधार ठरविलें आहे. हें तत्त्व खरें असल्यास नय-नीति राहिली कोठे? राज्यघटनेचें (state) मूळ सापडणें शक्य नाही हा सिद्धांत ग्रंथकर्त्याने प्रतिपादिला आहे, यासंबंधीं प्रथम आश्चर्य वाटतें, परंतु विचारांतीं तें खरें वाटतें कारण आजपर्यंत प्रतिपादिलेल्या अनेक उपपत्तींपैकी कोणतीच टिकलेली नाही 'व्यक्तिस्वातंत्र्य' या प्रकरणांत नागरिकांचें व्यक्तिस्वातंत्र्य व सर्व सत्ताधीश राजसत्ता हीं परस्परविरोधी नसून परस्परावलंबी आहेत हें उत्तम रीतीने विशद केलें आहे. राजसत्ता नसेल तर व्यक्तिस्वातंत्र्य नुसतें शाब्दिक होय हें हर्बट स्पेन्सरसारखे कट्टर स्वातंत्र्यवादी लोक विसरतात व आमच्या समाजांतही असे लोक हल्ली पुष्कळ आहेत;या सर्वांना ग्रंथकर्त्याने नवीन दिशा दाखविली आहे.

आंतरराष्ट्रीय नियमांसंबंधाने त्यांना कायदे असें नांव देतां येणार नाही असें ग्रंथकर्त्याने अनेक आधार देऊन ठरविलें आहे तें योग्यच आहे. तथापि "मनुष्याने मानवी समीति व विश्वबंधुत्व हीं ध्येयें डोळ्यापुढे ठेवून त्या दिशेने प्रयत्न करणें हिताचें नाही असें मात्र कोणी समजूं नये" असें म्हणून त्याने नीतिदृष्ट्या या नियमांचें महत्त्व कबूल केलें आहे. ग्रंथकर्त्यास कायदे घडविणारें मंडळ, कार्यकारी अधिकारी व न्याय देणारे अधिकारी यांच्यांत पूर्ण अधिकारविभागणी पाहिजे हें तत्त्व कबूल आहे; परंतु सार्वजनिक हिताच्या विरुद्ध परिणाम घडूं नयेत इतक्यापुरत्या स्पष्ट मर्यादा घालाव्या अशी त्याची सूचना आहे. कायदेमंडळांचा विचार करितांना एकसभात्मक पद्धति श्रेयस्कर नाही असें ठरविलें आहे व त्याबद्दल कारणेंही सयुक्तिक दिलेलीं आहेत. कायदेमंडळाला न विचारितां प्रत्यक्ष कायदे करण्याविषयींची पद्धति (Initiative and Referendum) पुस्तकांत ग्राह्य मानिली आहे; परंतु दिलेलीं कारणें आम्हांस समर्पक वाटत नाहींत.

मतदारसंघाचा विचार करितांना इंग्लंडच्या स्वभावाचें उत्कृष्ट व यथास्थित वर्णन केलें आहे तें वाचकांस बोधप्रद आहे. "दिखाऊ औपचारिक व भावनात्मक-सिद्धांताचा उगाच काथ्याकूट करीत न बसतां त्या सिद्धांतांना सारासार बुद्धीने व उपयुक्ततेच्या प्रमाणांन कृतींत उतरविण्यांत इंग्लंडचा हातखंडा आहे." अल्पसंख्या-कांच्या प्रतिनिधींचा प्रश्न म्हणजे त्यांना योग्य प्रमाणांत आपले प्रतिनिधि कसे निव-डतां येतील हा प्रश्न ग्रंथकर्त्याने फारच त्रोटक रीतीने सोडविला आहे असें म्हणावें लागतें. कार्यकारी सत्तेचें विवेचन आमच्या देशाच्या दृष्टीने बोधप्रद झालेलें आहे. युनायटेड स्टेट्समधील लुटारू पद्धति म्हणजे "अध्यक्ष बदलतांच त्याने नेमिलेल्या सर्व अधिकाऱ्यांस कमी करून त्यांच्या रिकाम्या झालेल्या जागीं नव्या अध्यक्षाच्या राजकीय बगलबच्च्यांस नेमण्याची पद्धति" हिंदुस्थानांत न येईल अशी खबरदारी घेतली पाहिजे.

ग्रंथकर्त्याचा 'संधिसंश्लिष्ट' राज्यपद्धतिवर (Federation) बराच विश्वास दिसतो. अवयवभूत राज्यांचें कार्यक्षेत्र व अधिकारक्षेत्र दिवसेंदिवस संकुचित होऊन मध्यवर्ती राज्याचें कार्यक्षेत्र व अधिकारक्षेत्र विस्तृत करण्याकडे उत्क्रांतीचा एकंदर कल दिसतो हें त्याने दिलेलें प्रमेय खरें आहे. त्यामुळे भावी राज्यघटनेंत भारतीय प्रांतांना पुष्कळ स्वातंत्र्य देणें इष्ट होणार नाही; तर मध्यवर्ति सरकार प्रबळ ठेवलें पाहिजे. 'वसाहतींतील शासनपद्धति' या प्रकरणांत इंग्लंडचें आपमतलबी धोरण उत्तम विशद केलें आहे. पुढील पार्लमेंटांत झालेला ठराव ग्रंथकर्त्याने उद्धृत केला आहे "वसाहतींत उद्योगधंद्यांची वाढ होऊं दिल्याने वसाहतींचें ग्रेटब्रिटनवरील अवलंबन कमी होत जातें." हेंच धोरण पुढे हिंदुस्थानावर लादण्यांत आलें. युनायटेड स्टेट्सच्या वसाहतीसंबंधी धोरणाची फार मार्मिक टीका त्याच प्रकरणांत केलेली आहे. तथापि हिंदुस्थानाविषयी निश्चित असें कांहीच विधान या प्रकरणांत किंवा इतर प्रकरणांतहि सापडत नाही.

पुस्तकाच्या आकाराच्या मानाने 'स्थानिक कारभार' या विषयाचें विवेचन चांगलेंच विस्तृत झालें आहे. तथापि या प्रकरणांतहि हिंदुस्थानविषयी एक अवाक्षर नाही हें आश्चर्य नव्हे काय? राजकीय पक्षाचें विवेचन करितांना इंग्लंड व युनायटेड स्टेट्स येथील पक्षांचा इतिहास व त्यांची हल्लीची रचना उत्तम रीतीने विशद केली आहे. तत्त्वांचें नैसर्गिक किंवा संघटनेचें कृत्रिम बंधन नसलें तर राजकीय पक्ष पद्धति म्हणजे लहान लहान नाठाळ संघांचा सावळागोंधळ बनते हें ग्रंथकर्त्याचें प्रमेय अगदी खरें आहे. हिंदुस्थानांत हल्लीं हीच स्थिति आहे.

'सरकारचें कार्यक्षेत्र' या महत्त्वाच्या प्रश्नास चोपन्न पृष्ठें दिलेलीं आहेत हें योग्यच आहे. या प्रश्नास समाजसत्तावादाचा जिकडे तिकडे फैलाव झाल्यापासून फारच महत्त्व आलेलें आहे व राजसभेने सर्वच गोष्टी हातांत घेतल्यास व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होईल अशी पुराणमतवाद्यांस भीति वाटूं लागली आहे. मार्क्सचें Surplus Value

चें तत्त्व चुकीचें आहे हें ग्रंथकर्त्यानें कबूल केलें आहे. यावरून तो कट्टर समाजसत्तावादी नाही हें स्पष्ट आहे. तसेंच समवेतनपद्धति अगदी अव्यवहार्य आहे हेंहि त्यानें कबूल केलें आहे. सरकारचें कार्यक्षेत्र हल्लींच्या राज्यांत अतिविस्तृत झालें आहे हें पुस्तकांत दिलेल्या वर्णनावरून वाचकांस दिसून येईल. परंतु इतकीं कार्यें सरकारनें करणें इष्ट आहे किंवा नाही या प्रश्नावर निश्चित मत दिलेलें कोठेंहि या प्रकरणांत आढळत नाही. तसें देणें अवश्यक होतें.

आयर्लंड, इटली वगैरे शब्द लिहिण्याची तऱ्हा पाहून आपण एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास आहों की काय, अशी शंका येते. पुस्तकांत पुष्कळ ठिकाणीं अवतरणानंतर ग्रंथकाराचें नांवच दिलेलें नाही व कांहीं ठिकाणीं नांव दिलेलें असतां अवतरण ज्यांतून घेतलें त्या पुस्तकाचें नांव नाहीं, हें ठीक नाही.

छापण्यांत अशुद्धें इतकीं आहेत कीं, प्रुफें कोणी पाहिलीं होतीं किंवा नाही याविषयी संदेह उत्पन्न होतो; 'दृष्य,' 'अनुशंगिक,' हे शब्द नमुन्यादाखल देतों. कांहीं शब्दांसंबंधानें सूचना करणें अवश्य वाटतें:—Hierarchical याला 'त्रिषमपदस्थ' शब्द वापरला आहे. परंतु 'उच्च नीच' हा शब्द अधिक अर्थपूर्ण व कमी बोजड आहे. Federal चें भाषांतर 'संधिसंश्लिष्ट' या शब्दानें केलें आहे परंतु तो शब्द बरोबर दिसत नाही. अस्तु. हे दोष बाजूला केलें असतां हें पुस्तक अवश्य संग्राह्य आहे या विषयीं मतभेद होणार नाही.

प्रो. वा. ना. गोडबोले.

---

**ज्ञानोपासना व भारतीयांचें कर्तव्यः**—( लेखकः—श्रीनिवास नारायण बनहट्टी, प्रकाशक नवभारतग्रंथमाला, कांग्रेसनगर, नागपूर. )

नवभारतग्रंथमालेचें हें पहिलें पुष्प मुखपृष्ठावर श्री. न. चिं. केळकर यांचें शिफारसपत्र घेऊनच बाहेर पडलें आहे; तेव्हां याला अन्य शिफारसींची विशेष गरज नसणार. तथापि यांतले अनेक गुण अगदी न दाखविणें म्हणजे परीक्षकाविषयीं कांहीं गैरसमज उत्पन्न करून ठेवल्यासारखें होणार आहे म्हणून आम्ही प्रथम याच्या त्या अंगाकडे वळतों.

मनुष्यप्राणी उपजत ज्ञान घेऊन आलेला नाही. त्याला विविधज्ञान मिळविण्यासाठीं अखंड शतकानुशतकें धडपड करावी लागते; तेव्हां कोठें विद्यमान ज्ञानाची जोड त्याला लाभते. ज्ञान म्हणजे सर्वच प्रकारचें आणि अनेक अंगोपांगांचें असणार. विद्या आणि कला या शास्त्र आणि व्यवहार या दृष्टीनें पाडलेल्या मुख्य भागांतून तें

स्थूलपणें विभागलें असून, त्याची उपासना करणें हें सुसंस्कृतीचें लक्षण मानलें जातें. जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांची आणि समाजांची संस्कृति या ज्ञानोपासनेच्या कसावर घांसून अजमावली जात असते. तेव्हा आजतागायत ज्ञानमार्गावर मनुष्याने किती दौड मारली आहे हें पाहणें फार अवश्यक झालें आहे. या हनुमानपहाणीसाठीं प्रस्तुत पुस्तकासारखीं संकलित माहिती देणारीं लहान पुस्तकें निघणें जरूर असून, तीं आता हळूहळू निघत आहेत हें खरोखरीच मध्याच्या पिढीचें भाग्य समजलें पाहिजे.

प्रो. बनहट्टी यांनी भौतिक शास्त्रांवरच सर्व भर दिला असून तीं शास्त्रें पाश्चिमात्य देशांत (कारण पौर्वात्य राष्ट्रांतून आधुनिक भौतिक शास्त्रांची उत्पत्ति व वाढ विशेष नाहीं) कशी प्रगति होत गेली याचा जो इतिहास शास्त्रवार दिलेला आहे तो उद्बोधक आणि मनोरंजकहि वाटेल. अशीच पण याहून विस्तृत मांडणी ज्ञानकोशकारांनी एका स्वतंत्र खंडांत (वि. ५ विज्ञानेतिहास) केलेली असून तिचा बराचसा उपयोग या पुस्तकाच्या लेखकाला झाला असला पाहिजे. त्या उल्लेखित ज्ञानकोशखंडांत प्राच्य राष्ट्रांनींहि ज्ञानोपार्जनांत किती भरीव भर टाकिली आहे याचा जो ठिकठिकाणीं आढावा घेतला आहे त्याचें अनुकरण मात्र करण्याचें कां टाळलें हें समजत नाही. 'भारतीयांची ज्ञानोपासना' या एका शेवटच्या प्रकरणांत माल मागचा थोडा आढावा देऊन भारतीयांत ज्ञानोपासना मध्ययुगापासून कां झाली नाही याचें चांगलें विवेचन केलें आहे. संस्कृत भाषा आणि पुरोहित वर्ग या जोडीने आपल्याकडे ज्ञानप्रसाराचा मार्ग आडवून धरिला होता व संतमंडळाने जेव्हा त्यांची कोंडी फोडून बहुजनसमाजास ज्ञानमार्ग सुलभ केला तेव्हा कोठे आता ज्ञानोपासना योग्य रीतीने होण्यास आरंभ झाला आहे अशी प्रोफेसर मजकुरांनी या प्रकरणांत जी विचारसरणी अवलंबिली आहे ती वादग्रस्त पण मननीय वाटेल. मध्यंतरीं हजारदीडहजार वर्षे भारताला अज्ञानतिमिरांत कां खितपत पडावें लागलें हा प्रश्न फार व्यापक आणि एकमत्याने सुटण्यास अत्यंत कठीण असा आहे. तेव्हा येथे त्यावर चर्चा न केलेली बरी.

ज्ञानोपासनेस प्रवृत्त करणाऱ्या आणि सर्व ज्ञानाचा पाया, वाङ्मय आणि ललितकला यांचा योग्य परामर्ष या पुस्तकांत घेतलेला नाहीं; तो स्वतंत्र एका मालेच्या पुस्तकांत घ्यावयाचा विचार असल्यास न कळे. कारण आज सामान्यतः ज्ञान असें ज्याला मानण्यांत येतें तें वाङ्मयीन ज्ञानच होय. शास्त्रीय ज्ञानाला विज्ञान असें विशेष नांव आहे. शिवाय भारतीयांची जगांतील सर्व करामत याच वाङ्मयीन ज्ञानक्षेत्रांतली आहे. असो. खरें उपयुक्त ज्ञान म्हणजे विज्ञान (शास्त्रें) असा आजचा रोख आहे तेव्हा या विषयावर हात आखडला पाहिजे.

भारतीय संस्कृतीचा प्राचीन इतिहास देतांना (प्र. ३ रें) भारतीय आर्यांचा हिंदुस्थानांत प्रवेश इ. स. पू. ३००० ते २००० पर्यंतच्या काळांत झाला असें सांगितलें आहे. हा काल आजच्या ऐतिहासिक पुराव्यावरून यापेक्षा मागे न्यावा लागेल. तसेंच वैदिककालीं लोखंड प्रचारांत नव्हतें असा एक अप्रत्यक्ष उल्लेख याच

प्रकरणांत सापडतो (पृ. २०-२१), पण खुद्द ऋग्वेदांतच अयस् शब्द आला असून त्याचे श्याम आणि लोहित असे दोन प्रकार होते व पोलादहि शस्त्रांच्या कामीं उपयोजीत. (ऋ.१.१६३,९;६.३,५). त्याचप्रमाणे अर्वाचीन हिंदुस्थानांतील लिप्यांची जननी जी ब्राह्मी लिपि ती फिनिशियन लिपीपासूनच निघाली असा पाश्चात्य पंडितांच्या म्हणण्याचा जो अनुवाद केला आहे तोहि पुष्कळांस अग्राह्य वाटेल. असो इतिहास देतांना कोणत्या तरी एका प्रख्यात् पंडिताचें मत प्रमाण मानून त्याचा सारखा अनुवाद करावा लागतो; तेव्हा तदितर मतानुयाय्यांचा या इतिहासलेखकाला विरोध होणार हें साहजिकच आहे.

या पुस्तकांतल्याप्रमाणे शास्त्रांचा इतिहास लिहितांना आपल्या मनचें कांही न सांगतां झालेल्या गोष्टी जशाच्यातशा आपल्या मगदुराप्रमाणे व विशिष्ट उद्देश मनांत धरून मांडावयाच्या असतात; व आधाराला म्हणून ज्याचें भाषांतर-रूपांतर केलें असतां आपल्या पुस्तकाला इष्ट वळण मिळेल या हेतूनें एखादें प्रमाणभूत असें दुसरें पुस्तक हाताशीं घ्यावें लागतें. तेव्हा क्लेमेंट वुडचें दि आऊटलाईन ऑफ मॅन्स नॉलेज (Outline of man's knowledge) या ग्रंथावर प्रस्तुत ज्ञानोपासना जी आधारली आहे ती वाजवीच आहे. शिवाय प्रत्येक प्रकरणावर जास्त माहिती देणारे संदर्भ ग्रंथ पुस्तकाच्या आरंभीं दिलेलेच आहेत; ते जिज्ञासूला उपयुक्त होतील.

शुद्धलेखन आणि परिभाषा यासंबंधीं लेखकाने 'निवेदनां'त खुलासा केलेलाच आहे तेव्हा तो टीकाविषय होऊं शकत नाही. ज्या मालेचें हें पहिलें पुस्तक आहे त्या 'नवभारतग्रंथमाले'चा हवाला तर जागजागीं दिला असल्याने त्या मालेसंबंधी येथे माहिती देण्याचेंहि कारण नाही. स्वभाषेच्या द्वारें ज्ञानप्रसाराचें आणि ज्ञानसंवर्धनाचें कार्य चालकांनी योजल्याप्रमाणे अखंड चालावें व आपली महाराष्ट्रीय जनता लवकरच खालपासून सुसंस्कृत व्हावी हीच कोणाचीहि इच्छा असणार. तेव्हा मालेला मनःपूर्वक सुयश चिंतितों.

चिंतामण गणेश कर्वे

---

**सुलभ वास्तुशास्त्र**-(ले. रा. र. श्री. देशपांडे, बी. ई., पुणें.)

कोणत्याहि गोष्टींत पैसा खर्च करावयाचा असेल तेव्हा त्या पैशाचा मोबदला मिळेल अशी सर्वांची इच्छा व खटपट असते. घर बांधण्याच्या कामांतहि अर्थात् तोच नियम लागू होतो. त्यांतून तें घर जर स्वतःच्या उपयोगाकरितां असेल तर तें सोइस्कर, सुखावह, सुबक व मजबूत होऊन प्रमाणशीर खर्चांत व्हावें अशी प्रत्येकाची इच्छा असते. परंतु हें सर्व कसें घडवून आणावें तें स्वतः घर बांधणारास कांहीच माहीत नसतें आणि म्हणून या गोष्टी पैसे देऊन काम करणाऱ्या धंदेवाल्यावर

सोपवाव्या लागतात व त्यामुळे आपला हेतु साध्य होत नाही. 'गृहिणी गृहमुच्यते' असें म्हणतात. गृहाचा आत्माच अशी जी गृहिणी ती करिताना ज्याप्रमाणे तिची निवड यजमान करतो व तिच्या घराण्याचा दर्जा, वागणूक सांपत्तिक स्थिति, वधूची प्रकृति, रूप, वय, शिक्षण, वगैरे आपल्या व आपल्या घरांतील माणसांच्या पसंतीने ठरवितो व ही पूर्व तयारी झाल्यानंतर दक्षणा घेऊन काम करणाऱ्या भटजीकडून यथाशास्त्र तांत्रिक विधि उरकून घ्यावयाचा असतो त्याचप्रमाणें दगडविटांचें घर बांधतांना स्वतः यजमानाने जागेची निवड घराचा सुबकपणा, सोई, आकार, प्रकार व खर्च वगैरे ठरवावयाचा व त्याप्रमाणे काम त्या धंद्यांतील लोकांकडून घडवून आणावयाचें असतें. दोन्ही गोष्टी आयुष्यांत एकदाच घडणाऱ्या असतात. गृहिणीशीं सहवास एका पुरुषाचा आजन्म असतो तर घराशीं सहवास दोन तीन पिढ्या घरांतील सर्व माणसांचा असतो. इतक्या महत्त्वाचें असें घर बांधतांना त्यास लागणारें शास्त्र माहीत झाल्याशिवाय मनपसंत काम करून घेतां येत नाही व कायमची जिकीर पत्करावी लागते. अशा प्रकारचे दोष नवीन बांधलेल्या बऱ्याच घरांत पहावयास मिळतात. हे दोष कोठे व कां राहतात याचा अनुभव पुणें येथील सारस्वत ब्राह्मण हाऊसिंग सोसायटींतील घरांचीं कामें चालू असतां रा. देशपांडे यांस आला व त्यावेळीं केलेल्या निरीक्षणाचा फायदा सर्वसाधारण घरवाल्यांस मिळावा व कायमची अडचण दूर व्हावी म्हणून त्यांनी प्रस्तुत पुस्तक लिहीलें; हे पुढे होणाऱ्या घरमालकांवर उपकारच केले आहेत.

रा. भागवत यांनी प्रस्तावनेंत म्हटलें आहे की, हें पुस्तक कंत्राटदार वगैरे लोकांस विशेष उपयोगी पडणारें आहे. आमचे एक स्नेही बी. ई. असून कंत्राटदार आहेत. त्यांस या पुस्तकाविषयी विचारितां ते म्हणाले, "हें पुस्तक म्हणजे कंत्राटदाराचें मरण आहे" हा एक वाक्याचा अभिप्राय या पुस्तकाच्या उपयुक्ततेविषयी साक्ष देण्यास पुरेसा आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणें या पुस्तकावरून मालकास धंदेवाल्या कंत्राटदाराशिवाय चांगलीं घरें बांधणें सुलभ झालें आहे व कंत्राटदार म्हणेल तें ब्रह्मवाक्य धरून चालण्यास मालक तयार होणार नाही व फसवाफसवी अशक्य होईल.

थोडक्यांत या पुस्तकाचें वर्णन करावयाचें म्हणजे हा तीन रुपयांत कायमचा मिळणारा छोटा एन्जिनिअरच आहे. आरोग्यकारक व सोईची अशी जागा पसंत करण्यापासून खास तुमच्या कुटुंबास योग्य असें योजनाचित्र तयार करून त्याची मांडणी करणें, कामाचा प्रकार ठरविणें, उभारणी चालू असतां कामावर देखरेख करणे, माल तपासून घेणें व इतर मालाची तजवीज करणें, रंग, सफेती, विजेचें फिटिंग करणें वगैरे सर्व कामें काटकसरीने व कसोशीने करून घेण्यास हा छोटा एन्जिनिअर तुमच्या बरोबर सदासर्वदा असतो. कांही वेळेस मोठ्या एन्जिनिअरकडे सल्ला घेण्यास जावें लागलें तरी हा छोटा एन्जिनिअर तुमच्या बाजूची स्पष्ट व पूर्ण मांडणी तयार ठेवितो व मोठ्या साहेबाचें म्हणणें तुम्हास समजण्यास मदत करतो. तुमचें काम झाल्यावर हा सदोदित तुमचे जवळ विनामोल रहातो व तुमची इच्छा असल्यास दुसरींहि घरें बांधण्यास मदत करण्यास हा कधीच कंटाळत नाही. अशा प्रकारचें उपयुक्त पुस्तक लिहिल्याबद्दल व तें अल्पमोल ठेऊन सुलभ केल्याबद्दल रा. देशपांडे यांचें अभिनंदन करणें जरूर आहे. घर बांधण्याची इच्छा असणाऱ्या प्रत्येक माणसाने प्रथम हें पुस्तक घ्यावें व मग घर बांधण्याच्या तयारीस लागावें.

ठळकपणें दृष्टीस पडणारी यांतील उणीव म्हणजे विहिरीविषयी उल्लेख कोठे आलेला नाही ही होय. पुण्यामुंबईसारखे नळ फार थोड्या गांवीं आहेत. इतरत्र पाण्याचा पुरवठा विहिरींनीच होतो व शुद्ध पाण्याचा मुबलक पुरवठा असल्याशिवाय घर पुरें होऊं शकत नाही. ज्या ठिकाणीं म्युन्सिपालिटी नाही व नळाचें पाणीहि नाही अशा खेडेगांवांत प्रत्येक घरवाल्यास आपल्या आवारांतील मैला व सांडपाणी याची वासलात कशी लावतां येईल याचें विस्तृत विवेचन जर या पुस्तकांत केलें आहे तर

त्याप्रमाणें विहीरीस कोणती जागा योग्य, ती कशी बांधावी आंतील पाणी शुद्ध रहावें म्हणून काय केलें पाहिजे, पाणी बिघडल्यास काय उपाय योजावेत वगैरे सविस्तर माहिती या पुस्तकांत असणें अत्यंत जरूर आहे. शिवाय विहीरींतून पाणी काढण्याचे निरनिराळे पंप व आवारांत व घरांत नळ घालण्याबद्दलची माहिती असावयास पाहिजे. जलोत्सर्गसंडास व सांडपाण्याची स्वतंत्र व्यवस्था असलेल्या घरास पाण्याची सोय अगोदर पाहिजे. घर बांधावयास आरंभ करण्यापूर्वी पाण्याची सोय करणें जरूर असतें व ही माहिती सर्व दृष्टींनी परिपूर्ण अशा पुस्तकांत द्यावयाची कशी राहिली हें आश्चर्य वाटतें.

पुस्तकाच्या आरंभींच घर बांधतांना उपयोगांत येणाऱ्या शास्त्रीय शब्दांना मराठी प्रतिशब्द दिले आहेत. शाळाकॉलेजांतून इंग्रजींतून शिकून पारंगत झालेल्यास प्रत्यक्ष कामगारांशीं संबंध येतो त्यावेळीं नेहमींचे कामगाराच्या प्रचारांतील शब्द माहीत नसल्यामुळे अडचण येते. त्यांना या लहानशा कोशाचा चांगलाच उपयोग होणार आहे, परंतु अगदीं नवख्या माणसास इंग्रजी शब्दहि माहीत नसतो व मराठीहि नसतो. त्यास त्यांतील बरेच शब्द समजणें कठीण पडणार आहे. कारण पुस्तकाच्या मजकुरांत जेथे ते प्रथम वापरले गेले आहेत तेथे त्यांच्या उल्लेखाशिवाय कांहीं वर्णन नाही. उदाहरणार्थ पृ. २६३ वर छपराकरितां लागणारीं लाकडें दिलीं आहेत त्यांत पाखाडी किंवा कोनवासे म्हणजे नक्की कोणत्या लाकडास म्हणतात याचा उल्लेख नाही करितां छपराचें चित्र काढून त्यावर निरनिराळ्या भागांची नांवें दाखविल्यास जास्त सुबोध होईल. असे दुर्बोध राहिलेले दुसरे शब्द म्हणजे हेदर, गलथा, अचकोन, दुमाला, काचळा, नातऱ्या, कलमदान, पराच्या त्रिजागऱ्या, इर्सिपजर वगैरे वगैरे. ज्या ज्या जागीं असे याच शास्त्रांत वापरले जाणारे शब्द आले असतील व संदर्भावरून अर्थ समजत नसेल तेथे ते व्याख्येने व आकृतींनी माहिती करून द्यावयास पाहिजेत. आकृति जरूर आहे असें म्हणण्याचें कारण नुसत्या व्याख्येने साध्या माणसास बोध होत नाही व याचें उदाहरण म्हणजे पृ. १५४ वरील 'सांधमोड' ची व्याख्या पहावी. तसेंच दरवाजे खिडक्यांच्या झडपांचे जे प्रकार दिले आहेत त्यांचीं वर्णनें दिलेलीं आहेत, परंतु तेथेहि प्रत्येक प्रकारची आकृति देऊन त्याचें चित्र डोळ्यापुढे उभें केल्याशिवाय तीं वर्णनें स्पष्ट होत नाहीत.

पुस्तकांतील पहिल्या भागांत घरास लागणाऱ्या सामुग्रीची सविस्तर माहिती दिली आहे. चांगल्या मालांत काय गुण असावे लागतात, त्याची परीक्षा कशी करावी, उच्च दराचा माल कोठे वापरावा, मालाचीं मापें कशीं घेतात व तो सांठवून ठेवण्याकरितां काय खबरदारी घ्यावी लागते वगैरे दिलेली माहिती उपयुक्त व जरूर आहे. मळलेला चुना तयार करण्याच्या बाबतींत त्यांत वापरावयाची फकी व वाळू नुसती चांगली असून भागत नाही; तर ती योग्य प्रमाणांत मिसळून बेताचें पाणी घालून चांगली मळली गेली पाहिजे. मालकाच्या गैरहजेरींत घाणीवाल्याच्या आळसामुळे चुन्याच्या चांगुलपणांत फरक पडूं नये म्हणून काय उपाय योजावेत याबद्दल व्यवहारी हिशोबी माहिती दिली आहे. त्यांत सांगितल्याप्रमाणे गार घालण्याने जागेवर आलेला माल व्यवस्थित साठविला जाऊन फकी वाऱ्याने उडत नाही व केव्हांहि शिल्लक मालाचा हिशेब लागतो, हा आणखी एक फायदा आहे.

परंतु त्या भागांत दिलेल्या कांहीं कृतींचा समावेश या पुस्तकांत जरूरच होता असें नाही. उदाहरणार्थ, काचेची कृति देण्यापासून काच तपासून घेण्यास किंवा काचेचे निरनिराळे प्रकार समजण्यास मदत होते असें नाही. तसेच विटांकरिता लागणारी माती कशी कसावी व तीपासून विटा कशा तयार कराव्या ही माहिती किंवा चुनखडीपासून फकी तयार करण्याची कृतीहि या पुस्तकाच्या हेतूंत सामील होईल किंवा नाही याबद्दल मतभेद होण्यासारखा आहे. शिवाय या माहितीवरून विटा घरीं केल्यास त्यास माहिती अपुरी होईल. त्याचप्रमाणे लोखंडाच्या धारणशक्तीचें कोष्टक देण्याचें कारण

नव्हतें. कारण कोणत्याहि लोखंडी मालाचा आकार गणित करून दाखविणें हें या पुस्तकाच्या क्षेत्रा-बाहेरील आहे. साधारण आकार कसा काढावा हें दुसरीकडे दिलेलेंच आहे व त्यास धारणाशक्ति माहिती असण्याची जरूर नाही. तसेंच तेथ दिलेली हूप आयर्न, अँगल आयर्न यांची कोष्टकें यांचीहि गरज नव्हती. परंतु अँगल आयर्न छपराकरिता वापरावयाचे असतील तर काय हिशोबानें वापरावेत या माहितीचें कोष्टक छपराच्या माहितीबरोबर द्यावयास पाहिजे व तेवढ्यापुरती येथील कांही माहिती तेथे येऊं शकेल. हूप आयर्नचा तर उपयोग या पुस्तकांत कोठेहि सांगितला नाही. तेव्हा त्याचें दिलेलें मोठें कोष्टक निरुपयोगी आहे.

यापुढील पुस्तकाच्या भागांत सोईवार घराची मांडणी कशी करावी व कोठे काय सोई असाव्यात याबद्दल सर्व बाजूंनी सूक्ष्म विचार केलेला आहे. यांत दिलेल्या गोष्टी जरी नेहमीच्या अशा दिसल्या तरी त्यांच्या सोईगैरसोईची कल्पना घर उठेपर्यंत अनभिज्ञ माणसास येत नाही व मग असें केलें असतें तर बरें झालें असतें असा पस्तावण्याचा प्रसंग येतो. स्वयंपाकघरांतील धूर कोंडून सर्व घरभर होणें, जिन्याची जागा अगोदर मुक्रर न केल्यामुळे अडचणीचा जिना वगैरे कितीतरी गोष्टी नेहमी आढळण्यांत येतात. दिवाणखान्यांत खुर्च्यांमुळे भिंत व गिलावा खराब होऊं नये म्हणून लाकडी डॅडो घालण्याची सूचना यांत केली आहे. तशाच प्रकारचा डॅडो जेवणघरांत पाट उभे करून ठेवल्यामुळे भिंत खराब होऊं नये म्हणून असणें जास्त जरूर आहे.

सज्जा किंवा गॅलरीकरिता गर्डर बसवावयाचे असतील तर आंतील गर्डर अखंड बाहेर काढावे म्हणजे ते अधिक मजबूत होऊन भारानें वाकत नाहीत असें पृ. २०९ वर सांगितलें आहे. परंतु आंतील गाळ्याशीं सज्जाच्या रुंदीच्या ठराविक प्रमाणापर्यंतच हा नियम लागू होतो. शिवाय छपराच्या वजनाचाहि संबंध यांत येतो. तरी या बाबतींत जास्त खुलाशाची जरूरी आहे. निदान लाकडी बहा-लाचे बाबतींत तरी जास्त विचार करावयास पाहिजे. अशीं पुढं आलेलीं बहालें वाकल्याचीं पुष्कळ उदाहरणें पहाण्यांत आहेत.

पुस्तकांत वजनमापांची वगैरे कोष्टकें दिलेलीं आहेत, त्या प्रत्येक कोष्टकावर जरा मोठ्या अक्षरांत पी. डब्ल्यु. डी. हँडबुकप्रमाणे स्वतंत्र पूर्ण असा मायना असावयास पाहिजे. मजकूर वाचून विषयाची माहिती झाल्यावर पुढें केव्हा वजन किंवा आकार पहाण्यापुरतेंच कोष्टक पाहावयाचें असेल तर अशा तऱ्हेच्या असंदिग्ध मायन्याचा उपयोग होईल. पृ. ५४ वर पन्हाळी पत्र्याचें कोष्टक दिलें आहे. त्यांत दिलेले आकडे वजनाचे आहेत व ते पौंडाचे आहेत असा उल्लेख मजकुरांतही कोठे नाहीं. अनभिज्ञ माणसास अशा गोष्टी स्पष्टपणें मांडलेल्या असल्या पाहिजेत. पृ. २८२ वरील कोष्टक तर समजणारही नाही. त्या कोष्टकांत वर्तुळाच्या क्षेत्राच्या बाबतींत गाळ्याचा घन घ्यावयास पाहिजे.

छप्पर चांगलें सांधावें या गोष्टीवर जास्त भर दिला आहे. छपरांत बरेच वेळां गटार ठेवणें प्राप्त होतें. तेव्हा तें गळूं नये म्हणून कसें बांधावें याची माहिती द्यावयास पाहिजे. तसेंच, पागोळी गटार, खिडक्यांस झडी वगैरे किरकोळ गोष्टींचाही उल्लेख असावा म्हणजे प्रथम अंदाजपत्रक तयार करितांना तरी या लहान गोष्टी लक्षांत येतील.

शेवटीं परिशिष्ट ड मध्ये कामाचे दर दिले आहेत त्याचा उपयोग किती आहे हें ग्रंथकर्त्यानें तेथेच दिले आहे तें अगदीं खरें आहे. किंबहुना जरी कोणी घरमालक घराच्या कोणत्याही इतर बाबीं-कडे लक्ष घालीत नसेल तरी निदान आपणास पैशाच्या योग्य मोबदला काम मिळत आहे हें तरी पाहील व त्यास या कोष्टकाचा उपयोग आहे. परंतु याच माहितीप्रमाणे जर प्रत्येक कामास कोणती सामुग्री किती लागते हें दिलें तर माल घेतांना किती घ्यावा याचा घरमालकास अंदाज करतां येईल. म्हणजे दर मास वीटकामास विटा किती लागतील, चुना किती लागेल असें प्रमाण निरनिराळ्या व

प्रत्येक कामाच्या सामुग्रीचें द्यावयास पाहिजे. त्याशिवाय परिशिष्ट ड मधील माहिती दुसऱ्या स्वरूपांत म्हणजे एक मनुष्य कोणतेंहि काम एक दिवसांत किती करूं शकतो अशीहि दिल्यास फायद्याची होईल व कामगार अंगचुकारपणा किती करतात हें चटकन लक्षांत येईल. या सर्व गोष्टी दिल्या तरच कोणता माल किती व केव्हा लागेल याचा अदमास करून तरतूद करून ठेवितां येईल.

सदरहू पुस्तकाचा उपयोग करून प्रत्येक घर बांधणाराने पैशाचा अपव्यय न करितां सुखसोईचें व सुबक घर बांधणें मालकास स्वतःस व समाजाच्या दृष्टीनेहि इष्ट आहे. म्हणून प्रत्येकाने हें पुस्तक संग्रहीं ठेऊन त्याचा उपयोग करून घ्यावा अशी आमची आग्रहाची शिफारस आहे.

भ. प्र. ओक, B. E.

---

**आपलें आरोग्य** (भाग पहिला) (सांसर्गिक रोग व जंतुनाशक) (लेखकः— कर्नल कृ. वि. कुकडे, आय्. एम्. एस्.)

कर्नल कुकडे यांच्या 'आपलें आरोग्य' या शास्त्रीय पुस्तक मालेचा 'सांसर्गिक रोग व जंतुनाश' हा पहिला भाग नुकताच प्रसिद्ध झाला आहे.

पुस्तक १२८ पृष्ठांचें असून त्यांत सूक्ष्मजंतु, त्यांची उत्पत्ती व नाश, नाश करण्याचीं साधनें, कृति, सांसर्गिक रोग, प्रसार व त्यांचे निवारण, सांसर्गिक रोगांचे वाहक (कीटक), सांसर्गिक रोगांचीं वर्णनें, त्यांचा अधिशमनकाल (Incubation period), व प्रतिबंध वगैरे विषयांचें शास्त्रीय विवेचन केलें आहे. पुस्तकांत आलेल्या पारिभाषिक शब्दांची यादी देऊन शेवटीं सूचीहि जोडल्यामुळें पुस्तकाची उपयुक्तता वाढली आहे.

प्रत्येक प्रकरणांत विवेचन केलेल्या विषयाच्या अनुरोधाने प्रकरणाच्या शेवटीं कांहीं प्रश्न दिले असल्यामुळे ते कोणत्या दृष्टीने वाचावे हें विद्यार्थ्यांना सहज समजतें आणि त्या प्रकरणांत दिलेल्या विषयाची अनायासें उजळणीहि होते. परिचारिकांना व ॲम्ब्युलन्सच्या परिक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांना उपयोगी व्हावें म्हणून जरी हें पुस्तक लिहिलें असलें तरी इतरांनाहि तें बोधप्रद व मनोरंजक झालें आहे यांत संशय नाही. ठिकठिकाणीं चित्रें व रेखाकृती घालून पुस्तकास पूर्णत्व आणण्याचाहि प्रयत्न केला आहे.

पुस्तकाची भाषा व विवेचन पद्धति अगदीं साधी व सरळ असल्यामुळे विषय समजणें सुलभ झालें आहे. पारिभाषिक शब्दकोश तयार होईपर्यंत पारिभाषिक शब्दांची अनिश्चितता मात्र राहणारच. याविषयावर जसजशी अधिकाधिक पुस्तकें प्रसिद्ध होतील तसतशी परिभाषाहि निश्चित होईल.

स्नेह्यांच्या आग्रहाने कां होईना, पण आमच्या तज्ञ लोकांचें लक्ष, अत्यंत महत्वाच्या अशा ह्या शास्त्रीय विषयाच्या मराठीकरणाकडे जाऊं लागलें हें आपल्या मातृभाषेचें सुदैवच म्हटलें पाहिजे.

कर्नल कुकडे यांच्या सारख्या अधिकारी व अनुभविक तज्ञांकडून प्रस्तुत विषयासारख्या महत्वाच्या व जिव्हाळ्याच्या विषयावर यापुढे अधिकाधिक ग्रंथनिष्पत्ति होईल अशी आशा आहे.

के. वा. साठे

# पुस्तकपरीक्षण

**संस्कृत साहित्याचा इतिहासः**—( लेखकः–श्री. रा. पांडुरंग वामन काणे, बी. ए., एल्‌एल्. एम्. व रा. केशवरावजी ओगले, बी. ए.)

श्री. रा. पांडुरंग वामन काणे, एम्. ए. एल्‌एल्. एम्. मुंबई हायकोर्ट वकील व रा. केशवरावजी ओगले, बी. ए. या उभयतांनी वरील ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. सन १९२३ सालीं रा. काणे यांनी वरील विषयावर इंग्रजींत निबंध लिहून प्रसिद्ध केला होता. रा. ओगले यानी त्याचें हें मराठींत भाषांतर केलें आहे. त्यांत रा. काणे यांनी १९२३ सालापासून आजपर्यंत जी विशेष माहिती उपलब्ध झाली तिचा समावेश करून तें पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलें आहे. याप्रमाणे या पुस्तकाच्या कामीं उभयतांचे श्रम खर्ची पडले आहेत. याबरून मूलग्रंथकर्तृत्व रा. काणे यांजकडे येत असून त्याचें भाषांतर करून मराठी वाचकांस लाभ करून देण्याचें श्रेय रा. ओगले यांस प्राप्त होत आहे. रा. केशवरावजी ओगले यांची साधारणपणे अशी मनःप्रवृत्ति दिसून येते की, कोणी विद्वानांनी इंग्रजींत एखादें उत्तम पुस्तक लिहिलें की त्याचें मराठींत रूपांतर करून मराठी वाचकांस उपकृत करून सोडावयाचें. आमचें हें विधान रा. केशवरावजींचीं 'आर्यांचें मूलस्थान' 'वेदकाल निर्णय,' 'भरत खंडांतील आर्यसुधारणेचीं स्थित्यन्तरें' वगैरे जीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांवरून कोणाहि वाचकांस युक्त वाटेल.

रा. काणे यांच्यासंबंधाने चार ओळी लिहून वाचकांस त्यांचा परिचय करून देण्याचें कारण नाही. त्यांचा संस्कृत वाङ्मयाशीं विशेषतः साहित्यशास्त्र, धर्मशास्त्र, अद्वैत वेदांत इत्यादि विषयांशीं किती परिचय आहे व त्यांचा साठा त्यांच्या बुद्धींत किती झालेला आहे ही गोष्ट त्यांचीं व्याख्यानें, इंडियन ॲंटीक्वेरीमधील त्यांचे लेख, साहित्यशास्त्र, धर्मशास्त्र यांवरील विद्वत्तापरिपूर्ण त्यांचे निबंध यांचें परिशीलन करणाऱ्यास त्यांचें स्वरूप योग्यपणें अवगत होणार आहे. त्यांचा आमचा परिचय आज जवळ जवळ २०।२२ वर्षांचा असल्यामुळे साधारणपणें इतर जनांस अज्ञात असणाऱ्या दोन गोष्टी सांगितल्याशिवाय आम्हांस राहवत नाही. या दोन गोष्टी म्हणजे त्यांची अविरत व्यासंगप्रवृत्ति व निरभिमानवृत्ति या होत. रा. काणे यांजकडे केव्हाहि जावें त्यांचें वाचन व लेखन चाललेलें असावयाचेंच. त्या संबंधाने ते कधीहि कंटाळलेले आढळावयाचे नाहीत. आज आपल्या या महाराष्ट्रांत रा. चिंतामणरावजी वैद्य, प्रि. राजवाडे, डॉ. बेलवलकर वगैरे जीं दोन चार व्यासंगी विद्वान मंडळी आहेत त्यांत प्रामुख्याने रा. काणे यांचा समावेश कोणीहि विद्वान करील. रा. काणे यांचा दुसरा गुण निरभिमानता हा होय. त्या संबंधानेहि असें सांगतां येईल की, त्यांचा कोणाशीं कितीहि मतभेद असला तरी त्या व्यक्तीविषयी लेखांत अथवा भाषणांत उपहास अगर अनादर केव्हांही त्यांच्याकडून झालेला दृष्टीस पडणार नाही. तसेंच कोणीहि साधारण मनुष्य त्यांस कांही माहिती विचारावयास गेल्यास

ते तत्क्षणींच आपणास अवगत असलेली माहिती त्यांस सांगून मोकळे होतील. त्यांत अंतरंग बहिरंगभाव मुळीच ठेवणार नाहीत. तात्पर्य या वर दिलेल्या दोन गुणांबद्दल ते प्रशंसनीय आहेत. असो, याप्रमाणे उभय ग्रंथकारांविषयी थोडीशी माहिती देऊन आता आपण त्यांच्या प्रस्तुतच्या ग्रंथाकडे वळूं.

या साहित्यशास्त्रेतिहास ग्रंथाचे मूळग्रंथकाराने दोन भाग केले आहेत. त्यांतील प्रथम भागांत साहित्यग्रंथकार, त्यांनी केलेले ग्रंथ, त्यांतील विषय, त्या ग्रंथकारांचें व त्यांच्या ग्रंथांचें पौर्वापर्य, त्यांचें स्थल व काल वगैरे गोष्टी अर्वाचीन चिकित्सापद्धतीने सप्रमाण सांगितल्या आहेत. दुसऱ्या भागांत साहित्यशास्त्रांतील अंतरंगभूत विषय म्हणजे साहित्यशास्त्राचें स्वरूप, त्याचा उत्पत्तिकाल, त्याचा विकासकाल, त्यांतील रीति, अलंकार, रस वगैरेना महत्त्व देणारे भिन्न भिन्न मार्ग व त्यांचे पुरस्कर्ते इ. इ. गोष्टी संक्षेपाने सांगितल्या आहेत.

पहिल्या भागांत प्रथमतः साहित्यशास्त्राचा आद्य प्रणेता कोण याविषयीं चर्चा केली आहे. कांही अर्वाचीन महेश्वरादि साहित्य ग्रंथकार हे साहित्यशास्त्राचें मूळ उद्गमस्थान अग्निपुराण होय असें समजतात. भरतमुनीने नाट्यशास्त्राची रचना केली ती त्यावरून केली असें त्यांचें मत आहे. अग्निपुराण हा ग्रंथ आर्ष समजला जात असल्यामुळे व त्यांत साहित्यशास्त्रांतील बऱ्याच विषयांचें विवेचन असल्यामुळे भावनाप्रधान अर्वाचीन साहित्यकोविदांनी अग्निपुराणास साहित्यशास्त्रांतील आद्य ग्रंथ समजणें हें युक्तच होय. परंतु चिकित्सक विद्वांनाना हें त्यांचें मत ग्राह्य होणें शक्य नाही. कारण साहित्यशास्त्रांतील आप्त म्हणून समजले जाणारे ध्वन्यालोककार आनंदवर्धन, काव्यप्रकाशकार मम्मट इत्यादि विद्वानांनी विष्णुपुराण वगैरे पौराणिक ग्रंथांतील उतारे आपल्या ग्रंथांत उद्धृत केले आहेत. परंतु या आर्ष म्हणून समजल्या जाणाऱ्या अग्निपुराणांतील कोठेहि उतारा घेतलेला आढळत नाही अथवा त्याचा उल्लेखहि केलेला नाही. यावरून त्यावेळीं अग्निपुराणांत हा साहित्यविषय समाविष्ट झाला नव्हता किंवा कदाचित् समाविष्ट असला तर त्यास प्रामाण्य मानिलें जात नव्हतें हें उघड होत आहे. शिवाय भरत, भामह, दंडीप्रभृति साहित्यग्रंथकारांच्या ग्रंथांतून अग्निपुराणांतील व्याख्या, श्लोक व अनुक्रमयुक्त श्लोकसंघहि सापडतात. हे सर्व ग्रंथकार अभिजात कवि व साहित्यशास्त्रांत निष्णात असल्यामुळे अग्निपुराणासारख्या आर्षग्रंथाचा उल्लेख न करतां त्यांतील विषयाचा असा अपहार करतील अशी कोणास शंकाहि घेतां येणार नाही. शिवाय अग्निपुराणांत केवळ साहित्यशास्त्राचीच माहिती आहे असें नाही, तर कोश, छंद, ज्योतिष, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र वगैरे अनेक विषयहि त्यांत समाविष्ट झालेले आहेत व तेथे तत्तच्छास्त्रांतील अभियुक्तांच्या ग्रंथांतील उताऱ्यांचा त्यांनी संग्रह केला आहे. तात्पर्य, प्रस्तुतचें अग्निपुराणाचें स्वरूप हें आर्ष नसून सर्व विषयांचें संग्राहक असें कोणीतरी अर्वाचीन विद्वानांनी बनविलेलें आहे. तेव्हा तो ग्रंथ आर्ष समजणें विशेषतः साहित्यशास्त्राविषयी समजणें युक्त नाही असें रा. काणे यांनी म्हटलें आहे तें विद्वानांस पटण्यासारखें आहे. यापुढे भरताचें नाट्यशास्त्र व भरतमुनि हेच प्रस्तुत उपलब्ध ग्रंथांत व ग्रंथकारांत आद्य होत असें त्यांनी म्हटलें आहे. प्रस्तुत उपलब्ध ग्रंथांत नाट्यशास्त्र हाच साहित्यशास्त्रांतील आद्यग्रंथकार म्हणून प्रतीत होत असला तरी नाट्यग्रंथकार म्हणून भग-

वान पाणिनीने शिलालि, कृशाश्व वगैरेंचे उल्लेख केलेले आहेत, ते भरताहून पूर्वकालीन असावेत. नाट्यशास्त्रांत तंडु वगैरेंचे उल्लेख आहेत ते बहुधा भरताच्या समकालीन असावेत. परंतु या कोणाचेच ग्रंथ आज उपलब्ध होत नसल्यामुळे भरताच्या नाट्यशास्त्रासच आद्यनाट्यग्रंथ म्हणून मान द्यावा लागत आहे. या नाट्यशास्त्राच्या विवेचनांत 'आनुवंश्य' या शब्दाच्या अर्थासंबंधाने थोडीशी वाटाघाट केली आहे. त्यांत 'अनुवंशभवौ शिष्याचार्यपरंपरासु वर्तमानौ' असा जो अभिनवगुप्ताने अर्थ केला आहे तोच प्राचीन परंपरेस अनुसरून आहे. कारण पाणिनीच्या 'संख्या वंश्येन' या सूत्राचें विवेचन करतांना 'वंशो द्विधा विद्यया जन्मना च। तत्र भवो वंश्यः" असा वंश्य शब्दाचा अर्थ दिला आहे. त्यास अनुसरूनच अभिनवगुप्तांचा हा अर्थ आहे. यानंतर प्रस्तुत उपलब्ध असणारें नाट्यशास्त्र असेंच भरतानें रचिलें का त्यांत कांही मिसळ झाली आहे याची वाटाघाट करून प्रस्तुतचें नाट्यशास्त्र मूळ स्वरूपांत नाही, त्यांत पुढील विद्वानांनी भर घातली आहे असें प्रमाणपुरःसर दाखविलें आहे. आमच्या मतें कोणताहि मान्य प्राचीन ग्रंथ घेतला तर त्यामध्ये पुढील काळांत कांही फेरफार हा व्हायचाच. ही गोष्ट मनुस्मृति, रामायण, भारत इत्यादि ग्रंथांतील प्रक्षिप्त भागासंबंधाने जे वादविवाद सुरू आहेत त्यावरून निश्चित झाल्यासारखीच आहे. तेव्हा मूलग्रंथकाराच्या आशयास व परिपाठीस अनुसरून कोणी कांही भाग घातले तरी तो सर्व ग्रंथ मूळ ग्रंथकाराचाच म्हणून समजण्यास हरकत नाही. मनुस्मृतीचा टीकाकार कुल्लूकभट्ट याने आपल्या शेंकडो विद्वान विद्यार्थ्यांबरोबर चर्चा करून मूळ निश्चित झाल्यावर मगच टीकेंत त्या त्या महत्त्वाच्या विषयांचा समावेश केला आहे असें म्हणतात. पातंजल महाभाष्यांत कांही स्थळीं तर वादाच्या वेळीं गुरुशिष्य संवादात्मकच पद्धति आढळून येते. तात्पर्य विशेष प्राचीन असणाऱ्या ग्रंथांत मूलग्रंथानुसार कोणी कांही भाग घातला तर त्याबद्दल विशेष आक्षेप घेण्यांत स्वारस्य नाही. तसें व्हावयाचेंच; असो.

नाट्यशास्त्राचा कालनिर्णय करतांना इसवी सनाच्या दहाव्या शतकांतील दामोदरगुप्तास आरंभ करून प्रतिलोमक्रमाने चवथ्या शतकांतील कालिदासापर्यंत येऊन मधल्या काळांतील कोणकोणत्या पंडितांनी भरताचा उल्लेख केला आहे हें दाखविलें आहे व त्यावरून त्यास दुसऱ्या शतकाच्यापुढे आणतां येत नाही असें निश्चित केलें आहे. परंतु त्यास मागे किती नेतां येईल हें ठरवितां येत नसल्यामुळे भरतासंबंधी हें कालविवेचन अर्धवटच झालेलें आहे.

यापुढे मेधाविरुद्र, धर्मकीर्ति, भट्टि वगैरेंची त्रोटक माहिती देऊन पुढे भामह व दंडी यांचे ग्रंथ व त्यांचा कालनिर्णय याविषयी विशेष विवेचन केलें आहे. व त्यासंबंधाने प्रो. पाठक, त्रिवेदी, म. म. गणपतिशास्त्री वगैरे विद्वान एका बाजूस तर दुसऱ्या बाजूस प्रो. नरसिंह, दिवेकर, बटुकनाथ शर्मा व सुशीलकुमार दे अशी विद्वान मंडळीही आहेत. या दोन्ही बाजूंच्या विद्वानांनी भामहाचा काव्यालंकार व दंडीचा काव्यादर्श यांचा कीस काढून आपलें मत स्थापन करण्याचा कसून प्रयत्न केला आहे. त्यामुळे हा वाद विशेष गंभीर स्वरूपाचा झाला आहे. तेव्हा या विवेचनांत ज्यांनी विशेष परिश्रम केले आहेत अशा व्यक्तींनीच वाटाघाट करणें युक्त. तथापि एक पक्ष म्हणून नव्हे तर शंका म्हणून या संबंधाने कांही वाटा-

घाट येथे केली तर ती अप्रस्तुत होणार नाही. या दृष्टीने पाहूं लागलें तर भामहापेक्षा दंडी प्राचीन असावा याविषयी थोडेसें गमक सापडतें तें असें. साहित्यशास्त्राचें प्रारंभीचें स्वरूप कसें असावें, त्यावेळीं कोणत्या गोष्टीकडे विशेष लक्ष दिलें जात असावें याचा जर विचार केला तर काव्याची बाह्य चमत्कृति, जी अनुप्रास, रीति वगैरे, तिच्यावर प्रथम विशेष कवींचें व त्यामुळे साहित्यशास्त्रकारांचें लक्ष असावें असें वाटतें. अर्थात् या गोष्टींचें ज्या ग्रंथांत विशेष विवेचन असेल तो प्राचीन अशी कल्पना करण्यास हरकत नाही. भामह व दंडी या उभयतांचे ग्रंथ पाहिले तर दंडीइतके रीति, अनुप्रास इ. इ. शब्दालंकार वगैरे शब्दचमत्कृतिप्रधान गोष्टींचें विवेचन भामहाने केलेलें दिसत नाही. वामन, भोज इत्यादि पुढील विद्वानांनी रीतीचें व शब्दालंकारांचें विस्तृत विवेचन केलें आहे. तथापि ते पूर्वसंप्रदायानुप्राप्त म्हणून केलेलें आहे. त्यांत दंडीच्या मानाने शब्दापेक्षा अर्थासच प्राधान्य दिलेलें आढळतें. दंडी रीतींत अर्थगत ४।५ च गुण मानितो तर हे पुढील ग्रंथकार ते दहा मानितात. रीति वगैरेचा त्यांनी विस्तार केला आहे तथापि तो त्यावेळीं अर्थाला काव्यांत प्राधान्य येऊं लागल्यामुळे शब्दार्थांचेंहि महत्त्व दाखवावें एवढ्याकरतांच केलेला आहे. तात्पर्य पुढील हा विस्तार काव्यांत काय आढळतें हें दाखविण्यापेक्षा रीति, शब्दालंकार वगैरेचा विस्तार किती करतां येईल हें दाखविण्याकरतांच केला आहे. भामह, दंडी यांच्या ग्रंथांत या कृत्रिम विस्ताराकडे विशेष लक्ष दिलेलें दिसत नाही. तेव्हां ते दोघेहि प्राचीन ठरतात व त्या दोघांत दंडीचा शब्दालंकार, रीति वगैरे-कडे भामहापेक्षा विशेष ओढा असल्यामुळे तो प्राचीन असावा असें वाटते.

या दंडीच्या विवेचनांत दुसरा एक विवादाचा मुद्दा आला आहे तो म्हणजे दशकुमार-कर्ता दंडी व काव्यादर्शकर्ता दंडी हे एक का भिन्न याविषयीचा आहे. प्रो. त्रिवेदी, रा. आगाशे यांनी हे दोन ग्रंथकार एक नव्हेत भिन्न आहेत असें म्हटलें आहे. याचें कारण काव्या-दर्शकार दंडी हा उत्तम वैयाकरण, सुशील व नीतिमान होता हें त्याच्या काव्यादर्शग्रंथावरून दिसून येतें. दशकुमारकर्ता हा वैयाकरण व सुशील नसावा हेंहि त्याच्या दशकुमार ग्रंथा-वरून दिसून येतें. तेव्हा या दोन ग्रंथाचे कर्ते, हे दंडी या एकाच नांवाने संबोधिले जात असले तरी एक नव्हेत असा या मंडळीचा पक्ष आहे. रा. काणे वगैरे यांचें म्हणणें ते उभयतां एकच असावेत. दोघांच्या ग्रंथांत एक उत्तम, शुद्धप्रयोगयुक्त व कर्त्यांचें सौशील्य दाखवि-णारा तर दुसरा व्याकरणदृष्टीने अशुद्ध प्रयोगाने युक्त व कर्त्यांचें दौःशील्य दाखविणारा हा जो फरक दृष्टीस पडत आहे तो प्रथम सांगितलेल्या गुणांनी युक्त ग्रंथ अर्थात् काव्यादर्श हा त्या कवीने परिणतप्रज्ञ झाल्यावर प्रौढ वयांत लिहिला असावा व दुसरा दोषयुक्त दशकुमार ग्रंथ हा अविचारप्रधान उच्छृंखल जें तारुण्य त्यांत लिहिला असावा, अशी त्याची उपपत्ति करतां येत असल्यामुळे दोन दंडी मानण्याचें कारण नाही. परंतु हा कोटिक्रम पटण्यासारखा दिसत नाही. व्याकरणांत, महाभाष्यांत दंडीचें उत्तम अध्ययन झालें होतें, हें 'लिंपतीव तमो-ङ्गानि' येथे उपमा मानितां येत नाही, उत्प्रेक्षाच मानिली पाहिजे याविषयी त्याने जें विवेचन केलें आहे त्यावरून स्पष्ट होत आहे. हें त्याचें विवेचन पुढील साहित्यकारांनी प्रमाणभूत म्हणून आदरिलें आहे. अर्थात् त्याच्या व्याकरणांतील पांडित्याविषयी कोणासहि शंका घेतां येणार नाही.

काव्यादर्शांत दुष्ट प्रयोगाबद्दल तो " गौर्गौः कामदुघा सम्यक् प्रयुक्ता स्मर्यते बुधैः। दुष्प्रयुक्ता पुनर्गोत्वं प्रयोक्तुः सैव शंसति ॥ तदल्पमपि नोपेक्ष्यं काव्ये दुष्टं कथं च न । स्याद्वपुः सुंदरमपि श्वित्रेणैकेन दुर्भगम् ॥" असें बजावीत आहे. यावरून त्याचा निर्दोष शब्दरचनेकडे केवढा ओढा होता हें उघड होत आहे. त्याच्या या काव्यादर्शांत निर्दोष शब्दरचनाच दिसून येते, अशुद्ध प्रयोग आढळत नाही. तेव्हा अशा नांवाजलेल्या वैयाकरणाच्या हातून अचक्षिषि, आल्हादिषत, अहमाचकमे, अहंसस्वजे अशा प्रकारचे अशुद्ध शब्दप्रयोग होणें दुर्घट आहे. तसेंच त्याचें भाषेवर प्रभुत्व उत्तम होतें तें काव्यादर्श पाहिला असतां स्पष्ट होत आहे. तेव्हा अशा जाड्या वैयाकरण व भाषेवर प्रभुत्व असणाऱ्या व्यक्ति जर अशुद्ध प्रयोग करूं लागल्या तर शुद्ध प्रयोग करावयाचे कोणी ? व तसेंच वर दिलेल्या प्रयोगाप्रमाणे अशुद्ध प्रयोग करणाऱ्या व्यक्तीस जर वैयाकरण म्हणावयाचें तर मग अवैयाकरण कोण ? तेव्हा दशकुमारकर्ता व काव्यादर्शकर्ता या व्यक्ति भिन्न असाव्या याविषयी व्याकरण अशुद्धाचा जो पुरावा त्रिवेदी प्रभृतींनीं पुढे आणिला आहे तो विचारणीय आहे. आता दशकुमारचरित हें दंडीने तरुणपणीं लिहिलें असावें असें जें या ऐक्यवादी मंडळानी म्हटलें आहे तेंहि चिंत्यच वाटतें. कारण दशकुमारचरित ज्याने वाचिलें आहे त्यास ही गोष्ट माहीत आहे की, दशकुमारचरिताचा पूर्व भाग ज्याला पूर्वपीठिका म्हणतात तो व शेवटचा भाग हा दंडीचा नसून भट्टनारायण वगैरे इतरांनी ते भाग त्यास जोडून ग्रंथास पूर्णता आणिली आहे. तेव्हा दशकुमारकार दंडी हा दशकुमाराची अर्धवट योजना करून तो ती पूर्ण होण्याचा आंतच या लोकींची यात्रा संपवून गेला असला पाहिजे. म्हणजे दशकुमार हाच त्याचा शेवटचा ग्रंथ असावा. म्हणून दशकुमारचरित तारुण्यावस्थेंत लिहिलें वगैरे जें म्हटलें आहे तें विचिकित्सक विद्वानांस पटण्यासारखें नाही. तसेंच दशकुमारांत अश्लील व नीतिबाह्य ज्या कथा आहेत त्याचें कर्तृत्व काव्यादर्शकार दंडीला देतां येणार नाही. कारण काव्यादर्शकार हा अश्लील वर्णनाविषयी इतका विन्मुख आहे की, त्याला शब्दाच्या जोडणीमुळे सहज घडणारें अश्लीलत्व सुद्धा त्याज्य वाटत होतें. ग्राम्यशब्दाचे उच्चार स्पष्टपणें करूं नयेत म्हणून तो 'यथा यकारादि पदम्' असें सांगून त्या शब्दाची कल्पना वाचकांस करून देतो व या अश्लीलाचें उदाहरणहि 'या भवतः प्रिया' असें सभ्यार्थनिगूहित अत्यंत सौम्य देतो. तेव्हां अशा कवीच्या हातून दशकुमारांतील नीतिशैथिल्ययुक्त कथा रचिल्या जातील असें वाटत नाही. बरें कदाचित् तरुणपणीं उच्छृंखल अवस्थेमध्ये त्या रचिल्या अशी कल्पना केली तरी पुढे काव्यादर्श ग्रंथ करण्यासारखी त्याला परिणतावस्था प्राप्त झाल्यावर त्याने तो दशकुमार ग्रंथ फाडून अथवा जाळून कां टाकिला नाही ? तात्पर्य, या ऐक्यवादी मंडळीची परिणतावस्था ही कोटि विशेष महत्त्वाची नाही. असो. आता हें दंडीचें विवेचन येथेच पुरें करून भामहाकडे थोडेसें वळूं. भामह हा दंडीच्या मागूनचा असावा असें आम्हांस वाटत असल्यामुळे रा. काणे यांनी जरी दंडीच्यापूर्वी त्याचें विवेचन केलें आहे तरी कालक्रमाच्या धोरणाने आम्ही त्याचें विवेचन दंडीनंतरच करितों.

भामह याचा सन्मान्य साहित्यकार म्हणून दंडीपेक्षा विशेष लौकिक असावा. कारण पुढील साहित्यशास्त्रकारांनी दंडीपेक्षा त्याचे विशेष उल्लेख प्रमाण म्हणून आपल्या ग्रंथांत केले आहेत. उद्भटासारख्या नामांकित साहित्यकोविदांनी त्याच्या ग्रंथावर भामहविवरण म्हणून टीका

लिहिली आहे यावरूनहि हेंच सिद्ध होत आहे. हा भामह बौद्ध का वैदिक यासंबंधाने थोडासा वाद आहे. कांही मंडळींनी त्यास वैदिक ठरविला आहे. त्यास मुख्य कारण त्याने बौद्धपंडितांनी स्वीकारलेला ' अपोहवाद ' मानिला नाही, त्याचें खंडन केलें आहे, हें होय. तो बौद्धधर्मानुयायी असावा याला त्याने ग्रंथारंभीं विशिष्ट देवतेचें वंदन न करतां सार्व, सर्वज्ञ असे सामान्य शब्द घालून सर्वज्ञाला ( बुद्धाला ) वंदन केलें आहे. त्याच्या बापाचें नांव रक्रिल हें बौद्धलोकांत प्रचारांत असलेलें होतें. त्याच्या नांवापुढे बौद्ध व्याकरणकार चंद्रगोमी याने पूज्य या अर्थी सांगितलेला 'गोमी' हा शब्द लावलेला आढळतो. तेव्हा तो बौद्ध असावा, असें दुसऱ्या बाजूचें म्हणणें आहे. आता पहिल्या बाजूच्या एकेक मुद्याचा विचार करून त्यासंबंधाने आम्हांस काय वाटतें तें सांगतों. यांचे मुख्य मुद्दे त्याने बौद्धाच्या अमोह वादाचें खंडन केलें आहे व आपल्या ग्रंथांत वैदिक देवतांचीं वर्णनात्मक पद्यें उदाहरणार्थ म्हणून दिलीं आहेत, हेच दोन होत. यापैकी पहिला मुद्दा विशेष शंकास्पद आहे. कारण बौद्धधर्मातील एखाद्या व्यक्तीला एखादा शास्त्रीय विषय मान्य नसला म्हणून त्याचें विशिष्टधर्मत्व कसें नष्ट होतें तें कळत नाही. बौद्ध धर्मांत माध्यमिक, योगाचार वगैरे पंथांचीं शास्त्रीय मतें भिन्न भिन्न आहेत, परंतु ते सर्व बौद्धच समजले जातात. नैयायिक वेदांती यांतहि पुष्कळ मतभेद आहेत परंतु ते सर्व वैदिकमार्गानुयायी म्हणूनच समजले जातात. धार्मिक विषय निराळे व शास्त्रीय विषय निराळे. शास्त्रीय विषयांत मतभेद असला तरी त्यामुळे धार्मिक भावनेला बाध येण्याचें कारण नाही. अपोहवाद हा शास्त्रीयविषय, तेव्हा त्यासंबंधाने मतभेद असला म्हणून काय झालें ? अलंकारिक व्यंजनावृत्ति मानितात, नैयायिक वेदांती ती मानीत नाहीत म्हणून त्यांचा धर्म थोडाच बदलतो. भामह स्वतंत्र विचाराचा मनुष्य होता. तो जेवढें त्याच्या बुद्धीस पटेल त्याचाच आदराने स्वीकार करीत होता व जें पटणार नाही त्याचा तितक्याच अनादराने तिरस्कार करीत असे हें त्याच्या या काव्यालंकारावरून दाखवितां येईल. तो व्याकरणशास्त्राची ' सूत्राम्भसं पदावर्तम् ' इत्यादि पद्यांनी मनसोक्त प्रशंसा करितो व " श्रद्धेयं जगति मतं हि पाणिनीयम् ' असें पाणिनीचे गौरव वर्णितो. परंतु त्याला वैयाकरणांचा स्फोटवाद मान्य नसल्यामुळे " शपथैरपि चादेयं वचो न स्फोटवादिनाम् । नभः कुसुमस्तीति श्रद्दध्यात्कः सचेतनः ॥ ' अशी खपुष्पाची त्यास उपमा देऊन त्यांचा उपहास करतो. यावरून तो स्पष्टवक्ता होता हें उघड होत आहे. अर्थात् त्याला बौद्धांनी अंगिकारलेला अपोहवाद मान्य नसला म्हणून तेवढयावरून त्याला वैदिक समजणें प्रशस्त नव्हे. या दृष्टीनेच आपण व्यक्तीची परीक्षा करूं लागलों तर वरील स्फोटवादाविरुद्ध त्याने केलेलें विधान पाहून त्यास अवैयाकरण ठरवावें लागेल. परंतु ती गोष्ट त्याने व्याकरणशास्त्राची जी प्रशंसा केली आहे त्यास अत्यंत विरुद्ध होत आहे. म्हणून तो वैयाकरण का अवैयाकरण याविषयी वादच करावा लागेल.

आता बौद्ध सारस्वतांत प्रायः आढळून येणारी जी बुद्धदेवतेचें गुणवर्णन करुन वंदन करण्याची पद्धति तीच भामहाने काव्यालंकारांत अनुसरलेली आहे. त्यांत बुद्धाचा ' सर्वज्ञ ' या संज्ञेने निर्देश करुन सर्वांचें हित करणारा या अर्थी त्याला ' सार्व ' हें विशेषण दिलें आहे. वैदिक ग्रंथकारांत अशा अर्थी ' सार्व ' शब्द उपयोगांत असलेला आढळत नाही. भामहाने

स्वतःच सर्वांचें हित करणारा अशी या शब्दाच्या अर्थाची फोड केलेली आहे. यावरून हें नमन बुद्धाला उद्देशूनच असावें असें वाटतें. कारण बुद्धाची प्रसिद्धि, त्याचें सर्वज्ञत्व व सर्वजनहितकारित्व या दोन गुणांनीच विशेष आहे, हें त्याच्या चरित्राचें परिशीलन करणाऱ्यास सांगण्याचें कारण नाहीं. अशा रीतीने भामहाचें हें नमन बुद्धास अनुलक्षून आहे हें सिद्ध होत असतांना 'सर्वज्ञ' हें शंकराचेंहि नांव आहे, 'सार्व' हें विशेषण शंकरास लावण्यास नड नाही इ. इ. कोटिक्रम प्रतिपक्षीयांनी केला आहे. परंतु तो विशेष टिकणारा दिसत नाही. कारण नमनसंप्रदाय व सर्वज्ञादि शब्द विशेषतः कोणत्या अर्थी योजिले जातात हें पाहिल्यावांचून यौगिक अर्थाने आपणास अभिप्रेत असणाऱ्या व्यक्तीकडे त्या शब्दांचा आपण उपयोग करूं लागलों तर वाटेल तो शब्द वाटेल तिकडे लावतां येईल. 'सार्व' शब्दच शंकराला लावतां येईल एवढेंच काय परंतु प्रत्यक्ष बुद्ध हा शब्दहि शंकरास लावतां येईल. परंतु असा शब्दाचा उपयोग करणें हें संप्रदायशुद्ध होणार नाहीं. तसेंच कोशांत 'सर्वज्ञ' हा शब्द बुद्ध व शंकर या उभयतांचा वाचक आहे म्हणून सांगितलें असलें तरी कविव्यवहार काय आहे हें पहावयास नको काय? एखादा शब्द अमक्याचा वाचक म्हणून कोशांत सांगितलें असलें तरी तो शब्द त्या अर्थी जर कविप्रचारांत नसेल तर त्या शब्दाचा उपयोग केला असतां 'अप्रयुक्त' दोष होतो. तेव्हा शब्दाचा अर्थ करतांना प्रयुक्तत्व, अप्रयुक्तत्व अवश्य पाहावें लागतें. नाही तर आपल्या अभिप्रेत अर्थाकरतां आपण कवीला अप्रयुक्त दोषभाक् करीत आहों असें होईल. अमरसिंह हा बौद्ध आहे ही गोष्ट आता निर्विवादपणें सिद्ध झाली आहे. अर्थात् अमरकोशांतील पहिला मंगलश्लोक जो 'यस्य ज्ञानदयासिंधो' तो बुद्धदेवतेला उद्देशून आहे हें उघड आहे. त्यांत बुद्धाचें ज्ञान व सर्वहितकारी दया यांसच भामहाप्रमाणे प्राधान्य दिलें आहे. परंतु अमरकोशावरील कांही टीकाकारांनीं हा श्लोक वैदिक देवतेपर लावून अमरसिंहास वैदिक बनविला आहे. ह्या प्रकारच्या प्राचीन व अर्वाचीन गोष्टी पाहिल्या म्हणजे कांही द्वैती विद्वान 'अद्वैत' या शब्दाचा अर्थ 'अकारो वासुदेवः स्यात्' या कोशानुरोधाने 'एन' (अ शब्दाची तृतीया) वासुदेवेन सह द्वैतं भेदः अद्वैतम् अशी फोड करून अद्वैत म्हणजे जीवेशभेद असा अर्थ करतात त्यांचा उपहास कां करावा हें समजत नाही. असो. आता भामहाच्या वडिलाचें नांव 'रक्रिलगोमी' यासंबंधाने भामहास वैदिक ठरविणारी ही मंडळी काय म्हणतात तें पाहूं. या मंडळीस 'रक्रिल' ही संज्ञा बुद्धवर्गांत प्रचारांत आहे ही गोष्ट मान्य आहे. तसेंच 'गोमिन् पूज्ये' या चांद्रव्याकरणावरून तो शब्द बुद्ध ज्ञातींत आदरार्थी विशेषनामापुढे लावतात ही गोष्टहि त्यांस मान्य आहे. तेव्हा भामहाच्या वैदिकत्वास बाध आणणारी ही त्याच्या वडिलांच्या नांवाची उपपत्ति ही मंडळी अशी करते की, भामहाच्या काळीं बौद्ध व वैदिकधर्मीयांचें परस्परांशीं विशेष संघट्टन झाल्यामुळे कांही वैदिकांनी बौद्ध प्रचारांतील विशेष संज्ञा आपल्यांत प्रचलित केल्या. उदाहरणार्थ प्रस्तुत काळीं कांही हिंदुलोक युरोपिअन लोकांचीं नांवें आपल्या मुलाबाळांस ठेवितात, त्याप्रमाणेच ही गोष्ट असावी. आम्हांस ही उपपत्ति विशेष धाडसाची वाटते. अशा कल्पनातरंगाने वाटेल तें ठरेल. शिवाय एखाद्या व्यक्तीनें अन्यधर्मीय एखादें नांव धारण केलें तरी त्या धर्माच्या लोकांत आदरार्थी रूढ असलेले जे 'गोमी' वगैरे शब्द

ते तो आपल्या नांवापुढे कशास जोडील ? एखाद्या वैष्णवाने तेलगांतील सुब्रह्मण्य वगैरे नांव चुकून किंवा नवसाने ठेविलें तरी तो आपणास सुब्रह्मण्या खास म्हणणार नाही. किंवा एखाद्या शैवाने वासुदेव नांव धारण केलें तरी तो आपणास वासुदेवाचार्य खास म्हणणार नाही. असो. आता भामहाच्या वैदिकत्वाबद्दल त्याच्या काव्यालंकारांनी उदाहृत पद्यांत वैदिक देवतांचें वर्णन आहे म्हणून तो वैदिक असावा असें या मंडळींचें म्हणणें आहे. परंतु तेंहि विशेष जोरकस वाटत नाही. कारण जानकीहरणकर्ता कुमारदास, कुन्दमालाकर्ता दिङ्नाग हे बौद्ध वर्गांतील प्रसिद्ध कवि व पंडित आहेत. या दोघांनीहि रामचारित्र सुंदर रीतीने वर्णिलें आहे. हेमचंद्र या जैन कवीने कितीतरी हिंदुदेवतांच्या वर्णनात्मक श्लोक घेतले आहेत. तेव्हा वरील पुरावा अगदीच निरुपयोगी ठरत आहे. आम्हांस अशी एक शंका येत आहे की, वैदिकधर्माच्या उत्कर्षाचा असा एक काल असावा की त्या वेळीं अन्यधर्मीयांस स्वविरचित ग्रंथांत स्वेष्ट देवतेचें मोघम वंदन करून प्रबल अशा हिंदुधर्मीयांच्या देवतादिकांचें वर्णन करण्यांत स्वकवित्व खर्ची घालावें लागत असे. त्याशिवाय त्यांच्या ग्रंथास गौरव प्राप्त होत नसावें. नाही तर कुमारदास, दिङ्नागप्रभृतींनी रामचरितवर्णन कां केलें व त्याबद्दल बौद्ध समाजाकडून त्यांचा निग्रह कां झाला नाही ? तसेंच बौद्धधर्मीय अमरसिंहाने स्वधर्मीय विशिष्ट पारिभाषिक शब्दांचे व संज्ञांचे उल्लेख न करतां हिंदु देवतांचे इतके विस्ताराने उल्लेख केले नसते. असो. या मुद्यासंबंधाने विशेष विवेचन करण्याचा हा प्रसंग नव्हे, म्हणून हें विवेचन येथेच पुरें करू. वर केलेल्या विवेचनावरून भामहास वैदिक समजण्यास मनाची निःशंक प्रवृत्ति होत नाही एवढें सांगून पुढील विषयाकडे वळू.

यानंतर पहिल्या भागांतील विषयांचा उहापोह करावयाचा म्हणजे उद्भटादि ३०।३२ साहित्यकार, त्यांचे ग्रंथ व त्यांतील विषय यांचा उहापोह करणें होय. रा. काणे यांनी या साहित्यकारांचे ग्रंथ, त्यांतील विषय, त्यांचे पौर्वापर्य, त्यांचे काल व त्यांचें स्थल यासंबंधाने विविध प्रमाणें उपन्यस्त करून निर्णय केले आहेत, ते पाहिले म्हणजे त्यांची ग्रंथोपस्थिति, समयस्फूर्ति वगैरे गोष्टींची जितकी प्रशंसा करावी तेवढी थोडीच असें वाटूं लागतें व त्यांस यापुढे राजेश्री अथवा प्रोफेसर म्हणण्यापेक्षां डॉक्टर म्हणण्याचा सुयोग प्रस्तुत लेखकास लवकर यावा असेंच तो अंतःकरणपूर्वक इच्छितो. केव्हां योग येतो पाहावें. असो या विस्तृत विवेचनांत ग्रंथ व त्यांतील विषय यांत मतभेद असण्याचें कारणच नाही. कारण त्यासंबंधाने त्या त्या ग्रंथांतील स्पष्ट उतारेच दिले आहेत. स्थलकालविवेचनहि प्रमाणपुरःसर केलें असल्यामुळे त्यांतहि मतभेद होण्याचें कारण नाही. शिवाय तो विषय ज्यांनी त्यांत आपलें आयुष्य वेचिलें असेल अशांनीच चर्चित करावा असें प्रस्तुत लेखकाने पूर्वी सुचविलेंच आहे. तेव्हा हें पहिल्या भागाचें विवेचन येथेच पुरें करावें हें त्यास युक्त दिसतें; परंतु कांही साहित्यग्रंथकारांचा या भागांत उल्लेख यावयास पाहिजे होता तो आला नाही म्हणून तेवढाच निर्देश करून दुसऱ्या भागाकडे वळू. वाग्भट, भानुदत्त वगैरे साधारण साहित्यकारांचा जर या भागांत उल्लेख आहे तर त्यांत मंदारमरंदचंपूकाराचा उल्लेख का नसावा हें कळत नाही. तसेंच बोपदेव यांनी श्रीमद्भागतावर मुक्ताफल नांवाची टीका केली असून भागवतांतील नवरसात्मक श्लोकांचा संग्रह करून त्या नवरसांचा भक्तिरसांत

समावेश केला आहे असें स्मरतें. ( प्रस्तुत मुक्ताफल जवळ नसल्यामुळे त्यांतील कांही श्लोक वगैरे देतां येत नाहीत ). या मुक्ताफलावर हेमाद्रि या प्रसिद्ध पंडिताची टीका आहे. तेव्हां या ग्रंथाचा व बोपदेवाचाहि या इतिहासात्मक ग्रंथांत थोडा परामर्ष घेणें अवश्य वाटतें. व शेवटी काव्यप्रदीप, रसगंगाधर व चित्रमीमांसा या ग्रंथांवर पांडित्यपूर्ण टीका करणारे महामहोपाध्याय नागेशभट्ट यांची माहिती दिली यापेक्षा विस्ताराने द्यावयास पाहिजे होती; असें आम्हास वाटतें नागेशपंडित हा सामान्य विद्वान नव्हे. व्याकरण, सांख्य, अलंकार या शास्त्रांत त्याचे सर्वमान्य ग्रंथ आहेत. जगन्नाथाचें मार्मिकपणे खंडन करून अप्पय्यदीक्षितास यानेच सावरून धरिलें आहे. मनोरमाकुचमर्दनीचे शब्दरत्नांत यानीच खंडन केलें आहे. तेव्हा अशा विद्वानाचें योग्य स्वरूप कळण्यास केलें यापेक्षा विशेष विस्तृत विवेचन करावयास पाहिजे होतें. तरी याचा विचार ग्रंथकर्त्यांनी द्वितीयावृत्तींत करावा एवढें सांगून प्रथम भागाचें विवेचन पुरें करितों.

या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांतील विषयापैकी साहित्यशास्त्राची वाढ, त्याचें लक्षण, व त्यांतील रसादि संप्रदाय यांचेंच मुख्यत्वेंकरून विवेचन करण्याचा विचार आहे. बाकीचे त्यांतील विषय म्हणजे काव्याचें प्रयोजन, हेतु, साहित्यशास्त्रांतील विषय, साहित्यशास्त्रें व इतर शास्त्रें इ. इ. यांचें विवेचन वाचकांनी मुळांतच पाहावें. कारण त्या विषयांत विशेष चर्चा करण्यासारखें कांही नाही व तितके महत्त्वाचेहि ते विषय नाहीत.

साहित्यशास्त्राचें विवेचन करावयाचें म्हणजे प्रथमतः साहित्यशास्त्र कशास म्हणतात व हें अभिधान या शास्त्रास कां प्राप्त झालें याचें थोडेंसें विवेचन केलें पाहिजे. राजशेखराने ' साहित्यविद्या ' या शब्दाचें विवेचन ' शब्दार्थयोः सहभावेन विद्या साहित्यविद्या' असें केलें आहे. शब्द व अर्थ यांच्या सहभावावर म्हणजे संयुक्ततेवर अवलंबून असणारी जी विद्या ती साहित्यविद्या म्हणजे साहित्यशास्त्र हें शब्दार्थांच्या सहभावावर ( उभयनिष्ठ चमत्कृतीवर ) अवलंबून आहे. व त्या उभयनिष्ठ चमत्कृतीचें या शास्त्रांत विवेचन असतें असें यावरून ध्वनित होतें. भामहाने ' शब्दार्थौ सहितौ काव्यम् ' असें काव्याचें लक्षण केलें आहे. हें व राजशेखराचें साहित्यविवेचन हीं दोन्हीं एकाच अर्थाचीं आहेत. तेव्हा काव्य व साहित्य हे शब्द पर्याय होतात. ' कवेः कर्म काव्यम् ' असें कांही विद्वान काव्य शब्दाचें विवेचन करतात. त्यांतील ' कर्म ' शब्दाने शब्दार्थवैचित्र्यरूपीच क्रिया अपेक्षित आहे. नंतर हें जें शब्दार्थांचें साहित्य सांगितलें यांत शब्द व अर्थ हे तुल्यबल समजावयाचे कां त्यापैकी एकास प्राधान्य देऊन दुसऱ्यास त्याचें सहायभूत समजावयाचें असा प्रश्न उपस्थित होतो. शब्द व अर्थ यांत अंगांगीभाव मानावयाचा असेल तर अंगी ( प्रधान ) कोण व अंग ( अप्रधान ) कोण हा प्रश्न येतो. म्हणजे शब्दाला प्राधान्य देऊन अर्थाला त्याचें अंगभूत समजावयाचें कां अर्थाला प्राधान्य देऊन शब्दाला त्याचें अंगभूत समजावयाचें हा विवाद उत्पन्न होतो. तात्पर्य, या वादामुळे आपण काव्य म्हणून ज्याला म्हणतों त्यांत शब्दचमत्कृतीचें प्राधान्य असतें का अर्थचमत्कृतीचें प्राधान्य असतें, अथवा उभय चमत्कृतीचें प्राधान्य असतें असे तीन पक्ष उपस्थित होतात. त्यांत समुचित शब्दयोजनेने चमत्कृति करण्यांत ज्याला प्रभुत्व प्राप्त झालें आहे असे दंडी जगन्नाथ वगैरे मंडळी काव्यांत शब्दचमत्कृतीला प्राधान्य देतात. त्यांच्या मतें ' श्री भूते '

' शुष्कोवृक्षस्तिष्ठत्यग्रे ' हीं वाक्यें काव्यें नसून याच अर्थाचीं ' कामिनी व्याहरति ' व ' नीरसतरुरिह विलसति पुरतः ' हीं वाक्यें काव्यें होत. तेव्हां दोन्ही ठिकाणीं अर्थ एकच असून केवळ शब्दभेदामुळे एक काव्य व दुसरें अकाव्य होत आहे. म्हणून काव्यांत शब्दाला प्राधान्य दिलें पाहिजे. याविरुद्ध अर्थप्राधान्यवादी हे वैदर्भ्यादि रीति व यमक, अनुप्रास इत्यादि शब्दचमत्कृति यांनी शून्य शब्दरचना असून केवळ सरस अर्थ व विविध अर्थालंकार यांनी काव्योत्पादनकारणचमत्कृति प्रतीत होत असल्यामुळे व तीच विशेष सहृदयहारी असल्यामुळे काव्यांत अर्थाला प्राधान्य देणें युक्त होय असें प्रतिपादितात. त्यांचें केवळ सरस अर्थामुळे काव्यसंज्ञेस पात्र होणारें पुढील उदाहरण होईलः—

" कूपे पानमधोमुखं भवति मे नद्यो वराक्यः स्त्रियः ।
सारङ्गैर्बकटिट्टिभैः सह सरस्येवं मुहुश्चिन्तयन् ॥
ना दत्ते तृषितोऽपि पल्वलजलं क्रूरैर्वृतं जन्तुभिः ।
मानादुन्नतकंधरः सुरपतिं तच्चातको याचते ॥ "

याचा अर्थः—ही मानी पुरुषाविषयी अन्योक्ति आहे. चातक पक्षी भूस्पृष्ट जल प्राशन करीत नाही असा कविसमय आहे. त्यावर प्रस्तुत कवितेंत उत्प्रेक्षा केली आहे की चातक पक्षी भूमिपृष्ठावरील उदक प्राशन न करितां आकाशातील मेघोदकाची जी अपेक्षा करितो ती त्याच्या मानी स्वभावामुळेच तो करितो. कारण तो म्हणतो, विहीरीचें पाणी प्यावें तर ते खाली तोंड करून ( वाकून ) घ्यावें लागतें. ( तेव्हा हें असलें खाली तोंड करून पाणी पिणें नको म्हणून तें पीत नाही ) नद्यांचें पाणी प्यावें तर त्या बिचाऱ्या गरीब स्त्रिया. ( तेव्हा त्यांजपासून पाणी कसें घ्यावें. अडीअडचणीला आपणच त्यास पाणी देणें उचित ) म्हणून तें पीत नाही. (संस्कृतांत नद्या ह्या स्त्रिया व समुद्र त्यांचा पति अशी कल्पना आहे. म्हणून येथे नद्यांना ' स्त्रियः ' असें म्हटलें आहे ) सरोवरातील पाणी प्यावें तर तेथे सारंग, बगळे, टिट्टवे वगैरे क्षुद्र जलचर प्राण्याबरोबर तें प्यावें लागेल ( म्हणून तेंहि तो पीत नाही ) रानातील एखाद्या डबक्यांतील पाणी प्यावें तर तेथे क्रूर लांडगे कोल्हे यासारखे प्राणी असतात म्हणून तेंहि तो वर्ज्य करितो. तेव्हा असे नानाप्रकारचे विचार करणारा चातक पक्षी तान्हेला असूनहि कोणतेंच भूमीवरील जल पीत नाही तर या मानी विचारामुळे आपली मान वर करून सुरपति जो महेंद्र त्यालाच तें मागतो. ( पावसाळ्यांत चातक पक्षी मेघाकडे तोंड करून ओरडतात त्यावर ही कल्पना केली आहे ). ही उत्प्रेक्षागर्भ मानी पुरुषाविषयीची अन्योक्ति फार सरस आहे. यांत रीति, अनुप्रास वगैरे कांही साधले नाहीत. ह्या कवीने वर्णिलेला अर्थ कोणत्याहि शब्दाने सांगितला तरी तो मनोहरच वाटणार. तेव्हा अशा अर्थरचनेला काव्यसंज्ञा प्राप्त होत असल्यामुळे काव्यांत शब्दचमत्कृतीला प्राधान्य देण्याचें कारण नाही. अर्थालंकाराभिमानी वर्गहि या वर्गातच मोडतो. कारण अर्थालंकार हे अर्थचमत्कृतीनेच वाक्यास काव्यत्व प्राप्त करून देण्यास मदत करितात. आता तिसरा वर्ग म्हणजे शब्दचमत्कृति व अर्थचमत्कृति या उभयतांस सम प्राधान्य देऊन त्याने काव्य होतें असें समजणारा. त्याच्यामतें " उपोढरागेण विलोलतारकं तथा गृहीतं शशिना निशामुखम्। यथा समस्तं तिमिरांशुकं तथा पुरोऽपि रागाद् गलितं न लक्षितम् ॥ " हें काव्य

होईल. कारण यांत वैदर्भीरीति, वृत्त्यनुप्रास, समासोक्ति वगैरे अलंकार व संभोगशृंगाररस हे उत्तम रीतीने संमीलित झाल्यामुळे या कवितेस मनोहरत्व आलें आहे. तेव्हा अशा प्रकारच्या शब्दार्थोभय-चमत्कृतियुक्त वाक्यास काव्य म्हणणें प्रशस्य होय असा या उभयप्राधान्यवादी विद्वानांचा आशय आहे. भामह अथवा मम्मट यांनी जरी शब्दार्थाला प्राधान्य दिलें आहे तरी त्यांचें साहित्यशास्त्रासंबंधाने संपूर्ण विवेचन पाहिलें तर अर्थप्राधान्याकडेच त्यांची दृष्टि विशेष असल्याचें दिसून येतें. कारण काव्यातील रस, भाव, गुणदोष, अर्थालंकार हे विशेषतः अर्थावर अवलंबून आहेत व यांचेंच त्यांच्या ग्रंथांत विवेचन विशेष आहे. या भिन्न भिन्न पक्षांत नानाप्रकारचे वाद आहेत, परंतु आपणास त्या वादांत पडण्याचें कारण नाही. पूर्वीचे विद्वान काव्याचें स्वरूप कसें समजत होते व त्याचा विस्तार कसा होत गेला एवढें येथे समजलें म्हणजे पुरें आहे, 'दंडी, वामन, जगन्नाथ वगैरे साहित्यपंडित रमणीयअर्थविशिष्ट शब्दाला काव्य म्हणणारे होत. भामह, मम्मट वगैरे सरस शब्दार्थाला काव्य म्हणणारे होत. काव्यांत रसाला प्राधान्य असलें तरच तें काव्य होईल, असें विश्वनाथादि कांही साहित्यकारांचें म्हणणें आहे. काव्यशब्दवाच्य केवळ रसात्मक वाक्यच नव्हे तर गिरिसागरादिकांचें मनोहर वर्णन करणारीं वाक्येंहि काव्य शब्दाचें अभिधेय होऊं शकतात म्हणून 'रसात्मकं वाक्यं काव्यम्' असा काव्य शब्दाचा अर्थ संकुचित करूं नये असा शब्दार्थवाद्यांचा अभिप्राय आहे. हा शब्दार्थ-प्राधान्यवादी वर्गच या साहित्यशास्त्रांत विशेष प्रभावशाली झाला आहे. कारण सर्व अलंकार, वक्रोक्ति व नवविध रस हे सर्व शब्दार्थावरच अवलंबून असल्यामुळे हा पक्ष सर्वोपजीव्य आहे. याप्रमाणे काव्याचें स्वरूप थोडेसें आकलन झालें म्हणजे आतां पुढे साहित्यशास्त्रांत जे विविधमार्गसंप्रदाय अथवा प्रस्थानें झालीं आहेत त्याचा विचार करणें सोयीचें होत असल्यामुळे आपण आता तिकडे वळू.

या साहित्यमार्गांचें विवेचन करण्यापूर्वी साहित्यशास्त्रांत वृत्ति कशास म्हणतात याविषयी थोडीशी माहिती द्यावीशी वाटते. कारण काव्यांत अर्थाला प्राधान्य आल्यापासून या वृत्तींचें महत्त्व बरेंच कमी झालें आहे. व त्यामुळे अर्वाचीन साहित्यभक्तांस रीति व वृत्ति या ओळखण्यास त्रास पडतो. प्राचीन अलंकारिकांनी वृत्तीचीं जीं लक्षणें दिलीं आहेत त्यावरून वृत्ति ह्या कांही विशिष्ट वर्णरचनेवर अवलंबून आहेत असें दिसून येतें. उद्भटाचार्य यांनी परुषा, नागरिका व ग्राम्या असे या वृत्तीचे तीन भेद केले आहेत. "शषाभ्यां रेफसंयोगैष्ट-वर्गेण च योजिता । परुषा नाम वृत्तिः स्यात् ॥" "सरूपसंयोगयुतां मूर्ध्नि वर्गान्त्ययोगिभिः । स्पर्शैर्युतां च मन्यन्ते उपनागरिकां बुधाः ॥" "शेषैर्वर्णैर्यथा योगं कथितां कोमलाख्यया ग्राम्यां वृत्तिं प्रशंसन्ति काव्येष्वादृतबुद्धयः ॥" अशीं त्यांचीं लक्षणें देऊन पुढे क्रमाने "तत्र तोयाशयाशेषव्याकोशितकुशेशया । चकाशे शालिकिंशारुकपिशाशामुखा शरत्" अशीं उदाहरणें दिलीं आहेत. यावरून काव्यांतील वृत्ति या केवळ विशिष्ट वर्णयोजनेवर अवलंबून आहेत ही गोष्ट स्पष्ट होत आहे. या वृत्ति केवळ वर्णध्वनिवैचित्र्य प्रतीत करितात. काव्याच्या प्रथमावस्थेंत या ध्वनिवैचित्र्यालाच प्राधान्य होतें. भरत मुनीने 'वृत्तयः काव्यमातृकाः' असें जें म्हटलें आहे तें याच उद्देशाने होय. या वृत्तीचेंच पुढील विस्तृत रूप म्हणजे छेकानुप्रास,

वृत्त्यनुप्रास, छायानुप्रास, यमक वगैरे शब्दालंकार होत. तात्पर्य, काव्याच्या प्रथम अवस्थेत वृत्तींना फारच प्राधान्य होतें. पुढे काव्यांत अर्थाला प्राधान्य आल्यापासून यांजकडे विद्वानांचें दुर्लक्ष झालें. व वृत्ति आणि रीति एकच समजूं लागले. 'केषांचिदेता वैदर्भीप्रमुखा रीतयो मताः।' असें प्रकाशकारांनी रीति वृत्ति व एकच म्हणून सांगितलें आहे. परंतु रीति ह्या 'श्लेषः प्रसादः समता' इत्यादि दशगुणावर अवलंबून आहेत. वृत्ति ह्या केवळ शब्दादि वर्णविशेषावर अवलंबून आहेत. त्याला अर्थ- व्यक्ति, उदारता इत्यादि अर्थस्वरूपी गुणांची किंवा श्लेषादि शब्दगुणांची अपेक्षा नसते. तेव्हां प्राचीन काली वृत्ति व रीति एक समजत नसत. नाटकांत रसानुरूप कैशिक्यादि वृत्ति सांगितल्या आहेत. त्यांचें स्वरूप या आरभट्यादि वृत्तींहून थोडें निराळें आहे. रा. काणे यांनी मम्मटादि साहित्यपंडितांच्या अनुरोधानें वृत्तींचें स्वतंत्रपणें विवेचन केलें नाही. परंतु साहित्यशास्त्राच्या इतिहासांत त्यांचा अवश्य समावेश व्हावयास पाहिजे म्हणून आम्ही येथे थोडेसें हें त्यांचें विवेचन केलें आहे.

आता आपण साहित्यशास्त्रांतील प्रस्थानें अथवा मार्ग यांचा विचार करूं. रीति, अलंकार, रस, वक्रोक्ति, व औचित्य असें ४।५ मार्ग अथवा संप्रदाय आहेत. यांतील पहिला जो रीतिमार्ग त्याचा इसवी सनाच्या आठव्या शतकांतील वामनानें विशेष पुरस्कार केला आहे. तो 'रीतिरात्मा काव्यस्य' 'विशिष्टपदरचना रीतिः' 'विशेषो गुणात्मा' असें सांगून दंडीने 'श्लेषः प्रसादः समता माधुर्यं सुकुमारता। अर्थव्यक्तिरुदारत्वमोजःकान्तिसमाधयः॥' असें सांगितलेलें दहा गुणच मानितो. परंतु यांत विशेष फरक असा आहे कीं, दंडी हा श्लेष, समता, व ओज हे शब्दगुण मानितो व प्रसाद, माधुर्य, अर्थव्यक्ति, उदारत्व, कांति व समाधि हे अर्थगुण मानितो. तर वामन हे दाहीहि शब्दगुण व अर्थगुण मानितो. भोजादिकांनीहि ही वामनाची पद्धतिच अवलंबिली आहे. वामनानें या गुणाप्रमाणे रीतींतहि विस्तार केला आहे. दंडी वैदर्भी व गौडी या दोनच रीति मानितो तर वामन त्यांच्या जोडीला पांचाली रीति मानतो. भोजानें आणखी यांत तीन रीतींची भर घालून वैदर्भी, गौडी, पांचाली, आवन्तिका, लाटीया व मागधी अशा सहा मानिल्या आहेत. दंडीच्या मतें गौड कवि हे सर्वत्र शब्दावडंबर फार करतात. हें त्यांचें अनौचित्य होय. 'अनुप्रासधिया गौडैस्तदिष्टम्' 'इतीदं नादृतं गौडैरनुप्रासस्तु तत्प्रियः।' असें वारंवार त्यानें गौडांची अनुप्रासप्रियता व 'ओजःसमासभूयस्त्वमेतद्गद्यस्य जीवितम्। पद्येऽप्यदाक्षिणात्यानां (गौडानां) इदमेकं परायणम्॥' असें ओजोगुणविशिष्ट पद्यरचनेसंबंधानें जागोजागीं गौडांचा उपहास केला आहे. भामहालाहि अनुचित शब्दावडंबर अभिप्रेत नव्हताच. परंतु त्यानें दंडीप्रमाणे गौडांविषयी अनादर व्यक्त केला नाही यावरून त्याच्या वेळीं ही काव्याची प्राथमिक शब्दचमत्कृतिप्रधानावस्था कमी होऊन गौडांतहि त्या पद्धतीस दंडीसारख्या विद्वानांच्या आक्षेपानें शैथिल्य आलें होतें अशी कल्पना होते; व त्यामुळे दंडीचा काळ भामहाच्या पूर्वीचा ठरतो. तसेच अलंकारांची संख्या, संज्ञा व लक्षणें याविषयी भामह व दंडी यांचें विवेचन पाहून अर्वाचीन काव्यप्रकाशकार इत्यादिकांच्या काळीं परिवर्तन पावत आलेले जें अलंकारविवेचन तें कोणांत दृष्टीस पडतें हें सूक्ष्मतेने पाहिलें तर याबरूनहि या उभय ग्रंथकारांच्या पौर्वापर्याच्या निर्णयास तें उपयुक्त होईल असें वाटतें.

आमच्याजवळ सध्या भामहाचें काव्यालंकार पुस्तक नसल्यामुळे हा प्रयत्न करितां आला नाही. असो. येथपर्यंत विचार केला तर वामनभोजापर्यंत रीतींचें विशेष प्राधान्य होतें, असें दिसून येतें. परंतु पुढे काव्यांत अर्थाचें महत्त्व विशेष आरूढ झाल्यामुळे हे रीति वगैरेवर अवलंबून असणारे शब्दप्रधानवाद मागे पडले असें समजण्यास हरकत नाही.

अलीकडील कांही विद्वानांचा शब्दालंकाराविषयी बराच प्रतिकूल ग्रह झाला असल्याचें दिसून येते. त्यांना अनुप्रास, यमक वगैरे शब्दालंकार विनाकारण कसरत वाटते एवढेंच नव्हे तर मराठी काव्यपद्धतींत रूढ असलेलें चरणांतील अंत्याक्षराचें ऐक्य हेहि दुःसह होऊं लागलें आहे. यांना रीति व वृत्ति यांचीं नांवें तरी माहित आहेत किंवा नाहीत याची शंकाच आहे. प्रस्तुत लेखकास शब्दालंकाराविषयी इतकी तुच्छता दर्शविणें इष्ट वाटत नाही. कारण शब्दालंकाराचा औचित्याने उपयोग केला तर त्यापासून काव्यास मनोहरता येतेच. 'मधुरया मधुबोधितमाधवी-मधुसमृद्धिसमेधितमेधया। मधुकराङ्गनया मुहुरून्मुदध्वनिभृता निभृताक्षरमुज्जगे॥' इत्यादि माघ-कवीचीं पद्यें अथवा 'शिञ्जानमञ्जुमञ्जीर चारुकाञ्चनकाञ्चयः। कङ्कणाङ्कभुजा भान्ति जितानङ्ग तवाङ्गनाः॥' अशा प्रकारची वाग्भटादि कवींचीं पद्यें वृत्यनुप्रासादिकामुळें कोणास मनोहर वाटत नाहीत? उद्यानें, सरोवरें, गिरि, समुद्र, चंद्रसूर्यास्तोदय, राजसभा, राजनगरी, विवाहमंडप वगैरे विषय वर्णन करतांना हे शब्दालंकार उपयुक्त होत नाहीत असें कोण म्हणेल? यासंबंधाने विविध उदाहरणें देऊन शब्दालंकाराचें महत्व पटवितां आलें असते परंतु या प्रसक्त्यानुप्रसक्तीने विस्तार फार होईल म्हणून निरुपायाने तें सोडून द्यावें लागत आहे. तेव्हा साहित्यशास्त्राचे अंगभूत जे अनुप्रासादि शब्दालंकार त्यांचा सर्वथा उपहास करणें उचित नव्हे. या उपहासाने उपहास-कर्त्यांचें शब्दावर प्रभुत्व नसतें, रीतिवृत्ति साधण्याची धमक नाही असेंच एखाद्याने अनुमान केल्यास तें वस्तुस्थितीपासून विशेष दूर आहे असें समजण्याचें कारण नाही. असो हें प्रसंगतः प्राप्त झालेलें विवेचन येथेच संपवून आता आपण प्रस्तुत विषयाकडे वळूं.

वर शब्दालंकाराचें विवेचन केल्यावर अर्थालंकाराची थोडीशी माहिती देणें क्रमप्राप्तच आहे. साहित्यशास्त्रांत अलंकार हा स्वतंत्रमार्ग या दृष्टीने जरी कोणी त्याचें महत्त्व प्रस्थापित केलें नसलें तरी या शास्त्रांत त्यास महत्त्व बरेंच आहे. वामनाने 'काव्यशोभायाः कर्तारोगुणाः। तदतिशयहेतवस्त्वलंकाराः।' असें अलंकारांना काव्यशोभातिशयहेतुत्व सांगितलें आहे. साहित्य-शास्त्रांत या अर्थालंकारांचेंच विशेष प्राधान्य असल्यामुळे 'प्राधान्येन व्यपदेशा भवंति' या न्यायाने याला अलंकारशास्त्र म्हणतात हेंहि ध्यानांत ठेवण्यासारखे आहे. तेव्हा त्यांची थोडीशी कल्पना येण्याकरतां त्याचें विवेचन करणें युक्त होत आहे. कोणताहि विषय सरळ व काटेतोल भाषेत सांगणें हें शास्त्राचें काम आहे. साधी गोष्ट का असेना ती साध्या भाषेत न सांगता चम-त्कारयुक्त पद्धतीने सांगणें हें काव्याचें कार्य आहे. ही चमत्कृतियुक्त पद्धति ज्याप्रमाणे शब्दगत असते तशी अर्थगतहि असते. म्हणून 'चमत्कृतिरलंकारः' असें अलंकाराचें सामान्य लक्षण होऊन बसलें आहे. हे चमत्कृतियुक्त कथन (वर्णन) प्रतिभेशिवाय होत नसल्यामुळे प्रतिभा याला असाधारण कारण आहे. नवनवोन्मेषशाली जी बुद्धि तिला प्रतिभा म्हणतात. दंडी "नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहुनिर्मलम्। अमन्दश्चाभियोगोऽस्याः कारणं काव्यसम्पदः॥' असें काव्यसंपत्तीच्या

कारणांत प्रतिभेला प्रथमस्थान देतो. या प्रतिभाशक्तीचा साहित्यशास्त्रपरिशीलनाने विकास होतो. तेव्हा अशा या विकसित प्रतिभाशक्तीने चमत्कृतिपूर्ण जी वर्णनशैली तीच अलंकार होय. हें अलंकाराचें मनोहर स्वरूप व्यक्त होण्याकरतां आपण त्याचीं कांहीं उदाहरणें घेऊं. आकाशांत नक्षत्रें उदय पावलीं आहेत. व चंद्रोदयामुळे त्याचा प्रकाश आकाशांत चहूंकडे पसरला आहे ही साधी गोष्ट प्रतिभाशाली कवीने "ज्योत्स्नाम्बुनेन्दुकुम्भेन ताराकुसुमशारितम्। क्रमशो रात्रिकन्याभिर्व्योमोद्यानमसिच्यत ॥' अशा रूपकालंकाराने खुलवून सांगितली आहे. या श्लोकाचा अर्थ—या रजनीरूपी कुमारिका चंद्ररूपी गडव्यांतील चंद्रिकारूपी उदकाने हें तारारूपी कुसुमाने प्रफुल्ल झालेलें जें गगनोद्यान त्याचें सिंचन करीत आहेत असा आहे. वर दिलेली साधीच गोष्ट परंतु ती अशा मनोहर रूपकाने सांगितल्यामुळे कितीतरी हृदयंगम झाली आहे. दुसरें उपमेचें उदाहरण पहा. "नेत्रैरिवोत्पलैः पद्मैर्मुखैरिव सरःश्रियः। तरुण्य इव भान्ति स्म चक्रवाकैः स्तनैरिव ॥" याठिकाणीं ज्यांत कमलें वगैरे विकसित झालीं आहेत, चक्रवाक क्रीडा करीत आहेत, असें हें सरोवर आहे ही साधी गोष्ट सांगणें आहे. परंतु ती नेत्राप्रमाणें (सुंदर) पद्मांनी, मुखाप्रमाणे (मनोहर) कमलांनी व स्तनाप्रमाणें हृदयंगम चक्रवाक पक्ष्यांनी तरुणीप्रमाणे सरःश्री शोभत आहेत. अशा उपमालंकाराने सहृदयास विशेष मोदावह होत आहे. याचप्रमाणे मदनाचें सामर्थ्य अप्रतर्क्य आहे, कारण त्याने शंकरालासुद्धां जर्जर केलें हें सांगणें असतां यास पुढील आक्षेपालंकाराने किती सौंदर्य आलें आहे पहाः—'अहो स्मरस्य माहात्म्यं यद्रुद्रेऽपि दशेदृशी। इयदास्तां समुद्राम्भः कुम्भैर्माने तु के वयम्॥' याचा अर्थः—अहो मदनाचें माहात्म्य काय वर्णन करावें. त्याने प्रत्यक्ष भगवान शंकराचीसुद्धा अशी दशा केली. (हें वर्णन शंकर पार्वतीला पाहून मोहित झाला त्यावेळचें आहे.) अथवा आतां आपण येथेंच थांबू या, कारण महोदधीचें पाणी घागरीने मोजणारे आम्ही कोण? या आक्षेपालंकाराने वरील गोष्टच किती सरस वठली याचा मार्मिक विद्वानानीच विचार करावा. याप्रमाणे अर्थालंकारांचीं किती तरी मनोहर उदाहरणें दाखवितां येतील. परंतु इतर विवेचन कर्तव्य असल्यामुळे येथेच थांबणें बरे. येथपर्यंत केलेल्या अर्थालंकाराच्या विवेचनाने आपणास त्याच्या माधुर्याची कल्पना होईल. असें असतां अर्वाचीन कांहीं साहित्य-कोविदांस संस्कृत काव्यांत या अर्थालंकारांचा विस्तार फार झाला आहे म्हणून उद्वेग वाटत आहे, यापेक्षा दुःखाची गोष्ट कोणती! असो; तेव्हा वर दर्शविल्याप्रमाणे अलंकारपद्धतीने खुलविलेला अर्थ वर्णनपद्धतींत वैचित्र्य उत्पन्न करीत असल्यामुळे त्याचाहि काव्यलक्षणांत अवश्य समावेश झाला पाहिजे. म्हणून भामह प्रभृतींनी 'शब्दार्थौ सहितौ काव्यम्' असें काव्याचें लक्षण केलें, व तेंच पुढे मम्मटादिकांनी स्वीकारिलें. शब्दप्रधानवादी दंडीनेहि 'काव्यशोभाकरान् धर्मानलङ्कारान् प्रचक्षते।' असें अलंकाराचें काव्यशोभाकरत्व मान्य केलें आहे. प्राचीन रामायणभारतादि काव्यग्रंथ पाहिलें तर त्यांत शब्दालंकार व अर्थालंकार या दोहोंचाहि भरपूर समावेश केलेला दिसून येतो. तेव्हा उभयांस प्रधान मानणें हें युक्त दिसते. असो आतां आपण ध्वनिसंप्रदायी लोकांचें काय म्हणणें आहे तें पाहूं.

साहित्यशास्त्रधुरीण आनंदवर्धन याने आपल्या ध्वन्यालोकांत प्रथमच "काव्यस्यात्मा ध्वनिरिति बुधैर्यः समाम्नातपूर्वः।' (प्राचीन विद्वानांनी काव्याचा आत्मा ध्वनि म्हणून

सांगितला आहे ) असें सांगून टाकिलें आहे व काव्यांत ध्वनीलाच प्राधान्य असतें हें सिद्ध करून दाखविलें आहे. त्यांनी ध्वनीचे वस्तु, अलंकार, रस असें मुख्य तीन भेद करून त्यांचे अनेक अवांतर भेद केले आहेत. साहित्यशास्त्रांत ध्वनि हा विषय विशेष सूक्ष्म व गहन आहे. ध्वन्यर्थ हा शब्दाने साक्षात् प्रतीत होत नसतो. तो उन्नीत करावयाचा असतो. या उन्नयनांत कल्पनेचें साम्राज्य असल्यामुळे ज्या व्यक्तींत जितकी कल्पनाशक्ति प्रगल्भ असेल तितकें ती व्यक्ति ध्वन्यर्थाचें आकलन जास्त करूं शकेल. ह्या आकलनशक्तीस साहित्यशास्त्रांत सहृदयता असें म्हणतात. आता आपण एक ध्वनीचें उदाहरण घेऊं म्हणजे आपणास त्याची थोडीशी कल्पना येईल " कस्य वा न भवति रोषो दृष्ट्वा प्रियायाः सव्रणमधरम् । सभ्रमरपद्मघ्राणशीले वारितवामे सहस्वेदानीम् ॥ " ही मूळच्या एका प्राकृत गाथेची संस्कृत छाया आहे. हिचा मराठी समच्छंद असा होईल :—' कोण न पावे कोपा पाहुनि व्रणिताधरा प्रियेलागी । सभ्रमरपद्म हुंगिशि हट्टि सदा तूं फलासि अजि भोगी ॥ ' यांत थोडासा शृंगाराचा संबंध येत असला तरी विविधध्वनींची कल्पना यांत समुचित झाली असल्यामुळे या पद्याची निवड केली आहे. याचा अर्थ समजण्याकरता ज्या प्रसंगी या पद्यांतलि उपदेश केला आहे त्याची थोडीशी माहिती देणे भाग आहे. एक स्वैरिणी उपनायकाशीं संगत झाली असतां त्या प्रसंगी तिच्या अधरोष्ठाला व्रण झाला. पुढे पतीने तो व्रण पाहिला असता तिच्या सवती, आसपासची मंडळी, कांही विदग्ध जन आणि गुप्तस्वरूपी तिचा उपपति या सर्वांदेखत तो तिची निर्भर्त्सना करूं लागला. त्यावेळी त्या व्रणिताधरेची एक सखी तिच्या पतीला आपण पाहिलें नाही असें दाखवून तिची घडलेल्या दोषापासून मुक्तता करण्याकरता तिला हा उपदेश करीत आहे. या पद्याचा अर्थ ' आपल्या प्रेयसीचा अधरोष्ठ व्रणयुक्त झालेला पाहून कोणास राग येणार नाही बरें ! हे भ्रमरयुक्त पद्मांचा नेहमी सुवास घेत बसणारे हट्टी मुली, आता काय होईल तें सहन कर असा आहे. याचा हा सरळ अर्थ सर्व लोकांस वरकरणी दाखविण्याकरता त्या मुलीस उद्देशून उपदेशरूपी आहे. परंतु या भाषणाने त्या चतुर सखीने कोणा कोणास उद्देशून काय काय सुचविलें तें पहा. हिचा अधरव्रण भ्रमरकृत आहे असें सुचविण्याने तूं हिजविषयी भलती शंका घेऊं नकोस असें तिच्या पतीस सुचविलें जात असल्यामुळे हें व्यंग्य तिच्या पतीला उद्देशून आहे. याचप्रमाणे पतीने तिची निर्भर्त्सना केली असता आसपासच्या लोकांना तिच्याविषयी जी शंका उत्पन्न झाली होती तीहि याच व्यंग्यार्थाने दूर होत असल्यामुळे त्यांना उद्देशूनहि हें व्यंग होत आहे. पतीने तिची निर्भर्त्सना केलेली पाहून मनांत संतुष्ट झालेल्या तिच्या सवतींना, ही पतीची आवडती आहे या अर्थी ' प्रिया ' या शब्दाने तिचें सौभाग्य सुचविलें आहे. तेव्हा 'प्रियायाः' या पदाने उन्नीत होणारें व्यंग्य तिच्या सवतींना उद्देशून आहे. तेथे गुप्तरूपाने स्थित असलेल्या उपनायकाला, तुजवर अनुरक्त असलेल्या हिचें आज मी याप्रमाणे रक्षण करीत आहे तर पुनः असा अधरव्रण करूं नकोस अशी सूचना दिली जात असल्यामुळे हें व्यंग्य त्या उपनायकाला उद्देशून आहे. व या भाषणचातुर्याने यावेळी मी हिचा जनापवाद कसा टाळला असें या भाषणाने तेथील विदग्ध लोकांना आपलें चातुर्य पटविल्यामुळे हें व्यंग्य विदग्ध लोकांना उद्देशून आहे. याप्रमाणे वरील एकाच वाक्याने तेथे जमलेल्या विविध वृत्तींच्या

लोकांना विविध व्यंग्यार्थ प्रतीत करून दिल्यामुळे हें ध्वनीचें उत्तम उदाहरण होय. येथे प्रत्येकास प्रतीत झालेला अर्थ वाच्यार्थ नव्हे हें स्पष्टच आहे. आता वाच्यार्थापासून व्यंग्यार्थ-परंपरा कशी उद्भूत होते याविषयी एक उदाहरण देऊन हें ध्वनिप्रकरण पुरें करूं. " पश्य निश्चलनिःस्पन्दा बिसिनीपत्रे राजते बलाका । निर्मलमरकतभाजनपरिस्थिता शङ्खशुक्तिरिव ॥ " हीहि वरीलप्रमाणेच एका प्राकृत गाथेची छाया आहे. या आर्येचे हि मराठींत " नलिनी पत्रिं बलाका शोभे निस्पंद निश्चला बघ ही । रुचिरीं मरकतपात्रीं ठेवियली शंखशुक्तिका जणु ही ॥" या गाथेचा अर्थ :— कमलिनी पत्रावर अगदी स्तब्ध अशी ही बलाका बसली आहे. ती पांचेच्या पात्रांवर ठेवलेल्या शिंपाकृति शंखाच्या झाकणाप्रमाणे शोभत आहे, पहा; असा आहे. ही उपनायकाला उद्देशून नायिकेची उक्ति आहे. यांत बलाका अगदी स्वस्थ बसली आहे असें सांगितलें आहे त्यावरून त्या बलाकेच्या मनांत कोणत्याहि प्रकारची भीति नाही, हा अर्थ सूचित होतो, त्यावरून येथे जनसंचार नाही हें उन्नीत होतें. व त्यावरून हें आपणाला एकांत स्थान ठीक आहे असें ध्वनित केलें जातें. याप्रमाणे वाच्यार्थ जो बलाकानिश्चलत्व त्या पासून ही ध्वनिपरंपरा प्रतीत होते. 'गतोऽस्तमर्कः' 'निःशेषच्युतचंदनस्तनतटम्' 'उपकृतं बहु तत्र' इत्यादि विविध प्रकारचीं ध्वनीचीं उदाहरणें आहेत. वरील उदाहरणांवरून ध्वनीची कल्पना येईल म्हणून आता विस्तार करीत नाही. आनंदवर्धनाने ध्वन्यालोकांत याचें मार्मिक विवेचन केलें आहे. तें शक्य असल्यास वाचकांनी अवश्य पाहावें, म्हणजे ध्वनीचें महत्त्व व विस्तार याची योग्य कल्पना येईल. सर्व साहित्यकार नवरस हें वाच्य नसतात व्यंग्य असतात असें मानितात. रसाचें महत्त्व साहित्यशास्त्रांत विशेष आहे. रसाचा ध्वनींतच अंतर्भाव होत असल्यामुळे ध्वनीचें विवेचन झाल्यानंतर रसाचें विवेचन करणें क्रमप्राप्त आहे. तेव्हा आता आपण ते करूं या.

'शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः । बीभत्साद्भुतसंज्ञौचेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः । व 'शान्तोऽपि नवमो रसः' असें साहित्यकारांनी नऊ रस मानिले आहेत. हे रस शृंगारादि पदाने वाच्य नसतात कारण नुसतें शृंगार असें पद उच्चारिलें असतां त्यापासून त्याची प्रतीति होत नाही. व तो शब्द न उच्चारतां विभावानुभवादिकांच्या योगाने त्याची प्रतीति होते. तेव्हा अशा या अन्वयव्यतिरेकाने रस हे शृंगारादि शब्दांनी वाच्य होत नाहीत हें स्पष्ट होत आहे. तेव्हा रसांची कल्पना येण्याकरतां त्यांची थोडीशी प्रक्रिया सांगितली पाहिजे मनुष्याच्या अंतःकरणांत रति (प्रेम), हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा (किळस) व विस्मय हे भाव फार सूक्ष्म रूपाने सुप्तावस्थेंत असतात. यांना स्थायिभाव म्हणतात. त्यांना प्रथमतः चालना देऊन उद्बुद्ध करणारे जे पदार्थ त्यास अलंकारिकानी विभाव असें नांव दिलें आहे. हे आलंबन व उद्दीपन असे दोन प्रकारचे आहेत. रति (कामीजनांचें प्रेम) हा शृंगाराचा स्थायिभाव आहे. तिचें उद्बोधन नायिकादि दर्शनाने होते म्हणून नायिकादिक आलंबनविभाव होय. चंद्रोदयादिकांनी तिचें उद्दीपन होतें म्हणून तें उद्दीपन विभाव होय. याप्रमाणें रति उद्दीपित झाली असता नायिकेचे तिर्यक् दृष्टिपात, भुजाक्षेप, रोमांचोद्भव, घर्मोत्पत्ति वगैरे शरीराचे ठिकाणीं प्रतीत होणारे विकार हे अनुभाव होत व या रतीचे साहाय्यक म्हणून उत्कंठा,

चिंता, लज्जा, हर्ष, इत्यादि ज्या भावना ते व्यभिचारी भाव होत. यानी रतीचा परिपोष झाला असतां त्या रतिपरिपोषास शृंगाररस म्हणतात. याचप्रमाणे हास्यादिकांचें समजावें. हा रत्यादिकांचा परिपोष आनंदस्वरूपीच असल्यामुळे या रत्यादिकांना आनंदाङ्कुरकंद असें म्हटलें आहे. तेव्हा रस हा सुखसंवेदनात्मक असल्यामुळे व या संवेदनापरिपोषास विभावादिकच कारणें असल्यामुळे केवळ शृंगारादि पदाने रसाची प्रतीति होऊं नये हें युक्तच आहे. आता हे विभावादि पदार्थ नटगत असोत किंवा काव्यगत असोत त्याचें चर्मचक्षूने अथवा ज्ञानचक्षूने आकलन झालें म्हणजे त्यापासून रसास्वादन-व्यापार सुरू होतो. तेव्हा रस हा शब्द वाच्य नाही; तसाच लक्ष्यहि नाही; तर तो विभावादिकांनी गम्य (व्यङ्ग्य) आहे. या रससंबंधाने विशेष विवेचन आणखी एक वेळ करण्याचें मनांत आहे. कारण रा. दत्तात्रेय केशव केळकर यांनी काव्यालोचन पुस्तकांत रस, त्यांची संख्या व त्याचें आस्वादन या विषयावर सुंदर विवेचन केलें आहे. तेव्हा त्यासंबंधाने कांही विचार वाचकांस सादर करावेत अशी मनीषा आहे. तेव्हा हें रसविवेचन विस्तृत करावें लागेल. तेव्हा प्रस्तुत रसाची एवढीच माहिती येथे देऊन भावासंबंधाने थोडें सांगून हें विवेचन पुरें करतो. 'निर्वेद, ग्लानि, शंका' इत्यादि तेहतीस व्यभिचारी भाव सांगितले आहेत. हेहि मनोवृत्तिस्वरूपच आहेत. हें व्यंजनावृत्तीने प्रतीत झाले म्हणजे त्यास व देव, पुत्र, वगैरे विषयीची रति यांस भाव अशी संज्ञा आहे. रस व भाव यांचें एकेक उदाहरण देऊं म्हणजे त्यांच्या चमत्कारांचें वाचकांस स्वरूप समजेल. संभोग-शृंगाराचें पुढील मनोहर उदाहरण पाहा :—

"एकस्मिन् शयने पराङ्मुखतया वीतोत्तरं तामतो—
रन्योनां हृदयस्थितेऽप्यनुनये संरक्षतो गौरवम् ।
दम्पत्योः शनकैरपाङ्गवलनान्मिश्रीभवच्चक्षुषो—
र्भग्नो मानकलिः सहासरभसध्यासक्तकण्ठग्रहम् ॥"

याचा तात्पर्यार्थ 'प्रणयकलहामुळे एकाच पर्यंकावर विन्मुख (पाठमोरे) होऊन बसलेल्या, व परस्परांच्या मनांत परस्परांचा अनुनय (प्रार्थना) करण्याची इच्छा असूनहि आपल्या मोठेपणाचें रक्षण करणाऱ्या त्या दांपत्याची (नायकनायिकांची) हळूच परस्पराकडे वळून पाहतांना दृष्टिभेट झाली असतां तो एकमेकातील मोठेपणाचा कलह भग्न झाला व परस्परानी परस्परास स्मितपूर्वक एकदम दृढालिंगन दिलें.' हें सभ्य शृंगारवर्णन कोणास मधुर वाटणार नाही ? आता भावाचें उदाहरण पहाः—'एवं वादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी । लीलाकमलपत्राणि गणयामास पार्वती ॥ देवर्षि बोलता ऐसे पितृपार्श्वी अधोमुखी । लीलाकमलपत्राते मोजिते पार्वती सुखी ॥ असें याचें समश्लोकी भाषांतर होईल. अंगिराऋषीने याप्रमाणे शंकराची स्तुति केली असतां बापाच्याजवळ उभी असलेली पार्वती खाली मान करून आपल्या लीलाकमलाचीं पानें मोजूं लागली असा या श्लोकाचा अर्थ आहे, व यांतील 'अधोमुखी' व 'लीलाकमलपत्राणि गणयामास' हीं पदें पार्वतीच्या मनातील लज्जाभाव व्यक्त करीत आहेत. असो, यावरून रस व भाव साहित्यशास्त्रांत किती मधुर व महत्त्वाचे आहेत याची वाचकांस कल्पना होईल. आता आपण हें रसविवेचन पुरें करून वक्रोक्तिजीवितकाराने काव्यांत वक्रोक्तिच प्रधान मानिली आहे त्या वक्रोक्तीचें थोडेसें विवेचन करूं,

इसवी सनाच्या १० व्या शतकांत कुंतक नांवाचा मोठा पंडित होऊन गेला. त्याने वक्रोक्तिजीवित नांवाचा साहित्यशास्त्रांत सुंदर ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाची उपलब्धि फार विरळ असल्यामुळे त्यांतील विषयांची माहिती फार कमी होती. डॉ. बेलवलकर यांनी परिश्रमाने मद्रासेंत उपलब्ध असलेल्या एका प्रतीवरून एक हस्तलिखित प्रत तयार करून घेतली. रा. काणे यांनी डॉ. बेलवलकराची प्रत मिळवून तीवरून त्या ग्रंथांतील अंतरंग विषयाची माहिती या ग्रंथांत दिली आहे. आम्हीहि प्राचीन ग्रंथांत कांही कुंतकाचे उल्लेख आढळतात त्यावरून व विशेषतः रा. काणे यांनी दिलेल्या माहितीवरूनच हें विवेचन करीत आहोंत.

सामान्यतः सर्व काव्यवाङ्मयाचें आपण निरीक्षण केलें तर त्यांत सर्वत्र अनुस्यूत असणारी एक गोष्ट दिसून येईल. ती गोष्ट म्हणजे वैचित्र्यविशिष्टवर्णनपद्धति ही होय. या वर्णन-वैचित्र्यालाच कुंतक वक्रोक्ति या संज्ञेने संबोधितो. 'वक्रोक्तिरेव वैदग्ध्यभङ्गीभणतिरुच्यते।' असें त्याचें वक्रोक्तीचें लक्षण आहे. वैदग्ध्याभङ्गीभणति म्हणजे वैचित्र्योक्तिच होय. ही वैचित्र्योक्ति काव्यांत सर्वत्र अनुस्यूत असते म्हणून वर म्हटलें आहे. तें कसें तें आतां आपण पाहू. काव्यांतील विषय पाहिले तर शब्दालंकार, अर्थालंकार, वैदर्भ्यादि रीति, माधुर्यादि गुण व रस हेच त्यांत प्राधान्याने दिसून येतात. अनुप्रासयमकादि अलंकारांत वर्ण किंवा वर्णसमुदाय यांची वैचित्र्यविशिष्ट आवृत्तिच असते; तेव्हां ती एकप्रकारें ध्वनिचमत्कारामुळे वक्रोक्तिच होत आहे. अर्थालंकारांचीं पूर्वी उदाहरणें दिलीं आहेत त्यावरून अर्थचमत्कृति किती मनोहर असते हें वाचकांस ज्ञात आहेच. तेव्हा सर्व अलंकारांना वक्रोक्ति म्हणण्यास हरकत नाही. याच अभिप्रायाने भामहाने 'सैषा सर्वत्र वक्रोक्तिरनयार्थो विभाव्यते। यत्नोऽस्यां कविना कार्यः कोलंकारोऽनया विना॥' असें वक्रोक्तीचें वर्णन केलें आहे. वैदर्भ्यादिरीति ह्याहि विशिष्ट रचनेमुळे मनोहारी असल्यामुळे त्यांचा व त्यांचे अंगभूत ओजः प्रसादादि गुण यांचा या वक्रोक्तींत समावेश करिता येतो. नव रसाचा ध्वनींत समावेश होतो. व ध्वनि हें तर वैचित्र्याचें निधान असल्यामुळे त्यांचा वक्रोक्तींत समावेश होतोच. तात्पर्य सर्व काव्यवाङ्मयाचा अशा रीतीने वक्रोक्तींत अंतर्भाव होत असल्यामुळे काव्यांत वक्रोक्तीला प्राधान्य कुंतकाने दिलें आहे तें युक्तच ठरतें. याच अभिप्रायाने दंडीने 'भिन्नं द्विधा स्वभावोक्तिर्वक्रोक्तिश्चेति वाङ्मयम्।' असें विधान केलें आहे. सारस्वताचे मुख्य दोन भाग आहेत. एक शास्त्र व दुसरें काव्य. सर्व शास्त्रें वास्तवार्थ प्रतिपादन करणारीं असल्यामुळे तीं स्वभावोक्तींत जातात. व काव्यें वैदग्ध्यभङ्गीभणतीमुळे वक्रोक्तींत येतात. तेव्हा हें दंडीचें विधान वास्तवच आहे. येथे टीकाकारांनी स्वभावोक्ति याचा अर्थ स्वभावोक्तिरलंकार असा केला आहे. परंतु दंडीने 'वाङ्मय' असा सर्व सारस्वतास लागू पडणारा शब्द घातला आहे. तेव्हां त्याचा साहित्यवाङ्मय असा संकुचित अर्थ करण्याचें कारण नाही. शिवाय कुंतकादि साहित्यकारांनी स्वभावोक्तिरलंकारच मानिला नाही. तेव्हा आम्ही केलेला अर्थच युक्त वाटतो. वक्रोक्तीचा हा विस्तार सूक्ष्म व विशदपणाने कुंतकाने आपल्या वक्रोक्ति-जीवितांत विवेचित केला आहे ही गोष्ट रा. काणे यांनी आपल्या पुस्तकांत जी माहिती दिली आहे त्यावरूनहि वाचकांस कळून येईल. पूर्वी शब्दालंकार, अर्थालंकार, रस इत्यादिकांचीं जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं सर्व वक्रोक्तीची होत असल्यामुळे येथे वक्रोक्तीचा परिचय

होण्याकरतां निराळीं उदाहरणें देण्याचें कारण नाही. तथापि पूर्वसंप्रदायाप्रमाणे एक वक्रोक्तीचें उदाहरण देऊन हें विवेचन पुरें करूं.

'किं गौरिमां प्रति रुषा ननु गौरहं किं कुप्यामि कां प्रति, मयीत्यनुमानतोऽहम्। जानाम्यतस्त्वमनुमानत एव सत्यमित्थं गिरो गिरिभुवः कुटिला जयन्ति ॥' हा वक्रोक्तियुक्त शिवपार्वती संवाद आहे. शंकर म्हणतात ' हे गौरि मां प्रति रुषा किम् ' म्हणजे हे पार्वती, माझ्यावर उगीच कां रागावतेस. याच वाक्याचा पार्वतीने किं गौः इमां प्रतिरुषा ' असा पदच्छेद करुन त्याचा अर्थ हे गौः (बैलाप्रमाणे निर्बुद्ध पार्वती) इमांप्रति (हिच्यावर) रुषा किं, कां रागावतेस असा विपरीत करुन शंकराला प्रश्न करिते ' ननु गौरहं किम् ' काय मी बैल आहे. व 'कुप्यामि कां प्रति ' मी कोणावर रागावते ? त्यावर शंकर उत्तर देतात. मयीति अनुमानतः जानामि ' माझ्यावर तूं रागावली आहेस हें मी अनुमानाने जाणतों. येथील ' अनुमानतः ' याचा शंकराने अनुमानाने अशा अर्थी प्रयोग केला आहे. परंतु पार्वतीने ' न उमा अनुमा अनुमायां नतः अनुमानतः' असा विग्रह करुन उमा म्हणजे पार्वती तिच्याहून भिन्न जी स्त्री अर्थात गंगा किंवा चंद्रकला ( पार्वतीची सवत ) तिचे ठिकाणीं नत, असा मुद्दाम विपरीत अर्थ स्वीकारुन शंकराला म्हणते खरेंच तूं अनुमानत आहेस खरा. ( अर्थात मग मला राग का येणार नाही. ) याप्रमाणे पार्वतीच्या कुटिलोक्ति ( वक्रोक्ति ) जय पावोत. असें कवीने मंगल केलें आहे. तात्पर्य येथे श्लेषालंकाराने चमत्कृतिपरिपूर्ण वक्रोक्ति झाली आहे. असो, आता आपण क्षेमेंद्राने काव्यांत औचित्याला जें प्राधान्य दिलें आहे त्याकडे थोडेंसें वळूं.

इसवी सनाच्या अकराव्या शतकांत क्षेमेंद्र नांवाचा मोठा कवि होऊन गेला. त्याचें साहित्यवाङ्मयांत पुष्कळ ग्रंथ आहेत. त्याने औचित्यमार्गाचा पुरस्कार केला आहे. तो औचित्यविचारचर्चेत प्रथमच म्हणतो की, '' औचित्यस्य चमत्कारकारिणश्चारुचर्वणे । रसजीवातुभूतस्य विचारः क्रियतेऽधुना ॥ ' येथे त्याने औचित्याला ' चमत्कारकारिणः ' व रसजीवातुभूतस्य ' हीं फार महत्त्वाचीं दोन विशेषणें दिलीं आहेत. त्यावरून त्याचें औचित्य सर्वकाव्यगामी कसें आहे याची वाचकांना कल्पना आलीच असेल. वक्रोक्तीचें विवेचन करतांना आपण पूर्वी काव्यांत चमत्कृतीला किती प्राधान्य असतें व ती काव्यास कशी व्यापून असते हें पाहिलें आहेच. येथे औचित्याला चमत्कारकारी हें विशेषण दिलें असल्यामुळे तेंहि सर्वकाव्यव्यापी होत आहे. क्षेमेंद्राने ' उचितं प्राहुराचार्याः सदृशं किल यस्य यत्। उचितस्य च यो भावस्तदौचित्यं प्रचक्षते ॥ ' असें औचित्याचें निर्वचन केलें आहे. कोणतीहि गोष्ट, देश, काल, परिस्थिति व प्रसंग याला अनुरूप केली म्हणजे ती उचित झाली असें म्हणतात. या औचित्याला व्यवहारांत तारतम्य म्हणतात. हें तारतम्य प्रत्येक गोष्टींत फार उपयुक्त व महत्त्वाचें आहे. वैष्णव लोक प्रत्यहीं पूजेंत तारतम्यस्तोत्र म्हणत असतात. त्यांत देवतांचे गुणधर्म व प्रभाव यांला अनुसरून क्रम दाखविला आहे. ध्वन्यालोककार आनंदवर्धन म्हणतो, ' अनौचित्यादृते नान्यद्रसभङ्गस्य कारणम्। प्रसिद्धौचित्यबन्धस्तु रसस्योपनिषत्परा ॥ ' येथे औचित्याला परा उपनिषद् असें म्हटलें आहे तें फार महत्त्वाचें आहे. आता आपण या औचित्यासंबंधाने एक दोन उदाहरणें घेऊं म्हणजे त्याचें महत्त्व कळून येईल. कविचूडामणि कालिदास याने रघुवंशांत

रामरावणवध करून अयोध्येस परत येत असतांना सीतादेवीला पूर्वानुभूत गोष्टी सांगत आहेत, त्या प्रसंगाच्या वर्णनांत सीतादेवीचा अपहार करून रावण निशाचर ज्या मार्गाने गेला त्या स्थळाच्या वर्णनप्रसंगांत "त्वं रक्षसा भीरु यतोऽपनीता तं मार्गमेताः कृपया लता मे। अदर्शयन् वक्तुमशक्नुवत्यः शाखाभिरावर्जितपल्लवाभिः॥" असा श्लोक आहे. याचा अर्थ 'हे सीतादेवि, तुझा अपहार करून रावणाने ज्या मार्गाने तुला नेलें तो मार्ग बोलण्यास असमर्थ झालेल्या या लतांनी ज्यांचें पल्लव ( अंगुलि ) तुझ्या मार्गाकडे वळविले आहेत अशा शाखांनी–(फांद्यारूप हातांनी) दाखविला. या पद्यांतील रक्षसा, भीरु व लता हीं पदें फार उचित आहेत. कारण रक्षस् हा नपुंसकलिंगी शब्द रावणाला योजिला असल्यामुळे त्याचें क्षुद्रत्व प्रतीत होतें; भीरु या पदाने सीतेची त्यावेळची त्रस्तता व्यक्त होते व लता या स्त्रीलिंगी शब्दाने कोमलचित्तवृत्ति, स्ववर्गीयाविषयी अनुकंपा व स्त्रीवर्गसुलभ दुःखासहिष्णुत्व प्रतीत होत आहे. व त्यामुळे हीं पदें त्या प्रसंगवर्णनाला फार उपयुक्त झालीं आहेत. येथे 'तं मार्गमेते कृपया नगा मे' असें म्हटलें असतें तरी वृत्तहानि व अर्थहानि झाली नसती. परंतु लताशब्दाने प्रसंगाला अनुरूप ज्या गोष्टी वर सूचित होत आहेत म्हणून सांगितलें आहे त्या झाल्या नसत्या. म्हणून येथे 'नगाः' पेक्षा 'लताः' हा शब्दच उचित आहे. तेव्हा हें एक औचित्याचें उदाहरण. येथे प्रसंगतः एका गोष्टीचा उल्लेख केल्यावांचून राहवत नाही. मल्लिनाथ हा उत्तम अभिजात टीकाकार आहे याविषयीं वाद नाही. रा. काणे यांनी एके ठिकाणी मार्मिक टीकाकार म्हणून त्याची प्रशंसा केली आहे ती युक्तच आहे. परंतु त्याचीहि क्वचित् अमार्मिकता दिसून येते. त्याचें प्रस्तुत श्लोकावरील टीका हें उदाहरण आहे. येथे 'वक्तुमशक्नुवत्यः' याला हेतु 'वागिंद्रियाभावात्' असा त्याने दिला आहे. तो अत्यंत अनुचित वाटतो. 'दुःखातिरेकात्' असें म्हणावयास पाहिजे होतें. म्हणजे तो कवीच्या अभिप्रायास धरुन झाला असता. कारण येथे मार्मिक कालिदासाला लतांना वागिंद्रिय नाही म्हणून त्या बोलू शकत्या नाहीत हा अर्थ मुळीच अभिप्रेत नाही. तर शोकातिरेकाने त्यांचा कंठ भरून आला त्यामुळे त्यांना स्पष्ट बोलतां येईना। म्हणून त्यांनी आपल्या शाखारूप हस्तांच्या कोमलपल्लवरूप अंगुलि वळवून तो मार्ग दाखविला हा अर्थ अभिप्रेत आहे, व नेहमीं व्यवहारांतहि दुःखातिरेक झाला असतां हीच गोष्ट दृष्टीस पडते. तेव्हा लतांवर याच गोष्टीचा कवीने आरोप करून हें वर्णन केलें असल्यामुळे तें फार सरस वठलें आहे. लतांना वागिंद्रिय नाही म्हणून बोलतां येत नाही म्हणावयाचें तर त्यांना ज्ञान नसल्यामुळे मार्गहि दाखवितां येणार नाही. परंतु चमत्कृतीकरता त्या ज्ञानशून्य असतांना त्यांच्यावर मार्गदर्शकत्व हें जसें आरोपित आहे, तसेंच त्यांच्या वागिंद्रियशून्यत्वावर दुःखातिरेकामुळे स्तब्धकंठत्वहि आरोपित मानण्यास हरकत नाही. तेव्हा येथे मल्लिनाथाचें कवीच्या अभिप्रायाविषयी अनवधान झालें आहे असें वाटतें. सहृदयांनी या आमच्या म्हणण्याचा विचार करावा. असो. आता औचित्याचें आणखी एक उदाहरण देऊं या. शाकुंतल नाटकाच्या प्रथमांकांत 'चलापाङ्गां दृष्टिं' या पद्याचा चतुर्थ चरण 'वयं तत्त्वान्वेषान्मधुकर हतास्त्वं खलु कृती।' असा आहे. येथे 'अहं तत्त्वान्वेषान्मधुकर हतस्त्वं खलु कृती।' असा एकवचनी प्रयोग केला तरी वृत्तभंग वगैरे कांही होत नाही. असें असतांना 'वयम्' असा बहु

वचनी प्रयोग जो कवीने केला आहे तो फार मार्मिक आहे. कारण त्यामुळे राजांनी आपले ठिकाणीं तरुणीजनदृष्टिविलासमार्मिकत्व, अधररसास्वादकुशलत्व, चाटुवादप्रवीणत्व वगैरे युवतिजनाकर्षक गोष्टी ज्या मागील तीन चरणांत भृंगाच्या व्यापाराने सुचविल्या आहेत त्या भृंगापेक्षा आपणांत कितीतरी अधिकपणाने विकसित झाल्या आहेत हें अत्यंत सरसतेने सुचविलें आहे. तात्पर्य, येथे बहुवचन अत्यंत उचित आहे. असो. याप्रमाणे औचित्याची अशी पुष्कळ उदाहरणें देतां येतील. परंतु दिलेल्या उदाहरणांवरुन वाचकांस औचित्याचें स्वरूप व महत्त्व अवगत होईल असें समजून हें विवेचन येथेच पुरें करतों. याप्रमाणे रा. काणे यांच्या साहित्यशास्त्रेतिहास पुस्तकाच्या दुसऱ्या भागाचें विवेचन येथे पुरें होत आहे. या भागांतील इतर विषयांचें विवेचन ते विषय मतभेदाचे व महत्त्वाचे नाहीत म्हणून करीत नाही असें पूर्वीच सांगितलें आहे.

रा० काणे यांचें पुस्तक वाचलें म्हणजे जवळ जवळ दोन हजार वर्षांचा साहित्यशास्त्राचा इतिहास अवगत होऊन त्या काळांतील ग्रंथकार, त्यांचे ग्रंथ व संक्षेपतः त्यांतील विषय यांची माहिती मिळते. दुसऱ्या भागांत साहित्यशास्त्रांतर्गत माहिती म्हणजे साहित्यशास्त्राचें स्वरूप, त्याचे हेतु, प्रयोजन वगैरे गोष्टी समजतात व त्यांतील रससंप्रदाय, अलंकारसंप्रदाय वगैरे संप्रदायांची माहिती मिळते. रा. काणे यांचें प्रत्येक विधान प्रमाणयुक्त असल्यामुळे त्यांत विवाद करण्यास सवडच रहात नाही व म्हणूनच आम्हीं त्यांच्या त्या चर्चेत विशेष भाग न घेतां त्यांनी ज्या शास्त्राचा व संप्रदायाचा इतिहास दिला आहे त्याचें थोडेसें विवेचन करुन व उदाहरणाने त्याचें महत्त्व वाचकांस पटविण्याचा यत्न केला आहे. हेतु हाच की, या शास्त्राची वाचकांस गोडी लागावी व त्यांनी या शास्त्रांत व्यासंग करुन रा. काणे यांच्या परिश्रमाचें चीज करावें. असो. आता शेवटीं रा. काणे व ओगले यांस प्रेमभावाने एक सूचना करुन हें विवेचन पुरें करतों. रा. काणे यांनी साहित्यशास्त्राचा उगम दाखवितांना वेदकालापासून आरंभ करुन वेदांतील कांही अलंकारांचीं उदाहरणें दिलीं. व पुढील पौराणिक काळांतील काव्यदृष्टीने फक्त रामायणभारतांचा त्यांनी उल्लेख केला आहे. आमच्या मतें येथे श्रीमद्भागवताचाहि उल्लेख असणें उचित होतें. कारण भागवत हा भक्तिरसाचा मूर्धन्य ग्रंथ, जगन्नाथासारखा रसिक पंडित, भागवतपुराणश्रवणप्रसंगीं भगवद्भक्तांना रोमांचाश्रुपातादिकांनी युक्त असा भक्तिरसास्वाद प्राप्त होतो असें त्यांतील भक्तिरसाचें वर्णन करितो. बोपदेवासारखा महापंडित त्यावर त्रिविधटीका करुन त्यांतील नवरसांचा आस्वाद वाचकांस घ्यावयास लावतो. अशा या सन्मान्य ग्रंथाचा साहित्यशास्त्राच्या इतिहासांत उल्लेख अवश्य पाहिजे होता असें वाटतें. तरी त्याचा विचार द्वितीयावृत्ति काढतांना त्यांनी करावा. रा. ओगले यांस प्रेमभावाने एवढेंच सुचविणें आहे की, त्यांची भाषा फार संक्षिप्त असते व तींत कांही ठिकाणीं ‘प्रश्न, प्रतिवचन, प्रयोग दर्शविणारीं वाक्यें’ (पान १३) ‘जातिवाचक नामावरून रूपकाने बनविलेली नाट्यकलेची प्रतिनिधिभूत अशी काल्पनिक व्यक्ति म्हणजे ‘भरत’ (पान १२) अशा संस्कृत शब्दांचा विशेष भरणा केला असल्यामुळे आमच्यासारख्या मध्यम स्थितींतील वाचकांचा वाचण्याचा ओघ अडखळतो. तरी त्यांनी शास्त्रीय विषयाचें प्रतिपादनांत यापेक्षा विस्तृत व सुलभशब्दयुक्त भाषा वापरली तर ती उचित होईल.

असो. शेवटीं या उभयतांनी प्रस्तुत पुस्तक लिहून व आम्हांकडे पाठवून हा विवेचन करण्याचा लाभ मिळवून दिला याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून व त्यांचे हातून असेच ग्रंथ निर्माण व्हावेत अशी सदिच्छा व्यक्त करुन लेखणी खाली ठेवितों.

———

# अभिप्राय

**रत्नावली नाटिका** (मराठी भाषांतर) रचनाकार शां. आ. सबनीस, सॉलि-सिटर मुंबई किं. १ रुपया. )

गुणाढ्याच्या कथेवर रचलेल्या मूळ संस्कृत नाटकाचें हें मराठी भाषांतर श्री. सबनीस यांनी कै. श्री. आ. शां. देसाई यांच्या मदतीने केलें आहे. ह्या भाषांतरांतील पद्य भाग "रचनाकार" श्री. सबनीस ह्यांचा आहे. पद्यें चांगलीं साधलीं आहेत. क्लिष्टत्वाचा अथवा कृत्रिमपणाचा दोष त्यांत नाही. एकंदरींत श्री. सबनीस ह्यांची काव्यशक्ति वाखाणण्यासारखी आहे. पद्य भाषांतर शब्दशः नाही असे त्यांनी अगाऊच सांगून ठेविलें आहे. शब्दशः भाषांतर जरी नसलें तरी चालेल, पण मुळांतील अर्थ भाषांतरांत उतरलाच पाहिजे असे आम्हांस वाटतें. पहिलाच श्लोक घ्या. ह्यांत मुळांतील "र्‍हीमत्या" हा शब्द गाळलेला आहे. मुहुः (वारंवार) ह्या शब्दाचा अर्थ "प्रतिपदीं" ह्या शब्दानें व्यक्त होत नाही. उलट दोष येतो. पायांवर उभी असलेली पार्वती पावलोपावलीं वांकतें असें म्हणणें अनुचित होय. पान २=नटी (विषण्णपणें). कंसांतील विषण्णपणें हें मुळांतील सोद्वेगम् ह्याचें भाषांतर कसें म्हणतां येईल? नटी विषण्ण नव्हती; क्रुद्ध होती. पान २७ "अतिसाध्वसेन" म्हणजे भीतीनें तथापि भाषांतर "लज्जेनें" या शब्दानें केलें आहे. असल्या किरकोळ चुका हयगयीनें झाल्या असाव्या. ह्या गद्यांतील चुका आहेत हें आम्ही विसरलों नाही. पुढल्या आवृत्तीच्या वेळीं तंतोतंत भाषांतर करण्या-कडे अधिक लक्ष्य पुरवावें अशी आमची सूचना आहे.

श्री. सबनीस ह्यांची प्रस्तावना वाचण्याजोगी आहे. त्यांत प्रदर्शित केलेले विचार आम्हांस तरी संमत आहेत. टिपांचें शाठ्य कां केलें समजत नाही. गुणाढ्याची मूळ कथा प्रस्तावनेंत दिली असती तर बरें झालें असतें. पिच्छिका हा संस्कृत शब्द मराठींत तसाच कां वापरला समजत नाही. एकंदरींत किरकोळ बाबी सोडून दिल्या तर रत्नावली नाटकाचें मराठी रूपांतर चांगलें वठलें आहे असेंच म्हटलें पाहिजे. पुस्तकावर परिश्रम घेतले आहेत. सुबक चित्रांनी पुस्तक चित्ताकर्षक केलें आहे. बांधणी सुरेख आहे. शुद्धिपत्र पाहिलें म्हणजे ग्रंथकाराचें लक्ष आपल्या रचनेंत शेवट-पर्यंत कसें वेधून गेलें होतें हें दिसतें. पान २२ वर ७ व्या श्लोकाच्या शेवटच्या चरणांतील पहिला शब्द "धन्यांच्या" हा आहे. धन्य ह्या संस्कृत विशेषणाची ही षष्ठी आहे. परंतु प्रथम धन्यांच्या म्हणजे मालकांच्या—स्वामींच्या हा अर्थ मनांत येतो आणि तसें वाचलें असतां मात्राभंग होतो असें वाटूं लागतें. ही आपत्ती टाळण्याकरतां न् द्वित्त लिहिण्याचा प्रघात पाडणें इष्ट दिसतें. प्रस्तुत "धन्यांच्या" हा शब्द धन्नयांच्या असा लिहावा. ह्या लिपिसुधारणेकडे कोणाचें लक्ष जाईल काय? असो. श्री. सबनीस ह्यांची वाङ्मयसेवा उत्तरोत्तर वाढत जावो असें आम्ही इच्छितों.

## हस्त नक्षत्राचा भोंडला

हस्त नक्षत्राच्या आरंभापासून जोंपर्यंत हस्त नक्षत्र असेल तोंपर्यंत हीं गाणीं फेर धरून म्हणायचीं असतात. पहिल्या दिवशीं एक, दुसऱ्या दिवशीं दोन याप्रमाणे एकेक गाणें प्रत्यहीं वाढवीत शेवटच्या दिवशीं सर्वांत जास्त गाणीं म्हणावयाचीं. एका पाटावर मध्यें सरस्वतीची मूर्ति काढून दोन बाजूला दोन हत्ती काढण्याचा व नंतर पूजा करण्याचा परिपाठ आहे. दररोज एकेक याप्रमाणे खिरापतीही वाढवीत ग्याव-याच्या. शेवटच्या दिवशीं सोळा खिरापती करावयाच्या. शेवटीं एके दिवशीं सर्व मुलींना जेवावयास बोलावून बोळवण करावयाची. अशा तऱ्हेने हा भोंडला १६ वर्षें घालतात.

### गाणें १ लें.

एक लिंबू झेलू बाई, दोन लिंबें झेलूं बाई, तीन लिंबें झेलूं बाई, चार लिंबें झेलूं बाई, पांच लिंबें झेलूं बाई, सहा लिंबें झेलूं बाई, सहा लिंबाचं सारसं, गवऱ्याच्या माहेरीं बारसं.

### गाणें २ रें.

एक लिंबू झेलूं बाई, दोन लिंबें झेलूं बाई, तीन लिंबें झेलूं बाई, चार लिंबू झेलूं बाई, पांच लिंबें झेलूं बाई, पांच लिंबांचा पानवठा, माल घाली हणमंता, हणमंताची निळी घोडी, येतां जातां कमळ तोडी, कमळाच्या पाठीमागें होती राणी, अग अग राणी, एथें कुठें पाणी, पाणी नव्हे यमुना जमुना, यमुना जमुनांची बारीक वाळू, तेथें खेळे चिलारी बाळू, चिलारी बाळूला भूक लागली, सोन्याच्या शिंपीनें दूध पाजिलें, निजरे निजरे वेल्हाळा, गवराई जाते माहेरा, गवराई तूझें ठाणें ग, आतां कधीं येणें ग, आतां येणें चैत्रमास, चैत्रा चैत्रा लवकर ये, हस्त घालीन हस्ताला, देव बसवीन देव्हारा, देव्हाऱ्याच्या चौकटीं, उठतां बसतां लाथ बुक्की.

### गाणें ३ रें.

वाजे चौघडा झुणझुणा, आलाग हदगा पाहुणा, वहाते तुळस दवणा, जाई जुई शेवंती, सुपारी, फुलें ग नानापरी, हार गुंफिते कुसरी, वहातें मी हदग्यावरी, हदगा देव मी पुजितें, सखयांना बोलावितें ॥१॥ लवंगा सुपाऱ्या वेलदोडे, करुनी ठेविले विडे, आणि दुधाचे दुधपेढे, ठेऊनी हदग्यापुढें, हदगा देव मी पूजितें ॥२॥

### गाणें ४ थें.

कृष्णाचें अंगडें बाई, कृष्णाचें टोपडें, शिंप्याघरीं बाई शिवायला टाकिलें, परटाघरीं बाई धुवायला टाकियलें, चंद्रभागेंत खळबळिलें, नागचाफ्यावर वाळविलें, चंदनाचे पाटावर घडी केली, घडीचा घडी रंग, कृष्णाचा पलंग, त्याही रात्रीं जन्मले गोविंद.

### गाणें ५ वें.

आला चेंडू गेला चेंडू राई चेंडू झुगारिला, आपण चाले हत्ती घोडे, राम चाले पायीं, एवढा डोंगर शोधिला, राम कोठें नाहीं, राम ग वेचितो कळ्या, सिता ग गुंफिते जाळ्या, आल्या ग लग्नवेळा, आकाशीं घातला मंडप, जरतारी घातलं बोहलं, जरतन

जरती बसले पाती, पातीनपाती, तिळबाई राळा, तिळबाई राळा मुंजा बाळा, मुंजाबाळाची मुंजक दोरी, तचि दोरी सावधमारी, सवता सवता सरवत कांठ, सरवत कांठाचा शिंपी रहाट, शिंपी रहाटाचे आणा बाई दोर, बांधा चोर बांधा चोर, झाडाशीं, झाड झपकं फूल टपकं.

## गाणें ६ वें.

रायाची घाडी ग व्याली, हस्तक बोंबुळ झाला, चला जाऊं, रायाला सागूं, रायानं धाडिल्या दासी, आल्या ग उंबरापाशीं, त्यांच्या ग नाकींच्या दोऱ्या आम्ही ग बहिणी गोऱ्या, चला जाऊं सुरवरा पाण्या, वाटेशीं भेटला वाण्या, वाण्याच्या हातींचा वीडा, पोफळी लागला कीडा, चुन्याशीं लागला खडा, काताशीं लागली कस्तुरी, अमचंबाई आघाडा, डोंगर करितो धुडधुडा, हरणी लोळते गडबडा, हरणे तुझें दूध ग, तें बाई दूध, अंखण पंखण, अंखण पंखण नक्षत्रें, चंद्र सूर्य कैखत्रें, चांदा सूर्य टिपूरीं, त्याही टिपरीवर पाय कसा देऊं, मामाला लेक झाली नांव काय ठेऊं ?

## गाणें ७ वें.

कमळे कमळे दिवा लाव, दिवा गेला वाऱ्यानें, कमळीला नेलें चोरानें, चोराच्या हातांतून सुटली, बाजेखालीं लपली, सासूबाईनीं देखली, मामंजीनीं ठोकली.

## गाणें ८ वें.

काळा चंद्रकळा नेसूं कशी ? गळ्यांत हार वाकूं कशी ? पायीं पैंजण चालूं कशीं ? दारीं मामंजी बोलूं कशी ? दमडीचें तेल आणूं कशी ? दमडीचें तेल आणलें. वन्संबाईचें न्हाणें झालं, सासूबाईची वेणी झाली, भाऊजींची शेंडी झाली, उरलं तेल झाकून ठेवलं, लांडोरीचा पाय लागला, वेशीपर्यंत ओघळ गेला, त्यांतून हत्ती वाहून गेला, उंट त्यांतून पोहून गेला ! सासूबाई सासूबाई अन्याय झाला, चार चाबूक अधिक मारा, दूध भात जेवायला घाला, माझें उष्टें तुम्हींच काढा.

## गाणें ९ वें.

हस्त हा जिवनाचा राजा, पावतो दिनियाचा काजा, तयासी नमस्कार माझा, नमस्कार सरशीवारा, आधीं पडल्या मोठ्या गारा, मागुनी आल्या मेघधारा, धारा दुधाच्या दिसती, त्यानेंही पीकयें पीकती, दहामध्यें सात गेलीं, हस्ताची ग पाळी आली, पडून त्यानें गंमत केली, त्याच्यामुळें चिखल झाला, चिखलामध्यें लावल्या केळीं एकेक केळें मोठालें, हदग्या तुला वाटिलें.

## गाणें १० वें.

धाकुटी चंद्रावळबाई, खेळत अंगणीं, खेळतां खेळतां बाई, कृष्णांनीं देखिली, कृष्णांनीं देखिली, बाई पालवा धरिली, सोडसोड पालवा, मी वैताग घेईन, तिकडे जाईन, बाभूळजी होईन, सुतारजी होईन, चौरंग जे घडवीन, त्यावर मी बैसेन, धाकुटी चंद्रावळ बाई.

सौ. सुशिलाबाई मवरे

# भंडारी लोकांच्या लग्नांतील गाणीं

( लेखक:— विष्णु सदाशिव [illegible] )

रत्नागिरी जिल्ह्यामध्ये किनाऱ्यालगतच्या गांवांतून भंडारी लोकांची वस्ती बरीच आहे. भंडाऱ्यांच्या कित्ते, मोरे, गौड आणि शिंदे अशा चार पोटजाती आहेत. परंतु त्यामध्ये कित्ते भंडारी प्रमुख गणले जातात. भंडाऱ्याचा पूर्वापार धंदा म्हणजे माड "वहाणे" म्हणजे ताडाची जशी ताडी तशी माडाची ( नारळीच्या झाडांची ) 'माडी' काढणें व विकणें. एका काळीं दर्यावर्दी म्हणूनहि भंडाऱ्यांची ख्याती होती व अजूनहि समुद्र किनाऱ्यावरून गलबतांतून किंवा मचव्यांतून थोडीबहुत मालाची नेआण मुंबईपासून तों मलबारपर्यंत कांहीं भंडारी करतात. अलीकडे आपापलें गांव सोडून मुंबईस जाऊन गिरण्यांत काम करण्याची प्रवृत्ति भंडाऱ्यांत बरीच दिसून येते. असो. प्रस्तुत लेखकाच्या आगरगुळें गांवाजवळ ( रत्नागिरीच्या ९ मैल दक्षिणेस ) समुद्रकिनारीं माडबनगुळें नामक गांव आहे व त्यांत भंडाऱ्यांचीच (कित्ते भंडाऱ्यांची) वस्ती आहे. त्यांच्या लग्नविधीची त्रोटक माहिती व लग्नांत निरनिराळ्या प्रसंगीं बायकांकडून म्हटलीं जाणारीं गाणीं या लेखांत दिलेलीं आहेत.

प्रथम वराकडून वधूला मागणी करतात. वधू पसंत पडली व वधूच्या पालकाकडून लग्नाला कबुली मिळाली म्हणजे वधुवरांचे ग्रह पहातात. सहजीं जातक जुळलें तर ठीकच. नाहीतर जोशाकडून रास फिरवतात व जातक जुळेल असें करतात ! उदाहरणार्थ वराचें जातक बोका व वधूचें जातक उंदीर आलें तर चांगलें. पण वधूचें बोका व वराचें उंदीर चालत नाही. असें झाल्यास पुन्हा राशींत फेरफार करवून जातक जुळेल असें करावें लागतें. नवऱ्याचें वर्चस्व पाहिजे.

नंतर वराकडून वधूच्या बापाला 'देज' द्यायचें असतें. देज म्हणजे 'शुल्क'. तें दिलेंच पाहिजे अशी पूर्वापार चाल आहे. परंतु हल्ली कांहीं लोक वधु 'फुकट' देतात किंवा सालंकृत कन्यादानहि करतात. पण ते जुन्या रूढीस धरून नाही. नंतर लग्नाचा मुहूर्त जोशाकडून ठरविण्यांत येतो. मुहूर्त ठरल्यावर सुपारी फोडायची असते. वराकडून लोक वधूकडे जाऊन पांच वाड्यांचे मानकरी घेऊन सुपारी फोडून ती व पानसुपारी आणि खिरापत वाटतात. नंतर वराकडील मंडळी घरीं येऊन लग्नाचें साहित्य तयार करितात. वधूकडेहि त्याचप्रमाणे तयारी होते.

नंतर 'कूळ' ठेवण्यांत येतें. प्रत्येकाच्या कुळांत चाल असेल त्याप्रमाणे कळंब, मारवेल, वड इत्यादि झाडाची खांदी आणून ती तुळशीवृंदावनांत लावून तिची पूजा करतात. व वधूवरांच्या आईबापांनी किंवा त्यांच्या जागीं जीं असतील

त्यांनी तें तोडून घरांत देवाच्यापुढे ' हुलपे ' काढून एका हुलप्यामध्ये ती खांदी ठेवतात. ' हुलपा ' म्हणजे शेर-सव्वाशेर तांदूळ, सुपारी विड्याचें पान व नारळ एकत्र ठेवलेला पुंजा. हे हुलपे देव असतील त्या मानाने त्यांच्या नांवाने काढून ठेवावयाचे असतात. हे देव अनेक असतात. उदाहरणार्थ:– वराच्या व वधूच्या आजोळचा देव, घरचा देव, गांवचे देव, गणपती, आदितनाथ, गांवराखी, पीर, चवाठा, वाड्याचा मालक म्हणजे वास्तुपुरुष, कुळदैवत, सत्यनारायण व चुकलामाकला इ. कूळ ठेवायच्या अगोदर घाणा भरावयाचा असतो.

घाणा भरावयाची जागा हळद, कुंकू, आंब्याचा टाळा, तांदूळ, सुपारी, नारळ यांनी सुशोभित करून पांच सवाशिणी बायका व वधू किंवा वर एकत्र बसून गाणीं म्हणून घाणा भरतात.

नंतर लग्नास जावयच्या दिवशीं वराची ' रेघ धरतात '. म्हणजे दाढीची हजामत करून 'चेहेरा राखतात', म्हणजे वरील भागाची हजामत न करिता कपाळावर मेहेराफीसारखे केंस काढून कांतीव कोरीव शोभा आणतात. रेघ धरून झाल्यावर दायजी, मित्र, सोयरे वगैरे मंडळी वराला विडयाच्या पानांतून मुठींत कांही तरी आंगठी, रुपया, अधेली, पावलीसारखा नजराणा देतात. वधूवरांच्या आईबापांना ह्यावेळीं कोणी कांही देत नाही. नंतर वर आंघोळ करतो व त्यावेळीं त्याच्यावरून एक कांकडा पेटवून ओंवाळून काढून तो म्हाराच्या स्वाधीन केला जातो. वराच्या डोक्यावर सुरी, कोयती, तरवार, यासारखे कांहीतरी हत्यार धरून त्याला आंघोळ घालतात, व त्याच्या आंगारून पांच वडे, पानसुपारी, नारळ, ( असोला ) ओवाळून काढून तें सर्व म्हाराला देतात. म्हार नसल्यास बाहेर ठेऊन देतात. नंतर वराचें उष्टावण होतें. उष्टावणापूर्वी वराची बहीण ' दार धरते '. उष्टावण्याच्या वेळीं मुर्तोळी ऊर्फ मुहुर्तवळी आणि वर एका पानावर जेवतात. नंतर सर्व मंडळी देवांच्या, वडील मंडळीच्या पायां पडून, तोरणांतून बाहेर पडून, मांडवावर विडा ठेऊन, वधू असेल तेथे सर्व मंडळीसह ताशे, वाजंत्री, बाजा, फटाके, बंदुका, लेजीम, पट्टा, बनाटे, ( जळके गोळे गरगर फिरवतात ते ) चक्रें वगैरे फिरवीत जाते.

वधूकडे जावयाच्या अगोदर जामवशावरीं जोशी वराकडून ग्रहपूजन करवतो. गोरज मुहूर्त असल्यास दिवस मावळतांना घटका घालतात. वर जानवशांतून निघून वधूकडे तोरणाशीं जाऊन बसतो. तेथे कूळ ठेवणारी नवराबायको त्याचे पाय धुवून प्रथम त्याच्या उजव्या पायावर व नंतर डाव्या पायावर गंध, फूल घालतात, व नारळाची एक वाटी त्यांत गूळ घालून त्याच्या हातांत देऊन त्याचा हात धरून त्याला मंडपांत आणतात. कूळ ठेवणाऱ्यांनी त्या दिवशीं उपास करावयाचा असतो. लगेच अंतरपट धरून पलीकडे वधूला आणून उभी करतात. व जोशी मंगलाष्टकें म्हणून सूर्यास्तानंतर बरोबर एक घटका भरली की " शुभ मंगल सावधान " होऊन लग्न लागतें. वधू फुलांची माळ वराच्या गळ्यांत घालते व वर तशीच दुसरी माळ

वधूच्या गळ्यांत घालतो. नंतर त्याच ठिकाणीं वधूवरांच्या सभोवती 'बर्मसूत्र' (ब्रह्मसूत्र) गुंडाळून त्याची दोन, पांच वेळ्यांची 'पोवती' करून वर व वधू परस्परांच्या गळ्यांत घालतात. नंतर वधूच्या गळ्यांत माहेरचें, सासरचें व आजोळचें अशीं तीन मणीमंगळसूत्रें बांधतात. यावेळीं वराचा शेला व वधूचें धोतर यांना गांठ मारतात. नंतर वधू व वर त्या जाग्यासभोवती— पाटांसभोवती— पांच प्रदक्षिणा घालतात आणि मग वधू वराच्या पाटावर बसते, व वर वधूच्या पाटावर बसतो. यानंतर जोशी प्रथम त्यांना अक्षता लावतो व त्यांच्या मागून गांवचे अधिकारी, पोलीस पाटील, सरकारी शिपाई, वाजंत्री, गुरव इत्यादि लोकहि त्यांना अक्षता लावतात. त्यांच्या मागून जातीचे अधिकारी, मानकरी अक्षता लावतात. अधिकारीमानकऱ्यांना तीन वेळ हाका मारायची चाल आहे. प्रथम गवाणकर किंवा गावणकर,— मुख्य मानकरी, यांना हाक मारतात नंतर इतरांना. उदाहरणार्थ "गुलेकर कोण मंडळी हाय का ओ बा?" असा तीनदा पुकारा होतो. पुढे अंतरपटाजवळून वधूवर उठून चौकावर (=माच्यावर) प्रथम माच्यासभोवती पांच वेळ प्रदक्षिणा करून, माच्यावर विडा ठेऊन, प्रथम आपआपला उजवा पाय वर ठेवतात, व मग दोन्ही पाय खालीं सोडून बसतात. त्यानंतर दोघांच्या हातांत, हळखुंड, आंब्याचें पान कंकणाने बांधून तीं कंकणें बांधतात. व त्यानंतर 'बासगां' (बाशिंगें) बांधून झाल्यावर कूळ ठेवणारें जोडपें कन्यादान करतें.

"अमक्याची पणती, अमक्याची नात, अमक्याची कन्या, अमक्याच्या पणतवाला अमक्याच्या नातवाला, अमक्याच्या पुत्राला दिली." असा मंत्र तेव्हां उच्चारिला जातो. त्या वेळीं जामाताला धोतरजोडा, उपरणीं, उरमल (रुमाल), आंगठी देतात. व वधूला पुतळी, 'डोईतलें फूल,' व इतर दागिने ऐपतीप्रमाणें देऊन पाणी सोडतात. नंतर वधूसाठी वराने आणिलेले दागदागिने लोकांना दाखवण्यासाठी सुपांत किंवा ताटांत मांडून ठेवतात. [दागिन्यांपैकीं चांदीचे पायांतले तोडे व गळ्यांतली टिका किंवा कानांतले तळप असे दोन नग वधूला न्हाणें होऊन माहेरचें पिवळें पातळ नेसून झाल्यावर ओटी भरतांना देऊन झालेलेच असतात. वर जानवशाच्या घरीं आल्यावर वधूला तिच्या घरीं न्हाणें घालतात नंतर वधूकडील ग्रहपूजन होऊन वधूला घटकेपाशीं बसवतात; तेथें ती देवाची (गौरीहराची) प्रार्थना करीत असते.]

नंतर वधूवरांना कुळापाशीं नेऊन तेथें वधूला वराकडील साड्या नेसवतात व दागिने "सणगारतात". पुढें मंडपामध्यें आणून वधुवरांचे व त्यांच्या करवल्यांचे व बटकवल्याचे पाय धुतात. करवली शिवाय दुसऱ्या मैत्रिणीचेहि पाय धुतात. त्यांना 'ठोकणी' असें नांव आहे. पाय धुण्याचें काम मानकऱ्यानी करावयाचें असतें. नंतर दोहोंकडील यजमानांची म्हणजे व्याह्यांची भेट होते. प्रत्येक व्याही एकेक नारळ घेऊन त्याची पूजा करून दोघेजण दोन दिशांनी पूर्व पश्चिम-येऊन जोराने पावलें टाकीत एक ठिकाणीं मधोमध येऊन एकमेकांवर धक्या मारून आदळतात. नंतर मानकऱ्यांचा

हुकूम घेऊन दोघेहि खाली बसतात. त्यावेळीं म्हणायचा मंत्र—"काशी गंगा दैवगोत, तुमचे लेकरूं आम्ही. तुम्ही सुज्ञान आम्ही अज्ञान बसायस हुकूम?" मानकरी "हुकूम" म्हणतात. करा, सळी, 'सुकना,' 'येरवण' आणि जानवंशाच्या घराचा दिवा अशा पांच वस्तु घेऊन वराबरोबर बायका जातात. नंतर भेटीचे नारळ व तळीचे दोन नारळ असें चार नारळ फोडून त्यांची खिरापत करून गूळ लावून, ती सर्व जमलेल्या मंडळीला वाटण्यांत येते. मागाहून सर्व जमलेल्या मंडळीला भोजन घालतात.

दुसरे दिवशीं सूर्योदयापूर्वी बाजा अगर वाजंत्री वाजवून तोरणाशीं जागा सारवून तेथे वधूवर पांच प्रदक्षिणा घालून सूर्याला नमस्कार करून चौकावर बसतात. नंतर न्यहारीच्या वेळीं घरीं, व इतर मंडळीकडे "ववर" (वधूवर) जाऊन विड्या तोडतात. 'ववर' जातें त्या ठिकाणीं त्यांना खण, नारळ, सुपारी मिळते. 'ववर'हि प्रथम नारळ देऊन पायांपडून आशीर्वाद घेतें.

नंतर दुपारचें जेवण होतें. पुढें न्हाणें, 'काळसवणी' आंबा शिंपणें, वगैरे होऊन वधूवर चौकावर न बसतां ओटीवर, बैठकीवर बसून राहातात. 'खळांत' (आंगणांत) मुहुर्तमेढीजवळ 'निंबवड्या' (एक प्रकारची भाकरी किंवा घावन) फिरवतात. त्याचप्रमाणे वधूवराची 'चाक काढतात' म्हणजे लोण उतरतात म्हणजे मीठ व असोलें भात ओंवाळून काढतात. हे जिन्नस नंतर महाराला द्यावयाची चाल आहे.

वधूकडून वरात निघाल्यानंतर तेथील तोरण, चौक वगैरे सोडून टाकतात. वरात गांवात गेल्यावर प्रथम जानवशाच्या घरीं जाते. तेथून वराच्या घरीं गेल्यावर तेथे वधूवरांचे पाय धुतात. त्यांची पूजा करून त्यांना घरांत घेतात. वधूवर देवांजवळ जाऊन देवाला विडा ठेवून चौकावर बसतात, तेथे पुन्हां त्यांचे पाय धुणें होतें. तसेंच मानकऱ्यांचे, अधिकाऱ्यांचे, सोयरेधायऱ्यांचेही पाय धुतात.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सूर्याला नमस्कार, विडया तोडणें, आंघोळ घालणें, घरांत आंघोळ व कांकण बाशिंगें सोडणें हें जानवशाच्या घरीं होतें. तेथच वधूवरांना नवीन पोषाख करून तीं जातात तेव्हा वराची बहीण 'दार धरते.' त्यावेळीं बहिणीच्या मुलाला आपली मुलगी देण्याचें वर कबूल करतो व बहीण दार सोडते, त्यावेळीं बहीण नारळाच्या एका तुकडयाची खिरापत सर्वांना साक्षी ठेऊन वाटते. नंतर वधूवर स्वतःच्या घरीं येतात. बाशिंगें कांकण सोडण्यापूर्वी कुळाला खंजीर लावून त्याचें विसर्जन करतात. वराकडून पुनः 'हळद काढणीं' करितां वधूकडे जातात त्यावेळीं घरांतून बाहेर पडल्यावर तेथील तोरण चोक वगैरे सोडून टाकतात. वधूचा सासरचें नांव ठेवायचा विधी जानवशाच्या घरांत होतो. काय नांव ठेवायाचें असेल तें मुर्तवळी जिरें व गोड (गूळ) वराला देऊन सांगते. तें जिरें, गूळ सर्व मंडळीला वाटतात. नांव वडील माणसांनीं ठरविलेलें असतें. त्याच वेळीं दोघांचीं वस्त्रें एकत्र गांठ मारून ठेवलेलीं असतात तींहि सोडतात. येथवर लग्न सोहाळयाचें वर्णन झालें.

---

# मुलींच्या खेळांची पूर्वपरंपरा

लहान मुलें व मुली एकत्र जमल्या म्हणजे निरनिराळ्या प्रकारचे खेळ खेळ-ण्यांत तासचें तास घालवितात. हे खेळ विविध असल्याने दुपारपासून संध्याकाळ-पर्यंत चालतात व बहुतेक सर्वांचा त्यांत समावेश होतो. कांही खेळ बौद्धिक असतात व कांही शारीरिक ( व्यायामप्रधान ) असतात. मोठ्या माणसांना या खेळांत कांही स्वारस्य वाटत नाही. तसेंच हजारों वर्षे हे खेळ समाजांत रूढ झाले असून ते परं-परागत आहेत अशी कल्पना स्वप्नांतसुद्धा येणार नाही. खेळ पाहिले तर क्षुल्लक; यामुळे ते लहान मुलांच्या वयोवस्थेप्रमाणे वाटेल त्यावेळी वाटेल तसे मुलें खेळतात असेच वाटणें साहजिक आहे.

कृष्णाची चेंडुफळी, लगोऱ्या, हमामा वगैरे मुलांचे खेळ सर्वांस माहीत आहेत. दशकुमारचरितांतील कंदुकावतीची कंदुकक्रीडा दंडीच्या काळांतील खेळ म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु मुलींचे साधे खेळ वात्स्यायनकालीन आहेत ही गोष्ट कौतुकास्पद वाटल्यावरून त्यांचा उल्लेख या लेखांत करण्याचें योजिलें आहे. वात्स्यायन कामसूत्रांत १८ व्या अध्यायांत खाली दिलेल्या खेळांचा उल्लेख आहे. टीकाकाराने त्या खेळांची समग्र माहिती दिली आहे तशीच लेखांत घेतली आहे. खेळाच्या नांवावरून सहज खेळ समजण्यासारखा असल्यामुळे संस्कृत टीकेचें मराठी भाषांतर दिलें नाही.

( १ ) मधलें बोट धरणें किंवा ओळखणें

मध्यमांगुलिग्रहणम् । अंगुलिविपर्यासेन गोपितुर्मध्यमांगुलेर्ग्रहणम् ।

( २ ) हदग्या

षट्पाषाणकम्ः--यत्र स्वात्म्यानि षट्पाषाणानि हस्तस्य क्रोडेन उत्क्षिप्य पृष्ठेन गृह्यन्ते ।

( ३ ) लपंडाव

सुनिमीलितकाः--यत्र एकस्य कश्चित् नेत्रे निमीलयति शेषाः प्रच्छन्नेष्वात्मानं गोपायित्वा तिष्ठन्ति ततोऽसावुन्मीलितचक्षुर्यद्गृह्णाति तस्य नेत्रनिमीलनमिति ।

( ४ ) गाड्याभिंगोऱ्या

अनिलताडितकाम्ः- यत्र पक्षवत् बाहू प्रसार्य चक्रवत् भ्रमणम् ।

( ५ ) टिपऱ्यापाणी

अंगुलिताडितकाम्ः-- यत्र एकं निमीलितनेत्रं अन्यैर्ललाटे आहत्य केनाभिहतोऽसीति प्रश्नः ।

हे खेळ वात्स्यायन काळापासून म्हणजे सुमारें ६ व्या शतकापासून अस्तित्वांत आहेत यांत शंका नाही. वात्स्यायनाने बऱ्याच बालक्रीडांचा उल्लेख केला आहे, परंतु त्यासंबंधाने टीकाकाराने फोड केली नाही यामुळे त्यांची माहिती मिळूं शकत नाही.

प्र. धों. कानिटकर

# " ताईआई "

( लेखकः—रामचंद्र राजाराम जोशी, औंध. )

हें दैवत मूळ कोकणांतलें आहे असा इकडे समज आहे. पण हल्ली याचें प्राबाल्य माण तालुक्यांतील एक दोन गांवांतच दिसून येतें. कोकणांतून तें इकडे कसें आलें याविषयी नक्की माहिती मिळत नाही. कोणी म्हणतात की, आपल्या मुलाबाळांस रोगराई होऊं नये म्हणून हें दैवत कोणी एकाने इकडे आणलें. कोणी म्हणतात की, वरील गांवांतील एक इसम फिरत फिरत कोकणांत गेला असतां त्याला हें दैवत लागलें, तेव्हा यापासून होणारा त्रास वांचविण्यासाठी त्याने आपल्याबरोबर इकडे आणलें. बहुतेक याच कारणाने घरोघर याचा प्रसार झाला असावा. ज्याला हे दैवत आपणाला लागलें असें वाटत असेल तो शनवार, पौर्णिमा अगर अमावास्या या दिवशीं दिवस मावळण्याच्या सुमारास गांवच्या ओढ्याओहोळींतून एक ताईआई म्हणून व सात तिचीं मुलें म्हणून असे आठ गोटे आणून आपल्या घराच्या अंगणांत अगर परसांत यांची स्थापना करतो. घरांत त्यांची पूजा करीत नाहीत. स्थापना केल्यावर त्या गोट्यांना तेल-शेंदूर लावून त्याच दिवशीं रात्रीं " तेलरांधा " करतात. तेलरांध्या-साठीं तीन कोळव्यांपासून तीन पायलींपर्यंत स्वयंपाक करावा लागतो. पोळया करतातच. पण त्या तेल सोडलेल्या व फिक्या म्हणजे गूळ न घातलेल्या पुरणाच्या असाव्या लागतात. प्रत्येक जिनसांत तेलाचा अंश असावा लागतो. इतकेंच नव्हे तर अन्न शुद्धिदेखील तुपाची न करतां तेलाचीच करावी लागते. अशा तऱ्हेचा सर्व स्वयंपाक नैवेद्याकरतां आणून नैवेद्य दाखवून मग आरती करतात. आरतीसाठी पुरणाच्या दिव्यांत काळ्या सुताची वात घालून तो दिवा सर्व पोळ्यांवर ठेवतात व मग आरती करतात. मग चोळी पातळ, एक सुपली, हिरव्या बांगड्या, जायफळें, मायफळें, हळकुंडें, सुपाऱ्या, खारका, बदाम, खोबऱ्याच्या वाट्या, लिंबें, केळीं व इतर मिळतील तितकीं फळें हीं प्रत्येकीं सात घेऊन, या सर्वांनी ओटी भरतात. नैवेद्य दाखवून आरती करण्याचें काम मूळ पुरुषाचें म्हणजे ज्याने त्या गांवांत हें दैवत प्रथम आणलें त्याचे अगर त्याच्या वंशजांचें असतें. आरतीच्या वेळेस ताईआईच्या मागे सात धान्यांचा दामटा, अंडें, तेल व तिखट ठेवावें लागतें. आरती करून ओटी भरल्यावर ज्यांच्या घरांत हें दैवत आहे असे भाऊबंद व त्यांच्यापैकींच एक सुवासिनी यांच्यासह भोजन करतात. अशा तऱ्हेचा तेलरांधा प्रत्येक तीन वर्षांनी करून पहिल्या ८ गोट्यांत आणखी एक गोटा दरवर्षीं ताईआईचें मूल समजून बसवावयाचा असतो. ज्यांच्या घरीं हें दैवत नसतें त्यांना अशा प्रसंगांत भाग घेतल्यास अगर आरतीचा दिवा पाहिल्यास पाहणाराने हें दैवत आपल्या घरीं स्थापावें लागतें.

## " महादेवी महादेवी "

चैत्री पौर्णिमेस तिन्हीसांजचे वेळीं एका भिंतीवर महादेवी महादेवी म्हणून दोन गंधाचीं बाहुलीं काढून त्यांची पूजा करतात. नंतर तीळ कुटून, त्याचा दिवा करून, त्यांत तेलवात घालून त्या दिव्याने त्यांची आरती करतात. अंबाबाईची आरती म्हणतात. या देवतेप्रीत्यर्थ गतधवा ऊर्फ विधवा सुवासिनी सांगून तिची पूजा करून तिला भोजन घालतात. पूजा करावयाची ती पात्र वाढल्यावर त्यावर एक सुपारी ठेऊन तिची करतात. अशी सुवासिनी न मिळाल्यास वरीलप्रमाणे पात्रीं सुपारीची पूजा करून तें पात्र गाईस चारतात. हा कुलधर्म नवा मुलगा झाला अगर नवी सून घरीं आली तर करतात. या देवतेची आरती केलेला दिवा घरातील मुलींनी म्हणजे माहेरवासिनींनी पाहिल्यास त्यांना वांझपण येतें म्हणून त्यांनी हा दिवा पाहूं नये. सुनेने पाहवयास हरकत नाही. गतधवेबरोबर आणखी एक खरीखुरी सवाष्ण लागते. गतधवेस तेल लावून न्हाऊं घालून तीस लुगडें नेसण्यास देतात. तिळाचा दिवा पूर्वी केलेल्या एका खळग्यांत ठेवतात. तो दिवा गतधवेने जेवण झाल्यावर आपल्याघरीं घेऊन जावा लागतो व तिच्या पाठीमागे दरवाज्यापर्यंत पाणी शिंपडावें लागतें. तीळ न मिळाल्यास कणकेचा दिवा करतात. नवीन सून घरीं आली म्हणजे तिला सहाण्यांत घालावयाची आहे असें म्हणतात.

बाहुलीची पूजा घरचा मालक करतो. सवासणीची पूजा मालकच करतो. पूजा झाल्यावर मुलगा अथवा सून फक्त पाया पडतात.

---

**निवडक भाषणें**:—(दत्तात्रय व्यंकटेश पै ह्यांचीं) प्रकाशक स्वतः लेखक हिंदु छापखाना, मडगांव-गोंवा किं. ८ आणे

श्री. दत्तोपंत पै यांना गोमांतक महाराष्ट्राचे पुढारी व 'हिंदु' पत्राचे संपादक म्हणून सर्व ओळखतातच. पण त्यांच्या भाषणांत स्फूर्ती, मार्मिकपणा, खोंचा आणि व्यवस्थित विचारपृथःकरणात्मक माहिती या गोष्टी सरसहा आढळतात त्या फार थोड्यांना परिचित असतील. तेव्हा या पुस्तकांतील १५ भाषणांच्या वाचनावरून श्री. पै चें उत्कृष्ट सडेतोड वक्तृत्व आणि त्यांचें सर्वव्यापी ज्ञान हींहि वरील गुणांबरोबरच कळून येतील. 'स्वराज्याची मीमांसा,' 'गोमांतकांतील मराठीची स्थिति' हीं भाषणें तर अत्यंत मननीय आहेत. या ८८ पानांच्या पुस्तकावरून गोमांतक—महाराष्ट्राच्या आकांक्षांची इष्ट जाणीव होईल.

# "कोकणांतील शिमगा"

( लेखकः एस्. के. गोखले, द. हैद्राबाद )

फाल्गुन महिन्यांत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे खेळ काढण्याचा प्रघात सर्वत्र आहेच. परंतु कोकणांत विशेषतः रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर तालुक्यांत जितक्या उत्साहाने हें काम पार पाडण्यांत येतें तितकें इतरत्र क्वचितच आढळेल.

या तालुक्यांतील खेड्यांतून पुष्कळ करून ब्राह्मणेतर वस्ती जास्त आहे व त्यांतहि शूद्रांचें प्रमाण मोठें आहे. हे लोक खरोखरच इतके देवभोळे आहेत की, जवळ जवळ प्रत्येक गावांत पांच सहा भगत नाहीत असें होतच नाही. या लोकांचा एक पुढारी असतो त्याला गांवकर म्हणतात. उपरिनिर्दिष्ट लोकांत गांवकराचा अंमल निर्विवाद व अखंड चालतो. असो.

फाल्गुन शुद्ध १० अगर ११ चे दिवशीं संध्याकाळीं देवीचा हुकूम घेऊन गांवकराच्या सांगण्यावरून शिंग फुंकण्यांत येतें. त्याच दिवशीं सायंकाळीं गांवांतील सर्व तरुण, थोर व वृद्ध मंडळी एका मोठ्या झाडाखाली अगर 'मांडा'खालीं एकत्र जमतात व "कापडें लावतात." कापडें लावणें म्हणजे प्रत्येकाने आपापले ऐपती-प्रमाणे उंची पोषाख चढविणें. पुष्कळ लोक तेवढ्या वेळेपुरती उसनीं 'कापडें'हि आणतात. अशा रीतीने कापडें लावून तयार झालेल्या मंडळींला 'खेळे' असें म्हणतात.

खेळ्यांमध्ये मुख्य दोन भाग आहेत. ( १ ) डफखेळे ( २ ) कापडखेळे. 'डफखेळे' हें नाम विशेषकरून लहान मुलें व साधारण नाचणाऱ्या बऱ्या मंडळीला मिळून लावतात. ह्यांचा नाच डफावर असतो. प्रत्येक मेळ्यांत दोन डफ व दोन झांजा जरूर असतात. डफ वाजवणाराला 'डफ्या' म्हणतात व तो ज्या चालीवर वाजवील त्या चालीवर इतरांनी नाचावयाचें असतें. प्रत्येक डफखेळ्याजवळ दोन दोन टिपऱ्या असतात. यांनी बाहेर "घेर धरला" म्हणजे 'डफ्या', दोन झांज वाजवणारे व दोन लावणी सांगणारे एवढी मंडळी त्या घेराचे गर्भांत राहतात. लावणी सांगण्याचा प्रकार फार मौजेचा असतो. झांज वाजवणारी मंडळी व इतर दोघे हे नेहमी आंतून जोराने फिरत असतात. लावणी सांगतांना मात्र एकदम उभे रहातात व एकमेकाच्या कानाजवळ तोंड नेऊन व दुसऱ्याची नीट समजूत पाडण्याचा आविर्भाव करून त्यांनी सांगितल्यावर बाहेरील डफ खेळ्यांनी तें म्हणून नाचावयाचें असतें.

'कापडखेळे' हे आपणाला साहजिकच डफ खेळ्यांहून श्रेष्ठ समजतात. ह्यांचा नाच मृदंगावर असून फारच कसबाचा असतो. एका इसमाची एक टिपरी चुकल्यास सर्व डावाचा रसभंग होतो. कधीं तीन लोकांना चुकवून चौथ्याला टिपरी देणें तर कधी एकदम खाली बसून पलीकडच्याला टिपरी देणें; कधी 'गोप' विणणें वगैरे फारच कौशल्याची कवाईत हे लोक करतात. असो.

वर सांगितल्याप्रमाणे दोन तुकड्या केल्यानंतर सर्व मंडळी निशाणांसह गांवोगांव नाचण्याकरितां बाहेर पडते. या वेळीं कर्णे-मोर्शिगांचा गजर होतो. सर्वांच्या पुढे महार लोक मोठमोठे ढोल गळ्यांत बांधून नाचत नाचत पिटतात. अशा रीतीनें शेजारच्या गांवीं जाऊन रात्रौ सर्व मंडळी फराळ करतात व दुसऱ्या दिवसापासून दोनचार दिवस पर्यंत निरनिराळ्या (परंतु ठराविक) गांवांतून नाचत नाचत फाल्गुन शु. १५ चे दिवशीं सायंकाळपर्यंत आपापले गांवीं परत येतात.

या नंतरचा कार्यक्रम फारच मौजेचा असतो. कारण त्या रात्रीं 'होळी' व्हाव-याची असते. कोणचें झाड तोडावयाचें तें आधीच त्यांचे आपसांत ठरलेलें असतें. सुमारें नऊ दहा वाजण्याच्या सुमारास खेळ्यांचा पुढारी (गांवकर) हा इतर दोन चार प्रमुख इसमांबरोबर त्या झाडाच्या मालकाच्या घरीं येतो व झाडाची मागणी करतो. शिवाय देवीचा हुकूम मिळाला आहे म्हणूनहि कळवितो. मालकाची संमति शेंकडा ९९ हिश्शाने मिळते.

झाड तोडण्यापूर्वी मालकाने तेथे जाऊन एक कुऱ्हाड हाणावी असा प्रघात आहे. नंतर खेळ्यांतील पुष्कळ मंडळी भराभर तोडून झाड पाडतात. झाड पडूं लागलें म्हणजे सर्व मंडळी अगदी जवळ होऊन त्याला जमिनीला लागूं न देतां वरचेवर सावर-तात. नंतर तें झाड तोडलेल्या जागेवरून होळीचे जागेपर्यंत जाईपर्यंत जी अभद्र व चावट शब्दांची मालिका मंडळीच्या तोंडून बाहेर पडते ती वर्णन करणें आमच्या शक्तीच्या बाहेर आहे.

रात्री होळीचा कार्यक्रम पुरा झाल्यावर दुसरे दिवशीं सर्व दमलेभागलेले लोक विश्रांती घेतात व द्वितियेच्या दिवशीं पुनः आपापले गांवांत नाचतात. या दिवशीं रात्रीं गांवांतील खोत अगर पाटील यांच्याकडे मोठया प्रमाणावर नाच होतो. दर दोन टिपऱ्यांमध्ये एक फार्स केला जातो.

उपरिनिर्दिष्ट खेळ्यांशिवाय कोकणांत 'कोळीण खेळे' व 'गोमुचे खेळे' असे आणखी दोन भाग आहेत. यांपैकी कोळीण खेळ्यांतील, कोळीण व संकासुर या नटीनटांच्या साहाय्याने पुष्कळ तमासे होतात. 'गोमुचे' खेळ्याची पदें फारच ग्राम्य व शृंगारिक असतात. ह्यांचा खेळ फार कसबाचा नसून समाधानकारकहि नसतो.

अशा रीतीने खेळ पार पडल्यानंतर सबंध गांवाचें एक पोस्त ( वनभोजन ) होतें व सर्वांस देवीचा प्रसाद वाटण्यांत येतो. नंतर घाडी व गुरव घरोघरीं येऊन "शिपणें" करतात, महार सूर धरतात व सर्व शिमग्याचा कार्यक्रम खलास होऊन लोक नेहमीच्या कामास लागतात.

वरील वर्णन फारच त्रोटक झालें आहे. तरी सर्वसाधारण कोकणांतील शिम-ग्याची कल्पना येण्यास पुरेसें आहे असें वाटतें. या लेखाच्या शेवटीं अनुक्रमें 'डफ' व 'कापड' खेळ्यांचें एकेक पद ( जत ) देऊन लेखणी ठेवतों.

### ( डफ खेळ्यांचें पद १ )

॥ जयजथारि जयजथा ॥

राम लक्ष्मण दोघेरे बंधू वनासि पाठविले ॥
वनासि पाठविले नी जानकी सहीत मोकले ॥ १ ॥
आणि चौदा वर्षांचा भवीस वनवास माहित रामाला ॥
आणि चौदा वर्षांचा भवीस वनवास माहित रामाला ॥ जी ॥ २ ॥
आणि तांब्याचि घागर हातांमधि डोले ॥
हातामधि डोले उभि राघूमैना बोले; मग तांब्याची घागर ॥ ३ ॥
आणि चैत्रमासिं वैशाखिं उन्हाळा झाला ॥
उन्हाळा झाला पाण्याचा तुट पडला जी ॥ ४ ॥
अतो साधु जेवली ॥ सून मोडावली ॥
लेकिन पालव ॥ केलारेभाय ॥ जांवय लोळत गेला ॥ ५ ॥
अरे गढींत माझ्या वझे टेळया आम्ब्याशि गाय लाव रक्षीगा ॥ ६ ॥
॥ जयजतारे जयजता ॥

### ( कापड खेळ्यांचें पद )

कोणा एका सावकाराचि कामिना हो ॥ कामिना जी ॥ १ ॥
सकाळींच उठुन हो ॥ उठुन जी ॥ २ ॥
सडासारवण करी हो ॥ हे करी जी ॥ ३ ॥
होता सांधिकोंधित हो । कोंधितजी ॥ ४ ॥
मग डंकला माझ्या हाताला हो ॥ बोटाला जी ॥ ५ ॥
मग बाई अतांग बाइ मी भोळी ॥
बाई भोळी । हाताची झाली होळी ॥
मग बाइ अतांग बाइ मी भोळी ॥ ६ ॥
अतो कांहू गेल्या चवघीजणी ॥ परतुन आल्या दोघीजणी ॥ ७ ॥
अतो कांहू गेल्या चवघीजणी ॥ परतुन आल्या दोघीजणी ॥ ८ ॥

## कोकणांतील खेळ्यांचीं इतर पदें

### जत १ ( कापड खेळ्यांची )

जित्या सर्पावर पाय देऊन गेलारे पाय देऊन गेला ॥
मेलेल्या सर्पान डवस केला ॥ १ ॥
अरे शिक झाली रामा तर नुको जाऊं कामारे नुको जाऊं कामा ॥
शिक झाली रामा तर नुको जाऊं कामा ॥ २ ॥

अहो शिकेन माझें काय होणार हो काय होणार ! ॥
शिकेन माझें काय होणार ॥ ३ ॥
अरे जित्या सर्पावर पाय देऊन गेलारे पाय देऊन गेला
मेलेल्या सर्पान डवस केला ॥ ४ ॥
आणि आई म्हणे माझ्या पोटचा गेला हो पोटचा गेला ॥
आणि म्हणे माझ्या पोटचा गेला ॥ ५ ॥
आणि बहीण म्हणे माझ्या मागचा गेला हो मागचा गेला
बहीण म्हणे माझ्या मागचा गेला ॥ ६ ॥
आणि भाऊ म्हणे माझ्या म्होरचा गेला हो म्होरचा गेला ॥
भाऊ म्हणे माझ्या म्होरचा गेला ॥ ७ ॥
आणि बायको म्हणे माझा चुडा हरपला हो चुडा हरपला ॥
बायको म्हणे माझा चुडा हरपला ॥ ८ ॥
अतो आंब्याची टाळी मोडली धांवगे गोल्यें ॥
पिकलो आंबो टाळ्ये ॥ ९ ॥

( वरील पद्यांत कवीने शिंकेला न जुमानतां काय अनर्थ ओढवतो त्यांचे करुणास्पद चित्र रेखाटलें आहे." )

जत २ ( कापड खेळ्यांची )

सारणीचें पाणी रे बाहो सारणीचें पाणि गाजी ॥
लावीयेलें बागे रे बाहो लावीयेलें बागे गाजी ॥ १ ॥
आणि रंगरूपा आलीरे बाग रंगरूपा आलि गाजी ॥ २ ॥
आणि नारळायेवढा कळा रे बाहो वरण्यायेवढें फुल गाजी ॥ ३ ॥
अतो हातीं धनुस् बाण घेरे रामा ॥
मागच्या गोटच्या लक्ष्मिमणा ॥ ४ ॥

( खेळ्यांचा नाच संपल्यानंतर काली करण्याची पद्धत आहे. यजमानाच्या घरील लहान मुलगा एखाद्या हुषार खेळ्याच्या खांद्यावर बसविण्यांत येतो व त्याला मौजेने सर्वांच्या मध्यभागीं उभा करतात. नंतर दुसरे चार खेळे एक उत्तम मौल्यवान वस्त्र त्याच्या डोक्यावर धरतात व इतर सर्व पुढील गाणें म्हणत त्याचें सभोंवार नाचतात. )

## कालींचें गाणें

काली ये गे काली ये मांड मांड काली ये ॥
बारा गांवा घेऊन गेले ढेप येऊंदे ॥
कालीच्या वेळा मांड मांड केला ॥
घेऊन गेले बारा गांव नारळ येऊंदे ॥
हे ढेप येऊं दे ॥ हे नारळ येऊं दे ॥

वरील गाणें पुनः पुनः म्हणण्यांत येतें. नंतर यजमान एका पत्रावळीवर सुमारें दोनशेर गूळ व एक नारळ ठेवितो. त्यांतील गुळाचा खडा मुलाच्या तोंडांत घालण्यांत येऊन मोठ्याने "गोविंदा" या नामाचा घोष करण्यांत येतो. नंतर मुलाला खालीं ठेवण्यांत येऊन कालींचा 'प्रोग्राम' संपतो. प्रत्येक ठिकाणीं हा प्रोग्राम संपल्यानंतर कर्णा मोरशिंग वगैरेचा गजर होतो. (अपूर्ण)

---

# दिपवाळीचें गाणें २ रें

( पहिलें गाणें मागील जोड अंकांत आलें आहे; त्याची प्रस्तावना पहाणें. )

घरचा धनी न्हाला धुला । गाई खालून चालून गेला
गाइनं त्याला शिरपाव दिला । धन्याचा शिरपाव फाटून गेला
त्याच्या केल्या बारा तेरा वाती । बारा तेरा वाती लोविया
अरे अरे वाघ्रयूनाना । अरे अरे वाघ्रयूनाना
गाइला पाजीन पहिला पान्हा । मग येईन तुझ्या राना

## दिपवाळीचें गाणें ३ रें.

गायख्या गायख्या झोपाटा उघड । गाया जाऊं दे वरल्या रानीं
गायख्या गायख्या झोपाटा उघड । वासरं जाऊं दे खालच्या रानीं
वरच्या रानचा शिंगनी मात । खालच्या रानचा कुंदनी मात
गायख्या गायख्या झोपाटा उघड । गाया जाऊं दे नदीवरी
नदीचं पाणी झिरीमिरी । नदीचं पाणी झिरीमिरी

गायखा—गुराखी; झिगनी मात व कुंदनीमास—गोड व बलवर्धक अशा चाऱ्यांचीं नांवें मात हा शब्द चारा या अर्थानें वापरला आहे.

गाइला झाला ढवळा नंदी । तो हाये शिंगशिंगूड्या
त्याला सोडा काळ्या वावरीं । काळ्या वावरीं बेलाचें झाड
त्याच्यावर बसला सोग्या मोर । सोग्या मोराचीं लांब लांब पख
एक पख आखाडिला । त्याला लावा गंभीर नाडा
आमच्या गांवचा कुणबी येडा । पडत्या पावसांत हाकितो गाडा
गाडा पळे गाडीवाटेनं । चित्तर पळे आडवाटेनं

संपादक—विठ्ठल महादेव घुले,
सदस्य वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर.

---

ढवळा—पांढरा; नंदी-गोन्हा पख-पंख; चित्ता—बहुतकरुन चित्ता ( प्राणी ) असा अर्थ असावा.

# शंका, चर्चा, इत्यादि

## लत्तलूर व बलिपत्तन

सुमारें २॥ वर्षांपूर्वी श्री. वा. र. वर्दे वाळावलीकर यांचें 'गोंयकारां गोंया-भायली वसडणूक पैलें खं' हें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. तेव्हांपासून आतापर्यंत त्याजवर २।३ ठिकाणीं आलेले अभिप्राय, पुस्तक परिचय किंवा परीक्षण हीं मी पाहिलीं. त्यापैकी श्री. वि. स. सुखटणकर यांनी ज्ञानप्रकाशाच्या ता. २७ जानेवारी १९२९ च्या लेखांत प्रस्तुत पुस्तकाचा परिचय करून दिला आहे असें म्हणण्यास हरकत नाही. श्री. प्रियोळकर यांनी विविध-ज्ञान-विस्तारांत लिहिलेले लेख व श्री. दामोदर अच्युत कारे यांनी मनोरंजनाच्या १९३१ मार्चच्या अंकांत लिहिलेला लेख हे परीक्षणात्मक आहेत असें वाटतें. श्री. प्रियोळकर व श्री. कारे या दोघांनीहि श्री. वर्दे यांचे त्यांनी लाविलेल्या शोधांबद्दल अभिनंदन केलें आहे. त्यांनी सोडविलेल्या प्रश्नांना दुसऱ्या बाजू आहेत हें मात्र अभिप्राय देणाऱ्यांच्या किंवा खुद्द ग्रंथकाराच्याहि लक्षांत आलें नसावें असें वाटतें. येथे मला त्यापैकी दोन गोष्टी विषयीच लिहा-वयाचें आहे.

( १ ) राष्ट्रकूट किंवा रट्ट हे आपल्या लेखांतून लत्तलूर किंवा लतलौर किंवा लत्तनूरपुराचा आपलें मूलस्थान म्हणून उल्लेख करतात. हें गांव व हल्ली गोवें प्रांतांत असलेलें लोटली हे गांव हीं एकच असावींत असें सांगून गोव्यांतील लोटलीकार चाड्डे म्हणजेच राष्ट्रकूट असा सिद्धांत श्री. वर्दे यांनी मांडला आहे (पृ. ३६ ते ३९ व पृ. २८). तो मांडतांना त्यांनीं कै. राजवाडे, श्री. वैद्य व डॉ. फ्लीट यांचे लत्तलूरपुरा विष-यींचें तर्क खोडून काढले आहेत. श्री. वैद्य व कै. राजवाडे यांच्या विधानांविषयी मला आज कांही म्हणावयाचें नाही. डॉ. फ्लीट यांच्या मताविषयीं मात्र कांही खुलासा केला पाहिजे. डॉ. फ्लीट यांनी लत्तलूर म्हणजे मध्यप्रांतांतील बिलासपूर जिल्ह्यांतील रत्नपूर किंवा रतनपूर असावें असें एकवेळ सांगितलें होतें हें खरें. पण पुढे त्यांनी आपलें हें मत बदलून नवीन मत मांडलें आहे हें श्री. वर्दे यांच्या लक्षांत आलेलें दिसत नाही. डॉ. फ्लीट यांचें नवीन मत एपिग्राफिआ इंडिकाच्या ७ व्या भागांत पृ. २२६ व २२७ यांत पहावयास मिळतें. त्यांत त्यांनी लत्तलूर म्हणजे लातूर हें गांव असावें असें प्रतिपादन केलें आहे. हें गांव हल्ली निजामच्या राज्यापैकी उस्माना-बाद जिल्ह्यांतील लातूर तालुक्याचें मुख्य ठिकाण व बार्शी लाइट रेलवेचें शेवटचे स्टेशन आहे. डॉ. फ्लीट यांच्या मताप्रमाणेच आहे असें दाखविलें आहे. (एपिग्राफिया इंडिका व्हॉ. १३ पृ. ४१) पण हीं मतें त्यांनी विचारांत घेतलीं नाहीत असें दिसतें. भाषाशास्त्राच्या दृष्टीने **लत्तलूर** पासून **लातूर** बनणें जितकें सहज आहे तितकें **लत्तलूर** पासून **लोटली** बनणें सहज नाही. शिवाय लत्तलूर व लातूर यामध्ये लिंगैक्य आहे. पण लत्तलूर व लोटली यांमधील लिंगभेद उघड आहे. शब्दाचा अपभ्रंश होतांना लिंगामध्ये कधीच बदल होत नाहीं असें नाहीं पण एका शब्दापासून एक समलिंग व एक भिन्नलिंग असे दोन शब्द तयार झाले अशीं उदाहरणें काढलीं तर समलिंगी

शब्दाला जास्त महत्त्व आहे हें सांगावयास नकोच. उ. ने सरिका या नांवापासून ने सरी व निसरें अशी दोन नांवें बनलीं असें जर कोणी सांगितलें तर नेसरी या अपभ्रंशास जास्त महत्त्व दिलें पाहिजे. तद्वत् **लातूर** या अपभ्रंशास **लोटली** यापेक्षा जास्त महत्त्व आहे. लत्तलूर या शब्दाचा दुसरा पर्याय **लत्तनूर** हा शब्द रट्टनुरु या शब्दापासून व्युत्पादतां येणें शक्य आहे. र चा ल, ट वर्गाबद्दल त वर्ग व न बद्दल ल असे फरक अपभ्रंश होतांना झाल्याचीं उदाहरणें दाखवून देतां येतील. रट्टनुरु हा कानडी शब्द असून त्याचा अर्थ रट्टांचें गांव असा होईल ( रट्टन = रट्टांचे, ऊरु = गांव ). लत्तलूर म्हणजेच लातूर असें मानलें तर राष्ट्रकूटांचें मूलस्थान गोवें प्रांतांत नव्हतें असें ठरेल. लत्तलूर म्हणजेच लोटली असें ठरलें तरी चाड्ड म्हणजेच राष्ट्रकूट हें ठरणार नाही. तसें ठरण्यास राष्ट्रकूटांच्या लेखांतून चाड्ड चतूरथी किंवा यामधील एखादें रूप त्यांनी आपल्या स्वतःच्या कुलाचें नांव म्हणून लावून घेतल्याचें दाखविलें पाहिजे. हें जोपर्यंत झालें नाही तोपर्यंत श्री. वर्दे यांच्या तर्काला महत्त्व येऊं शकणार नाही.

(२) जी गोष्ट लत्तलूरपुरासंबंधीं तीच गोष्ट बलिपत्तनासंबंधीची. दक्षिण कोकणांतील शिलाहारांच्या लेखांतून या शहराचा उल्लेख येतो. उ. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या श. १८३५ च्या अहवालांत ४३२ पृष्ठावर 'आसीत्तत्रान्वये [ सिलाराह्वये ] श्रीमान्राजा धंम्मियर: पर: । अधिवेलाकुलंरम्यंयोऽकरोब्दलिपत्तनम् ॥ हें बलिपत्तन गांव म्हणजेच गोवें प्रांतातील बाळ्ळी असें श्री. वर्दे यांनीं ठरविलें आहे. (पृ. ६) या सिद्धांताचीही दुसरी बाजू दाखवितां येईल असें वाटतें. होत्तूर व कोल्हापूर येथील कानडी लेखांत **बळेयवट्टण** असा एका शहराचा उल्लेख आला आहे. ( एपिग्राफिया इंडिका व्हॉ. १६ पृ. ७८ आणि व्हॉ. १९ पृ. ३२ ). या दोन्ही लेखांत **बलिपत्तन** असा शब्द आला नाही हें खरें पण **बळेयवट्टण** व **बलिपत्तन** या दोन शब्दांत इतकें सादृश्य आहे की, दोन्ही शब्द एकच स्थान दाखवीत आहेत अशी खात्री होते. ज्या लेखांत हे गांव आलें आहे ते दोन्ही लेख डॉ. बार्नेट यांनीं संपादिले असून दोन्ही ठिकाणीं डॉ. बार्नेट यांनी एकाच तऱ्हेची माहिती दिली आहे. तींत ते म्हणतात कीं, "हें गांव म्हणजे मलबार जिल्ह्याच्या चिरक्कल तालुक्यांतील बळिअपट्टं किंवा जास्त बरोबर म्हणजे वळपट्टणं हें गांव असावें. याचा उल्लेख टॉलेमी व पेरिप्लस यांच्या ग्रंथांत असून बृहत्संहितेंतील बलदेवपट्टण म्हणजेच टॉलेमीने उल्लेखिलेलें गांव असावें." येथेंही **बाळ्ळी** या शब्दापेक्षा **बळेयवट्टण** किंवा **बळिअपट्टं** किंवा **वळपट्टणं** हा शब्द बलिपत्तनाशीं जास्त जुळता असून बाळ्ळी व बलिपत्तन यामध्ये ज्याप्रमाणें लिंगभेद आहे. त्याप्रमाणें बळिअपट्टं किंवा वळपट्टणं व बलिपत्तन या शब्दामध्ये नाही. यामुळे डॉ. बार्नेट यांचाच तर्क जास्त योग्य असें वाटतें. हें गांव शिवकालापर्यंतहि महत्त्वाचें होतें. शिवकालांत इंग्रजांनी येथे एक वखार घातली होती अशी माहिती मिळते. इंग्लिश रेकॉर्डस् ऑन शिवाजी या पुस्तकांत ती माहिती आहे.

ग. ह. खरे.

## नवखंड पृथ्वी !

" नवखंड पृथ्वी व दहावें खंड काशी " असें म्हणण्याचा परिपाठ आहे; परंतु त्यावरून विशेष बोध होत नाहीं. खंड म्हणजे Continent ( एशिया, युरोप वगैरे ) हा अर्थ ध्यानांत येतो; किंवा खंड म्हणजे तुकडा इतकीच कल्पना होते. वास्तविक " खंड " हें शिल्पशास्त्रांतील परिमाण आहे ही गोष्ट खाली दिलेल्या कोष्टकावरून प्रतीत होईल. सदर कोष्टक अमेरिकन मिशन प्रेसनें इ. स. १८५८ सालीं प्रसिद्ध केलेल्या एका पुस्तकांत दिलें आहे. त्या पुस्तकाचें नांव " A Help in acquiring a Knowledg of the Egnlish Language ' असें आहे. त्यांतून खालील कोष्टक जसेंच्या तसेंच घेतलें आहे--

हें पुढील कोष्टक हिंदूंच्या मुख्य शिल्पशास्त्रांतून काढिलें आहे.

८ परमाणु=१ त्रसरेणु; ८ त्रसरेणु=१ रथरेणु (Atom); ८ रथरेणु=१ बालाग्र ( Tip of a hair ); ८ बालाग्र=१ लिख (Nit); ८ लिखा=१ ऊ (Louse); ८ उवा= १ यव (Barley Corn) ८ यव=१ अंगुळ (Inch); २४ अंगुळें=१ हस्त (Cubit) ४ हस्त=१ दंड; २०० दंड=१ कोस; ४ कोस=१ योजन; १०० योजन=१ देश (Country); ४ देश=१ मंडळ; १०० मंडळें=१ खंड, ९ खंड=१ पृथ्वी (World).

प्र. धों. कानिटकर

( १ ) महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या ४ थ्या वर्षाच्या १-२ ह्या संयुक्त अंकांत "शंकाचर्चा इ० " ह्या शीर्षकाखालीं 'मराठी वाक्यरचना व लेखन नियमन' ह्याविषयीं श्री. केशव ल. ओगले ह्यांनी चर्चात्मक लेख लिहिला आहे; त्यांत १११ व्या पृष्ठावर केसरीच्या लेखांतील वाक्यें उध्दृत करून सुधारणा सुचविली आहे. त्यांतील पहिल्या वाक्यांत " जपले जाण्याची " ह्या ऐवजीं " जपण्याची " अशी शब्दयोजना पाहिजे; व त्याचें कारण 'जप' धातु अकर्मक असल्यामुळे कर्मकर्तरि किंवा कर्मणि प्रयोग होणें व्याकरण दृष्टया शक्य नाही असें त्याचें म्हणणें आहे. ह्यांतील 'जप' धातूने कर्मकर्तरि किंवा कर्मणिप्रयोग होणें शक्य नाही हें खरें, पण तो धातु अकर्मक कां मानावा ? आई **मुलाला** जपते, मी आपल्या **भ्रीदाला** जपलों, मनुष्य **स्वधर्माला** जपेल, इ० वाक्यें भाषेच्या किंवा व्याकरण नियमाच्या दृष्टीनें अशुद्ध नाहींत. मग ह्या वाक्यांतील अधोरेखित शब्द कर्मदर्शक कां नाहींत ? मराठी भाषेंतील सर्व सकर्मक धातूंवरून सगळेच प्रयोग एकाच नियमाने बनत नाहींत. मुलगा साधे शब्द बोलतो, ब्राह्मण वेद पढतात इ० हीं वाक्ये अशुद्ध नाहींत. ह्याचीं कर्मणि प्र० रचना कशी होईल ? सारांश केवळ प्रयोगदृष्टीने धातु सकर्मक किंवा अकर्मक ठरविणें योग्य नाहीं असें मला वाटतें.

( २ ) ह्याच १११ व्या पृष्ठावर 'ग्रंथिक कीं ग्रांथिक ?' ह्यासंबंधी नियमबद्ध-चर्चा श्री. म. ना. गाडगीळ ह्यांनी केली आहे. तरी पण त्या दोहोंतील शुद्ध शब्द कोणता ह्याचा स्पष्ट उल्लेख नाही तो व्हावा.

कृ. गोविंद आठे, गोठणे देवाचें.

## व्युत्पत्ति.

( १ ) **उतार वयः**— याचा अर्थ म्हातारपण असा आहे. संस्कृत "उत्तरं वयः' यापासून मराठींत 'उतार वय' हा शब्द आला आहे.

( २ ) **कोथिंबीरः** — मूळ संस्कृत शब्द 'कुस्तुंबरु' असा असून त्यापासून कोथिंबीर हा शब्द बनला आहे.

( ३ ) **खळमळ** :— मूळ संस्कृत शब्द 'कलिमल' यापासून 'खळमळ' शब्द निघाला आहे. ( भूयात् भारतपंकजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे । )

( ४ ) **जंगलः**— हा तत्सम शब्द आहे. मूळ अर्थ एकांतस्थान, हल्ली निबिड अरण्य. ( जंगलं निर्जने स्थाने । मेदिनी )

( ५ ) **झेंगटः**— पिरपिर, सारखा कोणत्या तरी गोष्टीचा छंद. मूळ संस्कृत शब्द 'जेंगटः' त्याचें रूपांतर 'झेंगट'. जेंगट याचा अर्थ डोहाळे (गर्भवती स्त्रीचे). जेंगटो दोहदः स्मृतः । हारावली. गर्भवती स्त्रीस नित्य नव्या वस्तूची इच्छा होत असते. एका इच्छेची पूर्तता झाली की, पुन्हा दुसऱ्या वस्तूची इच्छा होते. या क्रमावरून वर दिलेले अर्थ झेंगट या शब्दास प्राप्त आहेत.

( ६ ) **धणे-नेः**— मूळ संस्कृत शब्द 'धान्याक' त्याचें प्राकृतद्वारा मराठी रूप धणा-ना.

( ७ ) **नस-साः**— मूळ शब्द स्नसा. ( मस्तुलुंगोऽप्यथ स्नसा । त्रिकांडशेष ) याचें प्राकृतद्वारा मराठींत रूपांतर नस-सा. ( Nerve ).

( ८ ) **बिः**— मराठ्यांच्या बोलण्यांत येतो. अपि याचें प्राकृतांत बि हें रूप होतें. रामोऽपि आगतः । = रामा बि आला.

( ९ ) **रिंगरिंग जाणेंः**— हळुहळु जाणें. मराठ्यांच्या बोलण्यांत येतो. संस्कृत रिग्=रिंगति पासून रिंग; रिग्=हळुहळु जाणें, रांगणें. रांगणें यांतहि रिग् हाच धातु आहे.

( १० ) **लंकाः**— स्वैरिणी स्त्री. हा तत्सम शब्द आहे. लंका रक्षःपुरी शाखा शाकिनी कुलटासु च । मेदिनी. लंका असें वाईट अर्थानें स्त्रियांना म्हणतात.

प्र. धों. कानिटकर

**सुबोध**—(वर्ष २ अंक १) संपादक सां. ब. कंटक, सुरगांव, हारबर (गोंवा) वा. व. ३ रु. सुबोध मालेचें या अंकापासून मासिक झालेलें असून प्रस्तुत अंकांत ३ कविता, ३ गोष्टी, १ व्यापारी लेख (शं. वा. किर्लोस्कर) १ स्फुट लेख (दा. न. शिखरे) व १ पुस्तकसमीक्षण आलें आहे. निवड चांगली आहे. पण या छोट्या मासिकानें इतर मोठ्या मासिकांचें अनुकरण न करितां केवळ विशिष्ट दिशेनें गोमंतकी वाङ्मय निर्मितीचें कार्य करीत राहिल्यास याच्या अस्तित्वाची गरज भासून मोठें देश-भाषा-हितहि साधेल.

# पेशवाईच्या सावलींत*

( लेखकः— ना. गो. चापेकर )

( एका अप्रसिद्ध नाटक मंडळीची व त्यांतील कांहीं नटांची माहिती )

रघुनाथ हरी उर्फ तात्यासाहेब चिपळूणकर यांच्या प्रोत्साहनाने व आश्रयाने एक पौराणिक नाटकें करणारी मंडळी शके १७७७ च्या पूर्वी स्थापन झाली. कदाचित् ही मंडळी पुणेकर मंडळी म्हणून ओळखली जात असेल. चिपळूणकर यांच्या दप्तरीं जीं पत्रें संग्रहित आहेत त्यांवरून ही मंडळी लौकरच फाटाफूट होऊन मोडली असावी असें वाटतें.

बभ्रुवाहन, कूर्मावतार, सीताहरण, विराटपर्व, पारिजातक, रासक्रीडा, वालीवध, अंगदशिष्टाई, नरसिंहाख्यान, द्रौपदी स्वयंवर व सीतास्वयंवर इतके पौराणिक खेळ या मंडळीने केल्याचें पत्रव्यवहारावरून दिसतें. त्या वेळच्या इतर पौराणिक नाटकमंडळ्या अशाच प्रकारचे खेळ करीत असले तरी प्रत्येक मंडळीचे खेळ निरनिराळे असावेत असें आम्हांस वाटतें. त्यावेळेस नाटकें तयार करण्याचा एक मोठा कारखानाच महाराष्ट्रांत होता असा भास होतो. त्यावेळीं छापण्याची कला नव्हती व निरनिराळ्या मंडळींत वैमनस्य असे. त्यामुळे एकाने रचलेलें नाटक सर्व कंपन्या करीत असें मानणें चुकीचें होईल. प्रत्येक मंडळींत नाटक रचणारा कोणीतरी असेच. ह्या पुणेकर मंडळीला " चिपळूणकर मंडळी " असें सुखबोधार्थ नांव आपण देऊं. ह्या चिपळूणकर मंडळींत नारो रामचंद्र सोहोनी या नांवाचा एक हुशार माणूस होता, तोच नाटकें रची. " हल्ली उत्तररामचरिताच्या कविता चालल्या आहेत " " मी दहा बारा नाटकें तयार करून ठेवितों " " आपल्या आज्ञेप्रमाणे श्रियाळ आख्यान करावें तर मजजवळ ग्रंथ नाही, आपण पाठविलेल्या हॅन्डबिलावरून होणें अशक्य " "आमच्या कवितांची वही चोरीस गेली" "येथे रा. त्रिंबकपन्त व बाळकृष्ण सांगलीकर यांनी आमची आख्याने चोरून नेली, त्याजमुळे बारसी मुक्कामी त्यास घालवून दिलें." " हल्ली आतां आमची सात नाटकें तयार आहेत व आणखी कांही जास्त करण्याची तजवीज चालविली आहे ". अशा प्रकारची माहिती नाना सोहोनी याने पत्रद्वारें चिपळूणकर यांस दिली आहे. ह्यावरून या मंडळीची सर्व नाटकें सोहोन्याने बनविलीं असावींत असें वाटतें.

---

* या लेखांतील टीपा रा. शं. बा. मुजूमदार यांचे माहितीवरून दिल्या आहेत.

तात्यासाहेब चिपळूणकर याना लिहिलेल्या एका पत्रांत त्याने केलेली एक आर्या आढळली, तिच्यावरून नानाची काव्यशक्ति कळून येईल. ती आर्या अशी:—

" मत्पासून दातरा जरी घडले अपराध चित्तिं नाणावे ।
विनयें प्रार्थित तुम्हां बालक तुमचाच चित्तिं आणावें ॥

नाना हा सांगलीजवळ गणेशवाडी येथील राहणारा होता. खानदेशचे असिस्टंट कलेक्टर ग्रँटसाहेब यांचा पंचवीस रुपयांवर खाजगी कारकून होता. बहुधा त्यांना हा मराठी शिकवीत असावा. याला बुद्धिबळें चांगली खेळतां येत होतीं. परंतु पुढे हा व्यसनाधीन झाल्यामुळे मंडळीला याला काढून टाकणें भाग पडलें. " नानासाहेब सोहनी[1] यांनी नाशीक येथे जो प्रकार फटीशूलाचा केला तो पत्रीं लिहिता येत नाही." अशी तक्रार चिपळूणकर यांजकडे मंडळींतील लोकांनी केलेली आढळते.

या नाटक मंडळींतील मुख्य स्त्रीनट गोविंदा काळे हा असावा असें "त्याच्या अंगची चोळी करणें आहे तरी त्याला खण पाठवावा" या वाक्यावरून वाटतें. या मंडळींतील दुसरे नट ( १ ) बाळशास्त्री आडकर ( २ ) बापूजी बाजी खरे ( ३ ) बासूनाना ऊर्फ वासुदेव जनार्दन ताम्हनकर ( ४ ) बाळकृष्णपन्त ओक ( ५ ) कृष्णाजी हरी रहाळकर ( ६ ) सोनोपंत दाते ( ७ ) अण्णा सोहनी ( ८ ) विठू सोहोनी ( ९ ) मोरभट गोडबोले ( १० ) बाबाजी शिवराम अभ्यंकर व ( ११ ) वे. शा. सं. रा. रा. परशरामशास्त्री पाटणकर असे होते. लक्ष्मण गोपाळ दाते याचें दुसरें नांव सोनोपंत असावें. याशिवाय १ गणपतराव २ व्यंकाप्पा ३ केशवराव भोवळकर हेहि या मंडळींत समाविष्ट असल्याचा संशय येतो.[2] शास्त्री व भिक्षुक हेहि नाटकांत जाऊन सोंगें घेत ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. या मंडळींत प्रथम विनायक गोपाळ फाटक या नांवाचा मनुष्य सूत्रधार असावा. नंतर सांगलीकर मंडळींतील वासुदेव म्हणून कोणी एक मनुष्य हेंच काम करण्यास आला असावा असें खालील वाक्यावरून वाटतें. " सांगलीकरांपैकी वासुदेव येथे येऊन सूत्रधाराचें काम चालवितो. त्यास सर्व आख्याने येतात. आतां सोहोनीची मुळीच गरज नाही. "

या मंडळीचा दरमहा भोजनखर्च ७५।८० रुपये असे; नाटकाला शंभर रुपये मिळाले म्हणजे नाटक फार यशस्वी झालें अशी समजूत होती. रुपया, आठ आणे, चार आणे असे नाटकाचे दर असत. तिकिटें लावून नाटक होई व हीं तिकिटें छापलेलीं असत. एका नाटकाच्या तिकिटांचा हिशेब एका कागदावर आढळला तो येणेप्रमाणे :—

---

१ नाना सोहनी यांची माहिती अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या चरित्रांत पृष्ठ १७–१९ मध्ये आहे.

२ हे बुधवार वाड्यांतील शाळेंत हेड मास्तर होते. यांच्या हाताखालीं सोहनी मास्तर होते.

जमा

२१२ एकंदर छापून आली
तिकिटें ५९८

| | | | |
|---|---|---|---|
| ५० | १ रुपयाप्रमाणे | ५० | |
| ५० | ·॥· प्रमाणे | १०० | |
| ११२ | ·।· प्रमाणे | ४४८ | |
| २१२ | | ५९८ | |

वरील नाटक ता. १० मार्च १८५५ रोजीं झालें. नाटकाचें उत्पन्न किती होई हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

जमाखर्च गु. नाना सोहोनी फा· व· ८ श. १७७६

नाटकांची जमा

३१९। रु.

| | |
|---|---|
| ९८ | पहिले नाटकाबद्दल |
| १०७८= | दुसरे नाटकाबद्दल |
| ११०८= | तिसरे नाटकाबद्दल |
| ४ | तिकिटें; उधारी |
| ३१९। | |

एका खर्चाच्या टिपणावरून माहिती मिळते ती.

| | |
|---|---|
| २० | मांडवाचे मक्त्याबद्दल |
| ३ | रावणाचे मुखवट्यास |
| ४॥ | खुर्चीबद्दल |
| ६॥। | छापणावळीबद्दल |

पुण्यास सांगलीकरांचे वाड्यांत नाटकाचे [illegible] लोकांना बसण्याकरितां नवीन 'बोटे' घातले त्याला २[illegible] रु. [illegible]॥ आणे खर्च आल्याचें नमूद आहे.

## सांगलीकरांवर मात करावी हा पुणेकरांचा उद्देश होता.

श्री

राजमान्य राजश्री नानासाहेब यांसीः—

विनंती विशेष. तुम्ही हणमंता याजबरोबर पत्र पाठविले ते पाहून लिहिला मजकूर कळला. हल्ली येथे सांगलीकर नाटकवाले येऊन त्यांनी दोन नाटकें केली. एक सीताहरण व दुसरें उत्तररामचरित्र. येते शनिवारी रामाचा राजवियोग नाटक-करणार व पुढे सुमारें दहा नाटकें करावयाचा बेत आहे कारण की, त्यास येथें कोणी

स्पर्धी राहिला नाही व दुसऱ्या लोकांनी आमच्यापुढें नाटकें काय करावयाची आहेत असें त्यांचे म्हणणें. त्याप्रमाणे तुम्हाकडून जो गडी आला त्याने येथे वर्तमान सांगितलें की, तुमचे नाटकांतील मंडळींचा बेबनाव आहे व तंटेबखेडे होऊन नाटक मोडले असे ऐकल्यावरून तर आतां ते निरवैर होऊन लोकाजवळ पाहिजे तशा गप्पा मारतात व आमचेकडेही कार्याकारण येतात जातात. तुम्ही येथे थिएटरांत नाटक करून वाहवा मिळविली व बाहेरही बराच लौकिक होऊन तुमचे गुणाची चीज झाली. परंतु त्याचे अन्तःकरणांत जो मोठेपणा आहे की, आमच्यापुढे उभे राहून वाहवा मिळविण्याची मुष्कील. त्यास बाहेर कोठें तरी जाउन पैसाच मिळवावयाचा त्यापेक्षां पुण्यांत येऊन महिनाभर मुक्काम करून पांच चार नाटकें जी चांगलीं असतील ती करून त्याची खात्री झाली म्हणजे पुढे जशी मर्जी असेल तिकडे जाण्यास कांही हरकत नाही. तुम्ही नाटक तयार करण्याचे कारण केवळ पैसाच मिळविण्याचे होते असे नाही. फक्त ईर्षेचे कारणाने वाहवा मिळावी व गुणाची चीज व्हावी व पृथ्वीचे पाठीवर त्यापेक्षां जाजती करणारे आहेत असे लोकांस वाटावें त्याप्रमाणे झाले. आतां इतके दिवस श्रम करून जितका गुण दाखविला तो येथें त्या समक्ष आल्यानें म्हणजे कमी होईल असें नाही. श्रीदत्तात्रय कसा तरी आश्रय देईलच व कित्येक मंडळीचे मत आपलेकडेही आहे. तुम्ही आमच्याजवळ इतके दिवस ज्याप्रमाणें वागणूक ठेविली त्याचे श्रेय घेऊन पुण्यांत विशेषपणा मिळवाल अशी आमची खातरजमा आहे. त्यास आम्हास जें कळलें तें तुम्हास लिहिलें आहे. यापुढे तुमची मर्जी. सारांश ज्याच्याशीं ईर्षा करून तुम्ही नाटक केले ते म्हणजे तुमच्या गुणापेक्षां फारच उत्कृष्ट आहेत असें आमचे मत नाही. व जे आमचे नाटकांत आहे तें त्याच्यांत नाही असे आमचे अन्तःकरणांत पूर्ण वाटते. त्यास सर्वमंडळी एक दील होऊन रात्रीचा दिवस करून पुढील शनिवारचे आंत येथे येउन दाखल होऊन त्याचे नाटकाचे दिवशींच नाटकाची तयारी करावी व लिहिले याजवर तुमचा भरवसा असेल असे जाणून लिहिलें आहे.

श्री

राजमान्य राजश्री नाना सोहनी–बापू मोरभट व निळकंठ[1] कृष्णराव बळवंतराव व गणपतराव भट व अनंत व मार्तंड व भिकोबा व्यंकापा बावाजी शिवराम गोविंदा हुडेकर व गोविंदा काणे उभयतां रामभाऊ गणु करंदीकर व खेडकर व नेवासकर वगैरे मंडळीस कळावे की, जो बापूस मजकूर लिहिला आहे त्याप्रमाणे इकडे येण्याचे करावे. कारण तुमचे नाटक लावले पोट भरण्याकरिता नाही. सर्वमंडळीस घरची प्रपंचाची काळजी नाही. ज्या हेतुनें नाटक केले तो हेतु पूर्ण होण्याचा समय हल्ली आला आहे.

---

१ निळकंठशास्त्री घारपुरे मराठी शाळा नंबर ४ चे हेडमास्तर मोरोपंत घारपुरे यांचे बंधु-सदर मोरोपंत घारपुरे यांचे चि. हयात आहेत.

तरी या समयी हजर होऊन केले कामाची चीज करून येथे वाहवा मिळवून नंतर जावे, असा आमचा इरादा आहे. तर जी जलदी होईल ती करून फार लवकर इकडे यावे. श्रीदत्तात्रय कृपेनें मदत होणे ती होईल व निश्चय पार पाडणें त्याजकडेसच आहे. या उप्पर जर सर्वांनी पोटावरच नजर देऊन मुलुकात जाणेचे असेल तर करणें असेल तें करावे. जर तुम्ही न आला तर इतके दिवस जे काय तुमचे बोलणें होते ते अन्तःकरणांतीलच होते असें आम्हास वाटणार नाही. फक्त वरचेवरच होते. मजकूर विशेष लिहून कळवावा असा नाही. सर्वांस माहीत आहेच.

ह्या पत्रावरून नांव लौकिकाच्या ईर्षेने ही मंडळी स्थापन झाली होती असें दिसतें.

भालदाराची काठी, सोन्याचा वर्ख, टोप व गंगावने, ब्रह्मदेवाचा मुखवटा व मोतीं असे जिन्नस मुंबईपुण्याहून नाटकवाले मागवीत असत. "मोत्यांची जोडी जी पुण्यास एक रुपयास मिळते ती येथें (मुंबईस) तीन चार आण्यास मिळते." वगैरे.

नाटकवाल्यांना वर्तमानपत्रांचे वर्गणीदार होणें हें भूषण वाटूं लागलें होतें. "आजपासून पुण्यांतील ज्ञानप्रकाश पत्र घेण्याकरिता तिकडे लिहून पाठविलें आहे. आमच्या कृत्यास वर्तमान पत्रें हें भूषण आहे. यामुळे पत्रें घेण्यास प्रारंभ केला आहे.

नाना सोहोनी यांचें पत्र.
शके १७७७

चिपळूणकर हे या नाटकमंडळीचे उत्पादक होते असें मानण्यास बाबा आडकर याच्या पत्रांत आधार मिळतो. "जसी श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपासाहेब सांगलीकर यांनी गोष्ट आरंभून तो प्रकार सिद्धीस नेला, त्याप्रमाणेच आपली कीर्ति जगांत झाली."

या नाटकाला लोकाश्रय ठिकठिकाणीं चांगला मिळत होता हें खालील उताऱ्यांवरून दिसून येईल.

"नगर येथें आमचीं नाटकें रासा सुद्धां चार झाली. येथील मुन्सफ सदाशिवपंत भाऊ यांचा लोभही आम्हांवर फार आहे." "येथील (नगर) लोकांनी राहण्याचा फारच आग्रह केला. बडे लोकांकरिता घरगुती एक नाटक केलें. वांबूरीचे लोक येथें आम्हांस बोलाविण्यास आले आहेत याज करितां तेथें जाणार. येथील लोक आमच्या नादीं फारच लागले आहेत."

"दिपोटी, कलेक्टर, दादोबा पाण्डुरंग आणि प्रिन्सिपॉल सदर अमिन, सदाशिवपन्त गोडबोले वगैरे बडे बडे कामदार लोकांची मुलाखत झाली. या लोकांच्या मनांतून नाटक पहाण्याचा हेतू फारच आहे. आणि हे लोक आम्हास बहुत प्रकारें करून सहाय्य करतील हे खास." "श्रीदत्तात्रेय कृपेकरून चांगली वाहवा झाली. येथील (घोडनदी) लोकास नाटक चांगलें वाटून हे लोक आम्हास फारच वळले आहेत

येथील सहाय्यकारी मंडळी आम्हास मेजवानी करणार आहेत." "येथें सरकारने (विंचूरकर) आमचा चांगला बंदोबस्त ठेवला आहे. विंचूरकर सरकारनी मला रास-क्रीडा नाटक सरकारांत केले त्या वेळेस एक पागोटें आणि चांगला दुपेटा आणि ४० रुपये दिले आणि बापूस पागोटें, व कृष्णास पागोटें, मोरभटास पागोटें आणि कांही रुपये दिले. शिवाय कांही मंडळीस रुपये वाटिले खेरीज नाटकाचा पैसा दिला. विंचूरकर यांनी एक पटेवाला दिला आहे. तो आमचेबरोबर येणार." "नाशकास हिंगण्यांच्या वाड्यांत खेळ झाला."

"नासीक मुक्कामीं बाबासाहेब हिंगणे यांचा आधार चांगला आहे. आम्ही त्यांच्याच वाड्यांत उतरलो आहो"

"पुणें सोडल्यापासून दोन हजार रुपये मिळाले"

"जळगांवीं नाटकाचे मक्तेच होत आहेत."

"येथील (अहमदनगर) कामदार दादोबा पांडुरंग व भाऊसाहेब मुनसब वगैरे लोकांची आम्हावर मोठी कृपा आहे. येथें इंदूर सरकारचा दिवाण बाबासाहेब पारनेरकर आले आहेत. त्यांणी आमचें नाटक पाहून फार संतोषीत झाले आणि आम्हास इंदूरास येण्याविषयी आश्वासन दिलें."

"येवले मुक्कामी तीन नाटके केली. मामलेदार गुरुरावजी कानडे याणी आमची बरदास्त चांगल्या प्रकारची ठेवून येथें खेळास जागा न मिळाल्याकारणानें त्यांणी आपल्या घरीं जागा नीट करून मांडव वगैरे घालून तयार केली. त्याला खर्च एकंदर २५।३० रुपये लागला असेल परंतु तो खर्च आमच्यावर अगदी पडला नसून आमची सर्वप्रकारें चांगली बरदास्त ठेवली आहे."

"आम्ही सोलापूरास येऊन आठ दहा दिवस झाले. येथे जागा लष्करांत थेटर करून खेळ चालू जाहले. सरकारची मदत येथें व लष्करांत चांगली आहे. खेळ एक मंदवारीं जाहला व आजचा खेळ आहे. येथें एका दिवसाआड खेळ होत आहे. मिळकत बरीच आहे."

"सीता—स्वयंवर तिकीटे लावून घोडनदीस केले. त्या[illegible]रीज येथील लोकांस बरीच पटली."

यावरून नाटकाची हौस लोकांत किती उत्पन्न झाली [illegible]ी हें दिसून येईल. इतर नाटक कंपन्याचा उल्लेखही या पत्रांतून केलेला आढळतो.

"मुंबईकर नाटकवाले हे धुळें मुक्कामीं आले होते. त्यांचे "सुलोचनाख्यान" नाटक पाहिलें. फारच वाईट होऊन त्यांचा फजिता झाला. सदहू नाटक फारच अभि-मान करून येथें आलें होतें. पण त्याची थट्टा उत्कृष्ट झाली."

"सांगलीकर रामा अवतारी येथें (मुंबई) येऊन दोन खेळ थेटरमध्ये केलें (१) विराटपर्व (२) गोपीचंद" "नाटक झालें. तेथें मंडळी बहुत समाजही मिळाला होता. त्यापैकी कित्येक मंडळी इकडील (शेडाणीची) होती ती आली. त्यांणीं सांगि-

तले की, पूर्वी सांगलीकर यांचेही नाटक पाहिलें. व हेंही (बभ्रुवाहन) पाहिलें नाटक अप्रतीम झालें. असो. जी गोष्ट स्वीकारली तिची वाढवा झाली म्हणजे आनंदच आहे."

चिन्तोपन्त रोजेकर यांचे चिपळूणकर यांस पत्र--

"सांगलीकर बडोद्यासच आहेत. ते तेथून परभोर इंदूरास जाणार असें ऐकिवांत आहे."

"येथें दिक्षि[illegible]नी वाईकर गोविंदभट गोखले वगैरे मंडळी आणवून नवीन नाटकाची तयारी चालवि[illegible] आहे. त्यांत वेदमूर्ति रा. भिकंभट लेले यांचे चिरंजीव आले."

नाटक मंडळ्या स्थापन झाल्यामुळे नाटकांतील वागणुकीचे नियम बनत चालले होते. एखाद्या नटास कोणी बक्षिस दिलें तर त्याच्यावर सत्ता कोणाची यासंबंधीं जो निर्णय झाला तो खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

"तुम्हास अगर नाटकांतील दुसरे कोणास बक्षिस दिलें असेल तर तो पैसा तुमचा आहे असे आम्ही समजत नाहीं. कारण मुख्य नाटकास आरंभ करणार रा. विष्णुपन्त भावे येथे आले आणि त्यांचे नाटकांतील वहिवाटी आहेत त्यांत असा नियम आहे कीं, नाटकांत कोणास जरी कांहीं मिळाले तरी तो पैसा सर्वांनी घ्यावा. तो कोणता म्हटला तरी जे केवळ त्यांत भिक्षुक असतील आणि श्राद्धास, भोजनास जरी कोठे गेले तत्रापि तो पैसा सर्वांचा आणि जे कोणी नाटकास बक्षिस देणारे आहेत ते म्हणजे सर्वांस बक्षिस देतात असे नाहीं. त्याचपैकीं त्याजवर कोणाची मर्जी असते त्यासच पैसा देतात त्याच नाटकांतील कोणी एक मनुष्य जरी असेल तरी चिन्ता नाहीं परन्तु जें नाटक जेथें जातें आणि घरें सोडून मंडळी बाहेर निघाली म्हणजे घरीं येई पावेतो जी काय मिळकत होईल तो जितके नाटकांतील हीसे (?) जात दरमहा खेरीज करून असतील ती त्यांची असें आह्मास सांगितलें."

चिपळूणकर यांचें नाटकवाल्यांस पत्र--

अशा रीतीने नाटकवाल्यांचे खेळ सुव्यवस्थितपणाने चालू होते. तथापि हा उत्कर्ष ज्यांना पाहवेना असे कांहीं लोक त्यांच्या मार्गांत विघ्न आणीत होते. रघुनाथ हरी नाना सोहन्यास लिहितो, "द्वेषी यार्णी तुमचा नाश करावा इतक्या विषयीं बहुत खटपट चालविली आहे. व जे तुमचा वाईट मजकूर छापविणार होते त्यार्णी त्यास आम्हास मिळोन तुमची दुमत घ्यावी म्हणून तजवीज चालविली, परंतु आम्ही ती गोष्ट नाकबूल केल्यामुळे जास्ती द्वेष जाहला आहे. तुम्ही येथे नाही पाहून सांगलीकर मंडळीस आणविण्याची तजवीज करणारांनी केली आहे."

नटामधेही आपसांत भांडणें सुरु झालीं.

"रा. बलवंतराव अभ्यंकर यास नाटकाचे कारभारी म्हणोन गर्व येऊन माझा कंटाळा करितात. असो. निभावलें तोंपर्यन्त राहीन." असें नगराहून कृष्णा रहाळकर चिपळूणकरांस कळवितो. नाना सोहन्याला काढून टाकावा लागला व त्याच्या ठिकाणीं

फाटक सूत्रधार हा आला. परंतु तोही शके १७७८ सालीं नाटकांतून निघाला. नाना सोहन्याला काढल्यावर त्याने एका पत्रांत मंडळीच्या अंतस्थितीबद्दल चिपळोणकर यांस खालील मजकूर लिहिला आहे. "नाटक मंडळी शेंदूर्णीस आहे. खर्चवेंच जाऊन २७५ रुपये त्याजपाशी शिल्लक आहेत. पैसा भिकोबाचे स्वाधीन आहे. बाळा अभ्यंकर वही लिहीतो. कारभार नाना करतो, मुकत्यार बापू आहे. या सर्वत्रांचें चांगलें वैमनस्य आहे. मला त्यांतील मंडळी असें म्हणत होती की, तुम्ही धुळ्यास दुसरें नाटक करा. आम्ही येतो. पुढे इंदूरास या मंडळीची फुटाफूट झाली असे डोकल्याचें नाना एका पत्रांत लिहीतो.

ज्यांची मुलें नाटकांत येत ते कधींकधीं कलेक्टरपर्यन्त तक्रारी करून कुणाच्या तरी सांगीवरून फौजदाराच्या मार्फत नाटक मंडळ्यांना धाक दपटशा दाखवीत. ता. १३ नाव्हेंबर १८५४ रोजीं हिंदू नाटकवाले शहर पुणें यांनी याबद्दल कलेक्टरकडे अर्ज केला. त्यांत ते म्हणतात की, "आम्ही हिंदुधर्माप्रमाणे आजपर्यन्त जे देवाचे अवतार झाले त्यांची स्तुतीवर्णने करून ज्या ज्या अवतारी ईश्वरी व पराक्रमी खेळ झाले ते नाटकांत लोकांस दाखवितो व यांत दोन पैसे उत्पन्न होतात. सबब ज्याचें मनास आलें तो स्वसंतोषें खेळास येतो." जयरामपन्त हातवळणे यांचा मुलगा शिवराम हा आपण होऊन नाटकांत आला. शिवराम याला बापाने अतिशय मारहाण केल्यावरून फौजदार येऊन त्याने शिवराम यास बापाच्या स्वाधीन केलें व कोणाचें मुलास फितवून नाटकांत येऊं दिल्यास तुम्हांस भारी शिक्षा मिळेल अशी नाटकवाल्यास धमकी दिली. यावर नाटकवाल्याचें म्हणणें.

"या हुकुमाचें आधारास कोणाचा अर्ज आहे असे ऐकिवांत नाही. त्याजवर जुलूम जबरी झाली. त्याणे सरकारांत अर्ज केला. त्याचें निराकरण, त्याचे अर्जीप्रमाणे व्हावे ते न झाले हे सरकारमर्जीची गोष्ट आहे. परंतु सदरहू लिहिलेले हुकमाने आम्हावर सक्ती झाली. त्याचा हा हुकूम रद्द व्हावा. निर्वाह चालेल असे फायद्यावर नजर देऊन कोणी मनुष्य या नाटकांत येतो. आम्ही त्याला फितावून आणलें असी तो स्वतः फिर्याद करून पुरावा करील तर हा हुकूम त्यास लागू असावा."

आपलीं मुलें नाटकांत जाऊन बिघडतील ही भीति लोकांस कशी वाटत होती ह्याचें आणखी एक प्रत्यंतर पहा.

श्री

पौ अधिक आषाढ वा। ८
शके १७७७ राक्षसनाम संवत्सरे.

श्रीमंत रा. तात्यासाहेब चिपलोणकर यांसी—

आश्रित भिकंभट लेले वेदो० आशीर्वाद येथील कुशलतागायत अधिक वा ३ पा वाई येथे क्षेम असो. विशेष येथे गोविंदभट गोखले कोणी आहेत. त्यांनी कांही पोरे

जमा करून दशावतारी खेळ तयार केला आहे. त्यांत आमचे चिरंजीव जात असून हल्ली पुण्यास आले आहेत. ही गोष्ट न कर्ता व्यवस्थेने घरांत असावे म्हणोन बहुत यत्न केला. परंतु ते न ऐकतां बेहोष होऊन गोखले मजकूर हे बहुत बदचालीचे असोन त्यांचे छंदास लागून अशी तजवीज झाली आहे. यावरून आपल्यास लिहिले आहे. तर या खेळास वे. रा. नारायण दिक्षित वसेकर यांची मदत आहे असें ऐकल्यावरून मुद्दाम लिहिले आहे. तर आपण वसेकर यास बोलावून आणून सदरहू मजकूर कळवून त्यांत इतकेच व्हावे की आमचे चिरंजिवास त्यांनी खेळांतून काढून टाकावे. नंतर काय ती मदत करीन असे वसेकर यांनी सांगून त्यांतून त्यास काढून आपण दोन गोष्टी सांगून कांही शुद्धीवर आहेत असे वाटल्यास इकडे पाठविण्यास चिंता नाही. तेथे राहतो म्हणत असल्यास ठेवून घेऊन मला लिहावे म्हणजे तेथे राहण्याचीहि तजवीज होईल. त्यांचे बिऱ्हाड शुक्रवारांत खाजगीवाले यांचें विष्णुचे देवळांत आहे. सदरीं लिहिले आहे याचा उपयोग करण्यास आलस होऊं नये. कोणतेहि तऱ्हेने कांही स्थितीवर येईल असे करावें. नाहीपेक्षां या खेळांत घेऊं नये इतके तरी झालेच पाहिजे. इकडून काडल्यानंतर मोरभट गोडबोले याजकडे जातील. तर तेथेही तजवीज ठेविली पाहिजे. येविषयीं यत्न होउन मला डाकमार्गे अथवा कोणी मुद्दाम येणारे आढळल्यास पत्र जलद पाठविण्यात यावे. अनमान होऊं नये. कळावे बहुत काय लिहिणे हे जाहले म्हणजे मला पुण्यास येण्यास ठीक पडेल. लोभ असावा हे विनंति.

स्ने. रा. नारायण दि. यास आशीर्वाद. सदरी लिहिल्याप्रमाणे रा. तात्यासाहेब आपणास कळवितील त्याप्रमाणे आपण अगत्यपूर्वक आमचें चिरंजीवास त्यांतून काढून नंतर काय मदत करणें असेल ती करावी. यांत आपल्यास श्रय जाणून लिहिले आहे. कळावे, हे आशीर्वाद.

---

मुलें नाटकांत फितवून नेलीं जातात याबद्दल १८६५ च्या ज्ञानप्रकाशांत एक पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला होता. किर्लोस्करांचें चरित्र पृष्ठ ५३ पहाणें.

# अभिप्राय

**पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ**:–( लेखक व प्रकाशक श्री. श्री.म. माटे; १९६।७६, सदाशिव पेठ, पुणें नं. २ किंमत १ रुपया ) ह्या २०६ पानांच्या पुस्तकांत शिकंदर, हॅनिबल, सीझर, ख्रिस्त, लूथर, कोलंबस, क्राम्वेल, सोबेस्की व पीटर दि ग्रेट या नऊ पाश्चात्य पुरुषश्रेष्ठांचीं जीवनचरित्रें देण्यांत आलेलीं आहेत. जागतिक संस्कृतीचे घटक म्हणून हे नऊ पुरुषश्रेष्ठ ( कीं पुरुषोत्तम ? ) निःसंशय आजच्या लोकांच्या परिचयाचे झाले पाहिजेत. शाळाकॉलेजांतील विद्यार्थ्यांना यांपैकी बऱ्याच जणांची ओळख होतेच; तथापि इतर माणसांनाहि ( adults ) जगांतील सर्व थोर व्यक्तींची सामान्य माहिती होणें आजच्या सार्वराष्ट्रीय जीवनाच्या काळांत अत्यवश्य आहे. तेव्हा श्री. माटे यांचें हें पुस्तक महाराष्ट्र समाजाच्या बौद्धिक संस्कृतीला पोषकच होईल. त्यांनी यांखेरीज जगांतील इतर अनेक जे पुरुषश्रेष्ठ आहेत त्यांचाहि 'पुरुषश्रेष्ठ-मालिकें'त क्रमशः समावेश करावा.

आता पुस्तकाच्या अंतरंगाकडे वळूं. एखाद्या थोर पुरुषाचें चरित्र लिहावयाचें म्हणजे अनेक कार्यक्षेत्रांत त्याने केलेले पराक्रम वर्णावयाचे अशी पद्धत आहे. पण असें करूं जातां पसारा वाढतो व पुस्तक सामान्य वाचकांना सुबोध आणि चित्ताकर्षक होत नाही. तेव्हा प्रत्येक चरित्रांतील फक्त खाजगी भाग निवडून तो मनोरंजक होईल असा मांडावयाचा हाच योग्य क्रम आहे व त्याचा श्री. माटे यांनी मोठ्या कुशलतेने अंगिकार केला आहे. खाजगी भागापैकी चरित्रकाराने कोणता निवडावा व तो उठावदार करावा याबद्दल वाचकांमध्ये मतभेद राहीलच; तथापि जो भाग राष्ट्रीय गुणांचा पोषक असेल व ज्यांमुळे चरित्रनायकाची प्रसिद्धी झाली तोच गुणगर्भित भाग विशेष विस्तारावा लागेल. याहि गोष्टीकडे श्री. माटे यांनी कांही लक्ष पोंचविलेलें दिसून येतें. श्री. माटे यांची भाषासरणी मात्र रूढीमार्गाहून अगदीच निराळी आहे. ती कोणाला अगदी अनागरी म्हणून आवडेल तर दुसऱ्या कोणाला प्रस्तुत सुसंस्कृत भाषेच्या अमदानींत अगदी अननुकरणीय किंबहुना गर्हणीय वाटेल. आज जुने आणि खेडवळ वाक्प्रचार –प्रयोग पुन्हा रूढ करावे कीं नाही हा प्रश्न वादाला निघूं पहातो व त्याचा एकदम निर्णय लागणें अशक्य आहे. तेव्हा श्री. माटे यांचे 'शिपायांचें पेंव पोलंडवर फुटलें', 'समुद्रास गरगरून भरतें आलें', 'इ. स. १४८६ च्या वसंतांत कोलंबस राजधानीस आला', 'अगदी कदरून गेल्यामुळे', 'ऐदी प्रतिष्ठितांचा लोंबाळा', 'मगरमिठी झिंजाडून', वगैरे शब्द आणि वाक्यें यासंबंधी योजलेले प्रयोग चांगले कीं वाईट ठरविणें हें वाचकांच्या आवडीनिवडीवरूनच ठरणार. असो. एकंदरींत या तऱ्हेचीं पुस्तकें मराठी भाषेंत निघून भाषेला नवें तेज चढत आहे ही गोष्ट कोणाहि भाषाभिमान्याला आनंददायकच वाटेल.

**चिंतामण गणेश कर्वे**

**लोकशिक्षण**—या मासिकाचा ताजा अंक नुकताच हातीं आला. मासिकाचे संपादक रा. जांभेकर यांनी सदर मासिक आजमित्तीपर्यंत उत्कृष्ठ प्रकारें चालविलें आहे. कै. नाना ओक यांच्या वेळीं या मासिकाचा जो दर्जा होता, तोच दर्जा, रा. जांभेकर यांनी स्वतःस तोशीस

लावून कायम राखिला, याबद्दल कौतुक वाटतें. तथापि, या कौतुकाबरोबर, रा. जांभेकर यांनी स्वतःस कितपत तोशीस लावून घ्यावी, याचा विचार महाराष्ट्राने आपलेपणाच्या भावनेने करण्याची वेळ सांप्रत आली आहे, असेंहि आम्हांस वाटतें. चटोर व हीन दर्ज्याच्या मराठी वाङ्मयास उत्तेजन देण्यापेक्षा मराठी भाषेंतील निरनिराळ्या शाखांतील विद्वानांनी आपल्या लेखांनी अलंकृत केलेल्या या मासिकाला जर महाराष्ट्राने उचलून धरिलें, तर मराठी वाङ्मयांत चांगली भर पडेल व सांप्रतप्रमाणे संपादकांना मासिकाची अडचणीची स्थिति प्रसिद्ध करण्याची वेळ येणार नाही. निदान या अंकांत संपादकांनी जी एक ग्रंथावलीची योजना मांडिली आहे तिला तरी भरपूर आश्रय मिळणें जरूर आहे. या आमच्या सूचनेचा महाराष्ट्राकडून अव्हेर होणार नाही अशी आम्हांस पूर्ण आशा आहे. या मासिकांत कोणकोणत्या विद्वानांचे लेख येतात त्यांची (चालू वर्षांतील) नांवें या अंकांत संपादकांनी दिली आहेत; त्यांवरून व सदर लेखकांच्या नांवांवरूनहि लोकशिक्षणाच्या कार्यांची ठोकळ रूपरेखा वाचकांच्या लक्ष्यांत येईल. या अंकांत नेहमीप्रमाणे ऐतिहासिक, काव्यात्मक, राजकीय वगैरे विषयांवरील लेख आले आहेत; त्यावरून व आजपर्यंच्या या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या एकंदर लिखाणांवरून सदर मासिकाने महाराष्ट्रांतील नियतकालिकांत श्रेष्ठ प्रतीचें स्थान मिळविलें आहे या बद्दल कोणास शंका राहणार नाही! उत्तेजनार्थ आश्रय देणें अवश्य तर आहेच, पण शिवाय उत्कृष्ट मासिकाचा ग्राहक होण्यांत खऱ्या विद्वानास भूषणच वाटलें पाहिजे. तथापि सुशिक्षित व विद्वान म्हणून मानल्या जाणाऱ्या गृहस्थांचीं "नको" चीं पत्रें वाचलीं म्हणजे मात्र कांही वेळ मन भावी स्थितीविषयी उद्विग्न झाल्या शिवाय रहात नाही. श्री. जांभेकरांची नवीन योजना यशस्वी होवो असें आम्ही इच्छितों.

ना. गो. चापेकर

**रणदिवे यांची कविता भाग १ ला:—** (प्रकाशक— प्रभाकर दत्तात्रय रणदिवे, कागल किं. १२ आणे) जैनांच्या पौराणिक कथांतील विविध काव्यमय प्रसङ्गांना अनुलक्षून असलेली रणदिव्यांची सारी कविता या भागांत प्रसिद्ध केलेली आहे. धर्माच्या आपुलिकीमुळे मराठी जैनांसहि वाचनीय वाटेल यांत शङ्काच नाही, पण मराठी भाषा ही महाराष्ट्रांतील अमूक एका धर्मांची अथवा जातीची मिरास नसून ती अवघ्या मराठ्यांची आहे. रणदिवे यांची जैनविषयक कविता तिच्यांतील भावनातरङ्ग, शब्दलालित्य व ओघ इत्यादि गुणांमुळे सर्व मराठी जैनेतरांसहि वाचनीय अशी झाली आहे. त्यांनी मराठी भाषेची चांगलीच सेवा बजाविली आहे. 'प्रभावना' ही कविता विशेष संस्मरणीय वाटते. रणदिवे यांनी संग्रहित करून ठेविलेल्या दुसऱ्या भागाचें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा सुयोग मराठी वाचक— जैन व जनैतर— लौकरच आणतील अशी आशा आहे.

माधवराव पटवर्धन

**पृ. ३०१ व ३०२ हीं पानें वाचतांना खालील दुरुस्त्या अवश्य कराव्या.**

पृ. ३०१ ओ. २७ 'स्टेशन आहे' या पुढे 'डॉ. बार्नेट यांनी आपलें मत' हे शब्द वाचावे.

पृ. ३०२ ओ. ४ व ६ 'रट्टनुरु' ऐवजीं 'रट्टनूरु'

पृ. ,, ,, ७ 'रट्टांचें' ऐवजीं 'रट्टाचें'

पृ. ,, ,, १६ '॥' पुढे 'असा उल्लेख आहे.' हे शब्द वाचावे.

## पुणें येथें श्री. कुलकर्णी यांचे मार्फत झालेला जमाखर्च

### आक्टोबर १९३१

| | | | |
|---|---|---|---|
| मागील महिन्यांतील शिल्लक | रु. २२//३ | ना. गो. चापेकर (वर्गणी वसुलीचे) | रु. ६६ |
| वर्गणी | रु. २८७/४ | सुं. भा. वैद्य (व. वसुलीचे) | रु. ७ |
| एकूण जमा | रु. ३०९/४/३ | छपाई रु. | ९० |
| | | टपालखर्च रु. ६/८, ,, अंकासाठीं रु. ४०/१२/३ | रु. ४७/४/३ |
| | | प्रचार कार्यासाठी रु. | १ |
| | | हमाली | /६ |
| | | पगार कारकून सप्टेंबर | रु. ७ |
| | | एकूण खर्च | रु. २१८/१०/३ |
| | | शिल्लक | रु. ९०/१० |
| | | एकूण | रु. ३०९/४/३ |

### नोव्हेंबर १९३१

| | | | |
|---|---|---|---|
| मागील महिन्यांतील शिल्लक | रु. ९०/१० | छपाई | रु. १९० |
| देणगी रु. | १०० | ना. गो. चापेकर (वर्गणी वसुलीचे) | ,, ७५/८ |
| वर्गणी रु. | १३७/८ | प्रचार (हैद्राबाद) | रु. २४/२ |
| एकूण जमा | रु. ३२८/२ | पगार; कारकून आक्टोबरचा | रु. ७ |
| | | टपालखर्च | रु. ५/९ |
| | | अंक वाटणें | ,, २ |
| | | सादील | ,, १/४ |
| | | पोस्त | /८ |
| | | बट्टा | /४ |
| | | किरकोळ | /४ |
| | | एकूण खर्च | रु. ३०६/७ |
| | | शिल्लक | रु. २१/११ |
| | | एकूण | रु. ३२८/२ |